## प्रकरण पहिले

त्या अचानक पसरलेल्या नीरव शांततेची जाणीव होताच कुझ्नेत्सोव दचकून जागा झाला. एव्हाना असल्या नि:स्तब्ध शांत वातावरणाची त्याची सवय गेली होती. एकदम त्याच्या मनात विचार चमकला: आपण आगगाडीतून खाली उतरतोय! आपण थांबलो आहोत. मला कुणीच कसे जागे केले नाही?

वरच्या बर्थवरून त्याने खाली उडी मारली. सकाळ नुकती उजाडत होती व बाहेर गोठवणारी थंडी होती. डब्याच्या सताड उघडया दारांमधून थंडगार वारा आत घुसत होता.

त्या मालवाहू डब्यात कुणीही नव्हते. झोपण्याच्या लाकडी फळयांवर वाळलेले गवत इतस्तत: विखुरले होते, तांबूस चकाकत्या छोटया बंदुकांचा ढीग पायाशी पडला होता, अनेक खोकी उघडी पडली होती. बाहेर कुणीतरी जोरजोराने आपले हातमोजे आपटून स्वच्छ करीत होते, सकाळच्या त्या नि:स्तब्ध वातावरणात नमदी बुटांखाली चुरडल्या जाणाऱ्या बर्फाचा चुरचुर आवाज ऐकू येत होता आणि अनेक लोकांचे आवाज कानांवर आदळत होते.

"मंडळी, स्तालिनग्राद कुठं आहे?"

"आपण आगगाडीतून उतरत नाही वाटतं? अजून काही तसा हुकूम झालेला नाही. दोन घास पोटात ढकलायला आपल्याला वेळ मिळेल. अजून आपण तिथं पोचलो नाही असं वाटतं. अरेच्चा, आपली पोरं खाणं घेऊन आली बघा!"

आणि कुणीतरी आपल्या घोगऱ्या, उत्साही आवाजात म्हणाले:

"आकाश किती स्वच्छ सुंदर दिसतंय! लौकरच त्यांची आपल्यावर धाड पडेल. त्यांना ही अगदी योग्य वेळ आहे!"

अंगाला आळोखेपिळोखे देऊन कुझ्नेत्सोवने सुस्ती उडवली आणि तो दारापाशी गेला. झळझळीत सूर्यप्रकाशात चमकणाऱ्या बर्फाच्या त्या चकचकीत उजेडाने त्याचे डोळे किलकिले झाले आणि थंडगार चावरा वारा एकदम त्याच्या गळयाला झोंबला.

स्तेप प्रदेशाच्या मध्येच आगगाडी थांबली होती. डब्याशेजारी माणसे गटांनी उभी होती, एकमेकांचा आडोसा घेत होती व ऊब आणण्यासाठी अंगाच्या दोन्ही बाजूंना चापटचा मारीत होती. साऱ्यांचे डोळे एकाच दिशेला वळलेले होते.

आगगाडीच्या मध्यभागी एका उघडचा डब्यात सैन्याचा मुदपाकखाना होता. त्या सकाळच्या धूसर गुलाबी वातावरणात मुदपाकखान्यामधून धुराची वेटोळी उमटताना दिसत होती. त्याच्या नेमक्या विरुद्ध दिशेला, बर्फाच्या ढिगांमधून हळूच डोकावणाऱ्या छोटचाशा स्टेशनच्या एकमेव इमारतीचे लाल छप्पर चकाकत होते. हातात भांडी घेतलेले सैनिक डब्यांपासून मुदपाकखान्याच्या व स्टेशनच्या दिशेने धावत होते. मुदपाक-खान्याच्या व स्टेशनजवळच्या विहीरीच्या भोवती पायघोळ कोटांची व दुलईदार जाकीटांची झुंबड उडाली होती. सारी आगगाडी जणू पाणी उपसण्याच्या व न्याहरीच्या तयारीत गुंतल्यासारखी भासत होती.

एकमेकात धक्काबुक्की करणारी व पाय आपटीत उभी असलेली ती माणसे लेफ्टनंट दृष्टीस पडताच हुश्शार पवित्र्यात उभे राहण्याऐवजी केवळ मिनिटभर बोलायची थांबली (साल्यांना, एवढचात माझा धाक वाटेनासा झाला! कुझ्नेत्सोवच्या मनात विचार आला); प्रत्येकाच्या भुवयांवर, कानांवरच्या लोकरी आवरणांवर आणि पायघोळ कोटाच्या दुमडलेल्या कॉलरवर गोठलेल्या दंवाचा हलकासा थर बसला होता. एक नंबरच्या तोफेवरच्या उंच व पिळदार बांध्याच्या सार्जंट नेचायेवने आपले खांदे उडवले. अतिपूर्वेकडील काफल्यामधील या खलाशाच्या चेहऱ्यावर असंख्य बारीक तीळ होते, त्याने तिरपे कल्ले ठेवले होते व ओठांवर बारीक काळी मिशी राखलेली होती.

"कॉम्रेड लेफ्टनंट, तुम्हाला जागं करायचं नाही असा आम्हाला हुकूम होता. रात्री तुम्ही पहाऱ्यावर होता असं उखानोव म्हणाला. सध्या तरी आणीबाणीचं कसलंही चिन्ह नाही."

"द्रोझ्दोवस्की कुठाय?" बर्फावरून परावर्तित होऊन डोळयात

घुसणाऱ्या चकाकत्या प्रकाशकिरणांमुळे कुझ्नेत्सोवला अजूनही डोळे बारीक करून बघावे लागत होते.

"त्यांची आंघोळ चाललीय कॉम्रेड लेफ्टनंट," डोळे मिचकावून नेचायेव म्हणाला.

डब्यापासून सुमारे वीस मीटर अंतरावर, तोफखान्याचा प्रमुख लेफ्टनंट द्रोझ्दोवस्की उभा असलेला कुझ्नेत्सोवने पाहिला. आपल्या जन्मजात लष्करी वागणुकीमुळे आणि फिकट, निमुळत्या चेहऱ्यावरील करारी भावामुळे, तोफखाना विद्यालयातही द्रोझ्दोवस्की सर्वोत्कृष्ट छात्र ठरला होता व सर्व अधिकाऱ्यांचा आवडता होता. आता साऱ्या लोकांच्या समोर कमरेपर्यंत उघडयाबंब अवस्थेत उभा राहून, आपल्या पिळदार देहाचे प्रदर्शन करीत, बर्फाने खसखसा घासून तो शांतपणे आपले शरीर स्वच्छ करीत होता. त्याच्या रसरशीत गर्दनीतून, खांद्यांमधून, केसविहीन छातीमधून व सपाट पोटामधून वाफेचे अंधुक लोट उठत होते; या बर्फाच्या स्नानामध्ये एक प्रकारचा दिखाऊ डौल होता.

"एकप्रकारं हे योग्यच आहे," कुझ्नेत्सोव गंभीरपणे म्हणाला.

पण आपण मात्र असे करणार नाही याची त्याला खात्री होती म्हणून त्याने डोक्यावरची टोपी काढून पायघोळ कोटाच्या खिशात कोंबली, गळपट्टीची बटणे मोकळी केली आणि डब्यापासून काही पावले अंतर चालून हिमखंडाच्या एका तुकडयाच्या कडेचा घट्ट, खरखरीत बर्फ खरवडून त्याने मुठीत घेतला व गारठून कातडीला वेदना होईपर्यंत त्याने आपले गाल व हनुवटी बर्फाने खसखसा चोळली.

"ओ हो ऽ काय आश्चर्य! तू खास आम्हाला भेटायला आलीस?" त्याने नेचायेवचा नाटकी आनंद व्यक्त करणारा आवाज ऐकला. "तुला पाहून आम्हाला किती किती आनंद झाला म्हणून सांगू! लाडके झोया, सारा तोफखाना तुझं स्वागत करतोय!"

कुझ्नेत्सोवने मागे वळून पाहिले. हसऱ्या सैनिकांच्या मध्यभागी तोफखान्याची वैद्यकीय मदतनीस झोया येलागिना पांढऱ्याशुभ्र मेंढकातडी कोटात, पांढऱ्या नमदी बुटात व विणलेल्या पांढऱ्या लोकरी हातमोजात उभी होती. तिच्या पेहरावात लष्करी झाक अजिबात दिसत नव्हती. कुठल्यातरी दूरच्या शांत जगामधून, हिवाळ्यासाठी छानदार कपडे घालून आलेल्या आनंदी व्यक्तीसारखी ती दिसत होती. झोया

द्रोझ्दोवस्कीला पहात होती, तिच्या नजरेत हसू दाबल्यामुळे तिचे डोळे चकाकत होते. तिच्या अस्तित्वाची त्याला अजिबात कल्पना नव्हती. तो आपल्या गुलाबी शरीराचे मर्दन करण्यात, खांद्यांवर व पोटावर चापट्या मारण्यात, थोड्या नाटकी आविर्भावात दीर्घ श्वसनाचे प्रयोग करण्यात मग्न होता. आता झोयाच्या चेहऱ्यावर जो भाव होता त्याच मुद्रेने सारेजण त्याच्याकडे पहात होते.

"लेफ्टनंट!" झोयाने आपल्या भिंगरीसारख्या आवाजात हाक मारली. "आपलं स्नानकर्म केव्हा आटोपेल हे मी विचारू का? मी आपल्याला हजरी देऊ शकते का?"

लेफ्टनंट द्रोझ्दोवस्कीने आपल्या छातीवरचा बर्फ झटकला आणि एखाद्याला कामात अडथळा आणल्यानंतर तो जशी मुद्रा करील तशा आविर्भावात त्याने कमरेचा टॉवेल थोडा सैल केला आणि घुश्शातच परवानगी दिली.

"बोल.."

"गुड मॉर्निंग, कॉम्रेड तोफखाना कमांडर!" तिने औपचारिक अभिवादन केले. कुझ्नेत्सोव त्यावेळी हातरुमालाने आपला चेहरा पुसत होता. बर्फाचा बारीक थर बसलेल्या तिच्या भुवयांची टोके थरथरत असल्याचे त्याच्या दृष्टीला पडले. "मी काही कामासाठी तुम्हाला भेटायला आले आहे. तुमच्या तोफखान्यातील लोक काही वेळ माझ्याकडं लक्ष देतील का?"

कोणतीही घाई न करता, द्रोझ्दोवस्कीने आपला टॉवेल मानेभोवती टाकला आणि तो डब्याकडे चालू लागला. वाफेचे स्नान घेतल्याप्रमाणे त्याचे खांदे चकाकत होते, भुरकट रंगाचे त्याचे आखूड केस दमट ओलसर झाले होते आणि आता अधिकच गडद निळ्या, पारदर्शी दिसणाऱ्या आपल्या डोळ्यांमधून तो डब्याशेजारच्या लोकांच्या जमावाकडे कठोर नजरेने पहात पुढे चालला होता.

जवळ जाता जाता सहज सुरात तो म्हणाला, "तुम्ही कशाला आला आहात याचा मी तर्क बांधू शकतो. आठ नंबरच्या तपासणीसाठी तुम्ही तोफखान्याकडं आला आहात? आमच्या इथं उवा नाहीत."

"लाडके झोया," झोयाच्या गुडघ्यापर्यंतच्या लांब कोटावर व तिच्या पाठीवरच्या प्रथमोपचाराच्या थैलीवर सहज नजर टाकीत नेचायेव सामील

झाला. "आमचा तोफखाना अगदी तंदुरुस्त आहे. अगदी सूक्ष्मदर्शक यंत्र घेऊन पाहिलंस तरी इथं तुला एक बारीक कीटाणू सापडणार नाही. तू चुकीच्या पत्त्यावर आलीस... आणि रात्री तुला झोप कशी काय लागली? तुला कुणी त्रास दिला नसेल अशी मला आशा आहे!"

"नेचायेव, तू फार बकबक करतोस!" द्रोझ्दोवस्कीने एकदम त्याचे बोलणे तोडले आणि झोयाच्या अंगावरून सरळ चालत जाऊन भराभरा डब्याच्या लोखंडी पायऱ्या तो चढला. मुदपाकखान्यातून नुकत्याच परतलेल्या सैनिकांनी डबा गजबजला होता. त्यांच्या हातातल्या भांड्यांमध्ये वाफाळणारा सूप होता व जवळ कुरकुरीत पावाच्या तुकड्यांनी भरलेली तीन तीन पाकिटे होती. नेहमीप्रमाणे रेटारेटी करीत त्यांनी खालच्या फळ्यांवर कुणाचातरी पायघोळ कोट पसरला आणि पाव कापण्याच्या तयारीला ते लागले; त्यांच्या भेगाळलेल्या चेहऱ्यांवर कामात गुंतल्याचा भाव होता. द्रोझ्दोवस्कीने आपला आखूड लष्करी कोट अंगात चढवला आणि पट्ट्याखाली खेचला.

"शांत रहा! हा असा गोंधळ केल्याशिवाय तुम्हाला काही करताच येत नाही काय? मला शिस्त दिसली पाहिजे! सार्जंट नेचायेव, असा नुसता बघत काय उभा राहिलास? खाण्याचं नीट वाटप करण्याची व्यवस्था कर. या कामात तू पटाईत असशील अशी माझी समजूत होती! तुझ्याशिवाय वैद्यकीय तपासनीसाची काळजी घेतली जाईल."

सार्जंट नेचायेवने झोयासमोर दिलगिरीदर्शक मान झुकवली आणि तो डब्यात चढला.

"मंडळी, काय गोंधळ मांडलाय. जरा सबुरीनं घ्या बघू!! एखाद्या रणगाड्यांच्या अख्ख्या स्क्वाड्रनएवढा आवाज करताय."

त्या आज्ञा, शिधावाटप करताना लोकांनी चालवलेला गोंधळ या गोष्टी झोयाच्या नजरेला पडताहेत आणि तिच्या अस्तित्वाची दखल न घेता लोक वागताहेत हे पाहून कुझ्नेत्सोव शरमिंदा झाला. त्याला खेळकर शब्दात तिला एवढेच सांगावेसे वाटत होते, "आमच्या पलटणींची तपासणी करण्याची तुला गरज नाही, पण तुला पाहिल्यावर आम्हाला बरं वाटतं हे तेवढंच खरं आहे." पण हे तो प्रत्यक्ष बोलला असता तर अधिकच लाजला असता.

ज्या ज्या वेळी झोया तोफखान्याच्या पथकात येत असे त्या त्या वेळी प्रत्येकाला असेच उथळ बोलण्याचा मोह का होत असे हे त्याला स्वत:लाही अद्याप उमगले नव्हते. या क्षणाला त्यालासुद्धा तशाच पद्धतीने बोलायची अनावर इच्छा झाली होती. तिचे आगमन म्हणजे प्रत्येकाच्या दृष्टीने काहीतरी अत्यंत महत्त्वाची बाब आहे असेच जणू त्या अप्रत्यक्ष, सूचक, खेळकर बोलण्यामागचा अर्थ असायचा. तिचा अजूनही झोपाळू दिसणारा चेहरा, तिच्या डोळ्याखालची वर्तुळे, तिचे ओठ पाहताना सबंध प्रवास ती ज्या वैद्यकीय पथकाच्या डब्यातून करीत होती, तेथील तरुण डॉक्टरांशी तिचे काही गोड गुपित असावे असेच कुणालाही वाटले असते. पण दरवेळी आगगाडी थांबल्यावर ती तोफखाना पथकापाशी केवळ स्वच्छतेची पाहणी करण्यासाठी काही येत नाही, अशी कुझ्नेत्सोवची धारणा झाली होती. तिला द्रोझ्दोवस्कीला पहावयाचे असे.

"झोया, तोफखान्यात सारं काही आलबेल आहे," तो म्हणाला. "तपासणीची काही गरज नाही. विशेष म्हणजे आता न्याहरीची वेळ आहे."

झोयाने तात्काळ खांदे उडवले.

"किती पण सभ्य माणसांचा डबा! शिवाय एकही तक्रार नाही. एवढा भाबडा चेहरा करायची काही गरज नाही–तुला शोभत नाही!" आपल्या पापण्यांची उघडझाप करीत कुझ्नेत्सोवला न्याहाळीत ती म्हणाली. तिच्या ओठांवर एक वेगळेच हसू खेळत होते. "आणि तुमच्या लाडक्या लेफ्टनंट द्रोझ्दोवस्कीच्या बाबतीत बोलायचं तर, त्याच्या ह्या असल्या बर्फातल्या आंघोळीनंतर आघाडीऐवजी तो इस्पितळात दिसण्याचीच शक्यता अधिक आहे."

"पहिली गोष्ट म्हणजे तो माझा लाडका नाही," कुझ्नेत्सोव उत्तरला. "आणि दुसरी म्हणजे..."

"प्रामाणिक बोलल्याबद्दल आभारी आहे कुझ्नेत्सोव. आणि दुसरी काय? दुसरी गोष्ट म्हणजे माझ्याबद्दल तुला काय वाटतं?"

एव्हाना द्रोझ्दोवस्कीचा जामानिमा पुरा झाला होता. कमरेचा पट्टा घट्ट करून व पिस्तूलाची चामड्याची नवी पिशवी पायघोळ कोटाभोवती लटकावून त्याने हलकेच बर्फावर उडी मारली आणि कुझ्नेत्सोव व झोयाकडे एक कटाक्ष टाकून सहज स्वरात तो म्हणाला,

"मी आजाऱ्यांच्या यादीत माझं नांव दाखल करून घ्यायचा प्रयत्न करतोय असं तुला सुचवायचं आहे का झोया?"

झोयाने मानेला एक झटका दिला.

"कदाचित. तसं घडण्याची केव्हाही शक्यता आहे."

"ऐका तर मग," द्रोझ्दोवस्की ताडकन म्हणाला. "तुम्ही शाळेतल्या मास्तरीण नाहीत किंवा मी तुमचा एक विद्यार्थी नव्हे, कृपा करून तुमच्या डब्याकडं परत जा. समजलं? लेफ्टनंट कुझ्नेत्सोव, मी बटालियन कमांडरना हजरी देऊन येईपर्यंत तोफखान्याची जबाबदारी तू सांभाळ."

डब्यांभोवती विखुरलेल्या लोकांचे सलाम घेत, जातिवंत अधिकाऱ्याच्या ऐटीत पावले टाकीत, ताठ मानेने द्रोझ्दोवस्की तिथून निघाला. त्याला पाहताच ते लोक त्याला वाट करून देत व गप्प रहात. तो चालत असताना आपली वाट जणू नजरेने जमावातून कापत जात होता व मनगटाची किंचित हालचाल करून त्यांच्या सलामांना प्रत्युत्तर देत होता. त्या झगमगणाऱ्या पांढऱ्याशुभ्र स्तेपवर ओठंगलेल्या सूर्याभोवती थिजलेल्या धुक्याची इंद्रधनुष्ये पडली होती. विहीरीभोवती लोकांची सतत वर्दळ होती; माणसे पाणी उपसत होती, टोप्या उतरवून तोंड धूत होती, धापा टाकीत होती, नाक शिंकरीत होती, शहारत होती आणि हिमाने गच्च आच्छादलेल्या उतारू डब्याभोवती एकत्र जमलेल्या बटालियन कमांडरांच्या घोळक्याला शिताफीने टाळून आगगाडीच्या मध्यावर असलेल्या धूर ओकणाऱ्या मुदपाकखान्यांकडे धावत होती.

द्रोझ्दोवस्की कमांडरांच्या याच गटाकडे येत होता.

आपले किंचित तिरपे डोळे सताड विस्फारून झोया त्याच्याकडे पहात होती आणि तिच्या चेहऱ्यावर एक चमत्कारिक असहाय भावना उमटलेली कुझ्नेत्सोवच्या लक्षात आली.

"आमच्याबरोबर न्याहरी घ्यायला तुला आवडेल का?"

"काय?" विमनस्कपणे तिने विचारले.

"आमच्याबरोबर न्याहरी घे. तू अद्याप काही खाल्लेलं नाहीस ना?"

"कॉम्रेड लेफ्टनंट, सारं काही गार होतंय! आम्ही तुमची वाट पाहतोय!" नेचायेव गाडीच्या दरवाजातून ओरडला. "आहा! वाटाण्याचा सूप!" आपल्या हातातल्या भांड्यातल्या सूपचा चमचाभर

भुरका मारीत व जिभेने मिशा चाटीत तो पुढे म्हणाला, "जर तुमचा श्वास गुदमरला नाही, तर हा सूप मस्त!"

त्याच्या मागून अनेक माणसांचा गोंधळ ऐकू येत होता. त्यांनी आपापल्या पायघोळ कोटांमधून आपला शिधा बाहेर काढला होता व कुणी खुशीत तर कुणी कुरकुरत फळ्यांवर बसून न्याहरीला लागले होते. भांड्यातल्या सूपात चमचे बुडवताना किंवा पावाच्या गोठलेल्या काळ्या तुकड्यांमध्ये दात खुपसताना कुणाचेही आता झोयाकडे लक्ष नव्हते.

"चिबिसोव!" कुझ्नेत्सोवने हाक मारली. "माझं भांडं वैद्यकीय तपासनीसांना दे!"

"या, नर्सबाई या की! आमच्यात न्याहरी कराया येता का?" चिबिसोवने डब्यातूनच आपल्या गावरान बोलीत साद घातली. "हितं मस्त सौंगडी जमल्यात!"

"ठीक आहे," अजूनही तिची मन:स्थिती हरवलेली होती. "कदाचित.... हो हो, लेफ्टनंट कुझ्नेत्सोव, अर्थात. माझी न्याहरी अजून झालेली नाही. पण तुमच्या वाटचा शिधा मी का म्हणून घेऊ? आणि तुमचं काय?

"मी नंतर खाईन. मी उपाशी नक्की राहणार नाही," कुझ्नेत्सोव उत्तरला.

घाईघाईने चघळत चिबिसोव दाराशी आला, उलटया वळवलेल्या कॉलरमधून दाढीचे खुंट वाढलेला आपला बारीक चेहरा थोड्या अधिक औत्सुक्याने त्याने बाहेर काढला आणि जणू काही लहान मुलांचा खेळ खेळावा त्याप्रमाणे त्याने झोयाला जवळ येण्याची खूण केली. त्याच्या छोटया आकृतीवर चढवलेला तो भला मोठा कोट व एकूण त्याच्या हालचाली मोठ्या गंमतीदार भासत होत्या.

"ए तरुण पोरी, आत ये. लौकर!"

"मी तुझ्या डब्यातलं थोडंसं खाईन," झोया कुझ्नेत्सोवला म्हणाली. "पण तू सुद्धा खाल्लं पाहिजे. नाहीतर मी मुळीच हात लावणार नाही."

समाधानाचे सुस्कारे टाकीत व ढेकर देत लोक न्याहरी करीत होते; गरम सूपाचे पहिले काही चमचे पोटात गेल्यावर व गरम नरम चहाचे घुटके घेतल्यावर पुन्हा एकदा त्यांच्या प्रश्नार्थक नजरा झोयाकडे

वळल्या. आपल्या नव्या मेंढकातडी कोटाची बटणे तिने मोकळी टाकल्यामुळे तिचा पांढरा गळा मोकळा पडला होता. आपल्या गुडघ्यांवर कुझ्नेत्सोवचा डबा धरून ती अत्यंत काळजीपूर्वक खात होती आणि लोकांच्या नजरा चुकविण्यासाठी तिने नजर खाली वळवली होती.

कुझ्नेत्सोवही तिच्याबरोबर खात होता. ती ओठांशी चमचा कसा नेते व गिळताना तिच्या गळ्याची हालचाल कशी होते ते न पाहण्याचा तो प्रयत्न करीत होता; तिच्या खाली वळवलेल्या पापण्यांवरील हिम वितळल्यामुळे त्या एकमेकींना चिकटल्या होत्या व त्यांचा रंग अधिक गडद काळा दिसत होता. तिच्या डोळ्यातली चलबिचल त्या पापण्यांखाली दडली होती. स्टोव्हशेजारी खूप गरम होत होते आणि तिने आपली टोपी काढून ठेवली. तिचे पिंगट केस तिच्या पांढऱ्या केसाळ कॉलरवर पडले आणि टोपीविना तिचा चेहरा एकदम कमालीचा मोकळाढाकळा दिसू लागला. घामट, खाण्यानंतर तांबड्याबुंद झालेल्या अनेक गोलंदाजांच्या चेहऱ्यांमध्ये तिचा लहान मुलासारखा भेदरलेला चेहरा, ती वर आलेली गालांची हाडे व रुंद जिवणी, वेगळी उठून दिसत होती. एकाएकी कुझ्नेत्सोवला जाणीव झाली की, ती अजिबात सुंदर नाही. टोपीशिवाय यापूर्वी तिला त्याने कधीही पाहिले नव्हते.

"चाइराच्या* बगीच्यात गुलाबांना बहर येतोय, चाइराच्या बगीच्यात वसंताचा बहर येतोय...."

एका बाकड्यावर तंगड्या फाकवून सार्जंट नेचायेव उभा राहिला होता आणि चहानंतर सिगरेट वळत, स्वत:शीच गाणे गात, मिस्कील नजरेने झोयाकडे पहात होता. चिबिसोवच्या औदार्याला नेहमीपेक्षा जास्त भरती आली होती आणि त्याने पुरता प्याला भरून चहा झोयाला आणून दिला. आपल्या बोटांच्या टोकांमध्ये तिने प्याला धरला आणि ती लाजली.

चिबिसोवचे तिने आभार मानले व किंचित डहुळलेल्या नजरेने नेचायेवकडे पाहिले. "हा बगीचा आणि गुलाब ही सारी काय भानगड आहे सार्जंट? फक्त अशी गाणीच तुम्ही म्हणता का?"

---

*एक रशियन नांव.

या प्रश्नाने पुरुषांमध्ये एकच खळबळ माजली आणि जो तो नेचायेवकडे अपेक्षित नजरेने पाहू लागला.

"ए सार्जंट! दे उत्तर प्रश्नाला. कुठं मिळालं तुला हे गाणं?"

"व्लादिवोस्तोकला," स्वप्नाळूपणे नेचायेव उत्तरला. "समुद्र-किनारा, मग तुफान नाच आणि—'गुलाबांना बहर येतोय...' तीन वर्षं काम करीत होतो. आणि व्लादिवोस्तोकमधल्या मुली... आहाहा—झोया तुला काय सांगू—देखण्या परी, राजकन्या, बॅलेरिना! सबंध आयुष्यभर मला त्यांची आठवण राहील!"

आपल्या खलाशी पट्टयाचे बक्कल त्याने सरळ केले, आपल्या बाहुपाशात जोडीदारीण घेतल्याचे त्याने नाटक केले आणि कमरेला झटका देऊन नृत्याची चार गिरेबाज पावले टाकली.

"'चाइराच्या बगीच्यात वसंताचा बहर येतोय... तुझ्या सोनेरी बटांची मला याद येतेय...' ट्रा-ला-ला-ला...."

झोया बळेच हसली.

"सोनेरी बटा... गुलाब. सार्जंट, गाण्यातले शब्द जरा ओबडधोबड लागताहेत. राजकन्या आणि बॅलेरिना! कधी राजकन्या प्रत्यक्षात पाहिलीय?"

"अगदी गळयाशप्पत, तुझ्या रूपानं पाहतोय. तुझी आकृती हुबेहूब राजकन्येसारखी आहे," नेचायेव धीटपणे उत्तरला आणि इतरांकडे पाहून त्याने डोळे मिचकावले.

तो तिची का थट्टा करतोय? कुझ्नेत्सोवच्या मनात विचार आला. ती इतकी साधी आहे हे पूर्वी माझ्या कसं लक्षात आलं नाही?

"झोया, तू मला ओळखत नाहीस! जर हे युद्ध चालू नसतं ना, तर ऐन मध्यरात्री मी तुला उचलून टॅक्सीत घालून पळवली असती आणि दूर खेड्यातल्या एखाद्या हॉटेलात नेलं असतं नि शॅंपेनची बाटली हातात धरून, तू एखादी राजकन्या आहेस असं समजून तुझ्या पायापाशी बसलो असतो. आणि आपण कश्शा कश्शाची पर्वा केली नसती! कबूल झाली असतीस?"

"टॅक्सीतून? ऐकायला भलतंच रोमॅंटिक वाटतं," लोकांचे हसणे थोडे विरल्यावर झोया म्हणाली. "असा अनुभव मी पूर्वी कधीच घेतलेला नाही."

"माझ्याबरोबर तू सगळे अनुभव घेशील."

आपल्या तपकिरी डोळ्यांनी झोयाला कुरवाळीत नेचायेव अर्धवट थट्टेने म्हणाला, पण कुझ्नेत्सोवने ताडकन् त्याला अडवले.

"पुरे नेचायेव! तीन माणसांएवढी बडबड एव्हाना तू एकट्यानं केली आहेस! काय ही हॉटेलांची बाष्कळ बडबड! काय अर्थ आहे त्यात?... झोया, तू आपली चहा पी."

"तुम्ही सारे इतके चमत्कारिक आहात," झोया म्हणाली आणि तिच्या पांढऱ्याशुभ्र कपाळावर वेदनेची एक आठी उमटली. तिच्या शुभ्र कातडीवर ती आठी अजिबात शोभत नव्हती. तिने चहाचा प्याला स्टोव्हजवळ ठेवला आणि मुद्दाम उर्मट आवाजात ती कुझ्नेत्सोवकडे वळून म्हणाली:

"माझ्याकडं असं काय पाहतोस? माझ्या चेहऱ्यावर काय शोधतोयस? चिमणीतून निघालेली धुराची काजळी? का तूही नेचायेवसारखा त्या कळकट राजकन्यांच्या आणि बॅलेरिनांच्या आठवणी काढण्यात गुंतलायस?"

"लहान मुलांच्या परीकथांमध्ये जे काही वाचलंय तेवढ्यापुरत्याच राजकन्या मला ठाऊक आहेत," कुझ्नेत्सोव उत्तरला व आपला संकोच लपविण्यासाठी त्याने कपाळाला आठी घातली. "प्रत्यक्ष आयुष्यात मला अजून एकही राजकन्या भेटली नाही."

"तुम्ही सारे इतके चमत्कारिक आहात," ती पुन्हा एकदा म्हणाली.

"झोया, तुझं वय काय–अठरा?" नेचायेवने अंदाजाने विचारले. "आम्ही नौदलात म्हणतो त्याप्रमाणं २४ मध्ये तुझं होडगं पालातून बाहेर आलं का? झोया, मी तुझ्यापेक्षा चार वर्षांनी मोठा आहे. हा मोठा फरक आहे."

"चुकीचा अंदाज," आता ती हसत म्हणाली. "कॉम्रेड, पालातून बाहेर पडल्याला मला ३० वर्षे झाली. पुरी तीस आणि तीन महिने."

सार्जंट नेचायेवच्या चॉकलेटी तिळांनी भरलेल्या तपकिरी चेहऱ्यावर कमालीचे आश्चर्य उमटले.

"तुला खरंच स्वतःला तीस वर्षांची म्हणवून घ्यायचंय?" तो चिडवण्याच्या सुरात म्हणाला. "मग तुझ्या आईचं वय काय? ती पण तुझ्यासारखीच आहे? मला तिचा पत्ता देतेस?" त्याच्या हसण्यामुळे

त्याची बारीक मिशी वर उचलली गेली होती आणि त्याच्या शुभ्र दातांवर तिचे दोन भाग झाले होते. "मी तिचा आघाडीवरचा पत्र-मित्र होईन. आम्ही एकमेकांना फोटो पाठवू."

झोयाने नेचायेवच्या उंच, पिळदार आकृतीकडे एकदा तिरस्काराने पाहिले आणि चिरकत्या आवाजात ती उत्तरली.

"तुझ्या समुद्रकिनाऱ्यावरच्या नाचांनी तुला भरपूर फालतू विनोद पुरवलेत! माझ्या आईचा पत्ता पाहिजे? जरूर देते. स्मशान नंबर दोन, पेरेमिश्ल. तू लिहून घेतोस का राहील लक्षात? माझे आईवडील, दोघेही ४१ मध्ये वारले," कडवटपणे ती म्हणाली. "पण नेचायेव, मला नवरा आहे.... अरेच्चा, तुम्ही असे सारे माझ्याकडे डोळे फाडून काय बघताय? मित्रांनो, मी अगदी खरं सांगतेय! मला नवरा आहे."

एकाएकी शांतता पसरली. नेचायेवने मांडलेल्या धाडसी खेळाला आता कुणी उत्तेजना देईना. हे संभाषण ऐकणाऱ्या इतर माणसांनी आपले खाणे थांबवले* आणि त्या सर्वांनी आपल्या नजरा तिच्याकडे वळवल्या. सिगरेटचे जोरजोरात झुरके घेत, झोयाच्या चेहऱ्याकडे व तिच्या खाली वळलेल्या डोळ्यांकडे रोखून पहात काहीशा मत्सरी अविश्वासाने त्याने विचारले; "जर रहस्य नसेल तर तुझा नवरा कोण आहे ते सांगशील? रेजिमेंटचा कमांडर? किंवा एक अफवा आहे की, आमचा लेफ्टनंट द्रोझ्दोवस्की तुला फार आवडतो?"

अर्थात ती खरे सांगत नाही, असे कुझ्नेत्सोवनेही स्वतःला बजावले. झोयाने जे काही सांगितले त्यावर त्याचाही विश्वास बसला नाही. तिने ती सारी बनवलेली कथा सांगितली असावी. तिला नवरा वगैरे कुणी नाही. असणे शक्यच नाही.

"नेचायेव, आता बस्स झालं!" तो मोठ्याने म्हणाला. "मूर्खासारखे प्रश्न विचारायचं बंद कर! तू एखाद्या जुन्या ग्रामोफोनच्या तबकडीसारखा वाजतोस. एवढं तुझ्या लक्षात येत नाही?"

तो उठून उभा राहिला, झोयापासून दूर चालत गेला, छोट्या बंदुकांच्या ढिगावर आणि त्यांच्याशेजारी पडलेल्या हलक्या मशिनगनवर त्याने नजर टाकली.

"तोफखाना नंबर एक, न्याहरीबद्दल आभार!" केसांना झटका देत हसून झोया म्हणाली. तिच्या कपाळावरची आठी आता पुसली

गेली होती. तिने आपली नवी केसाळ किनारीची टोपी घातली व केस तिच्याआत कोंबले. "मला वाटतं ते इंजिन जोडताहेत. तुम्हाला ऐकू येतोय आवाज?"

"पुढचा टप्पा, आघाडी. जर्मनांनो, आम्ही आलो बघा! आम्हाला बघून खूष झालात की नाही?" कुणीतरी वरच्या फळीवरून मोठ्याने म्हणाले व बळेच हसले.

"झोया, लाडके, कृपा करून आम्हाला सोडून जाऊ नको!" नेचायेव म्हणाला. "आमच्या बरोबर रहा. कशाला पाहिजे तुला नवरा! या लढाईच्या दिवसात तुला त्याचा काय उपयोग?"

"दोन इंजिनं जोडल्यासारखा आवाज येतोय," पुन्हा तो वरचा कर्कश्य आवाज उद्गारला. "लौकरच ती आपल्याला तिथं नेतील. पुढचा टप्पा स्तालिनग्राद."

"कदाचित हाच शेवटचा असेल? कदाचित इथंच आपण उतरणार असू?"

"जेवढं लौकर तेवढं बरं," कुझ्नेत्सोव पुन्हा संभाषणात सामील झाला.

"कोण म्हणालं ते इंजिन आहे म्हणून! आयला, तुम्ही नंबरी आहात!" तोफेला बत्ती लावणारा येवस्तिग्नेयेव हा वयस्क सार्जंट म्हणाला. एवढा वेळ तो मोठ्या आरामात प्याल्यामधून चहा पीत बसला होता. आता खाली उडी मारून तो उभा राहिला व डब्याच्या दाराबाहेर वाकून पाहू लागला.

"काय भानगड आहे येवस्तिग्नेयेव?" कुझ्नेत्सोवने त्याला हाक मारून विचारले. "हुकूम?"

त्याने भोवती पाहिले तेव्हा त्याला येवस्तिग्नेयेवचे वर केलेले भलेमोठे डोके दिसले, त्याची नजर अस्वस्थपणे आकाशामध्ये भिरभिरत होती, कुझ्नेत्सोवला त्याचे उत्तर ऐकू आले नाही.

आगगाडीच्या दोन्ही टोकांपासून विमानविरोधी तोफा एकाच वेळी धडाडू लागल्या.

"दोस्तांनो, हे बघा! याचीच आपण खूप वेळ वाट पहात होतो!" कुणीतरी वरच्या फळ्यांवरून खाली उडी मारीत म्हणाले. "आणि ते आता इथं आलेत!"

"काय झकास आहे हे इंजिन! बाँब घेऊन आलंय!"

त्या वरच्या पट्टीतली घरघर विमानविरोधी तोफांच्या गडगडाटात मध्येच लोपत होती, मग दोन मशिनगनच्या फैरींनी डोक्यावरची हवा कापली गेली. "हवाई हल्ला! मेसेर्स!" अशा स्तेपमधून अनेक आरोळ्या उठलेल्या डब्यात ऐकू आल्या, तरी काय घडते आहे याची कुझ्नेत्सोवला अद्याप नीटशी कल्पना आली नव्हती. येवस्तिग्नेयेवने हातातला चहाचा प्याला भिरकावला व शस्त्रांच्या ढिगाकडे तो धावला, झोयाला त्याने धसमुसळेपणाने दाराकडे रेटले. दरम्यान इतरांनी भराभरा फळ्यांवरून खाली उड्या घेतल्या व आपल्या छोट्या बंदुका उचलल्या. चिंतनाच्या त्या एका छोट्या क्षणात कुझ्नेत्सोवने स्वतःला शांत राहण्याबद्दल बजावले. सर्वांत शेवटी मी डबा सोडीन!

"सारे डब्याबाहेर पडा!" त्याने हुकूम केला.

त्या दोन विमानविरोधी तोफांचा कानठळ्या बसविणारा भडिमार एवढ्या जवळून होत होता की, त्यांच्या सतत आवाजाने त्याच्या कानाचे दडे बसले. वेगाने जवळ येणाऱ्या इंजिनांची घरघर ऐकू आली व त्या पाठोपाठ गाडीच्या टपावर मशिनगनच्या फैरींचा पाऊस पडला.

कुझ्नेत्सोव दारापाशी धावला. लोक आपल्या छोट्या बंदुकांसह बर्फावर उड्या टाकीत होते व सूर्याच्या प्रकाशात न्हाणाऱ्या पांढऱ्या स्तेपवर इतस्ततः विखुरत होते. पोटात पडलेल्या गार खड्ड्यासकट त्याने स्वतः खाली उडी मारली आणि काही ढांगांमध्ये एका भल्यामोठ्या बर्फाच्या निळसर ढिगापाशी कुणातरी शेजारी दडी मारली. त्याच्या डोक्यामागे जोरजोराने घणाचे घाव बसावे तसा मोठा कर्कश्य आवाज होत असल्याचा त्याला भास होत होता. बर्फात खुपसलेले डोके मोठ्या कष्टाने वर करून त्याने पाहिले.

निमुळत्या पंखाची, सूर्यप्रकाशात धातूचे आच्छादन चमकावीत तीन मेसेरश्मिट विमाने, त्या प्रचंड हिमनिळ्या प्रकाशाच्या हिवाळी आकाशामधून आगगाडीच्या पुढच्या भागाकडे झेपावत होती.

आगगाडीच्या पुढील व पाठीमागील भागांकडून विमानविरोधी तोफांमधून सतत उडणाऱ्या गोळ्यांच्या उन्हात चमकणाऱ्या अनुक्षेपकांनी त्यांना वेढण्याचा प्रयत्न चालवला होता. त्या विमानांभोवती अनेक गोळे फुटत होते. पण तरीही त्या निमुळत्या आकृती अधिक वेगाने खाली झेपावत येत होत्या, त्यांच्या थरथरत्या मशिनगनमधून आणि

स्वयंचलित तोफेतून आगीच्या लालभडक ज्वाळांचा वर्षाव होत होता आणि डब्यांना अनुक्षेपकांचे दाट सप्तरंगी वलय लपेटत होते. माणसे अजूनही गाडीमधून उड्या टाकीत मैदानात धावत होती.

पहिले फायटर विमान आगगाडीच्या थेट छपरावर आडवे झाले व सबंध गाडीच्या लांबीभर आडवे उडत गेले; इतर दोन विमानांनीही त्या पाठोपाठ तशीच झेप घेतली.

ज्या ठिकाणी इंजिन असायला हवे तेथे पुढच्या भागात, बाँबचा महाप्रचंड स्फोट वातावरण हादरवून गेला, बर्फाचा ढीग वर उसळला आणि मग ती विमाने परत वर आकाशात झेपावली, सूर्यप्रकाशात लपली आणि पुन्हा हल्ला करायला परतली.

आम्ही सर्व त्यांना अगदी स्पष्ट दिसतोय, कुझ्नेत्सोवच्या मनात विचार चमकला. मला काहीतरी केले पाहिजे!

"चालवा गोळ्या! तुमच्या बंदुकींनी उडवा गोळ्या त्यांच्यावर!" तो ओरडला आणि गुडघ्यावर धडपडत उभे राहण्याचा प्रयत्न करीत असताना ढिगाच्या दुसऱ्या बाजूला झोयाचे वर उचललेले डोके त्याला दिसले. तिच्या भुवया चमत्कारिक जुळल्या होत्या, डोळे सताड विस्फारले होते.

"झोया! डब्यांपासून आणखी लांब जा!"

पण ओठ चावून ती केवळ एकटक गाडीच्या दिशेने पहात राहिली आणि त्याने तात्काळ त्याच दिशेला पाहिले. अंगासरशी फिट्ट बसणाऱ्या पायघोळ कोटातला लेफ्टनंट द्रोझ्दोवस्की गाडीजवळून बर्फाच्या खड्यां-वरून उड्या मारीत चालला होता आणि काहीतरी मोठ्याने ओरडत होता. पण दोघांपैकी कुणालाच त्याचे ओरडणे समजले नाही. द्रोझ्दोवस्कीने आपल्या डब्याच्या उघड्या दारातून आत झेप घेतली व एका हातात हलकी मशिनगन आणि एका हातात दारूगोळ्याची वाटोळी पेटी घेऊन तो पुन्हा दारात अवतरला. गाडीपासून तो दूर पळाला व कुझ्नेत्सोवपासून दहा मीटर अंतरावर बर्फावर पालथा पडला, त्वेषाने त्याने मशिनगनच्या स्टँडचे दांडे बर्फाच्या भेगेत ठोकून घट्ट बसवले, गोळ्यांची ठासणी केली आणि आपल्या तोफांमधून आगीच्या ज्वाळा ओकत झळाळत्या निळाईमधून झेपावत येणाऱ्या विमानांवर त्याने लांबलचक फैर झाडली.

धरतीकडे सुसाटत येणाऱ्या अनुक्षेपकांच्या आगीचा लांबलचक पट्टा बर्फ उखडवीत त्यांच्या दिशेने आला. मशिनगनची आणि तोफांची कानठळ्या बसवणारी फैर व इंजिनांची कर्कश्य घरघर कुझ्नेत्सोवच्या डोक्यात जोराने घुमली आणि त्याच्या डोळ्यांसमोर चित्रविचित्र आकृती थयथया नाचल्या. गोळ्यांनी उडवलेल्या बर्फाची धूळ त्याच्या तोंडावर चपराक मारावी त्याप्रमाणे बसली, एक रोरावती महाप्रचंड सावली क्षणभर त्यांच्यावर विसावली व भोवती हेवी कॅलिबर काडतूसांच्या रिकाम्या वेष्टनांचा सडा पडला. पण सर्वांत अतर्क्य गोष्ट म्हणजे झेपावणाऱ्या विमानाच्या धातूच्या आवरणाखालील अंड्याच्या आकाराचे वैमानिकाचे डोकेसुद्धा त्याला दिसले.

प्रचंड घरघराट करीत ती लढाऊ विमाने जमिनीपासून अगदी जवळ अंतरापर्यंत झेपावली आणि पुन्हा स्तेपवरच्या आकाशात त्यांनी भरारी घेतली.

"वोलोद्या! उठू नको! थांब!" त्याने जवळच किंकाळ्या ऐकल्या आणि पाहिले की, रिकामी दारूगोळ्याची पेटी टाकून द्रोझ्दोवस्की वर उठण्याचा प्रयत्न करतोय आणि झोया त्याच्या खांद्यांना बिलगून निकराने त्याला थोपविण्याचा प्रयत्न करते आहे. "वोलोद्या! प्लीज!"

"माझ्याजवळचा दारूगोळा संपलेला तुला दिसत नाही!" द्रोझ्दोवस्की तिच्यावर खेकसला. त्याचा चेहरा विद्रूप दिसत होता. झोयाला बाजूला ढकलून स्वतःला मोकळे करण्याचा तो प्रयत्न करीत होता. "सोड मला! मी सांगतो, सोड मला!"

अखेर त्याने तिची मिठी तोडली व तो डब्याकडे धावला. ती बर्फात तशीच विस्कटल्या अवस्थेत पडून राहिली. कुझ्नेत्सोव सरपटत तिच्याजवळ गेला.

"काय प्रकार आहे? बंदुकीला काय झालं?"

तिने त्याच्याकडे नजर टाकली आणि तिचा चेहरा बदलला. त्यावर प्रक्षोभक उपहास उमटला होता.

"कोण, लेफ्टनंट कुझ्नेत्सोव! तू का नाही विमानांवर गोळ्या झाडीत? घाबरतोस? द्रोझ्दोवस्कीच्या वाट्याला ते काम ठेवलंस वाटतं?"

"कशानं मी गोळ्या मारू? पिस्तुलानं? तुला हेच हवंय का?"

तिने त्याच्या उत्तराकडे दुर्लक्ष केले.

आता फायटर विमाने आगगाडीच्या पुढच्या भागावर भडिमार करीत होती व इंजिनाभोवती घिरट्या घालीत होती. दोन डबे एव्हाना धुराने धुमसू लागले होते. उघड्या दारांमधून आगीच्या ज्वाला भडकत होत्या व छपराला लपेटत होत्या. तो धूर, छपराला चाटणाऱ्या त्या ज्वाला आणि हल्ल्यामधील तो बेछूटपणा पाहून कुझ्नेत्सोवच्या मनात असहायतेची एक ओंगळ किळसवाणी भावना निर्माण झाली. एकाएकी त्याला असे वाटले की, अख्ख्या आगगाडीचा चुरा करून ती भस्मसात होईपर्यंत ही शत्रूची विमाने पिच्छा सोडणार नाहीत.

नाही, पण त्यांच्याजवळचा दारूगोळा संपेलच; त्याने दुसऱ्याच क्षणी स्वतःची समजूत घालायला आरंभ केला. लौकरच सारे काही संपेल....

पण फायटर विमानांनी गिरकी घेतली व आगगाडीच्या दिशेने पार खालपर्यंत ती झेपावली.

"नर्स! नर्स!" जळत्या डब्यांमधून एक आरोळी उठली आणि कुणालातरी धरून फरपटत अनेक आकृत्या खालच्या बर्फावर उड्या टाकताना दिसल्या.

"आले!" झोया ओरडली व उडी मारून उठताना तिने डब्याच्या उघड्या दारांकडे व बर्फात रोवलेल्या मशिनगनकडे एक नजर टाकली. "कुझ्नेत्सोव, तो कुठं आहे? मी जाते. मी तिथं आहे म्हणून त्याला सांग."

तिला थांबवण्याचा त्याला अधिकार नव्हता आणि आपली वैद्यकीय सामानाची थैली घेऊन ती घाईने निघाली, मग धावू लागली व नंतर बर्फाच्या ढिगांआड दिसेनाशी झाली.

"कोण, कुझ्नेत्सोव तू आहेस का?"

लेफ्टनंट द्रोझ्दोवस्की लांब ढांगा टाकीत गाडीपासून मशीनगनजवळ आला व त्याने नवा दारूगोळा ठासला. त्याच्या हडकुळया फिकट चेहऱ्यावर त्वेषाची भावना होती.

"बघ डुकरं काय करताहेत! झोया कुठाय?"

"पुढं कुणीतरी जखमी झालंय," मशिनगनच्या स्टँडचे दांडे बर्फात अधिक घट्ट रोवीत कुझ्नेत्सोव उत्तरला. "हे आले बघ परत..."



"अक्करमाशे साले.... मी विचारतोय झोया कुठाय?" खांद्याशी बंदुकीचा दस्ता आणीत द्रोझ्दोवस्की ओरडला आणि मेसेरश्मिट जशी स्तेपवर झेपावली तसे त्याचे डोळे बारीक झाले व डोळ्यांच्या निळाईत बाहुल्यांचे दोन काळे ठिपके जणू थिजले.

आगगाडीच्या शेवटाशी असलेली विमानविरोधी तोफ थंडावली.

पहिल्या विमानाच्या चकाकत्या शेपटावर द्रोझ्दोवस्कीने लांबलचक फैर झाडली आणि एखाद्या चमकत्या पात्याप्रमाणे शेवटचे विमान झपकन् जाईपर्यंत चापावरचा हात कायम ठेवला.

"मी टिपला त्याला!" घुसमटल्या आवाजात द्रोझ्दोवस्की ओरडला. "कुझ्नेत्सोव, तू पाहिलंस? माझी गोळी त्याला बसलीय! माझा नेम हुकणं शक्य नाही!"

पण ती लढाऊ विमाने आता स्तेपच्या खूप खालून उडत होती, आपल्या अवजड मशिनगनमधून वातावरण टराटरा फाडत होती आणि बर्फात पडलेल्या माणसांच्या शरीरांचा वेध घ्यायला अनुक्षेपकांचे झोत भिरभिरत होते. लोकांभोवती पंख्यासारखी पांढरी चक्रे निर्माण करीत होते. शेजारच्या तोफखान्यातल्या काही माणसांना ताण असह्य झाला, उड्या मारून ते उठले व भिन्न दिशांना धावले. एक पडला, थोडे अंतर सरपटत गेला व हात पसरून निश्चेष्ट पडला. दुसरा नागमोडी धावत होता, उजवी-डावीकडे विचित्र नजरा टाकीत होता, पण झेपावणाऱ्या मेसेरश्मिटमधल्या अनुक्षेपकाने त्याच्या शरीराचा वेध घेतला व तापल्या सळईप्रमाणे घुसून त्याला विंधला; हात पसरून तो माणूस बर्फावर गडगडला, मग निपचित पडला. त्याचे दुलईदार जाकीट धुमसत होते.

"किती अर्थशून्य! आघाडीवर आपण जाण्यापूर्वीच!" दुसरी पेटी रिकामी करीत द्रोझ्दोवस्की ओरडला.

बर्फखंडांच्या पलिकडे सरपटणाऱ्या माणसांना उद्देशून कुझ्नेत्सोव गुडघ्यांवर उभे राहून ओरडला.

"कुणीही धावू नका! खाली पडून रहा!"

पण ज्या क्षणाला त्याने ही आज्ञा केली, त्या क्षणाला एका विलक्षण शांततेत त्याचाच आवाज त्याला पूर्ण ताकदीने ऐकू आला. तिथे आता मशिनगनच्या फैरी झडत नव्हत्या, झेपावणाऱ्या विमानांची घरघर कानठळ्या बसवीत नव्हती. सारे काही संपले होते.

थिजलेल्या निळ्या आकाशाला भेदीत, प्रचंड घरघराट करीत, हल्लेखोर विमाने नैर्ऋत्येला पसार झाली होती. माणसे बर्फखंडाचा आडोसा सोडून अनिश्चित मन:स्थितीत उठून उभी रहात होती, अंगावरच्या कोटांवरचा व बंदुकींवरचा बर्फ झटकीत होती आणि सावकाशपणे आगगाडीकडे रखडत जाताना गाडीच्या पुढच्या भागातील जळत्या डब्यांकडे रोखून पहात होती.

"हजरी!" दुरून हुकूम आला. "सर्व तोफखान्याच्या तुकड्यांची हजरी!"

द्रोझ्दोवस्कीने तात्काळ हुकूम ठोकला:

"पलटण प्रमुख, तोफखान्याच्या तुमच्या लोकांना रांगेत उभे करा!"

"मुख्य ठाण्याची पलटण, रांगेत उभे रहा!" सार्जंट-मेजर गलोवानोवचा आवाज घुमला.

"पलटण नंबर एक, रांगेत उभे रहा!" कुझ्नेत्सोवने तोच हुकूम ठोकला.

"पलटण नंबर दो ऽ न..." प्रशिक्षण विद्यालयाच्या धाटणीत लेफ्टनंट दावलात्यानने सूर उचलला.

अजूनही भेदरलेल्या आणि कापऱ्या अवस्थेतले लोक, अंगावरचा बर्फ झटकीत व पट्टे ठाकठीक करीत, नेहमीप्रमाणे बडबड न करता पटापटा रांगेत उभे झाले; साऱ्यांचे डोळे आकाशाच्या अर्ध्या दक्षिण भागाकडे रोखलेले होते. आता तेच आकाश विश्वास बसणार नाही एवढे स्वच्छ व चकचकीत दिसत होते.

पलटण उभी राहताच कुझ्नेत्सोवच्या लक्षात आले की, तोफेला बत्ती लावण्याचे काम करणारा नेचायेव उजव्या बाजूला चुळबूळ करतो आहे व पहिल्या तोफेचा गोलंदाज वरिष्ठ सार्जंट उखानोव याचा त्या जागी पत्ता नाही.

"उखानोव कुठं आहे?" काळजीच्या सुरात त्याने विचारले. "हल्ल्याच्या वेळी तू त्याला पाहिलं होतं का नेचायेव?"

"तो कुठं असेल त्याचाच मी विचार करतोय कॉम्रेड लेफ्टनंट," नेचायेव पुटपुटला. "न्याहरीपूर्वी तो सार्जंट-मेजरला भेटायला गेला होता. कदाचित तो अजून तिथंच असेल."

"अजून सार्जंट-मेजरबरोबर?" कुझ्नेत्सोव ओळीच्या टोकाशी चालत गेला. "हल्ल्याच्या वेळी उखानोव कुणाच्या नजरेला पडला होता का?"

गारठ्यात काकडणाऱ्या लोकांनी नुसते नेत्रसंकेत केले.

"कॉम्रेड लेफ्टनंट," नेचायेवने हळूच पुन्हा त्याला हाक मारली. त्याच्या चेहऱ्यावर वेदनेची छटा होती. "जरा बघा ना! कदाचित तो तिथं असेल! ..."

हवाई हल्ला होण्यापूर्वी हिमकण किंचित पडत होते त्याचप्रमाणे अजूनही त्या प्रचंड आगगाडीवर, बर्फावर, अर्ध्या गाडल्या गेलेल्या स्टेशनच्या इमारतीवर, हळुवार हिमकण पडत होते. हिमाचे छोटे स्फटिक सूर्यप्रकाशात चमचम करीत होते. गाडीच्या पुढच्या भागात, जळणाऱ्या डब्यांभोवती आणि त्यांच्या शेजारच्या हिमाच्छादित डब्यांभोवती सैनिकांची अजूनही मागेपुढे धावपळ चालू होती. सर्वत्र तोफखान्याच्या तुकड्या रांगेत उभ्या रहात होत्या. कुणा जखमी किंवा मृताला, त्याच्या पायघोळ कोटात झोपवून दोघेजण समोरून घेऊन गेले.

"नाही, तो उखानोव नाही. त्याच्या अंगात दुलईदार जाकीट होतं," कुझ्नेत्सोव म्हणाला.

"पलटण नंबर एक!" त्याच्या कानांवर द्रोझ्दोवस्कीचा कठोर, विशिष्ट आवाज आदळला. "लेफ्टनंट कुझ्नेत्सोव, तू हजरी का देत नाहीस? काय भानगड आहे?"

उखानोवच्या गैरहजेरीचा कसा खुलासा करावा या विचारात कुझ्नेत्सोवने चार पाच पावले येरझाऱ्या घातल्या न घातल्या तोच, त्याने काही बोलण्यापूर्वी द्रोझ्दोवस्की पुन्हा करड्या आवाजात बोलला.

"गोलंदाज उखानोव कुठं आहे? मला तो रांगेत उभा राहिलेला दिसत नाही! एक नंबरच्या पलटणीचा कमांडर, मी तुला विचारतोय!"

"प्रथम तो जिवंत आहे किंवा नाही ते पाहिलं पाहिजे," थांबून राहिलेल्या तोफखाना कमांडरजवळ येत कुझ्नेत्सोव उत्तरला. माझ्या बोलण्यावर विश्वास नसल्यासारखा त्याचा चेहरा दिसतोय, कुझ्नेत्सोवच्या मनात विचार आला. काही एका कारणाने त्याला हल्ल्याच्या वेळचा द्रोझ्दोवस्कीचा निर्धार आठवला, झोयाला बाजूला ढकलून त्याने हल्ला करणाऱ्या मेसेरश्मिट विमानांवर अख्खी फैर झाडली त्यावेळचा त्याचा फिकट, ओढलेला चेहरा आठवला.

"लेफ्टनंट कुझ्नेत्सोव, उखानोवला कुठं जायला तू परवानगी दिली होती?" द्रोझ्दोवस्कीने विचारले. "मला वाटतं तो जर जखमी झाला

असता, तर वैद्यकीय मदतनीस येलागिनानं केव्हाच मला खबर दिली असती!"

"आणि मला वाटतं उखानोवला सार्जंट-मेजरनं थोपवून धरलं असावं," कुझ्नेत्सोवने प्रत्युत्तर दिले. "दुसरीकडं कुठं तो असणं शक्य नाही."

"क्वार्टरमास्टरच्या पलटणीकडे ताबडतोब कुणाला तरी पाठव! एवढा सारा वेळ तो तिथं काय करत बसलाय? आचाऱ्याला मदत करतोय?"

"मी स्वतःच जातो."

कुझ्नेत्सोव टाचेवर वळला आणि गाडीच्या मुदपाकखान्याकडे निघाला.

जेव्हा तो क्वार्टरमास्टरच्या डब्याजवळ पोहोचला, तेव्हा काही भांड्यांमधून अजूनही वाफा येत होत्या आणि त्यांच्यासमोरच अनेक ड्रायव्हर, कारकून व आचारी रांगेत उभे राहून जास्तीत जास्त रुबाबदार दिसण्याचा प्रयत्न करीत होते. निमुळत्या चेहऱ्याचा, हिरव्या डोळ्यांचा, बाकदार नाकाचा तोफखाना सार्जंट-मेजर स्कोरिक आपल्या अधिकाऱ्याच्या लांब कोटात व नव्या नमदी बुटात मांजराच्या पावलांनी त्यांच्या रांगांमधून फिरत होता. त्याने आपले दोन्ही हात पाठीमागे धरले होते व पुनःपुन्हा तो गाडीच्या शयनयानाकडे नजर टाकीत होता. काबीज केलेल्या बंदिस्त व आच्छादित जर्मन मोटारगाडीतून कुणी एक अत्यंत महत्त्वाची व्यक्ती नुकतीच तेथे आली होती व शयनयानाशेजारी त्या व्यक्तीभोवती अनेक वरिष्ठ अधिकारी व सैन्यातील रेल्वे अधिकारी जमा झाले होते.

"अटे ऽऽ न्शन!" स्कोरिक ओरडला. जणू त्याला पाठीवरूनच कुझ्नेत्सोवच्या येण्याची चाहूल लागली होती. एखाद्या बॅले नर्तकाप्रमाणे त्याने एका पायावर गिरकी घेतली, आपली मूठ कपाळाशी नेली आणि कृत्रिम रीतीने बोटे ताठ करीत तो म्हणाला, "क्वार्टरमास्टरची पलटण, कॉम्रेड लेफ्टनंट...."

"आराम!" कुझ्नेत्सोवने गंभीरपणे स्कोरिककडे पहात म्हटले. "वरिष्ठ सार्जंट उखानोव इथं आहे?"

"म्हणजे काय कॉम्रेड लेफ्टनंट?" स्कोरिकने शंकित आवाजात विचारले. "तो इथं कसा असेल? मी त्याला इथं थांबूच देणार नाही.

काय प्रकार घडलाय कॉम्रेड लेफ्टनंट? तो गायब झालाय? कमाल आहे आता! हा मूर्ख माणूस गेला तरी कुठं?"

"न्याहरीच्या वेळी तो इथं होता?" कुझ्नेत्सोवने कडक आवाजात विचारले. "तू त्याला पाहिलंस?"

तोफखान्यात जो काही प्रकार घडला होता त्याबाबतची स्वतःची जबाबदारी किती याचा अंदाज घेणारे भाव सार्जंट-मेजरच्या निमुळत्या राकट चेहऱ्यावर उमटले.

"होय कॉम्रेड लेफ्टनंट," त्याने गंभीरपणे उत्तर दिले. "मला उत्तम आठवतंय. गोलंदाज उखानोवनं आपल्या लोकांची न्याहरी गोळा केली. त्याचं आचाऱ्याशी थोडं भांडणही झालं. मिळालेल्या शिध्याबाबत त्यानं नाराजी दाखवली. मला स्वतःला त्याला ताकीद देणं भाग पडलं. कॉम्रेड लेफ्टनंट, तो अगदी नागरी माणसासारखा गबाळ्या आहे. त्याला त्यांनी कमिशन दिलं नाही ते योग्यच केलं. कमालीचा ढिसाळ आहे. अजून रूळला नाही.... कदाचित खेड्याच्या दिशेनं तो पसार झाला असावा. स्टेशनमागच्या खिंडीपलिकडं एक छोटं खेडं आहे." एकाएकी त्याने रुबाबदारपणे स्वतःला सावरले आणि हळू आवाजात तो कुजबुजला: "कॉम्रेड लेफ्टनंट, काही जनरल या दिशेनं येताहेत असं दिसतं.... तोफखान्याच्या तुकड्यांची ते पाहणी करीत असावेत. रिपोर्ट करताना जरा काळजी घ्या."

आपापल्या डब्यांपाशी उभ्या राहिलेल्या तोफखान्याच्या पलटणींची पाहणी करीत एक दिमाखदार गट पुढे सरकत होता. दूर अंतरावरूनच त्या गटातील भव्य व्यक्तिमत्वाच्या डिव्हिजन कमांडर कर्नल देयेव यांना कुझ्नेत्सोवने ओळखले. त्यांच्या छातीवर दारूगोळ्याचे तोस्तान अडकवण्याचे दोन चामडी पट्टे—उभे-आडवे लटकावलेले होते आणि कातड्याच्या तळव्याचे नवे नमदी बूट त्यानी पायात घातले होते. त्यांच्या शेजारी डिव्हिजनला अपरिचित असे रोड चेहऱ्याचे एक जनरल चालत होते. जनरल आपल्या हातातल्या काठीच्या साह्याने झपझप चालत होते. इतर सर्वांच्या मेंढकातडी कोटांमध्ये आणि पायघोळ कोटांमध्ये त्यांचा गुडघ्यापर्यंत लांबीचा काळा मेंढकातडी कोट उठून दिसत होत (सबंध डिव्हिजनमध्ये कुणाहीकडे तसा कोट नव्हता).

ते सेनाप्रमुख लेफ्टनंट-जनरल बेस्सोनोव होते.

ते देयेव यांच्या पुढे चालत होते. चालताना मधूनच ते लंगडत, प्रत्येक तोफखान्याशी थांबत, त्या त्या प्रमुखाचा अहवाल ऐकत, मग आपल्या हातातली बांबूची पातळ छडी उजव्या हातातून डाव्या हातात घेत, उजवा हात कपाळापर्यंत वर उचलत आणि पुढची पाहणी चालू करीत. जेव्हा सेनाप्रमुख आणि त्यांच्या बरोबरचे लोक शेजारच्या डब्यापाशी थांबले, तेव्हा जनरलचा तीक्ष्ण, वरच्या पट्टीतला आवाज कुझ्नेत्सोवच्या कानांवर एकाएकी पडला.

"तुमच्या प्रश्नाला उत्तर म्हणून मला एकच गोष्ट सांगायची आहे. त्यांनी स्तालिनग्रादला चार महिने वेढा घातला, पण ते काबीज करण्यात अपयशी ठरले. आता आपण आक्रमक पवित्रा घेतला आहे. आपल्या ताकदीची आणि आपल्या त्वेषाची शत्रूला पुरेपूर जाणीव झाली पाहिजे. आणि हेही लक्षात ठेवा: इथं, स्तालिनग्रादमध्ये, रशियाच्या स्वातंत्र्याचं आणि मानाचं आपण साऱ्या जगापुढं रक्षण करीत आहोत, याची जर्मनांना जाणीव झाली आहे. मी तुम्हाला खोट्या गोष्टी सांगणार नाही. पुढच्या लढाया सोप्या असतील असं मी तुम्हाला आश्वासन देत नाही. जर्मन अखेरपर्यंत लढतील. म्हणून पूर्ण धैर्यानं आणि पुरत्या ताकदीनं लढा अशी मी तुमच्यापुढं मागणी करतो!"

दुसऱ्यांना हमखास खडबडून जागे करणाऱ्या, प्रभावीत करणाऱ्या आपल्या आवाजातील भाषण जनरलनी संपवले. काळ्या मेंढकातडी कोटातील सडपातळ, किंचित अप्रिय, कुरूप चेहऱ्याच्या या जनरलच्या हुकमी अधिकाराने कुझ्नेत्सोव स्तंभित झाला. जनरल आता क्वार्टरमास्टरच्या पलटणीकडे येत होते. आता जनरलना हजरी कशी द्यायची, मुदपाकखान्याजवळ आपण का आलो हे कसे समजावून सांगायचे हे न कळून त्याने एकदम हुकूम केला.

"अटेऽऽन्शन! राईट ड्रेस! कॉम्रेड जनरल, दुसऱ्या डिव्हिजनच्या पहिल्या तोफखान्याची क्वार्टरमास्टरची पलटण..."

त्याने आपला अहवाल पुरा केला नाही. जनरलनी आपली काठी बर्फात रोवली आणि ताठ, निश्चल उभ्या राहिलेल्या पलटणीच्या समोर ते थांबले. त्यांचे कठोर डोळे प्रश्नार्थकपणे कर्नल देयेव यांच्याकडे वळले. धिप्पाड उंचीच्या देयेव यांनी दिलासादर्शक मान हलवली, ते किंचीत हसले व आपल्या खणखणीत आवाजात म्हणाले:

"कॉम्रेड जनरल, इथं जखमी-मृत कुणी नाही. सर्व हजर आणि सर्व ठीक. बरोबर सार्जंट-मेजर?"

"एकही माणूस बेपत्ता नाही, कॉम्रेड कर्नल!" डोळ्यात कमालीचा नम्र भाव आणून आणि काही कारण नसताना अर्धवट युक्रेनी भाषेतला हेल काढून स्कोरिक भराभरा बोलला. "तोफखान्याचा सार्जंट-मेजर स्कोरिक!"

आणि रुबाबदारपणे छाती पुढे काढून तो कमालीचा नम्र भाव चेहऱ्यावर आणून निश्चल उभा राहिला.

जनरलपासून चार पावले अंतरावर कुझ्नेत्सोव उभा होता. जनरलच्या अस्त्राखान कॉलरवर जमलेले हिमतुषार, गुळगुळीत दाढी केलेले खप्पड, निळसर गाल, गच्च आवळलेल्या जिवणीभोवतालच्या ठळक रेषा, त्याला स्पष्ट दिसत होत्या. आपल्या पन्नास वर्षांत बरेच काही अनुभवलेल्या त्या जनरलच्या चतुर नजरेने ड्रायव्हरांच्या बेडौल आकृतींवर एक कटाक्ष टाकला आणि भीतीने गर्भगळित झालेल्या सार्जंट-मेजरवर आपले डोळे स्थिरावले. जणू जनरल आपल्या नजरेनेच सार्जंट-मेजरला विवस्त्र करीत होते. सार्जंट-मेजरने आपल्या टाचा जुळवल्या, छाती आणखी पुढे काढली व थोडा पुढे झुकला.

"तुला कवायतीच्या सार्जंटसारखं दिसण्याची काही आवश्यकता नाही," आपल्या करकरीत आवाजात जनरलनी शेरा मारला. "आराम!"

सार्जंट-मेजर व पलटणीवरून त्यांनी आपली नजर बाजूला काढली व कुझ्नेत्सोवकडे वळवली.

"कॉम्रेड लेफ्टनंट, क्वार्टरमास्टरच्या पलटणीबरोबर तुमचा काय संबंध?"

कुझ्नेत्सोव काही न बोलता हुश्शार पवित्र्यात उभा राहिला.

"हल्ल्याच्या वेळी तू इथं सापडला का?" कर्नल देयेव यांनी सूचक दिलासा देत विचारले; पण तो दिलासा फक्त त्यांच्या आवाजापुरताच होता. सार्जंट-मेजरच्या हजरीनंतर देयेव यांच्या कपाळाली आठी पडली व भुवया नाकाशी एकमेकींना जुळल्या. "लौकर बोल. लेफ्टनंट, तुला प्रश्न विचारलेला आहे."

कर्नलच्या अधीरतेचा दबाव कुझ्नेत्सोवला जाणवला, सार्जंट-मेजर स्कोरिकने आणि त्याच्या पलटणीने त्याच्याकडे माना वळवल्याचे त्याच्या लक्षात आले, रक्षक अधिकारी आपल्या पायांची अस्वस्थ हालचाल करताना त्याने पाहिले आणि अखेरीस तो उद्गारला, "नाही, कॉम्रेड जनरल."

कर्नल देयेवनी आपल्या फिकट तांबूस पिवळसर रंगाच्या पापण्या एकत्र आणून डोळे किलकिले केले व त्रासदायक अडथळ्याकडे पहावे तसे कुझ्नेत्सोवकडे पाहिले.

"लेफ्टनंट, 'नाही' याचा अर्थ काय?"

"नाही," कुझ्नेत्सोव पुन्हा म्हणाला. "मी इथं हल्ल्याच्या वेळी अडकलो नाही. मी माझ्या एका गोलंदाजाला शोधतोय. हजरीला तो नव्हता. पण मला वाटतं...."

"कॉम्रेड जनरल, क्वार्टरमास्टरच्या पलटणीत एकही गोलंदाज नाही!" एक दीर्घ श्वास घेऊन व बेस्सोनोव यांच्याकडे बटबटीत डोळ्यांनी पहात सार्जंट-मेजर मोठ्याने म्हणाला.

पण बेस्सोनोवचे त्याच्या ओरडण्याकडे लक्ष दिसले नाही.

"लेफ्टनंट, तू सरळ प्रशिक्षण विद्यालयातून आलास? का पूर्वी लढाईत होतास?"

"१९४१ मध्ये तीन महिने मी लढाईत होतो," कुझ्नेत्सोवच्या बोलण्यात ठामपणा नव्हता. "मी नुकताच तोफखाना विद्यालयातून पास झालोय."

"तोफखाना विद्यालय," बेस्सोनोवनी तेच शब्द पुन्हा उच्चारले. "अच्छा, तू तुझ्या एका गोलंदाजाला शोधतोयस? जखमींमध्ये तपास केला?"

"तोफखान्यात कुणी जखमी अथवा ठार झालेलं नाही," आपली अगतिकता व अननुभव जनरलच्या लक्षात आल्याने त्यानी हा प्रश्न विचारला आहे ह्या भावनेने कुझ्नेत्सोव उत्तरला.

"आणि लेफ्टनंट, तुला माहीतच आहे की, आपल्या आघाडीच्या मागे असलेल्याला बेपत्ता म्हणत नाहीत," बेस्सोनोव कोरड्या सुरात म्हणाले. "पिछाडीवर बेपत्ता झालेल्यांना एकच नांव आहे – फरारी! कर्नल देयेव, आत्ता तसाच काही प्रकार घडला नसावा अशी मला आशा आहे."

उत्तर देण्यापूर्वी डिव्हिजन कमांडर काही काळ थांबले. कमालीची शांतता पसरली. दूरवर अस्पष्ट आवाज व इंजिनाचे सुस्कारे ऐकू येत होते. गाडीच्या पुढच्या भागात जळणारे ते दोन डबे वेगळे केले जात होते व त्यामुळे बफर्स एकमेकांवर आदळल्याचा आवाज येत होता.

"मी उत्तराची वाट पाहतोय."

कर्नल देयेव फाजील विश्वासाच्या सुरात बोलले.

"तोफखाना रेजिमेंटचा प्रमुख नवखा आहे. पण कॉम्रेड जनरल, आत्तापर्यंत कुणी फरारी होण्याचा प्रकार घडलेला नाही. आणि तसा घडणारही नाही असा मला विश्वास आहे. तसा घडणार नाही याची मला खात्री आहे कॉम्रेड जनरल."

बेस्सोनोव यांच्या कठोर ओठांचे कोपरे किंचित विलग झाले.

"कर्नल, तुमच्या खात्रीबद्दल आभारी आहे."

क्वार्टरमास्टरची पलटण अद्याप निश्चल उभी होती. आपल्या लोकांच्या रांगांपासून दोन पावले पुढे उभा असलेला सार्जंट-मेजर स्कोरिक अजूनही तसाच घाबरलेल्या अवस्थेत होता व कुझ्नेत्सोवला आपल्या भुवया उडवून काहीतरी खुणावण्याचा प्रयत्न करताना कमालीचा हास्यास्पद दिसत होता. पण कुझ्नेत्सोवचे त्याच्याकडे अजिबात लक्ष नव्हते. डिव्हिजन कमांडरबरोबरच्या संभाषणात जनरलचे अप्रत्यक्ष असमाधान उमटलेले कुझ्नेत्सोवला जाणवले होते, इतर अधिकाऱ्यांची अस्वस्थता लक्षात आली होती आणि तरीही स्वत:मधील काहीतरी दूर करण्याच्या भावनेने त्याने विचारले, "कॉम्रेड जनरल, आता मी जाऊ शकतो काय?"

काहीही न बोलता बेस्सोनोव कुझ्नेत्सोवच्या फिकट चेहऱ्याकडे रोखून पहात राहिले. त्यांच्या बरोबरच्या गारठलेल्या लष्करी अधिकाऱ्यांनी आपले कान जोरात चोळले व पावलांची अस्वस्थ हालचाल केली. साध्या क्वार्टरमास्टरच्या पलटणीवर सेनाप्रमुखाने एवढा वेळ वाया का घालवावा हेच त्यांना समजत नव्हते. त्या क्षणाला बेस्सोनोवच्या मनात काय चालले होते याचा कर्नल देयेव आणि कुझ्नेत्सोव यांच्यासकट कुणालाच अंदाज बांधता येत नव्हता. अलिकडे लागलेल्या सवयीनुसार जनरल आपल्या अठरा वर्षांच्या मुलाचा विचार करीत होते. जून महिन्यात वोल्खोव आघाडीवर त्यांचा मुलगा बेपत्ता झाल्याची बातमी

आली होती. आपला मुलगा बेपत्ता झाला हा आपलाच दोष आहे, असे ते स्वतःला अप्रत्यक्षपणे बजावीत होते. वस्तुतः युद्धामध्ये अशा अनेक वेळा येतात की, तेव्हा गोळीपासून किंवा दैवाच्या कठोर पंजापासून माणसाला कुणीही वाचवू शकत नाही, हे त्यांना चांगले माहीत होते. आपल्या रोखल्या नजरेने समोरच्या तरुण माणसात कमालीचा गोंधळ उडाला आहे व तो लपविण्याचा त्याचा वेडावाकडा प्रयत्न चाललाय हे त्यांच्या लक्षात येताच ते म्हणाले, "लेफ्टनंट, तू जाऊ शकतो. जा!"

गंभीर चेहऱ्याने त्यांनी आपला हात आपल्या उंच अस्त्राखान टोपीजवळ नेला आणि गारठत चाललेल्या आपल्या दुखऱ्या पायावर लंगडत, लष्करी अधिकाऱ्यांच्या घोळक्याबरोबर ते आगगाडीच्या दिशेने निघाले.

थंडीने त्यांच्या पायातली वेदना नेहमी वाढत होती व अलिकडे असे वारंवार घडत होते. तोफेच्या फुटलेल्या गोळ्याने त्यांच्या पायाची नस दुखावलेली होती आणि बराच काळपर्यंत दुखत राहणार व या वेदनेची आपल्याला सवय करावी लागणार, याची त्यांना इस्पितळातून बाहेर पडताना जाणीव झालेली होती. पण वस्तुस्थिती अशी होती की, त्यांच्या नडगीमध्ये ही त्रासदायक वेदना जवळ जवळ सतत ठणकत होती व त्यामुळे त्यांच्या उजव्या पायाच्या अंगठ्यामध्ये बधीरपणा निर्माण होत होता. जर जखम पुन्हा उघडली तर पुन्हा एकदा इस्पितळात नुसते पडून रहावे लागेल अशी भीती त्यामुळे मधूनच त्यांच्या मनात निर्माण होऊ लागली होती व या सेनाविभागावर त्यांची नेमणूक झाल्यापासून आपल्या मुलाच्या भवितव्याबाबत त्यांच्या मनात सतत विचार डोकावू लागले होते. या दोन्ही गोष्टी मनात सांधल्या गेल्यापासून त्यांची मानसिक स्थिरता ढळली होती, आत्मिक असमर्थतेची जाणीव करून देणारे क्षण त्यांच्या काळजाचा थरकाप उडवीत होते आणि स्वतःमध्ये किंवा दुसऱ्यांमध्येही त्यांना पहायला न आवडणारी, तिटकारा निर्माण करणारी एक प्रकारची चमत्कारिक चंचलता डोकावू लागली होती.

त्यांच्या आयुष्यात अनपेक्षित घटना फार कमी घडल्या होत्या. पण ही नवी नेमणूक—सेनेचे अधिपत्य करण्याची कामगिरी—अचानक

घडली होती. रशियाच्या दूर अंतर्भागात नुकत्याच हलविल्या जाणाऱ्या या ताज्या सेनेच्या प्रमुखपदाची सूत्रे त्यांनी नुकतीच हाती घेतली होती. दररोज सुमारे अठरा आगगाड्या भरून या सेनेतील लोकांची आघाडीवर रवानगी होत होती. आज मेस्सेरश्मिट विमानांच्या हल्ल्यानंतर त्या सेनेपैकी एका डिव्हिजनची पाहणी करायला ते आले होते व पाहणीनंतर त्यांच्या मनात फारशी समाधानाची भावना निर्माण झाली नव्हती. गाडीतून सेना उतरविण्याच्या विभागात हवाई दलाचे संरक्षण न दिले गेल्यामुळे हे असमाधान उमटले होते. "आपली लढाऊ विमाने नुकतीच उडून गेली होती कॉम्रेड जनरल," असा हालचालींचे सूत्रचालन करणाऱ्या अधिकाऱ्याने खुलासा करताच जनरल कडाडले होते – "उडून गेली याचा अर्थ काय? आमची उडून गेली आणि नेमक्या त्याच वेळी जर्मनांची उडत आली! असले हवाई छत्र व्यर्थ आहे!" आपल्या त्या रागाच्या स्फोटाचा त्यांना आता खेद वाटत होता, कारण तो अधिकारी हवाई छत्राला जबाबदार नव्हता. तो प्रथम त्यांच्या नजरेला पडला होता एवढाच त्याचा दोष होता.

क्वार्टरमास्टरच्या पलटणीपासून दूर जात असताना मागे कर्नल देयेव हलक्या आवाजात बोलत असल्याचे बेस्सोनोव यांच्या कानी पडले.

"लेफ्टनंट, काय हा सगळा मूर्खपणा? अस्सा तोफेतून सुटलेल्या गोळ्यासारखा वेगात जाऊन त्याला शोधून काढ! मी तुला अर्धा तास देतो – बरोब्बर अर्धा तास!"

पण तोफा भरलेल्या एका ट्रकपाशी कर्नलनी त्यांना गाठले व जणू काही घडलेच नाही, असे भासवून ते बोलत राहिले तेव्हा आपण काहीही ऐकलेच नाही असा बेस्सोनोवनी बहाणा केला.

"कॉम्रेड कमांडर, तो तोफखाना मला माहीत आहे आणि त्यांच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. आघाडीवर निघण्यापूर्वी त्यांच्या कवायती पाहिलेल्या मला आठवतात. पण पलटणीचे प्रमुख खरंच वयानं फार लहान आहेत. अजून त्यांचा पाय स्थिरावलेला नाही...."

"तुम्ही कशासाठी तरफदारी चालवलीय कर्नल?" बेस्सोनोवनी मध्येच अडवले. "अधिक स्पष्ट, वस्तुस्थितीला धरून बोला."

"माफ करा कॉम्रेड जनरल. मला ते नको होतं...."

"काय नको होतं? नेमकं?" बेस्सोनोव यांच्या चेहऱ्यावर त्रासिक

भाव उमटला. "मी कुक्कुलं बाळ नाही, समजलात. तेव्हा माझ्यासमोर उगीच धूळ उडवू नका. असल्या गोष्टींकडं मी पुरतं दुर्लक्ष करतो."

"कॉम्रेड कमांडर...."

"कर्नल, तुमच्या डिव्हिजनबाबत माझं मत मी तिच्या पहिल्या लढाईनंतर बनवीन. याची पक्की आठवण ठेवा. जर या बोलण्याचा तुम्हाला अपमान वाटत असेल, तर तसं न बोलण्याचा मी प्रयत्न करीन."

कर्नल देयेव यांनी विषण्णपणे खांदे उडवले.

"कॉम्रेड कमांडर, अपमान वाटून घेण्याचा मला अधिकार नाही."

"जरूर आहे! कशासाठी याची तुम्हाला जोपर्यंत जाणीव आहे तोवर!"

बर्फात आपली काठी खुपसून, बेस्सोनोवनी भोवतालच्या दबलेल्या लष्करी अधिकाऱ्यांवर नजर टाकली. ते त्यांना अद्याप नीटसे ओळखत नव्हते. या संभाषणात कोणत्याही प्रकारे भाग घेण्याचे टाळून ते गप्प उभे होते.

"अटे ऽऽ न्शन! राईट ड्रेस!" आगगाडीजवळच्या दुसऱ्या विभागा-पासून मोठ्या आवाजात हुकूम सुटला.

"तिसरा १२२ मिलीमीटर हॉविट्झर तोफखाना, कॉम्रेड जनरल," कर्नल देयेव म्हणाले.

"चला, तुमचा हॉविट्झर तोफखाना पाहू या," सहज सुरात बेस्सोनोव म्हणाले.

## प्रकरण दुसरे

"तोफखाना! आगगाडीतून खाली उतरा! आपल्या तोफा खाली घ्या! घोडे खाली उतरवा!"

"मंडळी, आपलं नशीब! अख्खी रेजिमेंट पुढं आगगाडीतून चाललीय! फक्त घोड्यांनी ओढणारा आपला तोफखाना इथं उतरवताहेत."

"रणगाडा घोड्याला सहजी टिपत नाही, होय ना?"

"काय घडणार आहे पुढं—भरपूर लांब रपेट का पुढच्या वळणावर जर्मन वाट पाहतोय?"

"घाई करायचं काही कारण नाही. पुढच्या जगात तू लौकरच जाशील. आघाडीवर कसं असतं माहीत आहे? ॲकॉर्डियन बाहेर काढायच्या आत गाणं खतम!"

"तू कशाला विव्हळतो आहेस? मला एवढंच माहीत करून घ्यायचंय की, आघाडीवर जाण्यापूर्वी आपल्याला ते थोडी तंबाखू देणार आहेत किंवा नाही? का सार्जंट-मेजरनं सारी लाटली? हलकट साला! कूच चालू असताना आपल्याला खाऊ घालतील असं ते म्हणाले होते."

"तो सार्जंट-मेजर नाही, धोंडा आहे नुसता!"

"स्तालिनग्रादला जर्मनांना आपण मस्त कोंडलंय. आपण तिथंच चाललो असू. एकेचाळीसमध्ये त्यांना असं घेरलं असतं आपण तर काय मजा आली असती! एव्हाना आपण कुठल्या कुठं पोचलो असतो!"

"हा वारा म्हणजे बर्फ पडायचं हमखास चिन्ह आहे. संध्याकाळ-पर्यंत थंडीचा कडाका खूपच वाढेल!"

"आज संध्याकाळपर्यंत आपण जर्मनांवर धाड घालू. तेव्हा तुला थंडी वाजणार नाही असं वाटतं."

"म्हणून काय झालं? तुझ्या चड्डीतल्या गोष्टी नीट साभाळ! मित्रा, ते फार महत्त्वाचं आहे. नाहीतर आघाडीवर जाईपर्यंत गोठून त्यांचा बर्फ बनायचा! मग घरी आपल्या बायकोकडं जाण्यापूर्वी तुला सर्टिफिकीट घ्यायची गरज पडायची."

"दोस्तांनो, स्तालिनग्रादला जाणारा रस्ता कुठला?

स्तेपमधल्या त्या छोट्या जंक्शनपाशी चार तासांपूर्वी ते आगगाडीतून खाली उतरले, तेव्हा कुठल्या नव्या ठिकाणाला जाताना एक प्रकारची उत्तेजकता वातावरणात निर्माण होते तशी तेथे झाली होती. प्रत्येकजण उत्साहाने झपाटला होता. पुढे काय वाढून ठेवले असेल याची पर्वा न करता, प्रत्येकामध्ये एक नवा जोम संचारला होता आणि कुठल्याही विनोदाला किंवा सहज घातलेल्या शिवीला भरपूर हास्याचा प्रतिसाद मिळत होता.

या काही मिनिटांमध्ये, नजीक येणाऱ्या अज्ञात लढाईची वाट पाहणाऱ्या हजारो लोकांमधील सर्वस्पर्शी एकीची कुञ्नेत्सोवला अचानक जाणीव झाली होती. त्याच उत्तेजक भावनेत त्याला जाणवले होते की, आघाडीवर जाण्यापूर्वीच्या या काही मिनिटांनी त्यांच्यामध्ये भक्कम

आणि चिरंतन बंध निर्माण केले होते. नेहमी फिकट दिसणाऱ्या लेफ्टनंट द्रोझ्दोवस्कीचा चेहराही कमी गूढ भासत होता आणि मेस्सेरश्मिट विमानांच्या हल्ल्याच्या वेळी व नंतर कुझ्नेत्सोवने जे अनुभवले होते ते सर्व आता त्याला पार विसरून गेल्यासारखे वाटत होते. जणू ते सर्व केव्हाच भूतकाळात जमा झाले होते. द्रोझ्दोवस्कीबरोबर नुकताच घडलेला त्याचा संवादही त्याच्या मनातून पुसून गेला होता. अपेक्षेच्या विरुद्ध, कुझ्नेत्सोवने आपल्या पलटणीबाबत दिलेला अहवाल द्रोझ्दोवस्कीने ऐकला नव्हता (उखानोव परत आला हे सांगत असूनही), उलट अधिक तातडीच्या कामात गुंतलेल्या माणसाच्या अधीरपणाने त्याने कुझ्नेत्सोवला मध्येच अडवले होते. "तुझी पलटण उतरवण्याचं काम चालू ठेव. आणि सर्व काही शिस्तीला धरून उत्तम झालं पाहिजे हे लक्षात ठेव! समजलं?" "उत्तम समजलं," असे उत्तर देऊन कुझ्नेत्सोव आपल्या डब्याकडे गेला होता. तिथे पहिल्या तोफेचा गोलंदाज आपल्या माणसांमध्ये जणू काहीच घडले नाही अशा थाटात उभा होता. लढाई नजीक येऊन ठेपल्यामुळे प्रवासातले अनुभव एकदम पुसून गेल्यासारखे झाले होते व आता त्यांच्याकडे मागे वळून दृष्टिक्षेप टाकताना कुझ्नेत्सोवलाच नव्हे, तर द्रोझ्दोवस्कीलाही ते क्षुल्लक भासत होते. 'स्तालिन-ग्राद' या एका शब्दाभोवती गुरफटलेल्या त्या अज्ञात नव्या साहसाच्या कल्पनेने, सबंध तोफखान्याप्रमाणे त्यांनाही भारून टाकले होते.

परंतु त्या बर्फाळ स्तेपमधून, एकही शेत किंवा एकही खोपट नसलेल्या त्या निर्जन प्रदेशातून, क्षणाचीही विश्रांती न घेता, तब्बल चार तास रपेट केल्यानंतर ते आवाज आणि हसणे हळूहळू विरले होते. आश्वासनाप्रमाणे पोटात घालायला चार घासही मिळाले नव्हते. सारा उत्साह विरून गेला होता आणि घामाने भिजलेल्या अवस्थेत माणसे रखडत चालली होती. सूर्यप्रकाशित बर्फखंडावरील तीक्ष्ण परावर्तित प्रकाश त्यांच्या डोळ्यांमध्ये सतत खुपत होता आणि त्यांच्या डोळ्यांमधून पाण्याच्या धारा वहात होत्या. मध्येच केव्हातरी दूरवर मागील बाजूस आणि डाव्या हाताला गडगडाट ऐकू येत होता. नंतर हेही आवाज विरले व आघाडी जवळ येण्याऐवजी कुठे नाहीशी झाली, तोफांचा गडगडाट मागे का राहिला हे कुणालाही समजेना. आघाडी कुठे आहे आणि रांग कोणत्या दिशेने चालली आहे एवढा एकच विचार प्रत्येकाच्या

डोक्यात घुमू लागला. अत्यंत लक्षपूर्वक ते आवाज ऐकत होते व रस्त्याच्या कडेचा चुरचुरीत बर्फ मधून मधून खात होते. त्या बर्फ खाण्यामुळे त्यांचे ओठ भेगाळत होते व तहान खिनभरही कमी होत नव्हती, तरी बर्फ खाणे चालूच होते.

थोडचा वेळापूर्वी कुझ्नेत्सोव आपल्या पलटणीच्या अग्रस्थानापासून बाजूला झाला होता व दुसऱ्या तोफेमागून चालत होता. त्याच्या दुलईदार जाकीटाखालील व पायघोळ कोटाखालील आखूड लष्करी कोट त्याच्या छातीला घट्ट चिपकून बसला होता आणि त्याच्या टोपीखालून वाहणाऱ्या घामाच्या गरम धारा धगधगत्या कपाळावर येताच वाऱ्याने तात्काळ गोठून जात होत्या व कातडी आकुंचित होत होती. पूर्ण शांततेत पलटण रखडत पुढे चालली होती; गाडीतून उतरलेले ठिकाण मागे टाकून हास्यविनोद करीत व निष्कारण खिदळत ते सारे जेव्हा प्रथम निघाले होते, तेव्हा कुझ्नेत्सोवला त्याचा केवढा आनंद वाटला होता. पण तो मूळचा उत्साह केव्हाच नाहीसा झाला होता. त्याच्या नजरेसमोर आता सामानाच्या ओझ्यांखाली वाकलेल्या, ग्रेनेडच्या वजनामुळे पट्टे वेडेवाकडे झालेल्या, कुबड काढलेल्या पाठींची रांग तरंगत होती. काही ओझी एव्हाना तोफगाडयांवर जाऊन पडली होती.

थांबण्याच्या आणि विश्रांती घेण्याच्या हुकूमाची वाट पहात, शिणल्याभागल्या मन:स्थितीत, कुझ्नेत्सोव बेपर्वाईने रस्ता तुडवत चालला होता. खिन्नपणे धडपडत चालणारी चिबिसोवची आकृती त्याने पाहिली. तोफेला बत्ती लावणारा नेचायेव आता आतापर्यंत कसा सतेज तरुण खलाशी दिसत होता; पण या क्षणाला त्याची मुद्रा ओळखू न येण्याइतपत बदलली होती, त्याची मिशी ओली झाली होती व तिच्यावर बर्फाचा दाट थर बसला होता आणि मधूनमधून तो मिशीवरचा बर्फ फुंकरीत होता आणि चमत्कारिक पद्धतीने चाटीत होता.

थांबायची आज्ञा ते केव्हा देणार? केव्हा तरी देतील किंवा नाही?

"थांबायचा हुकूम ते केव्हा देणार? काय विसरले काय?" आपल्या पाठीमागे त्याला लेफ्टनंट दावलात्यानचा खणखणीत, त्रासलेला आवाज ऐकू आला; त्याच्या आवाजातील त्या शाळकरी, निष्पाप ताजेपणाचे कुझ्नेत्सोवला नेहमी आश्चर्य वाटायचे. कदाचित दावलात्यान अजूनही ज्या आनंदी, निष्काळजी काळात रमत होता त्या काळाच्या रम्य आठवणी

जाग्या होत असाव्यात. पण कुझ्नेत्सोवच्या त्या आठवणी मात्र पार पुसट झाल्या होत्या, दूर गेल्या होत्या.

त्याने कष्टाने मान मागे वळवली. प्रशिक्षण विद्यालयातून बाहेर पडताना नव्या गणवेषाबरोबरच त्याला देण्यात आलेली लाकडी रांध्याची कॉलर घामाने चिप्प भिजली होती व ओलसर गारवा त्याला जाणवत होता. मोठ्या डोळ्याचा आणि खप्पड चेहऱ्याचा, टोपी मफलरविना उघडाबोडका असा, दोन नंबरच्या पलटणीचा प्रमुख दावलात्यान घाईघाईने त्याला गाठण्याचा प्रयत्न करीत होता व जणू साखरेचा खडा चघळावा त्या उत्साहात बर्फाचा गोळा चघळत होता.

"ए कुझ्नेत्सोव, जरा ऐक!" आपल्या शाळकरी उंच आवाजात तो म्हणाला. "या तोफखान्याचा कम्सोमोल* संघटक म्हणून मला तुझा सल्ला हवाय. चालेल?"

"काय भानगड आहे गोगा?" प्रशिक्षण विद्यालयात कुझ्नेत्सोव नेहमी त्याला त्याच्या पहिल्या नांवाने संबोधत असे त्याप्रमाणे आताही त्याने त्याचे पहिले नांव उच्चारले.

"जर्मन प्रचाराचा नवा नमुना वाचलास का?" बर्फ चोखता चोखता दावलात्यानने खिशातून घडी घातलेला एक पिवळा कागद काढला व कपाळाला आठ्या घातल्या. "कासीमोवला एका खड्ड्यात हा कागद सापडला. रात्रीच्या वेळी विमानातून टाकले असावेत. त्यांचा राग आता भलताच भडकत चाललाय."

"गोगा, बघू दे मला तो कागद."

कुझ्नेत्सोवने ते पत्रक घेतले, घडी उलगडली व त्यावरील मोठ्या छापील अक्षरांवर नजर फिरवली.

"स्तालिनग्रादच्या गुंडांनो!

"आमच्या विमान दलाने पार भुगा केलेल्या स्तालिनग्रादमध्ये काही जर्मन फौजांना वेढण्यात तुम्हाला तात्पुरते यश आले आहे. पण तेवढ्यावरच आनंद साजरा करण्याचे कारण नाही! तुम्ही आता आगेकूच कराल ही आशा कायमची सोडून द्या! तुमच्याच आळीत आम्ही तुम्हाला अजून पाणी पाजू! आम्ही तुम्हाला वोल्गाच्या पलिकडे

---

*कम्सोमोल – कम्युनिस्ट युवक संघटना.

हाकलून लावू व सैबेरियन उवांना तुमचे भक्ष्य पुरवू. आमच्या वैभवशाली अजिंक्य सेनेपुढे तुम्ही निर्बल आहात. सोविएत खुन्यांनो, तुमची कळकट कातडी शाबूत आहे तोवर पळ काढा!"

"त्यांच्या तोंडाला अगदी फेस आलाय," कुझ्नेत्सोवने वाचून संपवले आणि शुष्क हसून कागदाची घडी घातली तेव्हा दावलात्यान म्हणाला. "स्तालिनग्रादमध्ये आपण एवढी कडवी ताकद दाखवू असं त्यांना कधीच वाटलं नव्हतं. या प्रचाराबाबत तुझं काय मत आहे?"

"तुझं बरोबर आहे गोगा. बनावट गोष्टीचा हा खासा नमुना आहे," पत्रक परत देत कुझ्नेत्सोव उत्तरला. "एवढी सरळ सरळ शिवीगाळ मी आजवर कधी वाचली नव्हती. ४१ मध्ये त्यांचा पवित्रा अगदी वेगळा होता: "शरण या आणि येताना जेवणाचं भांडं नि चमचा आणायला विसरू नका!" दर रात्री अशा पत्रकांचा ते आमच्यावर पाऊस पाडीत."

"अशा प्रचाराबाबत मला काय वाटतं सांगू?" दावलात्यान म्हणाला. "पुढं काय होणार हे माहीत असलेल्या कुत्र्याच्या गुरगुरण्यासारखा हा प्रकार आहे. शुद्ध कुत्र्याची गुरगुर."

त्याने ते पत्रक चुरगाळून त्याचा बोळा केला व रस्त्याच्या कडेला फेकून तो मोठ्यांदा हसला. त्याचे हसणे ऐकताच कुझ्नेत्सोवला पुन्हा एकवार पार पूर्वीच्या परिचित गोष्टीची आठवण झाली. वसंतामधला सोनसळी उन्हाचा एक दिवस आहे आणि त्या उबदार प्रकाशाचे व लिंबाच्या झाडाच्या पानांच्या सावलीचे गंमतीदार नक्षीकाम उमटलेल्या शाळेच्या वर्गाच्या खिडकीतून तो बाहेरचा सुंदर वसंतातला दिवस पुन्हा पाहतोय, असा कुझ्नेत्सोवला भास झाला.

"तुझ्या एक गोष्ट लक्षात आली का?" कुझ्नेत्सोवच्या पावला-बरोबर पाऊल टाकीत दावलात्यानने संभाषण पुढे चालू केले. "प्रथम आपण पश्चिमेला चालत होतो, आता आपण दक्षिणेला वळलोय. कुठं चाललोय आपण?"

"आघाडीवर."

"ते मलाही ठाऊक आहे. काय पण शोध!" चिडून दावलात्यान खेकसला, पण त्याचे लांबट, मनुक्यासारखे डोळे मात्र सतत सावध होते. "स्तालिनग्राद आता आपल्या मागं आहे. तू पूर्वी लढाईत होतास,

तर मला एक सांग—आपल्याला एक निश्चित ठिकाणा का सांगितला नाही? आपल्याला कुठं जायचं आहे? ते गुपित आहे काय? तुला काही ठाऊक आहे काय? कदाचित आपण मुळी स्तालिनग्रादला जातच नसू?"

"गोगा, कुठंही जात असलो तरी ती आघाडी असेल," कुझ्नेत्सोव उत्तरला. "दुसरीकडं कुठंही नाही, फक्त आघाडीवर."

दावलात्यानने आपले टोकदार नाक रागाने मुरडले.

"ही काय—व्याख्या? यावर मी हसलं पाहिजे काय? ते मला माहीत आहे. पण या भागात आघाडी कुठं? आपण बरेचसे नैर्ऋत्येला चाललोय. कंपास बघायचाय?"

"आपण नैर्ऋत्येला जातोय हे मला समजतंय."

"जर स्तालिनग्रादला आपण जात नसू तर अगदी शरमेची गोष्ट आहे. ते तिथं जर्मनांचा फडशा पाडतील आणि आपण इकडं पिछाडीला तंगड्या झाडीत बसू."

या गोष्टीची लेफ्टनंट दावलात्यानला गंभीरपणे चर्चा करायची इच्छा होती हे उघड होते, पण त्या चर्चेचा काही उपयोग होणार नाही हे कुझ्नेत्सोवला माहीत होते. त्यांच्यापैकी कुणालाच डिव्हिजनच्या आगेकूचीचा नक्की मार्ग माहीत नव्हता व वाटचाल करीत असतानाच मार्ग बदलला आहे एवढे त्यांना जाणवले होते. स्तालिनग्रादच्या तोफांचा गडगडाट आता दूर त्यांच्या मागे पडला होता व स्तालिनग्राद आपले अंतिम ठिकाण नाही एवढे त्यांना समजून चुकले होते.

"जवळून चला!" पुढून हुकूम सुटला व अनिच्छेनेच शेवटापर्यंत पोचविला गेला. "लौकर पावले उचला!"

स्तेपवर अथांग पसरलेली, धडपडत चालणारी ती रांग बघत कुझ्नेत्सोव उत्तरला, "या क्षणाला काहीच स्पष्ट नाही. आपण कुठं तरी जात आहोत. आणि ते आपल्याला लौकर चलण्याची घाई करताहेत. कदाचित आपण वेढ्याच्या दिशेने चाललो असू. तिथं पुन्हा धुमश्चक्री उडाल्याचं कालच्या निवेदनात म्हटलं होतं."

"हे फार छान होईल!... पोरांनो, जरा जवळून चला!" प्रशिक्षण विद्यालयातील खास लकबीच्या आवाजात दावलात्यानने हुकूम पुढे सरकवला, पण अखेरच्या शब्दांना त्याचा आवाज चिरकला आणि

तो खळखळून हसला. "हा बर्फ बहुधा चुकीच्या वाटेनं घशात गेला! तू का थोडा खात नाहीस? तहान भागते त्यानं. माझ्या अंगातून तर अगदी डुकरासारख्या घामाच्या धारा वाहताहेत!" आणि पुन्हा एकदा त्याने जणू साखर चोखावी त्या थाटात बर्फ चोखायला सुरुवात केली.

"तू बर्फ चाटतोयस? फेकून दे तो गोगा. लौकरच आजाऱ्यांच्या यादीत तुझं नांव जाईल. मला वाटतं, आत्ताच तुझा आवाज थोडा घोगरा झालाय," अनिच्छेने दात विचकीत कुझ्नेत्सोव म्हणाला.

"आजाऱ्यांच्या यादीत? कधीही नाही!" दावलात्यान उद्गारला.

आणि परीक्षेपूर्वी एखाद्या शाळकरी मुलाने भोळसटपणे करावे, त्याप्रमाणे तो मान फिरवून तीनदा थुंकला* आणि नंतर अधिक गांभिर्याच्या थाटात त्याने बर्फाचा गोळा खाली फेकून दिला.

"तिथं जवळ रहा! तुमच्या तोफांजवळ रहा! त्यांना खेचून धरायला तयार रहा!"

रांगेच्या पुढच्या टोकापासून द्रोझ्दोवस्की तोफखान्याच्या दिशेने येत होता. खोगीरावर जणू काही पुतळा बसवावा तसा तो ताठ बसला होता. किंचित कलत्या टोपीखालील त्याचा चेहरा गूढ आणि कणखर दिसत होता. आपल्या केसाळ, भक्कम पायाच्या मंगोलियन घोड्याची दुडकी चाल त्याने मंदावली, रांगेच्या बाजूला लगाम खेचून तो उभा राहिला व काही मिनिटे ठेचकाळत, धडपडत पुढे चालणाऱ्या पलटणींकडे निरखून पहात राहिला. प्रत्येकाच्या लोकरी गळपट्ट्यावर बर्फाचा दाट थर बसला होता, प्रत्येकाच्या कोटाची कॉलर वर दुमडलेली होती. वाकलेल्या खांद्यांवरून सामानाचे बोजे सारखे खाली घसरत होते. थांबण्याच्या हुकूमाशिवाय दुसरा कोणताही हुकूम या थकलेल्या लोकांच्या घोळक्यात शिस्त आणायला समर्थ नव्हता असे दिसत होते. तोफखान्याच्या या बेंगरूळपणाचा, त्याच्यामधील औदासीन्याचा आणि बेफिकीरीचा, द्रोझ्दोवस्कीला राग आला. पण त्याहीपेक्षा, पाठींवरच्या सामानांचे बोजे तोफगाड्यांवर लादलेले पाहून त्याला मनस्वी चीड आली. त्या

---

*तीनदा थुंकले म्हणजे अशुभ घडत नाही अशी एक जुनी रशियन कल्पना. — अनुवादक

सामानात कुणाची तरी छोटी बंदूकही एखाद्या काठीसारखी डोकावत होती.

"चटचट पाय उचला!" रिकीबीतून झटकन उभे रहात द्रोझ्दोवस्की ओरडला. "एकमेकांच्या मधलं अंतर योग्य ठेवून चला! तोफगाड्यांवर कुणाचं सामान आहे? कुणाची ती बंदूक? तोफगाड्यांवरचं सामान ताबडतोब उचलून घ्या!"

पण सामान उचलून घ्यायला कुणीही गेले नाही आणि त्याच्या जवळच्या लोकांनी केवळ आज्ञापालन करण्याच्या बहाण्याने चालण्याचा वेग किंचित वाढवला. रिकीबीत अधिक उंच उभे राहून द्रोझ्दोवस्कीने तोफखान्याला पुढे जाऊ दिले व नंतर आपल्या नमदी बुटांवर निर्धाराने चाबूक फडकावला.

"तोफखान्याच्या पलटणींच्या प्रमुखांनो, हजरी द्या!"

कुझ्नेत्सोव आणि दावलात्यान असे दोघे एकत्रपणे त्याच्याकडे गेले. द्रोझ्दोवस्की घोड्यावरून किंचित खाली झुकला आणि वाऱ्यामुळे लालभडक झालेल्या आपल्या पारदर्शी डोळ्यांनी त्यांच्याकडे जळजळीतपणे पहात कडक शब्दात बोलला.

"एकदाही विश्रांतीला थांबलो नाही म्हणून तोफखाना असा विस्कळित चालतोय ही सबब सांगून चालायची नाही! तोफगाड्यांवर बंदुकाही ठेवल्यात म्हणजे काय? का तुमची माणसं तुम्हाला ऐकेनाशी झालीत?"

"तोफखाना कमांडर, प्रत्येकजण कमालीचा दमलाय," कुझ्नेत्सोव शांतपणे म्हणाला. "असं होणं अगदी साहजिक आहे."

"घोड्यांनासुद्धा धाप लागलीय," दावलात्यानने त्याचा सूर ओढला व तोफखाना कमांडरच्या घोड्याच्या बर्फाने माखलेल्या मुस्कटाला थोपटले. घोड्याने त्याच्या हातमोज्यांवर वाफाळ श्वासाचा फवारा उडवला.

द्रोझ्दोवस्कीने लगाम खेचला तसा घोड्याच्या मानेला हिसका बसला.

"माझे पलटण प्रमुख फारच हळव्या मनाचे बनलेले दिसतात," तो उपहासाने म्हणाला. "'प्रत्येकजण कमालीचा दमलाय,' 'घोड्यांनासुद्धा धाप लागलीय.' आपण कुणाकडं चहाला चाललोय का आघाडीवर? तुम्हाला दयाळू आणि ममताळू वागायची इच्छा झालीय? दयाळू प्रमुखांच्या हाताखालची माणसं आघाडीवर माशांसारखी पटापट

मरतात! 'आम्हाला क्षमा करा' असं म्हणत आम्ही सारा वेळ लढावं अशी तुमची अपेक्षा आहे? आता नीट ऐका. आतापासून पुढच्या पाच मिनिटांनंतर जर काही बोजे किंवा बंदुका तोफगाड्यांवर तशाच पडलेल्या दिसल्या, तर तुम्हा पलटणप्रमुखांना त्या आपल्या पाठीवर घ्याव्या लागतील. समजलं?"

"चांगलं समजलं."

द्रोझ्दोवस्कीच्या शब्दांमधील कठोर सत्याची जाणीव होताच कुझ्नेत्सोवने त्याला सलाम ठोकला व तो तोफगाड्यांकडे झपझप गेला, तर दावलात्यान आपल्या पलटणीकडे धावला.

"हे कुणाच्या मालकीचं आहे?" एका तोफगाडीवरचा बोजा त्याच्या जेवणाच्या भांड्यांच्या खडखडासकट खेचीत कुझ्नेत्सोव ओरडला. "ही बंदूक कुणाची?"

लोकांनी नाखूष नजरांनी भोवताली पाहिले व खांद्यावरची ओझी आपोआप सरळ झाली. एक तुसडा आवाज आला: "कुणी आपला बोजा इथं ठेवला? चिबिसोवनं ना?"

"चिबिसोव!" नेचायेवने आपल्या खास सार्जंट धाटणीची आरोळी ठोकली. "लेफ्टनंट तुला बोलावताहेत!"

आपल्या अत्यंत आखूड आणि कमालीच्या ढगळ कोटातला चिबिसोव, दारूगोळ्याच्या गाड्यांपासून घाईघाईने लंगडत, लोकांवर आदळत, तोफगाड्यांच्या दिशेने येऊ लागला. त्याच्या चेहऱ्यावर त्याचे नेहमीचे हास्य विलसत होते.

चिबिसोव ज्या पद्धतीने तोफगाडीभोवती घुटमळू लागला त्यावरून त्याला आपली चूक उमगल्याचे कुझ्नेत्सोवच्या लक्षात आले. त्याचा तो गोंधळ पाहून कुझ्नेत्सोवलाच लाजल्यासारखे झाले व त्याने विचारले "हे तुझं सामान? ही तुझी बंदूक?"

"होय, कॉम्रेड लेफ्टनंट, माझं सामान... माझी बंदूक..." त्याच्या हिमभरल्या लोकरी गळपट्ट्यावर वाफांचे लोट उमटत होते, त्याचा आवाज घोगरा झाला होता. "मला माफ करा कॉम्रेड लेफ्टनंट. टाचेला फोड आलाय. माझं सामान जरा बाजूला ठेवलं तर पायाला थोडा आराम मिळेल असं वाटलं होतं."

"तू खूप दमलायस का?" एकदम आवाज खाली पाडून व

द्रोझ्दोवस्कीच्या दिशेने नजर टाकीत कुझ्नेत्सोवने चिबिसोवला विचारले. तोफखान्याचा प्रमुख, नेहमीप्रमाणे ताठ स्वारी करून, रांगेशेजारून कडक पाहणी करीत चालला होता.

"चिबिसोव, मागे रेंगाळू नको," अजूनही खालच्या आवाजात कुझ्नेत्सोवने हुकूम दिला. "तोफगाड्यांच्या बरोबरीनं चाल."

"ठीक आहे लेफ्टनंट. तुम्ही सांगाल त्याप्रमाणं वागतो..."

चिबिसोव दुबळ्या चालीने तोफगाडीमागून धडपडत जाऊ लागला.

"आणि हे कुणाचं?" दुसरा बोजा उचलीत कुझ्नेत्सोवने विचारले.

त्या क्षणी त्याच्यामागे त्याला हसणे ऐकू आले. आपल्या सार्जंट-मेजरसारख्या वागण्याला किंवा चिबिसोवला कुणीतरी हसते आहे असे वाटून त्याने भोवती पाहिले.

तोफेच्या डाव्या बाजूने, रस्त्याच्या कडेने, उखानोव एखाद्या अस्वलासारखा झुलत, झोयाबरोबर हसत व गप्पा मारीत चालला होता. झोया त्याचे बोलणे अर्धवट ऐकत होती व मान डोलावीत, धापा टाकीत, घामेजल्या-थकल्या चेहऱ्याने त्याच्या जोडीने चालली होती. तिने आपला पट्टा करकचून आवळला होता आणि तिच्या खांद्यावर वैद्यकीय सामानाची थैली दिसत नव्हती; तीसुद्धा कुठल्यातरी गाडीवर ठेवलेली असावी.

साहजिकच ती दोघे तोफखान्याच्या शेवटच्या टोकाला होती व नुकतेच त्यांनी तोफांना गाठले होते. उखानोवच्या दिखाऊ आनंदामागचा काही गर्भित अर्थ शोधण्याच्या हेतूने, दमलेले गोलंदाज त्या दोघांकडे थोड्या तिरस्कारानेच नजरा टाकीत होते...

"थांबा! पुढं उतार आहे!" रांगेच्या पुढून सावधगिरीची आज्ञा सुटली. "ब्रेक लावा! तोफांना सर्वांनी पकडून ठेवा!"

कुझ्नेत्सोवने त्या आज्ञेचा पुनरुच्चार केला व तो तोफखान्याच्या आघाडीकडे गेला. तिथे माणसे पहिल्या तोफेच्या भोवती गोळा झाली होती. तोफगाड्याच्या खालच्या बाजूला व चाकांना ते बिलगले होते आणि तोफगाडीला त्यांनी खांदा दिला होता. खिंडीत गेलेल्या त्या जोरदार उतारावर घामेजले घोडे मागच्या पायावर सतत बसत होते व गाडीवान आरडाओरड व शिवीगाळ करीत घोड्यांचे लगाम गच्च खेचून धरीत होते.

त्या काचेसारख्या गुळगुळीत चकाकत्या उतारावरून खिंडीच्या पायथ्यापर्यंत पहिला तोफखाना सुखरूप पोहोचला होता आणि पलिकडच्या चढावर तोफा चढविण्यासाठी माणसे मुंग्यांसारखी त्यांना बिलगून मागून रेटा लावीत होती. त्यापलिकडे सैन्याची रांग वळण घेत स्तेपवर अथांग पसरलेली दिसत होती. पार खाली, मुख्य ठाण्याच्या पलटणीचा कमांडर, सार्जंट-मेजर गलोवानोव रस्त्याच्या मध्यभागी उभा होता व बेंबीच्या देठापासून ओरडीत जोरदार हातवारे करीत होता: "या बाजूनं! माझ्या दिशेनं या!"

"जपून सावकाश चला! घोड्यांचे पाय मोडू नका! सतत धरून ठेवा!" उताराच्या पार कडेपर्यंत आपला घोडा नेत द्रोझ्दोवस्कीने हुकूम केला. "पलटण प्रमुखांनो, आपण घोड्यांना लंगडे केले तर तोफा आपल्याला ओढाव्या लागतील! तेव्हा त्यांना मागं खेचून धरा! सावकाश चला! आणखी हळू!"

होय, जर आम्ही घोडे लंगडे केले तर तोफा ओढायचे काम आम्हालाच करावे लागेल. कुझ्नेत्सोव या विचारासरशी अस्वस्थ झाला. त्याला एकाएकी जाणीव झाली की, तो आणि इतर सगळे दुसऱ्या एका इच्छेपुढे कमालीचे दुय्यम आहेत आणि त्या इच्छेला विरोध करणे कुणालाही शक्य नाही; कुठल्यातरी प्रचंड आणि कमालीच्या दुर्दम्यतेमध्ये सारे काही विलीन झाले आहे व त्या दुर्दम्यतेच्या लोटामध्ये थकली-भागलेली व क्षीण होत जाणारी व्यक्ती अस्तित्वातच रहात नाही. इतर सर्वांबरोबर आपणही विलीन होत आहोत या जाणीवेच्या कैफात त्याने आज्ञेचा पुनरुच्चार केला—"घट्ट पकडा! सारे तोफांना धरा!" व पहिल्या तोफगाडीच्या चाकांना त्याने इतरांबरोबर धरले. तोफेवरच्या इतर माणसांचे चेहरे विद्रूप झाले होते व त्या प्रचंड उतारावरून गाडा जसा घसरू लागला तसे धापा टाकीत, गाड्यावर रेलून तोफेच्या चाकांना धरून ठेवण्याचा ती माणसे प्रयत्न करीत होती.

"हो ऽ हो ऽ हो ऽ! मागे मागे!!" गाडीवान घोड्यांवर ओरडत होते. त्यांच्या लोकरी गळपट्ट्यांच्या बर्फाळ किनारीतून त्यांचे घाबरून वासलेले जबडे विचित्र दिसत होते.

तोफगाडीची व तोफेची चाके उलटू नयेत म्हणून त्यांना ब्रेकच्या साखळ्या बसवलेल्या होत्या, पण त्या घट्ट, गुळगुळीत रस्त्यावर साखळीचे

दाते पकड धरेनात व लोकांचे नमदी बूट त्या उतारावरून सटासट घसरू लागले. तोफगोळ्यांचे भारी वजन, खुद्द तोफेचे वजन व तोफगाड्याचे वजन असा एकूण भार प्रचंड वाढल्याने वरचा दाब सतत वाढत चालला. आकाशा कडे माना उंचावून, पाठच्या पायावर ताणा पडल्याने खाली बसणाऱ्या घोड्यांवर तोफगाड्याचा लाकडी दांडा आदळला; तोफेवरच्या लोकांकडे रागाने नि तिरस्काराने पहात गाडीवान पुन्हा ओरडले आणि चाकांना बिलगलेला तो घामट मानवी शरीरांचा समूह त्या उतारावरून अधिकाधिक वेगाने घसरू लागला...

स्तेपभूमीतील एका बेचिराख, अनाम खेड्याशी सैन्य येऊन टेकले, तेव्हा सूर्यास्ताला विश्रांतीचा हुकूम देण्यात आला. रस्त्याच्या कडेची पहिली जळलेली घरे, गोठलेल्या ओढ्याच्या काठी हिरवट वाळुंजीखालील काळेठिक्कर पडलेले चुलाण्यांचे एकाकी सांगाडे, तेथील बर्फाच्या भोकां-मधून तरंगत येत असलेली लालसर विषारी वाफ, हे पाहून प्रत्येकाला प्रथम एकदम आश्चर्याचा धक्का बसला. डिसेंबरातल्या त्या सूर्यास्ताला पश्चिम क्षितिज व धरती लाल-जांभळ्या रंगाने माखून निघाली होती. गारठा एवढा जबरदस्त होता, वातावरण एवढे थिजले होते, की रस्त्याच्या कडेला थांबलेल्या माणसांचे चेहरे, बर्फाने माखलेल्या तोफा, घोड्यांचे पट्टे, ट्रक, ट्रॅक्टर या साऱ्या गोष्टीही पार थिजल्यासारख्या दिसत होत्या. हिमकणांच्या थिजल्या पार्श्वभूमीवर त्या धातूंची चकाकी अधिकच झळाळत होती.

"मंडळी, आपण कुठं चाललोय? तो साला जर्मन कुठं आहे?"

"इथं एक खेडं होतं. आता पहा, एक घर धड उभं नाही. काय बोध होतो तुला यावरून? फेदकाच्या लग्नाला जायला म्हणून निघायचं आणि सीदोरच्या प्रेतयात्रेला फेरी संपवायची!"

"प्रेतयात्रेच्या नांवानं का विव्हळताय? आपण स्तालिनग्रादला पोहोचू. वरच्यांना उत्तम समजतं."

"इथं लढाई केव्हा जुंपली होती?"

"बरेच दिवस लोटले असावेत असं दिसतं."

"कुठं उबेला आडोसा मिळाला तर काय छान होईल. नाहीतर आघाडीवर पोचण्यापूर्वीच आपला गोठून बर्फ व्हायचा."

"पण ही बेटी वैतागी आघाडी आहे कुठं? तेवढं सांग बुवा मला!"

मोठ्या कष्टाने पावले टाकीत कुझ्नेत्सोव पहिल्या तोफेच्या गाडीवानांकडे गेला. अधिकच जांभळा चेहरा झालेला रूबिन विमनस्कपणे आपल्या गाड्याला जुंपलेल्या घोड्यांच्या ओढण्या चाचपत होता; त्यांच्या चिकट अंगांमधून वाफा निघत होत्या. तरणा सेरगुनेन्कोव त्याच्या उरलेल्या एका घोड्याशेजारी उभा राहून मूठभर ओट त्याला चारीत होता. त्या थकल्या जनावराचे ओठ त्याच्या एका हातातील ओट खेचून घेत होते व दुसऱ्या हाताने तो त्याची ओलसर वाकलेली मान थोपटत होता. त्या गाडीवानांकडे कुझ्नेत्सोवने पाहिले आणि आपल्या तोफेवरच्या लोकांकडे तो गेला. आपल्या माणसांमध्ये घटकाभर पडावे, कुणाच्या तरी पाठीचा टेकायला आधार घ्यावा, झोंबऱ्या वाऱ्यापासून बचाव करण्यासाठी कॉलर वर करावी आणि आपल्याच श्वासाने चेहऱ्याला ऊब आणावी, एवढी एकच इच्छा त्या क्षणाला त्याच्या मनात होती.

"उठा! उठा! विश्रांती संपली!" हुकूम सुटला. "आगेकूच करायला हुश्शार!"

"हे काय हे? अजून पापणी मिटायला पण वेळ मिळाला नाही आम्हाला!" अंधारात आवाज कुरबुरले. "असं का पिटाळताहेत आम्हाला!"

"अरे केव्हा गिळायला मिळणार? त्या सार्जंट-मेजरचा आणि त्याच्या मुदपाकखान्यांचा पत्ताच नाही. मला वाटतं, भांडारखान्यात त्यांची जुंपली असावी!"

आपण पुन्हा निघालो, कुझ्नेत्सोवच्या मनात विचार आला. सारा वेळ तो आज्ञेची अपेक्षा करीत होता आणि थकल्या शरीराच्या जडावलेपणामुळे त्याचे पाय थरथरले. पण आघाडी कुठे आहे? आम्ही कुठे चाललो आहोत?

निश्चित माहिती नसली तरी स्तालिनग्राद कुठेतरी पार मागे, पिछाडीला असावे असा त्याने तर्क केला. स्तालिनग्रादमध्ये वेढ्यात अडकलेल्या व्हॉन पाउल्सच्या प्रचंड सैन्याला मुक्त करण्यासाठी प्रति आक्रमक चढाई करून येणाऱ्या जर्मन पँझर डिव्हिजनना अडविण्यासाठी सबंध सैन्याला व तदनुषंगाने तोफखाना रेजिमेंट, तोफखान्याची त्याची पलटण यांना समाविष्ट करणारी डिव्हिजन एकाच दिशेने-नैर्ऋत्य दिशेने

सतत दामटली जात आहे, हे त्याला माहीत नव्हते. आणि आणखी एक गोष्ट त्याला माहीत नव्हती की, त्याचे नशीब आणि त्याच्याबरोबरच्यांचे नशीब — ज्यातले काही मरणार होते व काही जिवंत राहणार होते — या सर्वांचे आता एकच एक सामायिक नशीब बनले होते; प्रत्येकाच्या वाट्याला कोणते भवितव्य वाढून ठेवले होते याचा त्याच्याशी काही संबंध नव्हता.

"निघायला तयार व्हा. पलटण प्रमुखांनो, तोफखान्याच्या कमांडरला हजरी द्या!"

दाटत चाललेल्या काळोखात माणसे नाखुषीने धडपडत उभी झाली. सर्व बाजूंनी खोकण्याचे, खाकरण्याचे व शिवीगाळीचे आवाज ऐकू येत होते. तोफेवरच्या माणसांची तोफांजवळ गर्दी उडाली होती. तोफेच्या मागच्या बाजूला त्यांनी ठेवलेल्या आपापल्या रायफली व छोट्या बंदुका ते उचलून घेत होते आणि सार्जंट-मेजरचा व त्याच्या मुदपाकखान्यांचा उच्च स्वरात उद्धार करीत होते. गाडीवानांनी घोड्यांच्या नाकाजवळच्या पिशव्या काढून घेतल्या व "बेट्यांनो, रात्रभर तुम्ही चरत रहाल" अशा अर्थाचे हातवारे त्यांच्याकडे पाहून केले. इंजिनांची घरघर सुरू होताच सैन्याच्या पुढील भागातून आवाजाची एक लाट गेली व हॉविट्झर तोफखाना हळूहळू पुन्हा मार्गाला लागला.

रस्त्याच्या मध्यभागी टेहळ्यांच्या व संदेशवाहकांच्या एका गटाबरोबर लेफ्टनंट द्रोझ्दोवस्की उभा होता. त्यांच्याजवळच विझवलेल्या जाळामधून अजून धुराचे पांढरे लोट उमटत होते. कुझ्नेत्सोव तेथे आला तेव्हा गलेलठ्ठ सार्जंट-मेजर गलोवानोवने रांध्याच्या पाकीटाखाली धरलेल्या नकाशावर तो विजेरीचा प्रकाशझोत टाकीत होता. कुणीही विरोध केलेला खपणार नाही अशा सुरात द्रोझ्दोवस्की बोलत होता.

"कोणतेही प्रश्न विचारण्याची गरज नाही. आपले अंतिम ठिकाण माहीत नाही. या रस्त्यावरून, नैर्ऋत्येला आपला मार्ग जातो, एवढंच आम्हाला ठाऊक आहे. तू आणि तुझी पलटण तोफखान्याच्या पुढं चालेल. नेहमीप्रमाणं तोफखाना रेजिमेंटच्या पिछाडीला राहील."

"समजलं," गलोवानोवच्या पोटाच्या खड्ड्यामधून घनगंभीर आवाज उमटला व अंधारात अस्पष्ट दिसणाऱ्या गाड्यांना ओलांडून तो आपल्या टेहळ्यांबरोबर व संदेशवाहकांबरोबर निघून गेला.

"लेफ्टनंट कुझ्नेत्सोव?" द्रोझ्दोवस्कीने विजेरी किंचित वर उचलली व तिचा प्रखर झोत लेफ्टनंटच्या डोळ्यांवर टाकला. कुझ्नेत्सोव दोन पावले मागे सरला.

"उजेडाशिवाय मला दिसतं. काय बातमी आहे तोफखाना कमांडर?"

"पलटणीत सारं ठीक आहे? कुणी मागं रखडत नाही ना? कुणी आजारी नाही? तुम्ही निघायला तयार आहात? पटकन चला आता."

दुसऱ्या कशाचा तरी विचार करीत द्रोझ्दोवस्कीने सारे प्रश्न यंत्रवतपणे भराभरा फेकले. याची कुझ्नेत्सोवला एकाएकी चीड आली.

"अजून कुणालाही नीट विश्रांती मिळालेली नाही. तोफखाना कमांडर, मुदपाकखान्याला काय झालंय हे मी विचारू शकतो का? सार्जंट-मेजर मागं का पडलाय? प्रत्येकाला मरणाची भूक लागलीय! अर्थात आम्ही निघायला तयार आहोत. विचारायचं कारण काय? कुणीही आजारी नाही किवां मागं रखडत नाही आणि फरारीसुद्धा कुणी नाही..."

"कुझ्नेत्सोव, याला हजरी देणं म्हणतात का?" द्रोझ्दोवस्कीने त्याला मध्येच अडवले. "तर तू नाखूष आहेस? कदाचित छान शिजवलेलं जेवण येईपर्यंत आपण आपले अंगठे चोखत बसू या. तू पलटण प्रमुख आहेस की गाडीवान?"

"माझ्या माहितीप्रमाणं मी पलटण प्रमुख आहे."

"पण तसं वाटत नाही! तू उखानोव आणि त्याच्यासारख्यांच्या कलानं वहात जातोस. तुझा धीर सुटला का? आपल्या पलटणीकडं ताबडतोब परत जा!" थंड सुरात द्रोझ्दोवस्कीने हुकूम ठोकला. "आणि तुझ्या माणसांच्या डोक्यात गिळण्याचे नव्हे तर लढण्याचे विचार भरव! लेफ्टनंट कुझ्नेत्सोव, तू मला चकित केलंस!.. आपण बरोबर कसे लढणार मला समजत नाही!"

"तोफखाना कमांडर, तूही मला चकित केलंयस! आणि लोकांबरोबर बोलण्याचे दुसरेही काही मार्ग आहेत हे मला चांगलं ठाऊक आहे," कुझ्नेत्सोव तिटकाऱ्याने उत्तरला आणि इंजिनांच्या घरघरीने व घोड्यांच्या खिंकाळण्याने सजग बनलेल्या अंधारात निघून गेला.

"लेफ्टनंट कुझ्नेत्सोव!" द्रोझ्दोवस्की ओरडला. "मागं फीर!"

"आता काय पुन्हा?"

थिजलेल्या धुक्यातून वाट काढीत विजेरीचा प्रकाशझोत वाफाळत जवळ गेला आणि कुझ्नेत्सोवच्या गालांवर तो त्रासदायक प्रकाशगोल स्थिरावला.

"लेफ्टनंट कुझ्नेत्सोव!" प्रकाशाची पाती त्याच्या डोळ्यात घुसली. धनुष्याच्या ताणलेल्या दोरीप्रमाणे द्रोझ्दोवस्की त्याच्या पुढ्यात येऊन उभा राहिला. "मी तुला परत मागं यायचा हुकूम करतो."

"तुमची विजेरी बाजूला ठेवा, तोफखाना कमांडर," त्या क्षणाला त्या दोघांमध्ये काय घडेल याची जाणीव होऊन कुझ्नेत्सोव शांतपणे म्हणाला. पण आता द्रोझ्दोवस्कीचा प्रत्येक शब्द, त्याचा असहिष्णू, बोचरा आवाज विरोधाची अदम्य उर्मी निर्माण करीत होता; जणू तो करीत असलेली प्रत्येक कृती, उक्ती म्हणजे कुझ्नेत्सोवला त्याच्या सत्तेची जाणीव करून देण्याचा हेतुपुरस्सर प्रयत्न होता व त्याला अपमानित करण्याचा प्रयत्न होता. खरेच, त्याला हेच हवे आहे, असा कुझ्नेत्सोवच्या मनात विचार आला आणि हे त्याला जाणवले न जाणवले तोच त्याच्या तोंडावर प्रकाशाचा प्रखर झोत पडला व त्या डोळे दिपवणाऱ्या नारंगी प्रकाशवर्तुळांमधून द्रोझ्दोवस्कीचा दबता आवाज त्याला ऐकू आला.

"कुझ्नेत्सोव... लक्षात ठेव मी या तोफखान्याचा कमांडर आहे! फक्त मीच, दुसरा कुणी नाही! हे तोफखाना विद्यालय नाही! यापुढं जवळिक चालणार नाही! तू लाथा झाडल्यास तर तूच संकटात पडशील! मी कोणतीही गय करणार नाही! समजलं? तुझ्या पलटणीकडं जा– धावत!" द्रोझ्दोवस्कीने विजेरी त्याच्या छातीवर खुपसली. "परत पलटणीकडं! धावत!"

थेट प्रकाशझोताने डोळे दिपल्यामुळे कुझ्नेत्सोवला द्रोझ्दोवस्कीचे डोळे दिसले नाहीत, पण छातीला त्या थंडगार वस्तूचा स्पर्श जाणवत होता. विजेरीचा तो हात बाजूला सारून व काही क्षण खाली वळवून कुझ्नेत्सोव म्हणाला, "विजेरी बाजूला कर! आणि तुझ्या धमक्या फार मूर्खपणाच्या वाटतात तोफखाना कमांडर!"

तो अदृश्य रस्त्याच्या दिशेने चालत गेला. त्या अंधारात ट्रक, तोफगाड्या, तोफा यांचे आकार व घोड्यांच्या जवळचे गाडीवान यांच्या आकृती ओळखणे कठीण जात होते. विजेरीच्या झोतामुळे अजुन त्याच्या

डोळ्यांसमोर अंधारात लालपिवळी वर्तुळे उमटत होती. आपल्या पलटणीजवळ तो लेफ्टनंट दावलात्यानवर आदळला. दावलात्यानच्या तोंडाला पावाचा खमंग वास येत होता. त्याने पटकन विचारले, "द्रोझ्दोवस्कीकडून आलास? काय पाहिजे होतं त्याला?"

"गोगा, जा आणि भेट त्याला. पलटणीचं नीतीधैर्य कसं आहे आणि कुणी आजारी किंवा फरारी आहेत काय, हे त्याला जाणून घ्यायचंय," कडवटपणे कुझ्नेत्सोव उत्तरला. "तुझ्याकडं काही आहेत ना, काय?"

"बाष्कळ बडबड!" शाळकरी आवाजात त्याला दावलात्यानने प्रतिसाद दिला व पावाचा सुका तुकडा चघळत पुन्हा सहजसुरात म्हणाला, "अगदी निव्वळ बाष्कळ बडबड!"

आपल्याबरोबर पावाचा घरगुती वास घेऊन तो अंधारात दिसेनासा झाला.

"होय, बाष्कळपणा आणि उन्मादवायू," द्रोझ्दोवस्कीच्या धमकावणी-मधील चमत्कारिक संवेदनक्षमता जाणवून कुझ्नेत्सोव स्वतःशीच म्हणाला.

"आगे बढो!" हा परिचित हुकूम रांगेच्या पुढून सुटला व त्याचे वाढते प्रतिध्वनी उमटत कुझ्नेत्सोवजवळ येताच, तो आपल्या पथकाच्या पहिल्या तोफेजवळ घोड्यांच्या पाठीवर गाडीवानांच्या सावलीवजा आकृत्या दिसत होत्या तिथे गेला व त्यानेही तो हुकूम पुढे सोडला.

"पलटण, आगे बढो!"

प्रत्येक गोष्टीला एकदम गती मिळाली. जोखडाचे दांडे हलू लागले व घोड्यांवर आपटू लागले, बर्फात घुसलेल्या तोफेच्या चाकांचा चरचर आवाज उमटला व असंबद्ध तालात हजारो पावलांचा आवाज ऐकू येऊ लागला.

पलटण रस्त्याला लागली तेव्हा कुणीतरी कुझ्नेत्सोवच्या हातात अणकुचीदार, खरखरीत पावाचा तुकडा कोंबला.

"पोटात आगीचा डोंब उसळलाय ना?" त्याने दावलात्यानचा आवाज ऐकला. "हे खा. तुला थोडं बरं वाटेल."

तो तुकडा सावकाशपणे चवीने चघळत थोडी भूक शमल्यासारखी वाटताच कुझ्नेत्सोव भावनावेगाने म्हणाला,

"थँक्स गोगा. तो कसा काय राखून ठेवलास?"
"मूर्ख आहेस! विसर सारं! आपण आघाडीवर चाललोय ना?"
"गोगा, असं वाटतं खरं."
"खरं सांगू, जेवढं लौकर तेवढं अधिक बरं..."

## प्रकरण तिसरे

ज्या क्षणाला वरिष्ठ पातळीवरील जर्मन सेनाधिकाऱ्यांनी सर्व काही योजना आधी ठरवल्या व त्यावर शिक्कामोर्तब केले आणि तीन सोविएत आघाड्यांवर बर्फात व उध्वस्त परिस्थितीत अडकलेल्या, अंतिम निकालाची अत्यंत ताणलेल्या मन:स्थितीत वाट पाहणाऱ्या पाउलसच्या तीन लाखांहून अधिक सेनेला युद्धग्रस्त स्तालिनग्रादमधून सोडविण्यासाठी मानष्टेईनच्या पँझर डिव्हिजन कोतेल्नीकोवो भागातून साखळी तोडून जाण्यासाठी निघाल्या–त्याच क्षणाला जनरल गोटच्या नेतृत्वाखालील मानष्टेईनच्या मुसंडी मारणाऱ्या तेरा डिव्हिजन सेनागटाला भिडण्यासाठी, सोविएत अखिल प्रमुख लष्करी ठाण्याने नव्याने तयार केलेली सेना पिछाडीहून पाठवली व अनंत स्तेप ओलांडून दक्षिणेकडे तिला कूच करण्याची आज्ञा दिली. अशा प्रकारे दोन्ही बाजूंच्या कारवायांमध्ये एक साधर्म्य होते, ते म्हणजे दोन्ही बाजूंनी आपले उपलब्ध होते तेवढे सारे सामर्थ्य ओतले होते.

...ती काबीज केलेली 'हॉर्ह' बंदिस्त मोटारगाडी रस्त्याच्या कडेने हिंदकळत चालली होती. कधी ती सैन्याच्या रांगेला मागे टाकायची तर कधी स्वत: मागे पडायची. पायघोळ कोटाच्या कॉलरमध्ये डोके खुपसलेले जनरल बेस्सोनोव निश्चल बसले होते व समोरच्या काचेतून रोखून पहात होते; सेनेचे प्रमुख ठाणे सोडल्यापासून ते गप्पच होते. सेनाप्रमुखाच्या या मौनाचा अर्थ इतर सहप्रवासी असा लावत होते की, त्यांचा स्वभाव मिळून मिसळून वागण्याचा नसावा. त्यांचे मौन मोडण्याचे धाडस पहिल्यांदा करण्यास कुणीही तयार नव्हते. लष्करी मंडळाचे सदस्य, डिव्हिजनल कमिस्सार वेस्निन हेसुद्धा गप्प होते. बेस्सोनोव यांचा मदतनीस, मनमोकळा, तरुण मेजर बोझिच्को मात्र प्रवासाच्या

अगदी प्रथमपासून प्रमुख ठाण्यामधील नवे विनोद सांगण्यासाठी तळमळत होता. पण ते विनोद सांगायची योग्य संधी सापडत नसल्याने मागच्या सीटवरच्या कोपऱ्यात झोपेचे सोंग घेऊन पडला होता. आपल्या वरिष्ठांचे भक्कम मौन मोडण्याची त्याची हिंमत होत नव्हती.

परंतु, आपल्या हेतुपुरस्सर मौनाचा अर्थ आपले सहकारी तुसडा स्वभाव किंवा आत्मतुष्ट बेफिकीरी असा लावतील याची बेस्सोनोव यांना साहजिकच कल्पना नव्हती. दीर्घ अनुभवाने त्यांना समजून चुकले होते की, बडबडेपणा किंवा मौन या दोन्हीही गोष्टी इतर लोकांशी त्यांचे बनणारे संबंध बदलू शकत नाहीत. उत्तम संभाषणचतुर म्हणून लोकांवर आपली छाप मारण्याचीही त्यांची इच्छा नव्हती. लोकप्रियता मिळविण्यासाठी असा फालतूपणा आणि व्यर्थ खेळ केलेला त्यांना आवडत नसे व तसे कुणी करू लागले म्हणजे त्यांना राग येत असे. एखाद्याला पाचकळपणाचा किंवा आत्मविश्वास नसलेल्या माणसाचा जसा तिटकारा येतो तसा त्यांना या गोष्टींचा तिटकारा येई. युद्धकाळात पोकळ शब्द काहीवेळा सत्य परिस्थितीवर पडदा घालतात, याची बेस्सोनोवना फार पूर्वीच जाणीव झाली होती. या सेनेचे आधिपत्य जेव्हा त्यांनी स्वीकारले तेव्हा त्यातील सेनाधिकाऱ्यांच्या गुणदोषांसंबंधी त्यांनी काही प्रश्न विचारले होते. त्यांनी तपासणीची केवळ एक फेरी मारली होती, कोरडे अभिवादनाचे शब्द उच्चारले होते आणि प्रत्येकाकडे ना धड पूर्ण समाधानाचा ना पूर्ण असमाधानाचा असा रोखला कटाक्ष टाकला होता.

त्या थिजल्या धुक्यात काही क्षण जेव्हा मोटरीचे पुढचे दिवे पेटत, तेव्हा बर्फाने माखलेल्या कानटोप्यांमधील अधिकाऱ्यांचे व लोकांचे बायका-सारखे दिसणारे चेहरे, रस्त्यावरून रखडत चालणारी असंख्य नमदी बुटांची रांग, बेस्सोनोव यांच्या नजरेला समोरच्या काचेतून पडत होती. ते दृश्य पाहताना लोकांच्या "लढाऊ वृत्तीत" चिंताजनक उतार पडलाय असे त्यांना मुळीच वाटत नव्हते, पण लोक कमालीचे थकले आहेत हे त्यांना समजत असूनही परिस्थितीवर त्यांचे नियंत्रण राहिले नव्हते. हे अवगुंठित सैनिक लौकरच लढाईत जाणार होते आणि कदाचित दर पाचापैकी एक सैनिक, त्यांना वाटत होते त्यापेक्षा फार लौकर मरणार होता. लढाई कुठे सुरू होणार आणि केव्हा सुरू होणार हे त्यांना माहीत नव्हते व माहीत होण्याची शक्यता नव्हती; त्यांच्यापैकी अनेकांची

आयुष्यातील ही शेवटची लढाईची वाटचाल आहे हे त्यांना माहीत नव्हते. याउलट, बेस्सोनोव मात्र आगामी संकटाचा स्पष्टपणे व शांतपणे अंदाज घेत होते. कोतेल्नीकोवो क्षेत्रात आघाडीने केवळ तग धरली आहे, स्तालिनग्रादच्या दिशेने जर्मन रणगाड्यांनी अवघ्या तीन दिवसात चाळीस किलोमीटर मुसंडी मारली आहे, आता त्यांच्यापुढे फक्त मीष्कोवा नदीचा अडथळा राहिलाय व तो पार केला तर वोल्गापर्यंत नुसते सपाट स्तेप जर्मनांना मोकळे पडलेय, हे त्यांना माहीत होते. बेस्सोनोव यांना अगदी त्या क्षणालाही या परिस्थितीची जाणीव होती की, त्यांना माहीत असलेल्या परिस्थितीवर मोटारीत बसून ते विचार करीत असताना, त्यांचे स्वतःचे सैन्य आणि मानष्टेईनच्या पँझर डिव्हिजन सारख्याच निकराने त्या नैसर्गिक अडथळयाच्या दिशेने कूच करीत आहेत व सर्वच नसले तरी बहुतांशी, कोण प्रथम नदी गाठतो त्यावर अवलंबून होते.

आपले घड्याळ पाहण्याच्या ते बेतात होते, पण त्यांनी विचार बदलला व ते स्तब्ध राहिले. आपल्या त्या हालचालीने शांतता भंगेल आणि आपल्याला इच्छा नसताना संभाषणाला तोंड फुटेल असा त्यांनी विचार केला. ते पूर्वीप्रमाणेच गप्प राहिले व आपल्या काठीवर पाषाणवत झुकल्या अवस्थेत राहून, इंजिनाच्या ऊबेजवळ जास्तीत जास्त आरामशीर अवस्थेत आपला जखमी पाय त्यांनी ठेवला. वयस्क ड्रायव्हर मधूनच तिरप्या डोळयांनी कटाक्ष टाकायचा तेव्हा त्याला फिकट उजेडात जनरलचे खिन्न, जडावलेले डोळे, खप्पड गाल व घट्ट मिटलेले ओठ ओझरते दिसायचे. अनेक वरिष्ठ अधिकाऱ्यांचा ड्रायव्हर म्हणून त्याने आजवर काम केले असल्याने, मोटारीतील शांततेचा त्याने आपल्या परीने अर्थ लावला की, प्रवासाला निघण्यापूर्वी भांडण झाले असावे किंवा आघाडीच्या ठाण्याकडून कडक खरडपट्टी झाली असावी. अधून-मधून गाडीच्या मागच्या भागात काडी फर्रकन पेटायची आणि कमिस्सारच्या सिगरेटचा लाल प्रकाश अंधारात उजळायचा. कुणाच्या तरी तलवारीचा पट्टा करकरायचा आणि नेहमी आनंदी असणारा बोझिच्को आपल्या सीटच्या कोपऱ्यातून झोपेत सुस्कारे टाकत होता.

जनरलचे काहीतरी बिनसले असावे किंवा ते तुसड्या स्वभावाचे असावे असा ड्रायव्हरने तर्क केला. पाठीमागच्या सिगरेटच्या प्रत्येक लाल प्रकाशाबरोबर त्याची धूम्रपानाची इच्छा बळावत चालली होती.

जनरल सिगरेटही ओढत नाहीत वाटते; ड्रायव्हरच्या मनात विचार येत होते. जनरलचा चेहराही आजारी दिसतो, हनुवटीखालचा भाग किंचित हिरवट दिसतो. परवानगी विचारावी का? कॉम्रेड कमांडर, सिगरेटचा एक झुरका घ्यायची परवानगी द्या, इतका वेळ मी कळ दाबून धरलीय पण आता असह्य झालेय!

"हेडलाईट पेटव," अचानक बेस्सोनोव म्हणाले.

त्यांच्या आवाजाने विचारांच्या तंद्रीतला ड्रायव्हर एकदम दचकला. पुढचे दिवे पेटले आणि थिजलेल्या धुक्यातून प्रकाशाचा झोत कापत गेला.

त्या प्रकाशात बेस्सोनोव यांच्या नजरेला, उंच पट्टीत ओरडणारा आणि चमत्कारिक आडवे कान असलेला सेकंड लेफ्टनंट आपल्या लांब पायघोळ कोटात तुटलेल्या कठड्याजवळ अगदी ताठ उभा असलेला दिसला. कोसळलेल्या लॉरीकडे व पुढे जाणाऱ्या 'हॉर्स'कडे तो अशा काही गोंधळल्या नजरेने पहात होता की, आयुष्यात जणू प्रथमच तो एवढा गोंधळला होता आणि कुणाचेतरी साह्य त्याला हवे होते.

जनरलचे विचार आपल्या मुलाकडे, विक्तरकडे वळले.

अलिकडे त्यांना जेव्हा जेव्हा तरुण चेहरा दिसे तेव्हा तेव्हा एकलेपणाची वेदना असह्य होई, आपल्या मुलाबाबत पितृकर्तव्य पार न पाडल्याची खंत देणारी गूढ भावना मनात निर्माण होई आणि जेवढा ते आपल्या मुलाबाबत अधिक विचार करीत तेवढे त्यांना अधिक जाणवू लागे की, आपल्या मुलाचे सबंध आयुष्य कुठल्यातरी राक्षसी पद्धतीने आपल्या नकळतच निसटून गेले.

आपल्या मुलाच्या लहानपणच्या कोणत्याही आठवणी बेस्सोनोवना आठवत नव्हत्या. त्याला काय आवडत असे, कोणती खेळणी घेऊन तो खेळायचा, किंवा शाळेला तो केव्हा जाऊ लागला, यापैकी त्यांना काहीही आठवत नव्हते. मात्र एकदा आपला मुलगा भयंकर स्वप्नामुळे झोपेत दचकून रात्रीचा अचानक रडत ओरडत उठला होता त्याची त्यांना अगदी स्पष्ट आठवण होती. त्याचा आवाज ऐकून बेस्सोनोवनी दिव्याचे बटण लावले होते. मुलगा बिछान्यावर बसला होता, तो कमालीचा हडकुळा होता आणि त्याच्या थरथर कापणाऱ्या छोट्या हातांनी कॉटची कडा धरली होती. बेस्सोनोवनी त्याला उचलून घेतले होते, त्याचे छोटे, कृश शरीर त्यांना जाणवले होते, त्याच्या बरगड्या त्यांच्या केसाळ

छातीला घासल्या होत्या, त्याच्या ओलसर केसांचा चिमणीसारखा येणारा गंध घेत त्यांनी त्याला खोलीभर डोलवीत फिरवले होते व अचानक सुचलेले एक अंगाईगीत म्हणून शांत केले होते. आपल्यातील या अचानक उमटलेल्या ममताळू, पितृत्वाच्या भावनेची जाणीव होऊन त्यांचा त्यांनाच आश्चर्याचा धक्का बसला होता. त्यावेळी ते म्हणाले होते: "ठीक आहे माझ्या मुला. मी तुझ्यावर कोणतंही संकट येऊ देणार नाही. दोस्ता, माझ्याबरोबर तू अगदी सुरक्षित आहेस."

पण याहीपेक्षा एक आठवण अधिक ठळक होती आणि विशेषत: आता ती जास्त दु:खदायी होती. पोटमाळ्यावर खेळल्यामुळे मळलेल्या पँटीतील त्यांचा बारा वर्षांचा मुलगा समोर ताठ उभा व रागाने बेभान होऊन ते त्याच्या पाठीवर पट्ट्याने सपासप मारीत असता त्यांच्या हातून पट्टा ओढून घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या त्यांच्या पत्नीचा घाबरलेला चेहरा. त्या सबंध मारात त्यांच्या मुलाने तोंडून अजिबात आवाज काढला नव्हता आणि मार संपल्यावर आपले ओठ दातात घट्ट दाबून तो बाहेर पळाला होता व आपल्या आईसारख्याच राखी डोळ्यांनी दारातून बघत राहिला होता. त्याने डोळ्यातून अजिबात पाणी काढले नव्हते, पण त्या बालमनाचा अपमान डोळ्यांमधून ओसंडत होता.

आपल्या मुलाला त्यांनी तेव्हा फक्त एकदाच शारीरिक वेदना दिली होती. मुलाने काही कबुतरे विकत घ्यायला वडिलांच्या टेबलावरचे पैसे चोरले होते.... विक्तरने ती कबुतरे पोटमाळ्यावर ठेवली होती का? होय, पण ही गोष्ट त्यांना केवळ नंतर समजली.

बेस्सोनोव यांची सारखी या विभागातून त्या विभागात बदली होत होती. मध्य आशियामधून अतिपूर्वेकडे, अतिपूर्वेपासून श्वेतरशियाकडे असे ते सतत सरकारी निवासांमधून अलिप्त भासणाऱ्या सरकारी फर्निचरसकट रहात होते; ही सारी भ्रमंती त्यांनी केवळ दोन सूटकेसेससह केली होती. त्यांच्या पत्नीला याची सवय झाली होती आणि नेमणुकीच्या नव्या जागी जायला ती नेहमी सज्ज असे. त्यांचे आणि त्यांच्याबरोबर आपले आयुष्य ती सहनशीलतेने सांभाळीत होती.

त्यावेळी ते सारे आवश्यक वाटले होते. पण त्यानंतर बऱ्याच काळाने, मॉस्कोनजीकच्या लढाईनंतर, ते इस्पितळात असताना, रात्रीच्या वेळी त्यांनी आपल्या बायकोचा व मुलाचा विचार केला होता व त्यांना

जाणवले होते की, खूप काही वेगळे होऊ शकले असते; त्यांना हवे ते आयुष्य पूर्णत्वाने जगले गेले नव्हते. दरवेळी त्यांना अशी आशा वाटायची की, वर्षा दोन वर्षात सारे काही आवरता येईल व पुन्हा आयुष्याची नव्याने कोरी पाटी हाती धरता येईल. तिसाव्या वर्षी त्यांना ही आशा वाटली होती, मग चाळीसाव्या वर्षी वाटली होती, पण संधी कधीच आली नाही. दर्जा व प्रतिष्ठा वाढत गेली होती, पण प्रथम स्पेनमध्ये युद्ध पेटले, नंतर फिन्लंडमध्ये; मग बाल्टिकमधल्या लष्करी कारवाया, पुढे पश्चिम युक्रेनमध्ये आणि अखेरीस १९४१ साल. त्यांनी तारखा व योजना ठरविण्याचा नाद सोडून दिला होता व एकच एक विचार मनाशी बाळगला होता की, कोणत्याही परिस्थितीत ही लढाई मोठे बदल घडवून आणील.

पण इस्पितळात त्यांना प्रथमच जाणीव झाली की, त्यांच्या जीवनाला फक्त एकच बाजू असू शकेल, केवळ सैनिकाचे आयुष्य ते जगू शकतील आणि ते एकदाच व कायमचे त्यांनी पत्करले होते. त्याची नव्याने सुरुवात करता येणार नव्हती आणि तसा प्रयत्न करण्याची गरजही नव्हती. दैवाने त्यांना देऊ केलेल्या निवाड्यात मधला मार्ग नव्हता आणि पुन्हा त्यांना आयुष्याचा मार्ग निवडायची संधी मिळाली असती तरी त्यांनी दुसरा कोणताही मार्ग निवडला नसता. पण याची जाणीव होत असतानाच त्यांना एका अक्षम्य वस्तुस्थितीने सावध केले. त्यांनी निवडलेल्या या एका शक्य जीवनात त्यांच्या अत्यंत जवळ असलेली वस्तू त्यांच्या हातून निसटली होती, सिगरेटच्या धुराप्रमाणे हलकेच दूर तरंगत निघून गेली होती आणि याबाबत बायको व मुलासमोर आपले समर्थन करायला त्यांना एकही सबब सापडत नव्हती.

सैन्यातील जनरलांसाठी खास राखून ठेवलेल्या वॉर्डमध्ये, मॉस्कोनजीकच्या एका इस्पितळात त्यांची विक्तरशी शेवटची भेट झाली होती. पायदळ विद्यालयात प्रशिक्षण घेतल्यानंतर त्यांच्या मुलाची एका तुकडीवर नेमणूक झाली होती व आगगाडी निघायला तीन तासांचा अवधी असताना तो आपल्या आईसह त्यांना भेटायला आला होता. चकचकीत किरमिजी रंगाची अधिकारपदाची चिन्हे लेवून, नव्या कोऱ्या पिस्तुलाचा पट्टा लटकावून, अत्यंत आनंदी व रुबाबदार असा हा सेकंड लेफ्टनंट बेस्सोनोव यांच्या समोरच्या कॉटवर बसला होता. बेस्सोनोव

यांच्या समोरच्या कॉटवरील पेशंटला चालता येत असल्याने, ही मंडळी येताच सूज्ञपणे तो उठून बाहेर गेला होता. या सगळ्या नव्या नवलाईत सजलेला विक्तर रस्त्यावरच्या अनेक मुलींच्या कटाक्षांचे लक्ष्य ठरला असावा. रणांगणावरच्या आपल्या नेमणुकीबाबत, पायदळ प्रशिक्षण विद्यालयातील "हुडेलहप्पी" मुळे आपण कसे "चॉकलेटी रंगाचे झालो" याबाबत विक्तर घोगऱ्या आवाजात आपल्या वडिलांना सांगत होता. अखेरीस तो आघाडीवर निघाला होता. सर्व नव्याने कमिशन मिळालेल्या अधिकाऱ्यांप्रमाणे त्यालाही कंपनी किंवा पलटण देण्यात येईल आणि आयुष्याला खऱ्या अर्थाने आरंभ होणार होता.

त्यांच्या संभाषणाच्या दरम्यान त्याने बेस्सोनोवना सहजपणे "बाबा" म्हणून संबोधले होते. यापूर्वी त्याने अशी हाक कधीही मारली नव्हती. बेस्सोनोवनी त्याच्या रसरशीत चेहऱ्याकडे, नितळ करड्या, आनंदी डोळ्यांकडे व गालावरच्या नुकत्या उमटणाऱ्या कोवळ्या लवीकडे, त्याच्या सळीदार कापडाच्या तंग तुमानीच्या खिशात वारंवार जाणाऱ्या अधीऱ्या, सडपातळ परंतु खंबीर अशा हाताकडे पाहिले आणि त्यांना इतर तरुण माणसांची, सेकंड आणि फर्स्ट लेफ्टनंट अधिकाऱ्यांची, पलटणींच्या व कंपनींच्या कमांडरांची आठवण आली; या लोकांना सहसा ते एकदाच पहात आणि पुढच्या लढाईला नवे आलेले असत...

"पेत्या, त्याला सिगरेट ओढायला परवानगी दे," आपल्या मुलाकडे अस्वस्थपणे पहात त्यांच्या पत्नीने मध्येच त्यांच्या विचारमालिकेत खंड पाडीत म्हटले होते. "त्याला सिगरेट ओढायची अलिकडेच सवय लागलीय."

"अच्छा, तर तुला सिगरेट ओढायची सवय लागली विक्तर?" बेस्सोनोव यांच्या आश्चर्यात फारसा आनंद नव्हता. तरीही त्यांनी आपल्या शेजाऱ्याच्या कॅबिनेटकडे सिगरेट व काड्यापेटी घ्यायला हात लांब केला. "यातली एक सिगरेट घे."

"बाबा, मी आता अठरा वर्षांचा आहे. विद्यालयात प्रत्येकजण सिगरेट ओढायचा. मला त्यांच्यापासून वेगळं राहता आलं नाही."

"मला वाटतं, तू दारूही पितोस? एव्हाना चव घेऊन झाली की नाही? चल, बोलून टाक. आता तू सेकंड लेफ्टनंट झालायस, तुला स्वतःचं मन ओळखता आलं पाहिजे."

"होय, मी चव घेतलीय... नाही, ती सिगरेट नको मला. मी माझी स्वत:ची ओढतो. चालेल ना?" त्यांचा मुलगा चटकन म्हणाला होता व लाजून सिगरेट त्याने तोंडात धरली होती आणि खाशा पद्धतीने काडी पेटवली होती. काडी पेटवल्यानंतर हाताचा आडोसा धरण्याची ती लकब तो पायदळ प्रशिक्षण विद्यालयात शिकला असावा. आपले लाजलेपण लपविण्यासाठी तो बडबडत राहिला, "पूर्वी तुम्ही जर मला सिगरेट ओढताना पकडलं असतंत तर काय झालं असतं याची कल्पना आहे मला! माझी कणीक तिंबली असतीत खात्रीनं!"

तो अवघडल्यासारखा सिगरेट ओढीत होता व धूर पलंगाखाली सोडत होता. जणू काही ड्यूटी ऑफिसरने पकडू नये म्हणून चोरून बराकीत सिगरेट ओढावी, तसे त्याचे चालले होते. बेस्सोनोवनी व त्यांच्या पत्नीने काही न बोलता केवळ नेत्रसंकेत केले.

"नाही. पुन्हा कधीही नाही." बेस्सोनोव घोगऱ्या आवाजात उत्तरले. "एकदा झालं तेवढं पुरे. मी फार कडक बाप आहे असं तुला म्हणायचं आहे का?"

"नाही, उलट त्यावेळी तुम्ही योग्य तेच केलंत," त्यांचा मुलगा म्हणाला होता. "मला चोप मिळणं आवश्यकच होतं. काय मूर्ख होतो मी!"

त्या वेळची आठवण होऊन तो हसत हे म्हणाला होता आणि आता नेमक्या त्याच प्रसंगाची आठवण होऊन–आपल्या मुलाला एकदाच आपण शारीरिक वेदना दिल्याच्या प्रसंगाची आठवण होऊन–बेस्सोनोव यांना पश्चात्ताप होत होता.

"अगबाई, आता माझ्यासमोर दोन मोठे पुरुष झाले की!" त्यांची पत्नी हळूच उद्‌गारली होती व पांघरुणाखाली बेस्सोनोव यांच्या हाताची बोटे नाजुकपणे तिने दाबली होती, "पेत्या, विक्तर कुठल्यातरी अनोळखी सेनेबरोबर वोलखोव आघाडीवर जातोय, तू त्याच्या बाबतीत काहीच केलेलं नाहीस हे जरा चमत्कारिक वाटतंय... तुझ्या कुठल्यातरी एखाद्या डिव्हिजनमध्ये तुला त्याला घेता येणार नाही का? निदान तुला त्याच्यावर लक्ष तरी ठेवता येईल. नाही का जमणार तुला हे करायला?"

तिला काय म्हणायचे होते हे त्यांना ठाऊक होते, तिच्याहीपेक्षा जास्त चांगले माहीत होते. आघाडीवर पलटणीच्या किंवा कंपनी

कमांडरचे आयुष्य पतंगाप्रमाणे अल्पजीवी असते याची त्यांना कल्पना होती. याचा त्यांनी अनेकवेळा विचार केला होता व त्यामुळेच त्यांना तिचा छोटा, ऊबदार हात कुरवाळायची अतीव इच्छा झाली होती. पण आपल्या मुलाच्या उपस्थितीत त्यांनी स्वतःला आवरले.

"ओल्या, सध्या मी सेनेशिवाय सेनापती आहे," आपल्या मुलाकडे निरखून पहात, पण पत्नीला उद्देशून ते म्हणाले होते. "जेव्हा खरोखरीच तशी काही शक्यता निर्माण होईल तेव्हा अर्थात मी विक्तरची आठवण ठेवीन..."

त्यांच्या मुलाने त्यांना पुरते बोलूच दिले नाही आणि धूर खोकीत मान ठामपणे हलवीत तो म्हणाला,

"छे: छे: बाबा! मला नकोय तुमच्या पंखाखाली यायला! अजिबात नको! आणि आई, तूसुद्धा असं काही सुचवू नको! कदाचित मी त्यांचा मदतनीस व्हावं असं तुला वाटत असेल! मग ते माझा सन्मान करतील असंच ना?"

"मी तुला माझा मदतनीस म्हणून घेणार नाही, पण मी तुला एक कंपनी देईन," बेस्सोनोव म्हणाले. "आणि लायकी सिद्ध केल्याशिवाय तुला माझ्याकडून कोणतीही मानचिन्हं मिळणार नाहीत. लोकांना अनेक तऱ्हांनी तशीच ती मिळतात हे अर्थात मला माहीत आहे."

"मलाही तशा तऱ्हेनं नको आहेत. प्रशिक्षणाच्या सबंध काळात असंच व्हायचं. मी बाबांकडं केव्हा जाणार म्हणून बरोबरची पोरं नेहमी विचारायची. बाबा, मला तसं नकोय! कोणत्या कंपनीवर मी हुकमत गाजवतो, यामुळं असा काय फरक पडतो? ते काहीही असो, माझ्या नेमणुकीचा कागद आत्ता माझ्या खिशात आहे. प्रशिक्षण विद्यालयातले आम्ही चौघे बरोबर आहोत आणि आम्हा सर्वांना एकत्र रहायची इच्छा आहे. आम्ही बरोबरच शिकलो आणि आता आघाडीवर बरोबरच जात आहोत. बाकी पुढचं सारं प्रत्येकाच्या नशीबावर. बाबा, कुणालाही दोन नशीबं लाभत नाहीत!" कुणाकडून तरी ऐकलेलं हे वाक्य त्याने पुन्हा उच्चारले होते. "खरं सांगतो आई, कुणालाही लाभत नाहीत!"

अचानक ओलसर बनलेल्या आपल्या पत्नीच्या हातामध्ये बेस्सोनोव

यांनी बोटांची क्षणभर चाळवाचाळव केली. आत्ता त्यांच्या मुलाला जे अगदी साधेसोपे वाटत होते, नव्या स्वतंत्र जीवनाच्या, बरोबर लढणाऱ्यांच्या मैत्रीच्या, धाडसाच्या आणि अर्थातच विजयी चढाईच्या ज्या कल्पनेने आत्ता तो उत्तेजित झाला होता, त्याच गोष्टींकडे बेस्सोनोव वेगळ्या दृष्टिकोनातून पहात होते. लढाई म्हणजे काय असते आणि रणांगणात किती हिडीस मृत्यू येऊ शकतो हे त्यांना ठाऊक होते.

पण आपल्या मुलाला सारे काही सांगण्याचा, त्याच्या तारुण्याच्या उत्साहावर पाणी ओतायला आपल्या अनुभवाचा उपयोग करायचा त्यांना काही एक अधिकार नव्हता. तसा तो मानलाही गेला नसता. त्या क्षणाला आपल्या आखूड लष्करी कोटाच्या खिशातील त्या नेमणुकीच्या कागदाचा खुसखुशीतपणा तेवढा विक्तरला जाणवत होता. केवळ लढाईलाच आपल्या चुका दुरुस्त करायचा अधिकार होता.

"नशीब," बेस्सोनोवनी तो शब्द पुन्हा उच्चारला होता. "विक्तर, तू नशीबाबद्दल बोलतोस• पण युद्धकाळात दैवावर भरवसा ठेवण्यात फारसा अर्थ नसतो. तुला ऐकायला चमत्कारिक वाटेल, पण त्याचा अर्थ स्वतःवर प्रभुत्व मिळविण्याचा एक दीर्घ प्रयत्न होय. आणि तुला जाणायचंच असेल तर अगदी अमानुष प्रयत्न असतो तो. असो, मुद्दा तो नाही..."

"खरंच नाही आणि कुठल्याही तात्त्विक जंजाळात घुसायची आपली इच्छाही नाही!" त्यांच्या मुलाने बेफिकीर सुरात पटकन कबुली दिली. पांघरुणाखालील आपल्या वडिलांच्या बँडेज बांधलेल्या पायाकडे त्याने अंगुलीनिर्देश केला. "कसं वाटतंय तुम्हाला? इथून लौकर बाहेर पडाल? तुम्हाला किती कंटाळवाणं होत असेल इथं याची कल्पना आहे मला. बाबा, मला खूप सहानुभूती वाटते तुमच्याबद्दल. पाय खूप दुखतो का?.. अरे बापरे! किती वेळ झाला पहा! दोस्त माझी वाट पहात असतील. मला स्टेशनवर पोचलं पाहिजे!" ज्या पद्धतीने त्याने घड्याळाकडे पाहिले त्यावरून वेदना म्हणजे काय असते याची त्याला अजिबात कल्पना नव्हती, तशी तो कल्पनाही करू शकत नव्हता हे स्पष्ट होत होते.

"लौकरच इथून बाहेर पडीन अशी आशा आहे," बेस्सोनोव म्हणाले. "आपल्या आईला पत्र लिहायची आठवण ठेव. निदान महिन्यातून एकदा."

"महिन्यातून चारदा लिहायचं मी वचन देतो!" आपल्या पायदळ विद्यालयातल्या दोस्तांना लौकरच स्टेशनवर भेटण्याच्या कल्पनेने उत्साहित झालेला विक्तर ताडकन उभा राहून म्हणाला.

"नाही विक्तर, महिन्यातून दोनदा पत्रं पाठवलीस तरी पुरे," त्याची आई त्याला सुधारीत म्हणाली. "निदान मला समजत जाईल..."

"मी वचन देतो आई. माझी जायची वेळ झाली आता..."

आणि आणखी एक अविस्मरणीय प्रसंग घडला होता.

जाण्यापूर्वी, त्यांचा मुलगा हसऱ्या चेहऱ्याने घुटमळत उभा राहिला होता. आपल्या वडिलांचे चुंबन घ्यावे किंवा नाही असा त्याला प्रश्न पडला होता. सर्वसाधारणपणे ते कधी एकमेकांचे चुंबन घेत नसत. अखेरीस त्याने ते धाडस न पत्करण्याचा निर्णय घेतला व मोठ्या माणसासारखा हस्तांदोलनाला हात पुढे केला.

"फिर मिलेंगे बाबा!"

पण बेस्सोनोवनी आपल्या मुलाची सडपातळ बोटे आपल्या हातात दाबली, त्याला जवळ ओढला, नेहमी स्वच्छ तुळतुळीत दाढी केलेला आपला बसका गाल पुढे केला आणि आठ्या घालून ते म्हणाले: "चल ये. आपण पुन्हा केव्हा भेटणार ते मला ठाऊक नाही. बेटा, लढाई ही अशी असते."

त्या सबंध संभाषणात पहिल्यांदाच ते त्याला "बेटा" म्हणाले होते आणि विक्तर त्यांना ज्या सुरात "बाबा" म्हणाला होता, त्यापेक्षा अगदी वेगळ्या धाटणीने त्यांनी तो शब्द उच्चारला होता.

आपल्या वडिलांच्या ओठांच्या कोपऱ्याजवळ विक्तरने अवघडलेपणाने ओठ टेकले आणि बेस्सोनोवनी त्याच्या गरम गालाचा पापा घेतला. त्याच्या आखूड कोटामधून येणारा त्याच्या पोरसवदा, गोडसर घामाचा गंध त्यांना अचानक जाणवला.

"ये तर. पण लक्षात ठेव: गोळ्या आणि कुलपी गोळे आम्हा म्हाताऱ्यांचा तिटकारा करतात. ते तुम्हा तरुणांच्या मागावर असतात. जर तुझा विचार बदलला तर मला लिही आणि मी तुझ्यासाठी कंपनी शोधीन. ठीक आहे, गुड लक् सेकंड लेफ्टनंट!"

"थँक्स, बाबा. लौकर बरे व्हा! लढाईच्या पहिल्या अनुभवानंतर मी तुम्हाला लिहीन."

तो हसला आणि आपल्या नव्या कोऱ्या करकरीत पिस्तुलाच्या पट्ट्यावर त्याने प्रसन्नपणे थोपटले, आपल्या लष्करी आखूड कोटाच्या चुण्या नीट केल्या, मोठ्या प्रेमाने पिस्तुलाची पिंगट चामड्याची पिशवी ठीक केली, खुर्चीच्या पाठीवरचा नवा कोरा रेनकोट उचलला व रुबाबात खांद्यावर टाकला. पण नेमक्या त्या क्षणाला त्या वॉर्डमधल्या चकचकीत फरशीवर काहीतरी खळाळत पडले. विक्तरच्या रेनकोटाचे खिसे पिस्तुलाच्या नव्या चकचकीत काडतुसांनी भरले होते. तरुण अधिकाऱ्यांना साधारणपणे फक्त काडतूसांच्या दोन पेट्या दिल्या जातात, पण कुठल्यातरी मार्गाने त्याने युद्धाचे काही महिने पुरतील एवढा दारूगोळा पैदा केला होता.

बेस्सोनोवनी खिडकीकडे तोंड फिरवले आणि ते गप्प राहिले.

"एवढ्या गोळ्या कशाला तुला? थांब, मी तुला मदत करते... एवढ्या सगळ्या त्यांनी दिल्या तुला?" त्यांची बायको कातर आवाजात उद्गारली होती.

"आई, तू त्रास घेऊ नको. मी करतो गोळा. त्या फक्त आणीबाणीच्या वेळेसाठी आहेत."

काहीशा अवघडल्या मन:स्थितीत विक्तरने काडतूसे गोळा केली आणि सरळ उभे राहून जेव्हा आपल्या खिशांमध्ये भरली तेव्हा एक काडतूस इतरांपेक्षा थोडे लांब घरंगळत गेल्याचे त्याच्या लक्षात आले. त्याने आपल्या वडिलांकडे कटाक्ष टाकला. ते अद्याप खिडकीबाहेर बघत आहेत असे पाहताच त्याने चटकन आपल्या क्रोम-लेदर बुटाच्या टोकाने ते काडतूस पार कोपऱ्यात ढकलले आणि नंतर जणू काही फिरायला जाण्याच्या थाटात तो कोऱ्या करकरीत पिस्तुलाच्या पट्ट्यातला व खांद्यावर नवा रेनकोट टाकलेला सेकंड लेफ्टनंट ऐटीत पावले टाकीत निघून गेला.

बेस्सोनोवना ते काडतूस नंतर एका रेडिएटरखाली सापडले होते व हाताच्या तळव्यावर धरून त्याचा विलक्षण हलकेपणा जाणवत ते बराच वेळ उभे राहिले होते.

## प्रकरण चौथे

सर्वप्रमुख लष्करी ठाण्याकडून आलेले बोलावणे अनपेक्षित होते.

हे आमंत्रण त्यांना मॉस्कोतील त्यांच्या घरात आले नव्हते, तर युद्धापूर्वी दोन वर्षे ते ज्या अकादमीत युद्धशास्त्राचा इतिहास शिकवीत होते, तेथे अकादमीत आले होते. आपल्या नव्या नेमणुकीबाबतच्या हुकमावर फक्त सही होण्याची बाकी राहिली आहे हे जेव्हा त्यांना समजले तेव्हा ते अकादमीचे प्रमुख जनरल वोलुबोव यांना भेटायला गेले. जनरल वोलुबोव हे त्यांचे जुने मित्र व फिन्निश मोहिमेतील सहकारी होते. अत्यंत शांत स्वभावाचे जनरल वोलुबोव आधुनिक युद्ध-शास्त्रातले खासे तज्ज्ञ होते; लष्करी वर्तुळांमध्ये फारशी ख्याती नसलेल्या या नम्र माणसाचा अनुभव मात्र दांडगा होता व बेस्सोनोव नेहमी त्यांचा सल्ला मोलाचा मानीत. जनरल वोलुबोव यांच्या अभ्यासिकेत बसून गतकाळच्या आठवणी काढीत आरामात ते दोघे चहा पीत बसले असताना टेलिफोनच्या घंटीने त्यांच्या संभाषणात खंड पडला. "लेफ्टनंट जनरल वोलुबोव बोलतोय," या आपल्या नेहमीच्या पद्धतीने जनरलनी टेलिफोनला उत्तर दिले, पण दुसऱ्याच क्षणी त्यांचा चेहरा बदलला आणि बेस्सोनोव यांच्याकडे वर पाहून ते दबत्या आवाजात म्हणाले,

"प्योत्र अलेक्सांद्रोविच, हा तुमचा फोन आहे–कॉम्रेड स्तालिन यांच्या साहाय्यकाचा!"

बेस्सोनोव यांनी रिसीव्हर घेतला. एका अपरिचित, धीरगंभीर, पूर्णपणे नम्र अशा आवाजाने बेस्सोनोव यांना त्यांच्या हुद्द्याने न संबोधता "कॉम्रेड बेस्सोनोव" म्हणून संबोधले, नंतर दुपारी दोन वाजता ते कॉम्रेड स्तालिन यांना भेटायला येऊ शकतील का असे नम्रपणे विचारले व त्यांना आणण्यासाठी गाडी कुठे पाठवायची त्याची विचारणा केली.

"तसदी होणार नसेल तर अकादमीच्या मुख्य प्रवेशद्वाराशी," बेस्सोनोव उत्तरले आणि रिसीव्हर खाली ठेवल्यानंतर काही काळ तसेच शांत बसून राहिले. आपल्या मनातील खळबळ दाखवू न देण्याचा त्यांचा प्रयत्न चालला होता. अशा प्रकारे भावनांचे प्रकटीकरण करणे त्यांना स्वत:ला आवडत नसे व दुसऱ्यांनी केले तर तिटकारा वाटायचा. जनरल वोलुबोव त्यांच्याकडे चौकस नजरेने पहात राहिले होते. बेस्सोनोवनी

आपल्या घड्याळाकडे पाहिले व नेहमीच्या सहज सुरात म्हणाले: "आतापासून आणखी दीड तासानं माझी सरसेनापतींशी भेट होईल असं दिसतं."

"एक गोष्ट तुम्ही लक्षात ठेवली पाहिजे," अकादमी-प्रमुखांनी बेस्सोनोव यांच्या दंडाला धरीत इशारा दिला," त्यांनी काहीही विचारले तरी पटकन उत्तर द्यायची घाई करू नका. तेथे जाऊन आलेला प्रत्येकजण सांगतो की, त्यांना चटकन बोललेले आवडत नाही. आणि कृपा करून त्यांना त्यांच्या आणि त्यांच्या वडिलांच्या नांवाने संबोधू नका. "कॉम्रेड स्तालिन" ह्या औपचारिक नांवानेच संबोधा. वडिलांच्या नांवासकट हाक मारण्याची पद्धत त्यांना अजिबात आवडत नाही. आज संध्याकाळी मी तुमची भेट घेईन आणि दुपारी काय घडेल ते सारं तुम्ही मला सांगितलं पाहिजे."

ओक लाकडाच्या तावदानांनी सजवलेल्या स्तालिन यांच्या सदरेवरच्या खोलीत, बेस्सोनोवना अपरिचित असे दोन जनरल भक्कम खुर्च्यांमध्ये शांतपणे वाट पहात बसले होते. शरदातल्या अखेरच्या काळातला तो एक दाटलेला दिवस होता. खोलीत किंचित काळोखा प्रकाश पसरला होता. करड्या चेहऱ्याच्या एका कर्नलने बेस्सोनोवना मोटरीतून आणले व त्यांनी त्या सदरेवरच्या खोलीत प्रवेश केला तेव्हा एक किंचित बुटका, टक्कल पडलेला, फिकट चेहऱ्याचा, नागरी पोषाख परिधान केलेला माणूस किंचित हसून त्यांना सामोरा गेला. अनेक टेलिफोन पसरलेल्या त्या टेबलाकडून तो हसऱ्या चेहऱ्याने पुढे आला तेव्हा त्याच्या मनातले भाव मात्र बेस्सोनोवना अजिबात वाचता आले नाहीत.

बेस्सोनोव यांच्या डोळ्यांमध्ये थेट रोखून पहात व आपल्या मऊ, गुबगुबीत हातांनी त्यांचा हात धरून त्याने त्यांना थांबावे लागेल असे सांगितले व त्या दोन जनरलांच्या पलिकडील मोकळ्या खुर्चीकडे नेले. मात्र किती वेळ थांबावे लागेल याचा त्याने निर्देश केला नाही.

"आपण बसावं इथं," तो बेस्सोनोवना म्हणाला.

बेस्सोनोव खुर्चीवर बसले. त्या टक्कल पडलेल्या, थकल्या चेहऱ्याच्या माणसानेच त्यांना अकादमीत फोन केला होता. पुन्हा एकदा तो दिलगिरीदर्शक हसला व सवयीच्या नम्रतेने बेस्सोनोव यांच्या काठीला आपल्या फिकट पांढुरक्या बोटांच्या टोकांनी स्पर्श केला.

"आपली परवानगी असेल तर ही काठी मी कोपऱ्यात ठेवीन. तुम्हाला ते अधिक सोयीस्कर पडेल."

त्याने काळजीपूर्वक ती काठी उचलून नेली, आपल्या टेबलामागील कोपऱ्यात ठेवली आणि मुकाट्याने परत कागदपत्रांकडे व टेलिफोनांकडे तो वळला.

वातावरण कमालीचे शांत होते व लाकडाचा आणि तापलेल्या रेडिएटर्सचा मंद वास येत होता. एव्हाना हिमाच्छादित बनलेल्या नगरीतील शारदीय सळसळसुद्धा त्या जाड, दगडी भिंतींमधून आत ऐकू जात नव्हती; कुठे माणसांचे आवाज ऐकू येत नव्हते किंवा व्हरांड्यात कुणाची पावले वाजत नव्हती.

खोलीतला प्रत्येकजण गप्प होता; खुर्चीचा करकर आवाज नाही किंवा कसलीही हालचाल नाही; नागरी पोषाखातील माणूस टेबलामागे स्वस्थ बसला होता; दोन अनोळखी जनरलही गप्प होते.

बेस्सोनोवही गप्प होते. त्या अभेद्य शांततेमध्ये आपणही हळूहळू विलीन होत आहोत ही जाणीव त्यांच्या मनात अधिक तीव्रतेने वाढत चालली होती. आपल्या बेसावधपणाची त्यांना जोरदार जाणीव होत होती. त्यांच्या मनात विचार डोकावत होता की, स्तालिन इथेच कुठे-तरी जवळ असतील, त्या भिंतीच्या पलिकडे असतील आणि कोणत्याही क्षणाला दरवाजा उघडला जाईल व आपल्या आईवडिलांच्या चेहऱ्यांपेक्षाही ज्या माणसाची प्रतिमा आपल्या मनावर वज्र लेपासारखी उमटलेली आहे त्या माणसाला प्रत्यक्ष भेटण्याचा योग येईल.

कदाचित त्या दुसऱ्या दोन जनरलना व त्या थकल्या चेहऱ्याच्या माणसालाही तसेच वाटत होते.

युद्धाची आणि लाखो लोकांच्या जीवनाची दिशा जो माणूस दिग्दर्शित करीत होता, ज्याच्यासाठी प्राणार्पण करायला ती सर्व माणसे जाणीवपूर्वक सिद्ध होती, त्या माणसाच्या दैनंदिन अस्तित्वाने तेथील प्रत्येक गोष्ट परिपूर्ण भारलेली होती. त्या माणसासाठी लाखो माणसे उपाशी रहायला, हाल सोसायला, दुःख सहन करायला सिद्ध होती; त्याच्या किंचित हास्याच्या दर्शनाने किंवा व्यासपीठावरून त्याने नुसता हात हलविला, तरी अमर्याद आनंदाने ओरडायला व खळखळून हसायला तयार होती. बेस्सोनोव आत्ता अनुभवीत होते ती अनिश्चित भावना

अधिकच तीव्र बनली होती, कारण प्रत्येकाला ज्याची सवय झाली होती व ज्याचा उच्चार भक्कम आणि भारदस्त वाटायचा ते स्तालिन यांचे नांव इत:पर केवळ एका माणसापुरतेच मर्यादित आहे असे वाटत नव्हते; पण तरीही ते फक्त एकाच व्यक्तीशी निगडित होते व ती एकमेव व्यक्ती सार्वत्रिक स्वरूपाची कोणतीही कृती करण्यास समर्थ होती, श्रद्धेचे व आशेचे एकमेव स्थान होती.

सदरेच्या खोलीतील शांतता भंग करण्याचा कुणाचाही धीर होत नव्हता. केवळ माणसाचा आवाजही प्रत्येकाची मन:स्थिती पालटून टाकील व कसल्यातरी पावित्र्याचा नाश होईल असे वाटत होते. त्या दोघा जनरलपैकी एका धिप्पाड, वयस्क जनरलने शरीराचा ताण थोडा कमी करण्यासाठी आपल्या गुबगुबीत मांड्या किंचित विलग केल्या, पण तेवढ्यात त्याच्या बुटांचा करकर आवाज झाला आणि जांभळ्या निळ्या झालेल्या त्या जनरलने गोऱ्यामोऱ्या नजरेने शेजारी बसलेल्या तोफखान्याच्या तरुण, रुबाबदार लेफ्टनंट-जनरलकडे कटाक्ष टाकला. छातीवर पदकांची माळ लटकावलेला तो लेफ्टनंट जनरल अगदी कडक इस्त्रीच्या कपड्यांमध्ये ताठ बसला होता व अद्यापही टेबलावरच्या कागदपत्रांमध्ये डोके खुपसून बसलेल्या त्या नागरी वेषातल्या बुटक्या माणसाकडे एकटक नजरेने पहात होता.

दुपारचे दोन वाजून दहा मिनिटे झाली होती. त्या टक्कलवाल्या, थकल्या चेहऱ्याच्या, नागरी पोषाखातल्या माणसाला स्तालिन पलिकडच्या खोलीत आहेत हे केवळ त्यालाच माहीत असलेल्या कोणत्यातरी मार्गाने समजले.

तो हळूच उठला, कोणतीही पूर्वसूचना न देता अभ्यासिकेत गेला व परत बाहेर येताना त्याने दरवाजा किंचित उघडा ठेवला.

"इकडून यावं कॉम्रेड बेस्सोनोव," तो म्हणाला.

न लंगडण्याचा प्रयत्न करीत बेस्सोनोव आत चालत गेले.

भिंतीवर सुवोरोव व कुतूझोव यांची चित्रे असलेल्या, हिरव्या आच्छादनाचे लांबलचक मेज असलेल्या, दुसऱ्या एका प्रचंड टेबलावर भौगोलिक नकाशा असलेल्या, अनेक टेलिफोन व गालिचावर नागमोडी तारांची भेंडोळी असलेल्या त्या प्रशस्त दालनातील कोणताही तपशील पहिले काही सेकंद त्यांच्या अजिबात लक्षात आला नाही. शरीराची

प्रत्येक नस न् नस व प्रत्येक स्नायू कमालीचा सावध बनलेल्या मन:स्थितीत जेव्हा त्यांनी दालनात प्रवेश केला तेव्हा त्यांनी फक्त स्तालिनना पाहिले. लहानखोर व्यक्तिमत्वाच्या स्तालिन यांचे त्यांच्या चित्रांशी अजिबात साधर्म्य नाही असे बेस्सोनोवना पहिल्या दृष्टिक्षेपात वाटले. लवचिक, अजिबात आवाज न करणाऱ्या बुटांमधील स्तालिन झरझर पावले टाकीत त्यांच्या दिशेने येत होते. लष्करी पद्धतीचा आखूड कोट त्यांनी घातला होता व त्यांच्या उतरत्या खांद्यांवर तो फिट्ट बसला होता. त्यांच्या जाड मिशांमधून व दाट भुवयांमधून एखाददुसरा पांढरा केस चमकत होता. त्यांचे पिवळसर छटेचे डोळे अत्यंत शांत होते. बेस्सोनोव यांच्या मनात पहिला प्रश्न उमटला: आता ते मला काय विचारतील?

हस्तांदोलन न करता किंवा खाली बसायला न सांगता आणि स्वत:ही न बसता स्तालिन यांनी बेस्सोनोव यांचे स्वागत केले व नकाशाच्या टेबलाशेजारी गालिचावरून आवाज न करता फेऱ्या मारायला सुरुवात केली. आपला फारसा लवचिक हालचाल न करणारा डावा हात त्यांनी पोटावर आडवा धरला होता.

बराच वेळ गप्प राहिल्यानंतर, ते खोलीच्या टोकाच्या टेबलाशी गेले व बेस्सोनोव यांच्या तिरप्या दिशेने उभे राहून, स्पष्टपणे वर्णन करून सांगता येणार नाही अशा उच्चारात त्यांनी विचारले, "अगदी अलिकडील घटनांबाबत आपलं काय मत आहे कॉम्रेड बेस्सोनोव?"

बेस्सोनोव यांना प्रश्नाचा रोख नीटसा कळला नाही व "कोणत्या घटना कॉम्रेड स्तालिन?" असा प्रश्न विचारून खुलासा करून घेण्याचा त्यांचा विचार होता. पण त्याऐवजी आपला आवाज प्रयत्नपूर्वक स्थिर ठेवीत ते उत्तरले, "कॉम्रेड स्तालिन, आपण जर स्तालिनग्रादमधील अगदी अलिकडील घटनांबाबत बोलत असू, तर ती मोठ्या प्रमाणावरील चढाईच्या पवित्र्याची नांदी ठरावी आणि मला असे वाटते की, आपण जर जर्मनांना आतील किंवा बाहेरील वेढा फोडण्यास संधी दिली नाही तर युद्धाचा तो एक नवा टप्पा ठरेल—"

"तुम्हाला तसे वाटते का तशी तुमची खात्री झाली आहे कॉम्रेड बेस्सोनोव?"

"माझी खात्री झाली आहे कॉम्रेड स्तालिन. वेढ्यात पकडलेला

शत्रू किती पद्धतशीरपणे फोडून आपण त्याचा नाश करतो त्यावर खूप काही अवलंबून राहील असे मला वाटते."

बेस्सोनोव किंचित थांबले; त्यांना असे जाणवले की, या उत्तरानंतर स्तालिन थांबले व त्यांची थोडीशी अरुंद, गोलसर पाठ थरथरली. बेस्सोनोव यांच्याशी ते बहुधा सहमत झाले होते.

अभ्यासिका थंड आणि शांत होती. स्तालिन यांनी रक्षापात्रावरचा पाईप उचलला, टेबलापासून ते दूर वळले, काडी ओढली व पाईप पेटवीत असताना काडीच्या ज्वालेमधून बेस्सोनोव यांच्याकडे स्थिर नजरेने पहात राहिले.

"स्तालिनग्रादमधल्या सेनेचे आधिपत्य करण्याची कामगिरी आम्ही तुमच्यावर सोपवली तर तुमच्या बाजूने काही आक्षेप आहे का कॉम्रेड बेस्सोनोव?" जणू काही त्यांचे उत्तर त्यांनी ऐकले नाही अशा थाटात त्यांनी मुद्दाम विचारले. "मॉस्कोनजीकच्या तुमच्या कोअरच्या कारवायांची आम्हाला माहिती आहे आणि त्याबाबत रोकोसोव्स्कींशी आम्ही सल्लामसलत केलीय."

याचा अर्थ त्यांच्या नेमणुकीबाबतच्या अफवा खऱ्या होत्या. आपली नेमणूक का केली जात आहे याचे कारण त्यांना समजले नव्हते किंवा ही नेमणूक अचानक झाली होती, असे मान्य करणे मूर्खपणाचे ठरले असते. रोकोसोव्स्कींनी त्यांची या जागेसाठी शिफारस केली असली पाहिजे. अशा रीतीने घटना घडणे किती विचित्र होते.

"कॉम्रेड स्तालिन, मी एक सैनिक आहे आणि कोणत्याही जागी नेमणूक हा मला दिलेला हुकूम आहे असे मी मानतो."

"तुम्ही इस्पितळातून बरे होऊन बाहेर पडला आहात आणि लढायला सिद्ध आहात असे मी गृहीत धरतो कॉम्रेड बेस्सोनोव. या बाबतीतही काही आक्षेप नसावेत असे मला वाटते." मनगटाला हलकासा झटका देऊन स्तालिननी काडी विझवली. "इथं नकाशापाशी या."

टेबलापर्यंतचे ते छोटे अंतर काठीविना चालत जायला बेस्सोनोवना विलक्षण कष्ट झाले. आघाडीवर हल्ला चढवताना मार्ग आक्रमिताना जे सायास पडतात, तीच अवस्था आत्ता त्यांची झाली होती. या क्षणाला ते स्तालिन यांच्या इतके जवळ उभे होते की, भारी किंमतीच्या तंबाखूचा स्तालिनच्या कपड्यांना येणारा गोडसर वास त्यांना स्पष्ट

जाणवत होता. एका बाजूने स्तालिन यांचा चेहरा पाहताना त्यांची रुंद, पिकत चाललेली भुवई व गालावरची देवीच्या वणांची, फिकुटलेली कातडी त्यांना दिसत होती; आणि जेव्हा, नकाशाजवळ काही काळ थांबल्यानंतर स्तालिन यांनी आपल्या पिवळसर डोळ्यांनी सावकाशपणे वर पाहिले, तेव्हा त्या नजरेत एक आंतरिक उपहासाच्या समाधानाची बारीक छटा चमकत होती.

"तुमच्या मीमांसेविरुद्ध मला काही म्हणायचं नाही, कॉम्रेड बेस्सोनोव," हळू आवाजात स्तालिन म्हणाले. "तुम्हाला माहीतच आहे की, मॉस्कोजवळ शत्रूला वेढणे शक्य आहे असे आम्हाला वाटले होते. पण आमच्याजवळ फौज अपुरी होती. तुमच्याजवळही अपुरी कोअर होती. कॉम्रेड बेस्सोनोव, प्रत्येक सेनापतीचं एक स्वतःचं विजयस्वप्न* असतं. पण आम्ही कम्युनिस्ट वस्तुनिष्ठ परिस्थितीवर विश्वास ठेवतो. असं म्हणतात की, मॉस्कोच्या वेशीपाशी हिटलरला एका ताज्या दमाच्या रणगाडा डिव्हिजनची आणि एका लांबलचक उन्हाळ्याची कमी भासली. काही लोकांचं तर असं मत आहे की, उन्हाळ्यात त्यांनी आगेकूच करणं आणि आम्ही हिवाळ्यात त्यांचा पराभव करणं हा नियमच बनला आहे. पण लढाईत असा काही नियम नसतो. ती जुनी कहाणी झाली...." स्तालिन बोलायचे थांबले. "तर कॉम्रेड बेस्सोनोव, तुम्ही कान्ने असं म्हणता?" हा शब्द जरी बेस्सोनोवनी वापरला नव्हता तरी त्याचा पुनरुच्चार स्तालिननी केला व केव्हाच विझलेल्या पाईपला ते ओढत राहिले. त्यांनी तो पुन्हा पेटवायचा यत्न केला नाही व त्याच्या दांडयाने हळुवारपणे नकाशावर स्तालिनग्रादभोवती वर्तुळ काढले. "इथं नाझी दरवडेखोर कचाटयात सापडले आहेत आणि इथं आमचं पहिलं कान्ने आहे, कॉम्रेड बेस्सोनोव. तुम्ही सहमत आहात?

"होय कॉम्रेड स्तालिन. मी तुमच्याशी पूर्ण सहमत आहे."

---

*"कान्नेचे स्वप्न असते" असे स्तालिन यांनी म्हटले. (इ. स. पू. २१६ मध्ये, इटलीच्या आग्नेयेस असलेल्या कान्ने नामक खेडयात, हन्निबालने आपल्यापेक्षा संख्येने अधिक असलेल्या रोमन सेनेचा पराभव केला होता. त्याने दोन्ही फळ्यांनी रोमन सेनेला चिमटयात धरून नंतर वेढा घातला होता.)

"तेव्हा तुमची सुसज्ज सेना," बराच वेळ थांबल्यानंतर स्तालिन पुढे बोलू लागले, "ती आम्ही तुम्हाला सर्वप्रमुख लष्करी ठाण्याच्या राखीव फौजेतून देत आहोत, ही सेना तीन आघाड्या बळकट करण्यासाठी, घेरलेल्या जर्मनांचा समूळ नाश करण्यासाठी पाठवली जात आहे. तुम्ही, पाउलसला खतम करा आणि 'साखळी' नांवाची मोहीम पूर्ण करा. कॉम्रेड बेस्सोनोव, या विषयावर तुमच्या काय कल्पना आहेत?"

मॉस्कोतील पूर्वीच्या घटनांचा स्तालिन यांनी का उल्लेख केला व नोव्हेंबरात सोविएत प्रतिचढाई सुरू झाल्यानंतर स्तालिनग्राद येथे निर्माण झालेल्या परिस्थितीबाबत बोलताना "कान्ने" शब्द तीन वेळा जोर देऊन का उच्चारला, याचा बेस्सोनोवना उलगडा झाला. ते म्हणाले, "कॉम्रेड स्तालिन, जर्मनांची ही प्रचंड सेना आपण जास्तीतजास्त किती वेगाने खतम करतो त्यावर सारे काही अवलंबून आहे असे मला वाटते. साखळी तोडण्याचा प्रयत्न केला जाईल किंवा बाहेरील आघाडीवरून दणका देऊन आतल्या अडकलेल्या जर्मन सेनेला मार्ग मोकळा करून देण्याचा प्रयत्न केला जाईल, या शक्यता आपल्याला नाकारता येणार नाहीत. अलिकडच्या काळात वेढलेल्या शत्रूचा पाडाव करण्याच्या आपल्या कारवाया मंदावल्या आहेत आणि जर्मन कडवा प्रतिकार करीत असून काहीवेळा तर प्रतिआक्रमक हल्ले चढवीत आहेत, असे मला सांगण्यात आले."

माझ्यापेक्षा त्यांना अधिक चांगले माहीत आहे आणि कदाचित मी चुकीचे बोलत असेन, असा विचार शेवटचे वाक्य उच्चारत असतानाच बेस्सोनोव यांच्या मनाला चाटून गेला. परंतु स्तालिन यांनी पाईप पेटवायला काडी ओढली व किंचित मान हलवली.

"साखळी तोडण्याचा प्रयत्न म्हणालात तुम्ही? कॉम्रेड बेस्सोनोव, तुम्ही चूक करीत आहात नव्हे काय? पश्चिम युरोपातल्या जर्मन फौजा स्तालिनग्राद क्षेत्रात बदली करण्यात येत असल्याबद्दलची माहिती आम्हाला मिळाली आहे... पुढे बोला."

"या कारणासाठीच कॉम्रेड स्तालिन, आपल्या फौजा लौकरात लौकर आघाडीवर पाठवल्या पाहिजेत असे मला वाटते."

काहीतरी स्वतःच्या विचारात गुरफटल्यामुळे, स्तालिन यांनी आपल्या

पाईपचा दांडा आपल्या तांबूस मिशांच्या दाट केसांवर तसाच काही काळ धरून ठेवला आणि नंतर जाणवण्याइतपत जॉर्जियन उच्चारात ते म्हणाले,

"वेढलेल्या फौजांना मोडून काढून त्यांचा नाश करण्याची 'साखळी' मोहीम रोकोसोव्स्कीच्या आघाडीवरील फौजांकडून आणि प्रामुख्याने तुमच्या सेनेकडून पार पाडली जाईल कॉम्रेड बेस्सोनोव. २३ डिसेंबरच्या आधीच. मुद्दा असा आहे की, स्तालिनग्रादच्या काळापर्यंत शत्रूला वेढण्याचा आणि त्या वेढलेल्या शत्रूला पूर्णपणे खतम करीपर्यंत चोपून काढण्याचा आमच्या सैनिकांना आणि आमच्या सेनापतींनासुद्धा सराव नाही. 'जर्मन' या शब्दामागे फार काळपर्यंत एक जोरदार वलय निर्माण झाले होते. तो एक मानसशास्त्रीय घटक बनला होता. आणि हा पगडा लोकांच्या मनावरून काढून टाकला पाहिजे. कायमचा. बरोबर आहे की नाही कॉम्रेड बेस्सोनोव? का तेवढं बरोबर नाही?"

"कॉम्रेड स्तालिन, ४१ च्या माघारीचा परिणाम अजून आपल्या सैनिकांच्या मनांवरून पुसला गेला नाही, असं मला वाटतं. किंवा ४२ च्या उन्हाळ्याचाही. पण वेगळे वळण लागण्याची वेळ येत आहे किंवा एव्हाना आलीय. आता लढाईचे स्वरूप वेगळे आहे, आता जर्मन वेढा घालीत नसून आपण जर्मनांना वेढा घालतो, याची त्यांना जाणीव होऊ लागली आहे."

कोणत्याही स्नायूची हालचाल न करता, फक्त खवखवणारा घसा खोकून किंवा खाकरून साफ करीत, स्तालिन यांच्या निर्विकार, पिवळसर-करड्या चेहऱ्याने यावर मान्यता किंवा नाराजी यापैकी कोणताच भाव व्यक्त केला नाही. अभ्यासिकेतील जाड गालिचावरून त्यांनी येरझाऱ्या घालायला सुरुवात केली, त्यांचा अवघडलेला डावा हात अद्याप तसाच पोटावर आडवा होता, त्यांचे अरुंद, उतरते खांदे किंचित वाकले होते. पण या क्षणाला बेस्सोनोवना असे वाटले की, कदाचित १९४१ च्या उल्लेखामुळे किंवा पाउलसच्या वेढल्या गेलेल्या फौजांविरुद्धच्या कारवाया मंदावल्याच्या निर्देशामुळे स्तालिन नाराज झाले आहेत किंवा कसल्यातरी चिंतेत पडले आहेत. स्तालिन त्यांच्या जवळ आले तेव्हा त्यांच्या नजरेला त्यांची कमालीची थंडगार नजर भिडली व त्यांना तिने थंडपणे खिळवून धरले.

"लष्करी नेत्याचं लक्ष्य आणि उद्दिष्ट काय," बेस्सोनोवना उद्देशून बोलण्याऐवजी किंचित स्वत:शीच बोलल्याच्या सुरात स्तालिन म्हणाले. या चिंतनपर बोलण्यातील प्रत्येक शब्द ते तोलून मापून उच्चारीत होते. "शत्रूचा अभ्यास करणं हे लष्करी नेत्याचं मुख्य काम. योग्य क्षणाची वाट पहात तयारीत राहणं. स्नायूंना शिकवून तयार करणं. अचानक घाला घालणं. आणि विजयश्री मिळवणं."

"विजयश्री मिळवणं" या शब्दांवर त्यांनी हाताची हालचाल करून भर दिला आणि देवीच्या वणांनी खडबडीत झालेल्या त्यांच्या चेहऱ्यावर क्षणिक समाधानाची छटा पसरलेली दिसली.

"आणि सर्व शंकेखोर चूक आहेत हे सिद्ध केले जाईल," पुन्हा एकदा हालचालीने शब्दांवर भर देऊन स्तालिन यांनी वाक्य पुरे केले. "कॉम्रेड बेस्सोनोव, दुर्दैवानं अजून काही भित्रे आणि कच्च्या दिलाचे शंकेखोर आहेत आपल्यात."

पुढे कुणाचेही काहीही ऐकायची तयारी नसलेल्या एखाद्या माणसाप्रमाणे कपाळाला आठी घालून ते अभ्यासिकेच्या टोकाला असलेल्या टेबलाकडे गेले व त्यांनी टेलिफोन उचलला, पण खोकून आणि खाकरून घसा साफ केल्यानंतर, पुन्हा हळूहळू खाली ठेवला. एक दोन मिनिटे ते बेस्सोनोव यांच्यापासून इतके बाजूला उभे होते की, जणू काही त्यांचे तेथील अस्तित्वच ते विसरले होते; सोनेरी केसांनी आच्छादलेल्या त्यांच्या काळसर छोटया हाताने पाईपमधली राख झटकली, मग टेबलावरील सिगरेटची पेटी उघडली आणि बोटांमध्ये सिगरेटी चुरगळून त्यातील तंबाखू पाईपमध्ये कोंबली.

बेस्सोनोव यांच्या मनात विचार आला, ही मला जाण्याची खूण आहे. नवा सेनापती कसा आहे ते पाहण्यासाठी त्यांनी मला बोलावले असावे आणि माझ्याबद्दल त्यांचे फारसे समाधान झाले नसावे. कदाचित मला वाटले होते त्याप्रमाणे रोकोसोव्स्कींच्या सल्ल्यानुसार या सेनेवर झालेली माझी नेमणूक हा निव्वळ योगायोग असावा...

स्तालिन सिगरेटमधील तंबाखू पाईपमध्ये चुरगाळीत राहिले आणि पाईप भरल्यानंतर खूप वेळ थांबून त्यांनी हळू आवाजात बोलायला आरंभ केला.

"मला सांगा कॉम्रेड बेस्सोनोव, तुम्ही अकादमीत शिकलात आणि नंतर तिथं शिकवलंत... ही सत्य स्थिती सर्वांना माहीत आहे. तुम्हाला जनरल व्लासोव म्हणून कुणी माहीत आहे?"

व्लासोवबद्दल त्यांनी का विचारले असावे? बेस्सोनोव यांच्या मनात विचार चमकला. ही गोष्ट त्यांनी का उकरून काढली असावी?

"होय, मला माहीत होते," असे उत्तर देताना त्यांच्या काळजाचे ठोके जलद पडत होते. वोलखोव आघाडीवर घडलेल्या जूनमधील घटनांबाबत आणि २ऱ्या चढाई सेनेच्या शोकांतिकेबाबत त्यांनी जनरल मंडळींकडून ऐकले होते. बेपत्ता म्हणून आता जाहीर झालेला त्यांचा मुलगा त्याच सेनेमध्ये होता. "ते मला माहीत होते," बेस्सोनोव पुन्हा म्हणाले. "अकादमीत आम्ही एकाच वेळी अभ्यास केला."

"त्या काळातल्या व्लासोवबद्दल तुमचं काय मत आहे? तो फार गर्विष्ठ होता आणि चटकन दुखावला जायचा असं म्हणतात."

"कॉम्रेड स्तालिन, त्यावेळी तसं जाणवलं नाही. माझी आठवण जर बरोबर असेल, तर त्या काळात ते कुणाशीही फारसा घनिष्ठ संबंध राखत नसत."

"आता जर्मनांना शरण गेलेला हा गर्विष्ठ सेनापती लढाईत अगदी भित्रा आणि भेदरट होता असं म्हणतात. येर्मोलोव उल्लेख करतो तसला सेनापती. खरं आहे?"

"कॉम्रेड स्तालिन, त्यांच्याबद्दल असं काहीही मी सांगू शकणार नाही. आघाडीवर व्लासोव यांच्याशी माझी कधी गाठ पडली नाही," खालच्या आवाजात बेस्सोनोव उत्तरले. "एकच गोष्ट मी खात्रीपूर्वक सांगू शकेन की, अकादमीत असताना त्यांची कोणत्याही प्रकारे सर्वश्रेष्ठांमध्ये गणना होत नव्हती. अत्यंत सामान्य क्षमतेचा तो माणूस होता."

"असे समजले आहे की, या सामान्य दर्जाच्या राजकीय साहसवाद्याने जर्मनांची नोकरी पत्करली आहे." स्तालिन संतापाने म्हणाले. "या भेदरट जनरलच्या चुकीमुळं त्याच्या सेनेतले सहा हजार लोक मारले गेले आणि आठ हजार बेपत्ता आहेत. कॉम्रेड बेस्सोनोव, माझं असं मत आहे की, स्वतःला कैद होऊ देणाऱ्यांमध्ये अनेक वेळा राजकीय व नैतिकदृष्टया अस्थिर प्रवृत्ती आढळतात. काही प्रमाणात ते आपल्या

पद्धतीबद्दल असमाधानी असतात. काही अपवाद मोजण्यात अर्थ नाही. मान्य आहे हे तुम्हाला?"

त्या आठ हजार बेपत्तांमध्ये विक्तरचा समावेश आहे, पण त्याला कैदी म्हणून नेले असणे शक्य नाही! हे सारे स्तालिन यांनी का उकरून काढलेय? बेस्सोनोव यांना पायात वेदनेची जळती कळ जाणवली आणि त्या वेदनेमुळे त्यांच्या कपाळावर जमलेला कढत घाम पुसायची त्यांना अनावर इच्छा झाली.

मॉस्कोमध्ये, इस्पितळातून बाहेर पडल्यानंतर, नेमणुकीची वाट पहात असताना आणि आपला मुलगा जिवंत आहे किंवा मेला आहे याचा सतत विचार करीत असताना बेस्सोनोव यांनी २ऱ्या चढाई सेनेबाबत शक्य त्या सर्व चौकशा केल्या होत्या व त्या वेढ्यातून निसटलेल्या सर्वांबाबत चौकशा केल्या होत्या; पण या अगदी अलिकडच्या घटनांचा, आपल्या पत्नीबरोबरच्या संभाषणात ते कटाक्षाने उल्लेख करीत नसत. अद्याप त्यांनी आशा सोडली नव्हती.

१९४१च्या पहिल्या काही महिन्यात खुद्द बेस्सोनोव यांनी स्वतः अगतिकतेच्या भावनांचा अनुभव घेतला होता. वेढ्यात सापडलेल्या लोकांमध्ये निराशेची भावना एखाद्या साथीसारखी झपाट्याने कशी पसरत जाते, हे त्यांना ठाऊक होते. पण त्याचप्रमाणे, केवळ पोरसवदा वयाचे तरुण लेफ्टनंट, कंपनी व बटालियनचे कमांडर, अनेक कारणांनी प्रमुख ठाण्याशी संबंध तुटल्यानंतर, बाह्यतः पूर्णपणे निराश दिसणाऱ्या परिस्थितीत लोकांना एकवटून अटीतटीने शेवटचा प्रयत्न करून शत्रूची फळी कशी फोडून जात किंवा त्याच्या रणगाड्यांच्या पट्ट्यांखाली व तोफांच्या माऱ्यात कसे धारातीर्थी पडत, हेही त्यांना माहीत होते व स्वतः त्यांनी पाहिले होते. अगदी आताही त्यांच्या नजरेसमोर त्यांना अशी दृश्ये ताजी दिसत होती व त्यांच्या शेवटच्या भेटीच्या वेळी त्यांना दिसलेल्या नव्या विक्तरने आपल्या पराभूत सेनेच्या अवशिष्टांबरोबर साखळी तोडण्याचा निश्चित प्रयत्न केला असणार, याबाबत त्यांना संदेह वाटत नव्हता.

"कॉम्रेड बेस्सोनोव, तुम्ही गप्प का आहात? माझं म्हणणं तुम्हाला पटत नाही?"

बेस्सोनोवनी वर पाहिले. त्यांच्या रोड चेहऱ्यावर रेषा ठळक उठून

दिसत होत्या आणि आपले घट्ट मिटलेले ओठ ते उघडू शकत नव्हते. फार काळ उभे राहिल्यामुळे त्यांच्या पायातली कळ कमरेपर्यंत पोचली होती व तिथे इंगळ्या डसल्याचा त्यांना भास होत होता. सदरेच्या खोलीत त्या टक्कलवाल्या विनम्र माणसाने त्यांच्या हातून काढून घेतलेल्या काठीची त्यांना आठवण झाली, खाली बसण्याची त्यांना अनिवार इच्छा झाली, पण आपण तसे करणार नाही हे त्यांना ठाऊक होते. अखेरीस मोठ्या कष्टाने ते म्हणाले, "२ऱ्या चढाई सेनेच्या एका कंपनीचं नेतृत्व माझ्या मुलाकडं होतं. त्याचं काय झालंय ते मला माहीत नाही; पण कॉम्रेड स्तालिन, त्याचा पिता या नात्यानं बोलता मी ठामपणं सांगू शकतो की, जरी त्याला कैदी म्हणून नेलं असलं, तरी तो विश्वासघात करील असं मला कधीही वाटणार नाही."

कोरड्या खोकल्याची उबळ दाबीत स्तालिन यांनी हातातला पाईप दाणकन टेबलावर आदळला आणि जणू काही तो एक त्रास देणारा सजीव प्राणी आहे अशा प्रकारे त्यांनी त्याला दूर सारले. बेस्सोनोवना मात्र याची कल्पना नव्हती की, आपली नावड दाबून टाकण्याची स्तालिन यांची ती पद्धत आहे. स्तालिन अभ्यासिकेत येरझाऱ्या घालीत होते; त्यांच्या गडद काळ्या पापण्या अर्धवट मिटलेल्या होत्या.

"माझ्या मनात जे काही होतं त्याचा तुमच्या मुलाच्या दैवाशी काही संबंध नव्हता. तो खूप लहान आहे हे मला माहीत आहे. कॉम्रेड बेस्सोनोव, तुम्हाला जे वाटलं, त्याचा मी विचार करीत नव्हतो. एक वेगळीच आकृती माझ्या मनात होती. विश्वासघाताची मूळं नेहमी भूतकाळात रुजलेली असतात, असं मला वाटतं. तरुण मंडळींना भूतकाळ नसतो."

आपली ठसठसती वेदना नडगीपासून कमरेपर्यंत अधिकाधिक वाढत चालली असून असह्य होत आहे, असे बेस्सोनोवना जाणवत होते. त्यांना काखेत घाम फुटला. आधाराला माझ्या हाती काठी असती तर किती बरे झाले असते, असा विचार त्यांच्या मनात चमकला, अर्थात अशी इच्छा धरणे व्यर्थ आहे याची त्यांना कल्पना होती.

"एक काळ असा होता की, या व्लासोवबाबत प्रत्येकाचं चांगलं मत होतं. त्याच्यातली कीड कुणाच्याच लक्षात आली नव्हती. अकादमीत नाही किंवा सैन्यातही नाही," स्तालिन ताडकन उद्‌गारले आणि त्यांच्या

नजरेतील थंडपणामुळे आपला चेहरा जणू चरचरा कापला जात आहे असे बेस्सोनोवना वाटले. ती गोठवून टाकणारी वेदना कमी करायला आपल्या गालावर हात ठेवण्याची त्यांना इच्छा झाली. "कॉम्रेड बेस्सोनोव, हे खरं आहे की नाही?" स्तालिननी पुढे विचारले.

"कॉम्रेड स्तालिन, त्या प्रश्नाचं उत्तर देणं मला अवघड आहे. व्लासोव यांना ज्या परिस्थितीत कैद करण्यात आलं त्या परिस्थितीची माझ्या कुवतीनुसार कल्पना करता, मानवी अधःपतनाची ती एक निंद्य बाजू आहे असं मी मनाशी नोंदवलं. पण प्रत्यक्ष जर्मनांची चाकरी करणं म्हणजे—ही राजकारणी चाल आहे असं मला वाटतं."

युद्धकैद्यांबद्दल स्तालिन यांनी जे काही विचार व्यक्त केले होते त्यांचा तार्किक धागा लावण्याचा त्या क्षणाला बेस्सोनोव यांनी प्रयत्न केला, पण आपल्या मुलासंबंधी विचार करताना कोणताही संशय घेण्यास त्यांच्या मनाने साफ नकार दिला. तो दुबळा किंवा भित्रा वागला असेल, यावर त्यांचा विश्वासच नव्हता. त्या वेढ्यामधून निसटून आलेल्या सोळा हजारांमध्ये विक्तरचे नांव नव्हते. त्या दुर्दैवी परिस्थितीत, इतरां-प्रमाणे विक्तरलाही कैद केले गेले असण्याची शक्यता ते स्वतःशी अद्यापही मान्य करीत होते, पण सहन करायला अवघड असूनही त्यांना अधिकाधिकपणे खात्री वाटत चालली होती की, २ऱ्या चढाई सेनेला वेढणारी साखळी तोडण्याच्या प्रयत्नात त्यांचा मुलगा मारला गेला. हे अधिक सत्य वाटत होते.

पण हे संभाषण का निघाले, जनरल व्लासोव यांच्याबद्दल स्तालिन यांच्या मनात अचानक का विचार आले, हे बेस्सोनोव यांना समजले नाही.

सर्व लढायांमध्ये विश्वासघाताचे प्रकार, भित्रेपणाचे प्रदर्शन, सैन्यातील फितुरी, गुप्त कागदपत्रांची देवघेव इत्यादी प्रकार घडतात. पण व्लासोव यांनी १९४२ च्या जूनमध्ये केलेला हा विश्वासघात हा त्या सबंध सेनेने केलेला विश्वासघात नव्हता; स्पास्काया पोलेस्त खेड्याजवळ त्या सेनेने अखेरपर्यंत झुंज दिली होती. उध्वस्त झालेल्या डिव्हिजनांच्या अवशेषांनी खरोखरीच वेढा तोडून स्वतःची सुटका करून घेतली होती. व्लासोव यांनी केलेला विश्वासघात ही एका सेनापतीने केलेली भित्र्या विश्वासघाताची

कृती होती. रात्रीच्या वेळी आपले मुख्य ठाणे गुपचूप सोडून जर्मनांच्या कबजातील प्यात्नित्सा खेड्यात ते गेले होते व लाचार शब्दात त्यांनी स्वत:ला जर्मनांच्या स्वाधीन केले होते: "गोळी झाडू नका, मी जनरल व्लासोव." आपला स्वत:चा जीव वाचवायचा त्यांनी प्रयत्न केला होता, पण त्याच क्षणी त्यांचा मृत्यू झाला होता. कारण विश्वासघाताची प्रत्येक कृती म्हणजे आत्मिक मृत्यूच होय. पण व्लासोव यांच्या विश्वासघाता-मुळे आणि एका कमी महत्त्वाच्या क्षेत्रामधील एका सेनेच्या पराभवा-मुळे अर्थातच सबंध सोविएत-जर्मन आघाडीवरील परिस्थितीत काही बदल घडला नव्हता. त्यावेळी सर्वांत मोठा धोका दक्षिणेला होता आणि दक्षिण आघाड्यांवर जर्मन आपली चढाई एकवटण्याच्या प्रयत्नात असल्याने स्तालिन यांचे सारे लक्ष तिकडे होते. वोलखोव भोवतालच्या घटनांवर लक्ष केंद्रित करण्याची स्तालिन यांची इच्छा नव्हती. पण या नोव्हेंबरातील प्रतिचढाईच्या दिवसात, स्तालिनग्राद येथील तीन सोविएत आघाड्यांवर प्रचंड यश नजीक येऊन ठेपले असताना, गुप्त अहवालांमध्ये जनरल व्लासोव यांचे नांव पुन्हा उमटले होते. स्तालिन यांचा पूर्वीचा राग पुन्हा उफाळून आला होता आणि त्यांचा राग जरी शांत झाला नव्हता, तरी लाल सेनेचे यश ऐकल्यानंतर जर्मन पिछाडीवर व्लासोवना काय वाटत असेल याची कल्पना ते करू शकत होते. आणि त्या पुन:पुन्हा टोचणाऱ्या आठवणींच्या भूतकाळात गेल्यानंतर, दुसऱ्या चढाई सेनेच्या पूर्वीच्या सेनापतीला अकादमीतील प्रशिक्षणाच्या काळात ओळखणाऱ्या आणि आपल्या आयुष्यातील अनेक वर्षे सैन्यात घालविलेल्या बेस्सोनोव यांच्यासारख्या अनुभवी, श्रेष्ठ जनरलकडून व्लासोवसारख्या विश्वासघातक्याच्या संबंधात काही अधिक समजू शकेल, त्या पार पूर्वीच्या काळातही विश्वासघाताची बीजे व्यक्त करणारे व्लासोवच्या वागण्यातील काही खास पैलू ते सांगू शकतील आणि खरा व्लासोव समजायला मदत होईल, असे स्तालिनना वाटले होते. स्तालिनना नेमके हेच समजून घ्यायचे होते.

बेस्सोनोव यांचे उत्तर ऐकल्यानंतर, आपल्या सवयीनुसार त्यांनी आपले असमाधान प्रत्यक्ष व्यक्त केले नाही; अत्यंत मंदपणे ते अभ्यासिकेच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत चालत गेले आणि तिथून जेमतेम ऐकू येईल अशा आवाजात बोलू लागले.

"राजकारणी चाल? होय, हे राजकारण... कॉम्रेड बेस्सोनोव, वेगवेगळ्या प्रसंगी तुम्ही काहीवेळा स्वतःचे खास विचार व्यक्त करता, असे लोक म्हणतात. उदाहरणादाखल, आत्ता तुम्ही युद्धकैद्यांबाबत आपला दृष्टिकोन व्यक्त केलात त्याप्रमाणे! तुमच्या बद्दलचे मत वस्तुस्थितीशी सुसंगत आहे?"

व्लासोव यांच्या बाबतीत पुढे चर्चा चालेल अशी अपेक्षा असल्याने बेस्सोनोव यांची या प्रश्नाला उत्तर देण्याची अजिबात तयारी नव्हती. आपला ठणकणारा पाय त्यांनी गालिचावर किंचित ठेवला तेव्हा खूप उंचावरून पडताना छातीत जसे लक्क व्हावे तशी अपरिचित भावना त्यांना जाणवली व जणू काही या वज्राघाताला आपण आधीच तयार होतो अशा प्रकारे दाखवून आणि मोठ्या कष्टाने त्यांनी तोंडातून शब्द उमटवले, "कॉम्रेड स्तालिन, कदाचित लोक याहून वाईट गोष्टी माझ्याबद्दल बोलतात. माझा स्वभाव वाईट आहे असे म्हटले जाते याची मला माहिती आहे. माझ्याबाबत तक्रारी आहेत यात काही शंका नाही."

स्तालिन यांनी आपल्या जड पापण्या वर उचलल्या, आश्चर्याने टक लावून पाहिले आणि पुन्हा त्या खाली केल्या.

"तुम्ही प्रश्नाचं सरळ उत्तर का देत नाही?" त्यांनी विचारले व अचानक मूक हास्य केले. अंगठ्याने पाईप चोळीत व खांदे वाकवून ते पुन्हा अभ्यासिकेच्या टोकाच्या टेबलापर्यंत गेले.

"कॉम्रेड बेस्सोनोव, तुम्ही कम्युनिस्ट आहात आणि तुम्ही कम्युनिस्टाप्रमाणं उत्तर दिलं पाहिजे. वेगवेगळ्या घडामोडींबाबत नेहमीच तुमचं स्वतःचं असं वेगळं मत असतं काय?"

"कॉम्रेड स्तालिन, तसं मी देण्याचा प्रयत्न केलाय. पण नेहमीच माझ्या मतांचं मला शेवटपर्यंत समर्थन करता आलेलं नाही."

टेबलाशी उभे राहून स्तालिन यांनी कपाळाला आठ्या घालून त्यांच्याकडे नजर टाकली. आपल्याभोवतालच्या माणसांच्या बिनतक्रार संमतीची त्यांना फार दीर्घ काळ सवय झालेली होती. पण काहीवेळा ते अगदी आपल्या काही मोजक्या सहकाऱ्यांना स्वतःचे मत व्यक्त करू देत आणि आता बेस्सोनोव यांचे उत्तर ऐकताच, सर्वप्रमुख लष्करी ठाण्यामधील एका प्रतिनिधीची त्यांना आठवण झाली. अनेक वेळा त्याच्या बोलण्याचा स्तालिनना राग यायचा, पण तरीही मोहिमेचे निर्णय घेताना

त्याचे निर्भय मनमोकळे मत अत्यंत आवश्यक असायचे. पण परिस्थितीचे ठाम आणि योग्य मूल्यमापन करण्याची स्तालिन यांना अनुभवी धूर्तपणाने सवय होती व त्यांच्या या गुणाचे सर्वांना आश्चर्य वाटायचे; त्याचमुळे स्तालिन यांना आपल्या विचारांच्या अचूकतेची खात्री वाटत असे आणि कोणताही विलंब न करता ते आपले विचार मांडीत असत.

"कॉम्रेड बेस्सोनोव, मला समजतं. एके काळी आम्ही काही लष्करी अधिकाऱ्यांना शासन केलं त्याबद्दल कदाचित तुम्हाला काही शंका वाटत असण्याची शक्यता आहे?"

"तो केवळ माझा दृष्टिकोन होता, कॉम्रेड स्तालिन," बेस्सोनोव उत्तरले. आपल्या तोंडावर आणि पायाभोवती झोंबणाऱ्या थंडगार चावऱ्या वाऱ्याच्या जणू आपण अधिक जवळ सरकलो आहोत असे त्यांना वाटले. हे उत्तर दिल्यानंतर त्यांना जाणीव झाली की, ज्याचा उल्लेख करण्याचा त्यांचा इरादा नव्हता अशा गोष्टीबाबत बोलण्यास स्तालिन यांनी त्यांना भाग पाडले आहे. ज्या शांतपणे ते पुढे बोलले त्या शांतपणाचे त्यांनाच स्वतःला आश्चर्य वाटले. "जे काही लष्करी अधिकारी पुढे निंदेला बळी पडले, त्यांच्या बरोबर काम केलेले असल्याने हा दृष्टिकोन तयार झाला. त्याबद्दल माझी खात्री आहे कॉम्रेड स्तालिन..."

जणू काही एखादी वस्तू आपल्या वाटेत अडथळा आणीत आहे अशा पद्धतीने स्तालिन यांनी आपला पाईप बाजूला सारला आणि निर्विकारपणे ते बोलू लागले.

"अशा प्रकारच्या शंकांची मला जाणीव आहे. संघर्षामुळे अनेक वेळा कठोर व्हावे लागते. पण ज्यांच्याबद्दल आम्ही त्यावेळी संशय घेतला त्यांच्यापैकी अनेकजण अंतर्यामी व्लासोवसारखे किडलेले होते. अतिरेक आणि चुका यांचा समतोल केव्हाच ठाकठीक केलाय. रोकोसोव्स्की आणि तोल्बुखिन स्तालिनग्रादमध्ये उत्तम लढताहेत."

पण इतरांबाबत काय? स्तालिन यांचे बोलणे पुढे चालू असतानाच बेस्सोनोव यांच्या मनात विचार आला. "...पण हा माथेफिरू व्लासोव शुद्धीवर आला आणि जर्मनांपासून फुटून परत आला तरी आम्ही त्याला कधीही क्षमा करणार नाही!"

या संभाषणामुळे साहजिकच स्तालिन यांच्या अप्रिय आठवणी जाग्या झाल्या. ते किंचित काळ खोकत राहिले; मग अजिबात आवाज न

करणाऱ्या त्या बुटांनी चटचट चालत नकाशाच्या टेबलापाशी गेले आणि त्या दिवशी सकाळीच त्यावर खुणा करून ठेवलेल्या तीन आघाड्यांच्या ठिकाणांवर खूप वेळ बघत राहिले. स्तालिनग्राद येथील तीन आघाड्यांवरील यशावर लक्ष केंद्रित करून त्यांनी मघाचे विचार झटकण्याचा प्रयत्न केला आणि ते म्हणाले, "असो! झाले ते झाले! कॉम्रेड बेस्सोनोव, तुमच्या मुलाच्या बाबतीत बोलायचे तर आम्ही त्याला कैद्यांच्या यादीत टाकणार नाही. तो बेपत्ता आहे असेच आम्ही समजू. नंतर आम्ही तपशीलवार चौकशी करू. त्याबद्दल तुम्हाला माहिती कळवत राहू. माझा मोठा मुलगा याकोव हा सुद्धा युद्धाच्या सुरुवातीला बेपत्ता म्हणून जाहीर झाला होता. तेव्हा कॉम्रेड बेस्सोनोव, आपली दोघांची परिस्थिती सारखीच आहे."

आपल्या मोठ्या मुलाबाबत स्तालिन आणखी काही बोलणार होते, पण ते घुटमळले, नकाशावर त्यानी भिंग फिरवले व एकदम विषय बदलला.

"तुमची सेना ताबडतोब लढाईत आणा. रोकोसोव्स्कीच्या आघाडीचा एक भाग म्हणून कॉम्रेड बेस्सोनोव, तुम्हाला पाउलसच्या फौजा चिरडून नष्ट करण्यात यश येवो, अशी इच्छा मी व्यक्त करतो. मॉस्कोजवळच्या तुमच्या कोअरच्या खंबीर लढवय्येपणानंतर माझा तुमच्यावर विश्वास बसलाय कॉम्रेड बेस्सोनोव. मला त्यावेळेची आठवण आहे."

"मी प्रयत्नांची मुळीच कसूर करणार नाही कॉम्रेड स्तालिन. येऊ मी?"

"पण तुम्ही आपल्या ताकदीला जपून वापरलं पाहिजे. तुम्ही महाप्रचंड आकाराचे असाल असं मला वाटलं होतं," बेस्सोनोव यांचे खांदे किती रुंद असतील याबद्दलचा आपला अंदाज हात पसरून दाखवीत स्तालिन म्हणाले आणि असे करताना अचानकपणे ते हसले. त्यांच्या मिशा थरथरल्या आणि त्याक्षणी (खुद्द स्तालिननाही त्याची जाणीव झाली) त्यांच्या नजरेतील तो कठोर थंडपणा एकदम वितळला व नाहीसा झाला, देवीच्या वणांनी भरलेला त्यांचा सबंध चेहरा मृदु बनला. बेस्सोनोव यांना चित्रांमध्ये परिचित असल्याप्रमाणे स्तालिन यांचा चेहरा घरगुती, प्रेमळ बनला. "कॉम्रेड बेस्सोनोव, तुम्ही फार बारीक आहात. हे सुद्धा तुमचा स्वतःचा एक दृष्टिकोन म्हणून का?

अल्सर तर नाही ना? तुम्ही भरपूर खात नसावेत असं वाटतं. याचा अर्थ लोकांना तुम्ही भरपूर खाऊ घालणार नाही. स्तालिनग्रादला पुरवठ्याची स्थिती फारशी चांगली नसली, तरी आम्ही तसं करायला तुम्हाला परवानगी देणार नाही."

"कॉम्रेड स्तालिन, मी नुकताच इस्पितळामधून बाहेर पडलोय. पण मी नेहमीच असा बारीक होतो," स्तालिन यांचा हसरा चेहरा पहात बेस्सोनोव म्हणाले. प्रत्यक्ष विषयाशी संभाषणात निर्देश झालेल्या इतर गोष्टींचा तसा काही संबंध नाही हेच स्तालिन यांच्या त्या स्मिता-मधून व्यक्त होत होते.

त्यानंतर तीन तासांनी बेस्सोनोव स्तालिनग्राद प्रदेशातील आपल्या ठिकाणाकडे निघाले. पण विमानातही त्यांना मनावरील गुंतागुंतीच्या जबरदस्त भावनेच्या पगड्याचा व सरसेनापतींशी झालेल्या चाळीस मिनिटांच्या संभाषणाचा स्वतःशी उलगडा करता आला नाही.

बेस्सोनोव तेथे आल्यानंतर तिसऱ्या दिवशी स्तालिनग्रादच्या नैर्ऋत्येला परिस्थिती अचानक बदलली होती.

२४ ते २९ नोव्हेंबरपर्यंत दॉन आणि स्तालिनग्राद आघाड्यांवरील सर्व हालचाली कोंडीत पकडलेल्या हजारो जर्मन फौजांवर सतत आक्रमक हल्ले चढविण्याच्या दृष्टीने केल्या जात होत्या. जर्मन फौजा अद्यापही कडवा प्रतिकार करीत होत्या व काही क्षेत्रांमध्ये तर प्रतिहल्ले चढवीत होत्या. डिसेंबरच्या आरंभाला या वेढलेल्या सेनेने व्यापलेला प्रदेश निम्म्याने कमी झाला होता. पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत ७०-८० किलोमीटर आणि उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत ३०-४० किलोमीटर, एवढ्याच प्रदेशात जर्मन फौजांचे अस्तित्व उरले होते. नैर्ऋत्येकडे मुसंडी मारायला, आपल्या फौजा एकवटल्यानंतर ही "साखळी" तोडण्याचा प्रयत्न करायला आपल्याला परवानगी द्यावी, असा तातडीचा संदेश ६ व्या रणमैदानावरील सेनेचा सेनापती कर्नल-जनरल पाउल्स याने हिटलरच्या प्रमुख ठाण्याला पाठवला होता. हिटलरची संमती गृहीत धरून, त्याने आपल्या सेनेला आणि आपल्या आधिपत्याखालील चौथ्या पँझर सेनेला व्होल्गापासून माघार घेऊन रोस्तोवच्या दिशेने कूच करायला सिद्ध व्हायचा हुकूम दिला होता. साखळी तोडून जाताना ज्या गोष्टींचा उपयोग होणार नव्हता अशा सर्व गोष्टी जाळून, उध्वस्त करण्यात या दोन सेनांनी अनेक

दिवस घालविले. अधिकाऱ्यांचे उन्हाळी गणवेष, इंधन नसलेले ट्रॅक्टर आणि मालवाहू मोटारी व फौजांना अडथळा ठरणारे साठे नष्ट करण्यात आले; महत्त्वाचे कागदपत्रही जाळून टाकण्यात आले.

आपल्या वैयक्तिक प्रतिनिधींकडून फौजांची परिस्थिती नीट समजूनही हिटलर गोंधळला. पण स्तालिनग्रादला हवाई मार्गाने दररोज ५०० टन मालाचा पुरवठा करण्याचे गोअरिंगने वचन देताच त्याने रेडिओसंदेशाद्वारे पाउल्सला उत्तर पाठवले व स्तालिनग्राद न सोडण्याचा आणि अखेरचा माणूस जिवंत असेपर्यंत चारी बाजूंनी संरक्षक पवित्रा धरून लढण्याचा हुकूम दिला. नंतर ६ व्या सेनेच्या प्रमुख ठाण्याला अडकून पडलेल्या फौजांच्या मुक्तीसाठी "हिवाळी तूफान" या सांकेतिक नांवाची मोहीम करण्याचा हुकूम देण्यात आला. वेढलेल्या फौजांभोवतालची सोविएत सेनेची साखळी तोडून कोतेल्नीकोवो आणि तोरमोसिनच्या दिशेने आत घुसण्याचा हुकूम फील्ड मार्शल मानष्टेईनच्या दॉन सेनेला देण्यात आला. मध्य दॉनच्या दक्षिणेला आस्त्राखानच्या स्तेपपर्यंत पसरलेल्या सर्व जर्मन फौजा, सुमारे तीस डिव्हिजन फौजा, या दॉन सेनेच्या अख्त्याराखाली होत्या. शिवाय जर्मनी, फ्रान्स, पोलंड व आघाडीच्या इतर क्षेत्रांमधून बदली केलेल्या सहा पँझर आणि एक चिलखती गाड्यांची डिव्हिजन, यांचाही त्यात समावेश करण्यात आला होता.

उत्तर कॉकेशसमधील जर्मन फौजांच्या फळ्याही धोक्यात आल्या होत्या व त्यांची रोस्तोवपर्यंतची माघार लपविण्यासाठी, वाटेल ती किंमत देऊन स्तालिनग्राद लढविण्याचा डावपेच हिटलर खेळत होता.

११ डिसेंबरला, स्तालिनग्राद भागातील परिस्थितीवर चर्चा केल्यानंतर, हिटलरने मानष्टेईनला हल्ला करण्याचा हुकूम दिला.

१२ डिसेंबरच्या पहाटेला, तिखोरेत्स्क-कोतेल्नीकोवो-स्तालिनग्राद रेल्वेच्या अरुंद पट्ट्यात तीनास एक असे वर्चस्व प्रस्थापित करून, सुटका करण्यासाठी धावलेल्या फौजांच्या आघाडीचा प्रमुख कर्नल-जनरल गोट याने स्तालिनग्राद आघाडीवरील दोन सेनांच्या सीमारेषेवर दोन पँझर डिव्हिजन व प्रचंड हवाई छत्राच्या साहाय्याने हल्ला चढवला. या पोकळीतून जर्मन टँक घुसले, १५ डिसेंबरला अक्साई नदीपर्यंत पोचले, ती पार करून तीन दिवस सतत हल्ले चढवीत स्तालिनग्रादच्या दिशेने ४५ किलोमीटर सरकले. गोटकडून पाउल्सच्या मुख्य ठाण्याला जाणारे

बिगर सांकेतिक संदेश सोविएत हेरखात्याने पकडले: "दम धरा. सुटका नजीक आहे. आम्ही वाटेवर आहोत!" नैर्ऋत्येकडील परिस्थिती अत्यंत बिकट बनली. पहिल्या बचावात्मक व आक्रमक कारवायांमुळे दुबळ्या बनलेल्या सोविएत फौजा प्रचंड हानी पत्करीत, प्रत्येक टेकडी आणि उंचवटा लढवीत माघार घेऊ लागल्या. मुख्य क्षेत्रात सारी राखीव फौज ओतली, पण तरीही परिस्थितीत काहीच बदल घडला नाही. १७ व्या पँझर डिव्हिजनची कुमक लाभलेली कर्नल-जनरल गोटची सेना स्तालिनग्रादच्या रोखाने वेगात कूच करू लागली. पाउलसची ६ वी सेना दर तासाला इशाऱ्याची वाट पहात होती व आपल्या मुक्तीसाठी धावून येणाऱ्या पँझर डिव्हिजनांच्या दिशेने साखळी तोडण्यासाठी डोळ्यात प्राण आणून वाट पहात होती.

स्तालिनग्रादच्या वायव्येला ज्या क्षणाला बेस्सोनोव यांची रणांगणात उतरणारी सेना आगगाडीतून खाली उतरत होती, त्याच क्षणाला कोतेल्नीकोवो क्षेत्रातील जर्मन प्रतिहल्ल्यांची आणि अक्साई नदीवरील हातघाईच्या लढायांची तपशीलवार माहिती मिळालेली होती. बेस्सोनोवना आणि त्यांचे चीफ ऑफ स्टाफ मेजर-जनरल यात्सेन्को यांना आघाडीच्या लष्करी मंडळात तातडीने पाचारण करण्यात आले. सर्वप्रमुख लष्करी ठाण्याचा प्रतिनिधीही तेथे हजर होता. आघाडीच्या सेनापतीचे व बचाव करणाऱ्या सेनांच्या प्रमुखांचे तपशीलवार अहवाल ऐकल्यानंतर अगदी स्पष्ट झाले, की हल्ल्याचा मुख्य भार सहन करणाऱ्या स्तालिनग्राद आघाडीजवळ प्रचंड संख्येने धावून फळी फोडू पाहणाऱ्या मानष्टेईनच्या आघाताला टिकून राहण्याचे बळ उरलेले नाही.

हे अहवाल ऐकत असताना, बेस्सोनोव गप्प राहून विचार करीत होते. दक्षिणेला हा निकडीचा धोका निर्माण झाला असताना, पाउलसच्या वेढलेल्या सेनेचा निकाल लावायला दॉन आघाडीवर आपली सेना पाठवणे, ही या क्षणाला घोडचूक ठरेल हे त्यांना समजून चुकले. त्यांनी आपली सुसज्ज सेना दॉन आघाडीवरून काढून, ज्या ठिकाणी सर्व मोहिमेचे भवितव्य निर्णित होते त्या मानष्टेईनच्या घुसणाऱ्या फळीविरुद्ध नैर्ऋत्येला जमवावी, असे जेव्हा सर्वप्रमुख लष्करी ठाण्याच्या प्रतिनिधीने सुचविले, तेव्हा या सूचनेबाबत बेस्सोनोव यांची आधीच

मानसिक तयारी झाली होती. काही वेळ थांबून त्यांनी उत्तर दिले की, प्राप्त परिस्थितीत त्यांनाही याशिवाय दुसरा उपाय दिसत नाही.

पण हे उत्तर देत असतानाच, बेस्सोनोव यांनी तात्काळ मागणी केली की, अद्याप एकही लढाई न खेळलेल्या त्यांच्या अननुभवी सेनेला रणगाडे किंवा यंत्रसज्ज कोअरांची कुमक पुरविण्यात यावी. मेजर-जनरल यात्सेन्को यांनी त्यांच्याकडे एक भयभीत कटाक्ष टाकला. आपल्याला अद्याप अपरिचित असलेला आपला चीफ ऑफ स्टाफ सैन्याच्या फेररचनेच्या नव्या कामगिरीमुळे कमालीचा अस्वस्थ झाला आहे व नव्याने आलेल्या सेनाप्रमुखाने ही सूचना एवढी चटकन आणि जवळजवळ बिनशर्त स्वीकारल्यामुळे चिंताक्रांत बनला आहे, हे बेस्सोनोवनी त्यांच्या चेहऱ्यावरून ताडले.

त्यांच्या दृष्टीने विचार करता त्याचे अगदी बरोबर आहे, असे बेस्सोनोव यांच्या मनात आले.

सर्वप्रमुख लष्करी ठाण्याच्या प्रतिनिधींनी उत्तर दिले की, स्तालिनना ते ताबडतोब फोन करतील; तसेच स्तालिनग्रादच्या वाटेवर असणाऱ्या मानष्टेईनच्या फौजांना थोपवून त्यांचा धुव्वा उडविण्यासाठी बेस्सोनोव यांच्या सेनेला, दॉन आघाडीवरून बदली करून अत्यंत आणीबाणीची परिस्थिती निर्माण झालेल्या स्तालिनग्राद आघाडीवरील कोतेल्नीकोवो क्षेत्रात आणावी, या लष्करी मंडळाच्या सूचनेला स्तालिन यांची मान्यता लाभेल, अशी आशा त्यांनी व्यक्त केली.

"धुव्वा" हा घाईने वापरलेला शब्द बेस्सोनोव यांनी ऐकला तेव्हा त्यांच्या मनात विचार आला की, या पहिल्या टप्प्यात शत्रूला नुसते "थोपविता" आले तरी मोहिमेचे यश निश्चित होईल.

सर्वप्रमुख लष्करी ठाण्याने तात्काळ संमती दिली आणि बेस्सोनोव यांची सेना, क्षणाची उसंत न देता, उत्तरेकडून दक्षिणेकडे अक्षरशः दामटण्यात येऊ लागली. ती सेना शेवटचा नैसर्गिक अडथळा असलेल्या मीष्कोवा नदीच्या काठाकडे आणण्यात येत होती. या अडथळ्यापलिकडे जर्मन रणगाड्यांना थेट स्तालिनग्रादपर्यंत सपाट पसरलेले स्तेप मोकळे मिळाले असते.

## प्रकरण पाचवे

फौजांच्या रांगांनी गच्च भरलेल्या स्तेपभूमीतील बर्फाच्छादित रस्त्यांवरून बेस्सोनोव यांची मोटार हिसके खात, त्या खोल दरीत वसलेल्या, बत्ती नसलेल्या कोसॅक खेड्यात पहाटे दोन तीनच्या दरम्यान पोहोचली. सेनेचे नवे मुख्य ठाणे तेथे उभे केले होते.

खेड्याच्या वेशीवरील चौकात विजेरीचा लाल झोत चमकला आणि रस्त्याच्या मध्यभागी तीन काळया आकृती उभ्या राहिल्या. ते गस्त घालणारे सैनिक होते.

मेजर बोझिच्को मोटारीतून बाहेर पडले व गस्तीच्या वरिष्ठ सैनिकाबरोबर बातचित केल्यावर मोटारीजवळ परतून त्यांनी सांगितले.

"उजवीकडचे चौथे घर. जागा ठाकठीक केलेली आहे. सर्व व्यवस्था केलेल्या आहेत."

आपल्या मुख्य ठाण्याच्या व्हरांड्यात बेस्सोनोव काही वेळ येरझाऱ्या घालीत राहिले. आपले अवघडलेले पाय ते मोकळे करीत होते. चुरचुरीत, थंडगार हवेत वाळलेल्या शेणावर जळणाऱ्या स्टोव्हच्या धुराचा किंचित ऊबदार कडवट वास मिसळला होता. आकाशात ताऱ्यांनी गच्च गर्दी केली होती. डिसेंबरच्या त्या काळोख्या रात्रीमध्ये आकाशात तारे चमचम करीत होते. ओलसर पांढरी बर्फाळ धूळ छपरांवरून घरंगळत होती. परसातल्या वाफ्यामधल्या बर्फात उभ्या असलेल्या मक्याच्या उघड्या बोडक्या ताटांमधून वाऱ्याचा आर्त आवाज घुमत होता. आणि डाव्या बाजूला कुठेतरी, दक्षिणेला, घुसमटलेला गडगडाट ऐकू यायचा व पुन्हा विरून जायचा, हवेच्या लाटांबरोबर ते ध्वनी कमी अधिक प्रमाणात ऐकू यायचे.

"प्योत्र अलेक्सांद्रोविच, तुम्ही ऐकलंत ते?" घशातला खाकरा साफ करीत व खिशातल्या रुमालाने आपला चष्मा पुसत वेस्निन म्हणाले. "रात्रीसुद्धा त्यांची कूच चालू आहे! त्यांना घाई झाली असावी! त्या तिथं आकाश उजळलेलं दिसतंय—सारं पेटलेलं दिसतंय..."

"होय, ते घाईत दिसताहेत," बेस्सोनोव उत्तरले व पहारेकऱ्याला ओलांडून बर्फाच्छादित पोर्चमध्ये गेले.

चीफ ऑफ स्टाफनी ज्या घरात मुक्काम टाकला होता तेथे एव्हाना भरपूर उष्णता निर्माण करण्यात आली होती आणि मेंढकातडयांचा, लाकडाचा व जवसाच्या तेलाचा वास दरवळला होता. खिडक्यांवर काळजीपूर्वक आच्छादने टाकलेल्या एका मोठ्या खोलीत बॅटऱ्यांना जोडलेल्या नुसत्या दिव्यांचा भगभगीत प्रकाश पडला होता. नकाशाच्या आणि टेबलाच्या शेजारच्या लाकडी बाकांवर वेगवेगळ्या विभागांचे प्रमुख बसले होते. कदाचित यात्सेन्कोनी त्यांना पाचारण केले असावे. मेंढकातडी कोट पांघरून आणि टोप्या घालून त्यांना बसलेले पाहून बेस्सोनोवना कमालीचे आश्चर्य वाटले. आपल्या मुख्य ठाण्यावर असले घबराट निर्माण करणारे ताणाचे वातावरण कधीही असू नये असे त्यांचे मत होते. सारे फसाफसा सिगरेटी ओढत होते आणि टेबलावर धुराची निळी वलये तरंगत होती. बैठक संपत आल्याचे स्पष्ट होत होते. बेस्सोनोवना पाहताच, भक्कम बांध्याच्या आणि हिवाळा असूनही आपले भलेमोठे डोके तुळतुळीत घासलेल्या, मेजर-जनरल यात्सेन्कोने घनगंभीर आवाजात हुकूम ठोकला. सारेजण गडबडीने सिगरेटी लपवून हुश्शार पवित्र्यात उभे राहिले. नवे सेनाप्रमुख धूम्रपान करीत नाहीत आणि तंबाखूचा धूर त्यांना अजिबात आवडत नाही याची त्या सर्वांना माहिती झाली होती.

कुणाशीही हस्तांदोलन न करता बेस्सोनोव यांनी प्रति-अभिवादन केले व आपला कोट काढला.

"या खोलीत कुणीही धूम्रपान करू नये अशी माझी इच्छा आहे", नापसंतीच्या सुरात ते म्हणाले. "तुमच्या डोक्यांमध्ये नुसता धूर साठवून ठेवू नका. त्याचप्रमाणं कमांडरांनी मुख्य ठाण्यात प्रवेश करताना आपले पायघोळ कोट आणि मेंढकातडी कोट बाहेर काढून ठेवलेले मला आवडतील. तुम्हा सर्वांनाच त्यामुळं अधिक आरामशीर वाटेल अशी मला खात्री आहे. जर मी तुमच्या बैठकीत व्यत्यय आणला नसेल, तर प्रत्येकानं कृपया आपापल्या कामगिरीवर ताबडतोब जावं."

"नुसती धुरांडी!" आपले हात चोळीत व लांब पायांवर मागेपुढे डोलत वेस्निन म्हणाले. "केवढा हा धूर!"

"मला काही करता येत नाही त्यांना याबद्दल, सैतान लेकाचे! सारखे भसाभसा धूर काढत राहतील! प्योत्र अलेक्सांद्रोविच, मी

खोलीत पुन्हा ताजी हवा खेळवून घेऊ का?" काही कमांडर खोलीतून निघून गेल्यानंतर यात्सेन्को आपल्या घनगंभीर आवाजात म्हणाले व पडदे लावलेल्या खिडक्यांच्या दिशेने आपले तासलेले भलेमोठे डोके वळवले.

"आत्ता नको," बेस्सोनोवनी आपले पांढरे होत चाललेले, बाजूचे विंचरलेले पातळ केस नीट केले व मान हलवली. "जरा नकाशाजवळ या. आणि तुम्ही सारे बसलात तर फार बरं होईल."

खोलीत जेवढे लोक राहिले होते ते सारे नकाशाभोवती बसले. बेस्सोनोवनी आपली काठी टेबलाच्या काठाला टेकून ठेवली. रुबाबदार-पणे उभे राहून अहवाल द्यायला जय्यत तयार असलेल्या यात्सेन्को यांच्या-कडे किंवा अगदी ताज्या खुणा केलेल्या नकाशाकडे कुणाचेच लक्ष नव्हते. सर्वांचे डोळे बेस्सोनोव यांच्या रोड आणि ओढलेल्या, गारठ्याने पांढऱ्याफटक पडलेल्या चेहऱ्यावर रोखले होते व वेस्निन यांच्या तांबड्याबुंद झालेल्या, यौवनाने फुललेल्या चेहऱ्याशी नकळत तुलना करत होते. सेनाप्रमुख आणि लष्करी मंडळाचे सदस्य यांच्यामधील फरक जाणवण्याइतपत मोठा होता.

"बोला," बेस्सोनोव म्हणाले.

"रेडिओचं दळणवळण तुटल्यामुळं पलटणींशी संपर्क राखणं अवघड झालंय. आम्हाला केवळ संपर्क अधिकाऱ्यांकडून माहिती मिळते आहे कॉम्रेड कमांडर," यात्सेन्को यांनी बोलायला आरंभ केला. आघाडीच्या लष्करी मंडळाच्या बैठकीच्या वेळी बेस्सोनोव यांनी टिपलेले त्यांच्या बारीक, चतुर नजरेतील प्रश्नार्थक आणि आश्चर्यदर्शक भाव आता दिसत नव्हते. आता या क्षणाला चार संपूर्ण दले उत्तरेपासून दक्षिणेला २०० किलोमीटरचे अंतर कापून आणण्यात यात्सेन्को पूर्णपणे गुरफटले होते. "दोन तासांपूर्वी सैन्य या जागेवर होते..."

आपला भलामोठा, मऊ, पांढरा हात जनरल यात्सेन्कोनी नकाशावर ठेवला. त्यांचा अहवाल अगदी शास्त्रशुद्ध स्पष्ट होता आणि त्यांच्या आवाजात एक गहिरी धार होती. जणू काही कोअरांची व डिव्हिजनांची संख्या भराभर सांगण्यात त्यांना गंमत वाटत होती.

"तिसरी पायदळ रक्षक कोअर मीष्कोवा नदीच्या तीराजवळ ठाण मांडून उभी राहिली आहे. ७वी कोअर कूच करते आहे आणि रात्री-

पर्यंत केंद्रित भागात विना आपत्ती पोहोचावी अशी आशा आहे. यंत्रसज्ज कोअरांमध्ये मात्र गंभीर परिस्थिती निर्माण झाली आहे कॉम्रेड कमांडर." आणि यात्सेन्को यांचा चेहरा हळूहळू जांभळा पडत गेला. जणू यंत्रसज्ज कोअरांकडून तो धक्कादायी निरोप मिळाल्यानंतर त्यांना काय वाटले होते याचे ते आता आपल्या कार्यक्षमप्रिय स्वभावानुसार प्रत्यंतर घडवीत होते. "वाटचाल करताना त्यांच्याजवळचं इंधन संपलंय. चाळीसाव्या किलोमीटरवर दारूगोळ्याच्या लॉऱ्या आणि ट्रॅक्टर अडकले आहेत. आघाडीच्या कमांडरला मी दोन तारा पाठवल्या आहेत."

अजिबात न अडखळता आणि अधिक स्पष्टपणे या दोन तारांमधील मजकूर यात्सेन्को यांनी म्हणून दाखवला आणि मग बेस्सोनोव यांच्याकडे एक तिरपा अपेक्षित कटाक्ष टाकला.

"अस्सं," बेस्सोनोव म्हणाले.

सकाळी आणि दुपारी, ज्या रस्त्यांवरून सैन्य येत होते त्या रस्त्यांवरून येताना त्यांनी स्वतःशी जे काही आडाखे बांधले होते, त्या सर्वांशी चीफ ऑफ स्टाफचा अहवाल पूर्णपणे मिळताजुळता होता. पण या क्षणाला या अडचणींची बेस्सोनोवना चिंता वाटत नव्हती; गेले अनेक दिवस कडव्या प्रतिकाराने लढणाऱ्या आणि जर्मन रणगाड्यांच्या हल्ल्यांनी बेजार झालेल्या शेजारच्या सेनेमधील एका डिव्हिजनला निर्माण झालेल्या धोक्याबद्दल त्यांना काळजी वाटत होती. त्या घाबरलेल्या रणगाडा चालकाच्या तुटक उत्तरांमधून केवळ त्यांना परिस्थिती समजली होती असे नाही. शत्रूच्या जबरदस्त धडाक्यापुढे ही डिव्हिजन किती वेळ तग धरते किंवा त्या प्रयत्नात खलास होते त्यावर मीष्कोवा नदीच्या काठी आपले मोर्चे बांधण्यास बेस्सोनोवना किती वेळ सापडतो हे अवलंबून होते. स्तालिनग्राद येथे वेढलेल्या जर्मन सेनांपर्यंत पोहोचण्यास जर्मनांना अटकाव करणारा हा शेवटचा अडथळा होता.

"अस्सं" एवढेच उद्गार काढून बेस्सोनोवनी यात्सेन्को यांच्या अहवालात खंड पाडला आणि टेहळणी पथकाचे प्रमुख कर्नल देर्गाचोव यांच्याकडे पाहिले. ते तसे खूप तरुण होते, पण त्यांच्या सुरेख एकत्र जुळलेल्या भुवयांमुळे त्यांच्या चेहऱ्यावर एक गंभीर, वयस्क भाव उमटलेला दिसायचा. काहीतरी असमाधानकारक बातमी मिळणार अशा अपेक्षेने बेस्सोनोव यांनी विचारले, "टेहळणी पथकाचा काय अहवाल?"

"कॉम्रेड कमांडर, परिस्थिती आज संध्याकाळप्रमाणेच आहे," कोणतीही आशादायक परिस्थिती न दर्शविणाऱ्या सुरात कर्नल देर्गाचोव उत्तरले. "आपल्या शेजाऱ्याच्या उजव्या फळीवर जर्मनांनी ताज्या दमाची रणगाडा डिव्हिजन आणली आहे आणि त्यात नव्या अवजड टायगर रणगाड्यांची एक अख्खी बटालियन आहे. काल पकडलेल्या जर्मन अधिकाऱ्याकडून काढलेली माहिती आणि इतर तपशील पाहता, वेढा मोडून काढण्याच्या कामगिरीत दहा डिव्हिजनपेक्षा अधिक सेना भाग घेत आहे व त्यात दोन रणगाडा डिव्हिजन्सचा समावेश आहे. एवढ्या प्रचंड हल्ल्याला शेजारची सेना तोंड देऊ शकणार नाही."

"अस्सं," बेस्सोनोव पुन्हा म्हणाले.

"आपला उजवीकडचा शेजारी अत्यंत वाईट नसला, तरी एकूण वाईट परिस्थितीतच आहे," कर्नलच्या बोलण्यानंतर निर्माण झालेल्या शांततेत जोरजोराने श्वासोच्छ्वास करीत यात्सेन्को पुढे म्हणाले. "घोडदळ कोअरांची प्रचंड हानी झाली आणि त्या परतल्या. आपल्या सेनेच्या उजव्या फळीवर जर्मन मुख्य घाला घालतील असे दिसते. तिथून स्तालिन-ग्रादला सर्वांत जवळचा रस्ता जातो."

बेस्सोनोव यात्सेन्कोना त्यांच्या नकळत न्याहाळू लागले. ओबडधोबड बाह्य रूपामुळे आणि सार्जंट-मेजर छापाच्या गडगडाटी आवाजामुळे ह्या धिप्पाड, तुळतुळीत डोके तासलेल्या जनरलची कार्यक्षम चीफ ऑफ स्टाफ म्हणून छाप पडली नव्हती. यात्सेन्को वापरीत असलेल्या हलक्या दर्जाच्या यू दी कोलनच्या वासानेही बेस्सोनोव काहीसे त्रस्त झाले होते.

"होय, इथून वेढलेल्या जर्मन सैन्यापर्यंत पोचायला मानष्टेईनला चाळीस किलोमीटर अंतर कापले पाहिजे," ते मोठ्याने म्हणाले. जर जर्मनांनी त्यांच्या उजव्या बाजूची फळी फोडली तर आणखी दोन तीन दिवसात ते वेढलेल्या सेनेपर्यंतचे अंतर लढत देऊन सरळ कापतील व स्तालिनग्रादमधील परिस्थिती पूर्णपणे त्यांना अनुकूल अशी पालटून जाईल. आणि मग काय?

पण हा विचार त्यांनी मोठ्याने बोलून दाखवला नाही. वस्तुत: हा प्रश्न प्रथमच त्यांनी स्वत:ला विचारला होता.

पूर्ण सत्ता असलेला आणि कोणतेही पूर्वग्रह नसलेला नवा सेनापती जेव्हा वरिष्ठ दर्जाच्या प्रमुख लष्करी ठाण्यामध्ये येतो तेव्हा त्याच्याकडे

ज्या प्रचंड औत्सुक्याने पाहिले जाते, त्याच भावनेने टेबलाभोवतालचे सारेजण बेस्सोनोव यांच्याकडे पहात होते. पण बॅटरीवर पेटणाऱ्या बल्बनी प्रकाशित केलेला, सैन्याच्या हालचालींच्या खुणा दिग्दर्शित करणारा नकाशा पहात असताना बेस्सोनोव यांच्या चेहऱ्यावर केवळ प्रचंड थकला भाव उमटला होता. चीफ ऑफ स्टाफच्या अहवालानंतर ते गप्प राहिले व ज्या ठिकाणी मुख्य हल्ल्याची अपेक्षा होती त्या क्षेत्रात फौजांचा समतोल कसा साधता येईल याचा विचार करीत होते. मीष्कोवा नदीच्या उजव्या तीरावर त्यांच्या सैन्याने मोर्चे उभारण्यापूर्वीच जर जर्मन रणगाड्यांच्या तीन-चार डिव्हिजनांनी धडक मारली, तर त्यांच्याही सेनेचा चुराडा होणार होता. हे सुद्धा अगदी स्पष्ट होते.

पण ही गोष्टसुद्धा ते मोठ्याने बोलले नाहीत, कारण त्या टेबलाशी हजर असलेल्या प्रत्येकाला जे माहीत होते तेच बोलून दाखवण्यात काही अर्थ नव्हता.

बेस्सोनोव उठून उभे राहिले. आपल्या काठीवर रेलून त्यांनी त्या खोलीत चार पावले येरझाऱ्या घातल्या आणि एकाएकी त्यांना त्या प्रचंड अभ्यासिकेतील, लांबलचक टेबलाशेजारच्या गालिचावरची स्तालिन यांची डौलदार चाल आठवली, त्यांचे अस्पष्ट ऐकू येणारे खोकणे व घसा खाकरणे आठवले, सर्वप्रमुख लष्करी ठाण्यामधील ते चाळीस मिनिटांचे संपूर्ण संभाषण आठवले. बेस्सोनोव खोलीच्या मध्यभागी थांबले तेव्हा त्यांच्या कपाळावर घर्मबिंदू चमकत होते. "काय झाले मला? काहीतरी भारल्यागत वाटतेय. ते डोक्यातून काढून टाकता येत नाहीय् मला!" स्वतःवरच चिडलेल्या अवस्थेत सर्वांकडे पाठ फिरवून काही वेळ ते तसेच उभे राहिले, पुतळीखाली घातलेल्या विणलेल्या रुमालांचे निरीक्षण करीत राहिले.

"आता ऐका," कोपऱ्यातून ते म्हणाले आणि मागे वळून यात्सेन्को यांच्या नजरेला नजर भिडवीत अत्यंत शांतपणे बोलण्याचा त्यांनी प्रयत्न केला. "यंत्रसज्ज कोअरांच्या कमांडरला ताबडतोब सांगा की, इंधनाची वाट पहात त्यानं एक मिनिटही थांबायचं नाही. ज्या लॉऱ्या व रणगाडे अद्याप चालू अवस्थेत आहेत त्यांच्यामध्ये ताबडतोब त्यानं दारूगोळा भरायचा. मुख्य ठाण्याकडून आणि पिछाडीकडून उपलब्ध असलेली सर्व वाहने कोअरांकडे ताबडतोब पाठवा. तोफखाना प्रमुखाला आणि

कोअरांच्या कमांडरला सांगा की, आत्तापासून दोन तासांच्या आत त्यांच्या ब्रिगेड आपल्या उद्दिष्टाच्या ठिकाणी लढाईला पूर्ण सज्ज अशा अवस्थेत पोचल्या नाहीत, तर त्यांनी कर्तव्यात कसूर केली असं मी मानीन!"

"अच्छा, हीच माझी अपेक्षा होती. सैन्यावर पहिल्या सलामीत त्यांनी पकड बसवली," असा विचार वेस्निन यांच्या मनात बेस्सोनोव यांचा तो कर्कश्य आवाज ऐकताना आला. "त्यांची वागण्याची ढब विलक्षण आहे..."

"दुसरी गोष्ट," तोफखान्याचे कमांडर जनरल लोमिद्झे यांच्यावर डोळे रोखीत टेबलाजवळ येत बेस्सोनोव पुढे बोलू लागले. "मला वाटतं, तोफखान्यांच्या मोर्चांची मूळ योजना आपण बदलावी. यंत्रसज्ज कोअरां-बरोबरचा तोफखाना सोडून सर्व तोफखान्याच्या तोफा पायदळाच्या मोर्चांपासून सरळ डागाव्यात. त्यांनी रणगाडे जमीनदोस्त केले पाहिजेत. ही मुख्य बाब आहे—त्यांचे रणगाडे खतम केले पाहिजेत. अगदी आणीबाणीच्या वेळी आम्ही आमचे रणगाडे लढाईत घालू. तोपर्यंत त्यांची जिवापाड जपणूक करू."

"मी समजलो कॉम्रेड कमांडर," यात्सेन्को म्हणाले.

"जनरल, तुम्ही?"

देखण्या व्यक्तिमत्वाच्या, काळ्या केसाच्या, चाळीशीच्या घरातील जॉर्जियन मेजर-जनरल लोमिद्झे यांनी, तोफखान्याच्या कमांडरांनी, बेस्सोनोव यांच्याकडे एक जळजळीत नजर चटकन फेकली.

"कॉम्रेड कमांडर, याचा अर्थ आम्ही जवळजवळ तोफखान्याविना राहणार असा होत नाही काय? पहिल्या लढाईनंतर? हॉविट्झर तोफा रणगाड्यांविरोधी फारशा प्रभावी ठरत नाहीत याची मी आपल्याला आठवण करून देतो. अर्थात, रणगाडाविरोधी तोफांपेक्षा त्यांचा पल्ला कमी आहे. थेट भडिमार करण्याचा आम्ही ७६ मिलीमीटर रणगाडा-विरोधी तोफखान्याला आधीच हुकूम केला आहे."

लोमिद्झे यांच्या आक्षेपाचे काहीसे आश्चर्य वाटले अशा नजरेने बेस्सोनोव यांनी त्यांच्याकडे पाहिले.

"आपण घेत असलेल्या धोक्याची मला कल्पना आहे. पण मागे पाय लावून पळ काढण्यापेक्षा एकही तोफ शिल्लक न राहिलेली अधिक

चांगली!" जोर देण्यासाठी त्यांनी मुद्दामच ग्राम्य शब्दाचा वापर केला. "स्तालिनग्रादपर्यंत आपल्या तोफखान्याला घेऊन पळ काढण्यापेक्षा ते बरे! म्हणून मी पुन्हा सांगतो, तुम्ही रणगाडे खतम केले पाहिजेत, जर्मनांच्या आघाताची सारी मदार रणगाडयांवर आहे! शक्य त्या सर्व साधनांनी त्यांचा नाश करा. स्तालिनग्रादपर्यंत एकही रणगाडा जाऊ देता कामा नये. सारा वेळ त्यांना डोकं खाली धरून बसावं लागेल असा भडिमार करा. एक इंचभरही त्यांना पुढे सरकू देऊ नका! 'साखळीत' अडकलेल्या जर्मनांना मानष्टेईनने चढाई सुरू केल्यावर केवढा आनंद झालाय याची तुम्हाला कल्पना आहे? साखळी तोडल्याच्या बातमीची दर मिनिटाला, दर तासाला ते वाट पाहताहेत. आपल्या समोरचा सेनापती नवखा नाही, तर चांगला अनुभवी, कसलेला आहे याचा आपण कधीही विसर पाडून चालणार नाही! लढाईच्या पहिल्या टप्प्यात रणगाडयांचा संहार हे सैन्याचे मुख्य उद्दिष्ट आहे या वस्तुस्थितीची तुम्ही सर्वांनी जाणीव करून घ्यावी अशी माझी इच्छा आहे. आणखी काही प्रश्न?"

आणखी प्रश्न राहिले नव्हते.

"मेजर बोझिच्को!" त्यांनी हाक मारली.

"त्या घराच्या दुसऱ्या अर्ध्या भागात जिथे टेलिफोन सतत खण-खणत होते, तिथले दार उघडले गेले आणि बोझिच्को वेगाने आत आले. त्यांनी नुकत्याच सांगितलेल्या विनोदाचे हसू अद्याप त्यांच्या डोळ्यात तरळत होते. त्यांनी उंबऱ्याशी आपल्या नमदी बुटांच्या टाचा खाडकन जुळवल्या.

"सेवेला हजर आहे, कॉम्रेड कमांडर!"

"मोटार."

सर्वांनी आपल्या सेनापतीला दारापर्यंत निरोप दिला, पण फक्त जनरल यात्सेन्को त्यांच्याबरोबर थंडगार अंधाऱ्या आतल्या पोर्चपर्यंत गेले. त्यांचा चेहरा दिसत नव्हता, पण यू दी कोलनचा गंध थंड हवेत रेंगाळला होता. आपला पाठिंबा दर्शवायला चीफ ऑफ स्टाफ हस्तांदोलन करू इच्छिताहेत, पण केवळ शरमेने तसे करायला धजत नाहीत, असे बेस्सोनोवना जाणवले.

“आपण उत्तमाची आशा करू या,” बेस्सोनोव म्हणाले व ओझरते हस्तांदोलन करून रस्त्यापर्यंत चालत गेले.

आकाश गच्च ताऱ्यांनी भरले होते, वारा घोंघावत होता, डिसेंबरातल्या त्या रात्रीचा काळोख खेड्यावर आणि बर्फाच्छादित स्तेपवर पसरला होता. रस्त्याच्या कडेला अंधुक दिसणाऱ्या मोटारीकडे बेस्सोनोव चालले होते, तोच पाठीमागे दार खाडकन वाजल्याचा व बर्फ तुडवीत येणाऱ्या पावलांचा आवाज त्यांनी ऐकला. आधीच जे काही सांगितले आहे त्यात आणखी काही सांगायला चीफ ऑफ स्टाफ परत येत आहेत अशा अपेक्षेने त्यांनी मागे वळून पाहिले. पण मागून वेस्निन येत होते. आपल्या बगळ्यासारख्या लांब पायांनी ढांगा टाकीत ते बेस्सोनोव यांच्या जवळ आले व काहीसे शरमून म्हणाले,

“मी आपल्याबरोबर येऊ का प्योत्र अलेक्सांद्रोविच? तुम्हाला चालेल?”

“माझी काहीच हरकत नाही, पण मला एक गोष्ट समजत नाही. लष्करी मंडळाच्या सदस्यानं आपण कुठं असावं हे सेना-प्रमुखाला विचारण्याचं काहीच कारण नाही. तो काहीही ठरवायला स्वतंत्र आहे.”

या बोलण्याचा अपमान वाटून न घेता वेस्निन मोकळेपणाने हसले.

“माफ करा, पण तुमच्या थेट वागण्यानं काही वेळा तुम्ही माझी अगदी दांडी उडवता. याबद्दल मी काय बोलायचं?”

“ठीक आहे, मी तुम्हाला सांगीन....” बेस्सोनोवनी वेस्निनना मोटारीपासून दूर खेचले. “मला तुम्हाला एक प्रश्न विचारायचा आहे. एक कम्युनिस्ट दुसऱ्याला विचारतो तसा... तुम्हाला जर कुणी सल्ला दिला असेल की, सेनेची सूत्रे हातात घेताना नव्या कमांडरवर लहान मुलावर ठेवतात तसे लक्ष ठेवा, तर मात्र विताली इसायेविच, आपले संबंध सुरळित राहणं कठीण जाईल. आपल्या दोघांना एकमेकांशी वागणं फार जड जाईल.” ते थांबले, पण वेस्निन यांनी मध्ये बोलण्याचा मुळीच प्रयत्न केला नाही. “जर असं नसेल, तर माझ्या शेऱ्याबद्दल मी ताबडतोब माफी मागायला तयार आहे.”

“प्योत्र अलेक्सांद्रोविच,” वेस्निन यांनी आपल्या डोळ्यांवरचा चष्मा उतरवीत म्हटले. त्यांच्या ऱ्हस्वदृष्टीदोष असलेल्या डोळ्यात उदास भाव होता. “बोलून टाकलंत त्याबद्दल आभारी आहे. पण मी

प्रामाणिकपणं आपल्याला एवढीच खात्री देऊ शकतो की, तुमच्याविरुद्ध कुणी मला सावध करायचा प्रयत्न केला, तर त्या मूर्खाला मी उभा भाजून काढीन! मला या बाबतीत एवढंच सांगायचं आहे."

"थँक्यू." बेस्सोनोव शुष्क हसले. "हा विषय उकरून काढल्याबद्दल मी माफी मागतो."

"उलट या बाबतीत अधिक तपशीलवार चर्चा करायला आपल्याला कधीतरी वेळ सापडावा अशी माझी इच्छा आहे. मात्र अर्थातच मोटारीत नाही," वेस्निन म्हणाले.

"आपण डिव्हिजनला पोचल्यानंतर बोलू," बेस्सोनोवनी आश्वासन दिले. "जर जर्मनांनी तेवढी सवड दिली तर!"

मेजर बोझिच्को यांनी त्यांच्यासाठी मोटारीचा दरवाजा उघडला.

## प्रकरण सहावे

दीर्घ काळ वाटचाल केल्यानंतर अखेरीस पहाटे दोननंतर कर्नल देयेव यांची डिव्हिजन आपल्या उद्दिष्ट स्थळी – मीष्कोवा नदीच्या उत्तर किनाऱ्यावर – पोहोचली आणि क्षणाची उसंत न घेता ताबडतोब खंदक खणायला सुरुवात करून तिने मोर्चे बांधायला घेतले. गोठून लोखंडा-सारख्या घट्ट बनलेल्या त्या जमिनीत लोक सतत खणत होते. या ठिकाणाचा कबजा ते कशाला घेत होते याची एव्हाना प्रत्येकाला माहिती झाली होती व स्तालिनग्रादपर्यंत शत्रूला पोचायचा हा शेवटचाच अडथळा आहे याचे दृश्य प्रत्येकाच्या नजरेसमोर स्पष्ट होते.

तीन वाजल्यानंतर, दूर चाललेल्या लढाईच्या सतत ऐकू येणाऱ्या अभद्र गडगडाटाचे प्रचंड धडधडाटात रूपांतर झाले व दक्षिणेकडील आकाशात क्षितिजावर एक गुलाबी पट्टा काळोखात उठून दिसू लागला. ज्या क्षेत्रापासून हा अदृश्य व अज्ञात धोका जवळजवळ येत चालला होता, तेथील क्षणिक शांततेच्या काळात सबंध नदी तीरावर चाललेली हुकूमांची आरडाओरड, फावड्यांचा आणि कुदळींचा आवाज व घोड्यांचे फुरफुरणे ऐकू येत होते. ग्रिगोऱ्येवस्काया खेड्यातल्या एकमेव पुलावरून दोन पायदळ बटालियन, डिव्हिजनच्या तोफखाना रेजिमेंटच्या तीन

पलटणी आणि एक स्वतंत्र रणगाडाविरोधी बटालियन एवढ्या नदीच्या दक्षिण किनाऱ्याला उतरल्या होत्या व डिव्हिजनच्या मुख्य सेनेच्या पुढे त्यांनी आपापले मोर्चे धरून खंदक खणायला आरंभ केला होता.

मोर्च्याच्या ठाण्यांपासून किंचित मागे, थेट भडिमारासाठी, लेफ्टनंट द्रोझ्दोवस्कीच्या तोफखान्याला जागा दिली होती. नदीच्या ऐन तीरावरच ते खणत होते व तीन तास पाठीचा कणा तुटेपर्यंत कष्ट केल्यानंतर फावड्याच्या दीड पाते खोलीपर्यंत जमिनीत ते तोफा चढवू शकले.

प्रत्येकाप्रमाणे, आरंभाला लेफ्टनंट कुझ्नेत्सोवही घाईगर्दी करीत होता. आकाशाच्या उजळलेल्या पट्ट्याच्या दिशेने तोफांच्या फुटणाऱ्या गोळ्यांचे घुसमटते आवाज जसजसे त्यांना ऐकू येत, तसतशी लढाई अगदी नजीक येत चालली आहे याची प्रत्येकाला जाणीव होऊ लागली व धरतीच्या आडोशाशिवाय राहणे म्हणजे बर्फाने झाकलेल्या नदीवर नागडे उभे राहण्यासारखे आहे याचीही जाणीव झाली होती. पण गोठलेल्या जमिनीवर फावड्यांचा फारसा घावच बसत नव्हता आणि फक्त छोट्या कुदळींच्या प्रभावी घावांनी बर्फाळ पृष्ठभागाच्या कपच्या उडत होत्या.

किनाऱ्यावरचा पृष्ठभागावरचा बर्फ वारा उधळीत होता आणि सर्व बाजूंना अंधुक दिसणाऱ्या तोफांच्या झाकणांच्या दाट काळ्या छायांभोवती गोलंदाजांच्या व शेजारच्या पायदळाच्या सैनिकांच्या आकृती पांढुरक्या काळोखात लगबगीने हालचाल करताना दिसत होत्या.

रात्रीबरोबर वाढत गेलेल्या चावऱ्या थंडीमुळे श्वास घेणे अवघड होत होते. बोलणे अशक्य झाले होते व लोक धापा टाकीत होते. कुणी एखादा काम करायचा मिनिटभर थांबला, तर लगेच त्याच्या घामेजल्या चेहऱ्यावर हिमाचा थर चढत होता आणि पापण्यांवर बर्फाचा पातळ पापुद्रा बसत होता. प्रत्येकाला विलक्षण तहान लागली होती. खंदकासमोरच्या बांधावरचा मातीमिश्रीत व बर्फाचे खडेमिश्रित घाणेरडा बर्फ मूठमूठ खरवडून ते घेत होते आणि चघळत होते. पण त्या बेचव ओलाव्याने त्यांचे घसे अधिक गारठत होते व दात कडकडा वाजत होते. कुझ्नेत्सोवच्या अंगातून घामाच्या धारा वहात होत्या, तो सतत कुदळ मारीत होता. थांबून विश्रांती घेणे त्याला शक्य होत नव्हते. त्याच्या पाठीला घट्ट चिपकून बसलेल्या आखूड लष्करी कोटाच्या आत त्याला

हुडहुडी भरत होती. इतरांप्रमाणे तोही सतत बर्फ चघळत राहिला, पण त्यांचे तोंड कोरडेच राहिले. धातूच्या बादलीतून विहीरीचे ताजे, शुद्ध, गंधित पाणी पिण्याची व त्या गारव्यात हनुवटी लपेटून घेण्याची इच्छा त्याच्या मनात सतत निर्माण होत होती आणि या विचाराने त्याला छळले होते.

"कॉम्रेड लेफ्टनंट, तुम्ही जरा जास्तीच बर्फ खाताय नाही का?" कुझ्नेत्सोवच्या कुदळी पाठोपाठ फावड्याचा घाव गबाळेपणे घालणाऱ्या चिबिसोवने बिचकत म्हटले. "बघा, तुम्हाला गारठा बाधेल. तहानेला बर्फ चांगला नाही. उगीच तहान भागेल असं आपल्याला वाटत राहतं."

"इथं कुणा लेकाला पर्वा आहे!" धाप टाकीत कुझ्नेत्सोव म्हणाला आणि त्याने उखानोवला बोलावले.

वरिष्ठ सार्जंट उखानोवने आपला पायघोळ कोट अंगातून काढून बाजूला टाकला होता व नुसते दुलईदार जाकीट घालून, तोफ लावणाऱ्या नेचायेवच्या साह्याने उथळ खंदक खणीत होता. आपल्या कुदळीच्या प्रत्येक घावाबरोबर तो हुंकार टाकीत होता. आता त्याने कुदळ बाजूला फेकली व अद्याप उथळ असलेल्या तोफेच्या खड्ड्याभोवतालच्या बांधावर चटकन उडी मारली.

"काय कॉम्रेड लेफ्टनंट, कसं काय चाललंय? सोप्या टप्प्यांनी पृथ्वीच्या पोटात गाडून घेताय?"

त्यांचा श्वास जलद चालला होता, त्यांच्या शरीराला निरोगी घामाचा उग्र दर्प येत होता व त्याचा ओला चेहरा चकाकत होता.

"आपण जर कुणाला खाली नदीवर पाठवलं आणि बर्फातलं एखादं भोक शोधून दोन डबे पाणी वर आणायला सांगितलं... तर काही बिघडायचं नाही," कुझ्नेत्सोव कष्टाने म्हणाला.

"मस्त कल्पना आहे," गालावरचा घाम बाहीने पुशीत उखानोवने पसंती व्यक्त केली. "नाहीतर हे सैतान समोरचा सारा बर्फ फस्त करून टाकतील आणि आपल्याला आडोशाला लपायला बर्फच राहणार नाही. अच्छा, बर्फात भोक पाडण्यात पूर्वी कोण तरबेज होता? चिबिसोव, तू? चल, ताबडतोब पहार घेऊन खाली जा!"

"मी करतो हे काम. आणि नदी एवढी जवळ असताना पाण्या-शिवाय तडफडत बसण्यात काय अर्थ आहे. कॉम्रेड लेफ्टनंट, मी हा

आत्ता परत येतो आणि आपणा सर्वांना प्यायला पाणी मिळेल," चिबिसोव आपल्या घाईगडबडीच्या सुरात म्हणाला. त्याची तत्परता तोफेवरच्या प्रत्येकाच्या लक्षात आली.

"चिबिसोवला कशाला पाठवता? तो दुसऱ्या बाजूनं पसार होईल!" कुणीतरी संशयाने हसून म्हटले. "त्याला परतीचा रस्ता नक्की सापडेल का?"

"पुन्हा एकदा तोच विषय! जरा काय बोलतो याचा विचार करीत जा गृहस्था!"

"मी असं म्हणतो की, आपल्याला पिछाडीला पाठवावं म्हणून तो नेहमी धडपडत असतो."

पण चिबिसोवने पहार घेतली, खंदकाच्या पुढच्या बांधावर तो धडपडत चढला आणि पाण्याच्या डब्यांसाठी शांतपणे तोफांकडे उड्या मारीत गेला.

"महाबिलंदर आहे लेकाचा," तो संशयात्मा पुन्हा म्हणाला. "कामाच्या वेळी टिवल्याबावल्या करतो, पण गिळायच्या वेळी मात्र स्वारी विजेच्या चपळाईने सुसाट धावते."

"कशाला त्याला टोचतोस? तुला स्वतःला पण प्यायला पाणी पाहिजे की नाही? चिबिसोव तुझ्या बायकोला घेऊन पळाला होता की आणखी काही? तो आपल्या परीनं शर्थ करतो आणि कुणाला किंचितही दुखवीत नाही! कशाला एवढा गोंधळ माजवतोस?"

"मंडळी, पुरे!" उखानोव ओरडला. "माझ्या चिबिसोवचा पिच्छा करू नका! आणि ए रूबिन, आपल्या घोड्यांची जरा नीट काळजी घे. तुझं तेच काम आहे ना? आँ? आणि कुणीही तुला विश्रांती घ्यायला सांगितलेली नाही. खणत रहा, नाहीतर ते इथं आपल्याला अंथरुणातल्या ढेकणांसारखं चिरडतील! समजलं तुला का पुन्हा सांगू सगळं?"

मनाला शिणवटा आणणारी एकसुरी खटखट करीत फावडी जमिनीवर खरवडत राहिली व कुदळी आदळत राहिल्या. कुझ्नेत्सोवने वर उचललेली कुदळ परत खाली टाकली आणि खंदकापुढच्या बांधावर चढून तो उभा राहिला. डाव्या बाजूच्या ओसाड खेड्यातील विस्कळित उभ्या असलेल्या घरांच्या काळ्या छायांपलिकडच्या उजळणाऱ्या आकाशाकडे तो टक

लावून पहात राहिला. त्या रात्रीच्या समयाला ते खेडे जणू गोठून निळे पडल्यासारखे दिसत होते.

"उखानोव, इकडं ये," त्याने हाक मारली. "तुला काही ऐकू येतं?"

"काय लेफ्टनंट?"

"ऐक."

त्या उजळत्या प्रकाशामधून अगदी विलक्षण, निर्जिव अशा शांततेच्या लाटा जणू पसरत चालल्या होत्या. तोफांच्या गर्जना आणि स्फोट थांबले होते. त्या गूढ स्तब्धतेमुळे फावडयांचा व कुदळींचा आवाज एकदम मोठा ऐकू येऊ लागला होता; पुढच्या भागातील पायदळाचे दुरून येणारे आवाज व डिव्हिजन मुख्य मोर्चे बांधीत होती त्या दूरच्या किनाऱ्यावरील उंचवटयावरच्या तोफखान्याच्या ट्रॅक्टरांची घरघर एकदम मोठयांदा ऐकू येऊ लागली होती.

"शांत आहे नाही?" कुझ्नेत्सोव म्हणाला. "एक तर त्यांनी त्यांना थोपवलं किंवा जर्मनांनी त्यांच्यामधून मुसंडी मारली."

"तिथं उजवीकडं काय?" उखानोवने विचारले. "तिथंही काहीतरी चाललंय."

अतिदूर क्षितिजकडेवर, त्या पुढील प्रकाशाच्या उजव्या बाजूस, खेडयाच्या अर्ध्या दक्षिण भागाच्या छपरांवर आणखी एक प्रकाशपट्टा उजळला. त्याचा लाल प्रकाश वर उंच उसळत होता आणि कडकडाट न करता विजांचा केवळ चकचकाट व्हावा त्याप्रमाणे खालच्या ढगांवर त्या प्रकाशाचे परावर्तन होत होते. आकाशाचा हा भागही त्या दबत्या शांततेत लपेटला गेला.

"आगीच्या ज्वाला उसळल्यासारख्या दिसताहेत," कुझ्नेत्सोव म्हणाला.

"होय," उखानोवने मान्यता दिली. "त्यांनी पुढं मुसंडी मारली असं वाटतंय. उजव्या बाजूला. अगदी आपल्या पुढयात. स्तालिनग्रादपर्यंत माळेसारखी रांग लावलीय त्यांनी, होय की नाही लेफ्टनंट? हे अगदी स्पष्ट आहे. त्यांना आपल्या लोकांना साखळीतून बाहेर काढायचं आहे आणि जुना खेळ परत सुरू करायचाय."

"असं दिसतं खरं."

कुणीतरी त्यांच्या मागे आनंदमिश्रित आश्चर्याने उद्गारले, "मंडळी, एकदम एवढी शांतता का पसरली? जर्मनांनी माघार घेतली असावी काय? आकाश अजून उजळतंय, पण शांतता आहे. साखळी तोडण्याची कल्पना त्यांनी सोडून दिली असावी? होय की नाही?"

"माघारी गेले? विसरा मिस्टर!"

"का नाही? कदाचित हिटलरच्या सेनापतींनी एकत्र येऊन विचार केला असावा आणि काही काळ थांबणं बरं असं ठरवलं असावं."

"त्यांनी 'एकत्र येऊन काय ठरवलं' ते आत्ता एका मिनिटात समजेल तुला!" एक कडवट, तीक्ष्ण आवाज उत्तरला. "आणि तुकडे गोळा करायलाही कुणी शिल्लक राहणार नाही!"

"मंडळी, काम चालू ठेवा! माती उकरा! खणत रहा!"

कुझ्नेत्सोव आणि उखानोव क्षणभर हे मागील आवाज व श्रमांनी होणारा श्वासोच्छ्‌वास ऐकत राहिले. दक्षिणेकडून धडकी भरविणारी शांतता पसरलेल्या त्या लोखंडासारख्या कठीण जमिनीवर, ऐरणीवर घणाचे घाव बसावे तसे कुदळींचे घाव बसत होते. उखानोवने सहजपणे विचारले :

"किती लांब आहेत ते? तुम्हाला काय वाटतं लेफ्टनंट? एक तास? दोन?"

"कुणास ठाऊक!" कुझ्नेत्सोव उत्तरला आणि ओल्या मानेला खुपणारी पायघोळ कोटाची कॉलर त्याने खाली केली. त्याच्या पाठीतून थंडगार शहारे अद्यापही येत होते. त्याचे तोंड कोरडे पडले होते व त्याची आग होत होती. "आपल्याला वेड्यासारखं खणत राहिलं पाहिजे! एक तास किंवा दोन तास यानं काही फारसा फरक पडणार नाही!"

ते पुन्हा गप्प झाले. त्या रात्रीच्या अंधारात उजळलेल्या 'दोन पहाटां'मधून निर्माण झालेली कसलीतरी जाणवण्याजोगी स्तब्धता सबंध स्तेपवर पसरली आणि तिने त्या तोफखान्याला आपल्या अभद्र छायेने लपेटले. त्या स्तब्धतेने प्रत्येकजण दबला आणि तोफांच्या खड्ड्यांमधील लोकांचे आवाज कमी झाले, विरळ बनले व लौकरच पूर्ण थंडावले.

"मला फक्त एक गोष्ट करायची इच्छा आहे," उखानोवने कुझ्नेत्सोवकडे एक नजर टाकून म्हटले आणि जाकीट अंगाभोवती लपेटून

घेतले. "एकच गोष्ट! त्या साल्या सार्जंट-मेजरची कातडी सोलून त्याला वाळत घातला पाहिजे आणि स्वतःच्या हातांनी स्वैपाक केला पाहिजे. अरे सालं जेवण कुठाय? समजा जर आपल्या तोफेवरचा कुणी एक चोवीस तास मागे पडला, तर त्याच्यावर फरारी झाल्याचा आरोप ठेवून कोर्ट मार्शल करतील! पण आपले स्वैपाकी आणि सार्जंट-मेजर सदैव मोकळे!" आणि आपल्या कुदळींनी व फावड्यांनी माणसे धापा टाकीत, हुंकार देत, गोठलेल्या जमिनीचे कपचे खणून समोरच्या बांधावर टाकत होते, तेथे आपल्या जागेवर तो गेला.

"दोस्तहो, हे काम कधीही न संपणाऱ्या चक्कीसारखं आहे!" त्याचा आवाज ऐकू आला. "मित्रांनो, पिसा चक्की आणि तुम्ही थेट स्वर्गात पोहोचाल!"

अख्ख्या तोफखान्याने तोफांच्या जागा खणून अर्धमेले होईपर्यंत थकल्यानंतर, दक्षिण किनाऱ्याच्या उंच उतारावर खंदक खापलायला घेतले होते तेव्हा पहाटे साडेचारच्या सुमाराला जेवण आले.

भटारखाना थेट नदीच्या बर्फावर उभा राहिला होता. वाटाण्याच्या साराच्या दर्पाने आसमंत दरवळू लागला होता. वाफाळणाऱ्या उघड्या बंबाखाली अद्याप निखाऱ्यांचा लाल उजेड चमकत होता. पळीच्या खडखडण्याचा मोठा आवाज होत होता. आचाऱ्याभोवती गोलंदाजांनी गर्दी केली होती. बर्फावर काळ्या आकृत्यांचा एक जमाव गोळा झालेला दिसत होता. वोदका प्यायल्यामुळे शेकलेले त्यांचे आवाज जरा चढले होते आणि एकूण कुरबुर चालू असली तरी त्या बडबडण्यात थोडा मवाळपणा आला होता.

"पुन्हा वाटाण्याचा सूप! बदल म्हणून दुसरं काही शिजवता येत नाही का?"

"चल ए, नीट भर भांडं–आयला, बायकोचा विचार करतोय वाटतं! सगळे लेकाचे आचारी असे खत्रूड कसे रे?"

"याच्या वाटाण्यानं जीव बेजार झालाय! वाटाण्यानं काय होतं माहीत आहे?"

"तब्येतीला हे फार वाईट आहे–आपल्याला खरं म्हणजे दूध पाजायला हवं!"

"साला बिनडोक आहेस! म्हणे दूध पाजायला पाहिजे – शहाणाच लागून गेलास मोठा!" चारी बाजूंनी बोलणी खाणाऱ्या आचाऱ्याने बचाव करण्याचा प्रयत्न केला. "माझ्यावर कशाला कावता? मी कुठून तुम्हाला दूध पाजणार – मी काही गाय नाही!"

कुझ्नेत्सोवने दीर्घ श्वास घेतला, पण नदीवरच्या ताज्या बर्फाळ हवेत मिसळलेल्या वाटाण्याच्या साराच्या जळक्या वासाने त्याला मळमळू लागले. भटारखान्यापासून बाजूला सरकून तो उंच सुळक्याच्या सावलीत गेला आणि बर्फावर पडलेल्या कुदळींना व फावड्यांना अडखळत ज्या ठिकाणाहून बोलण्याचे व हसण्याचे आवाज येत होते त्या उजेडाच्या झरोक्याकडे निघाला. त्याने ताडपत्री चाचपली, बाजूला खेचली आणि पुन्हा एकदा त्याच्या नाकपुड्यात अन्नाचा वास घुसला. यावेळी त्यात ओल्या मातीचा वास मिसळलेला होता.

उभे राहता येईल एवढ्या उंचीच्या त्या खंदकात, बादलीच्या तळावर पेट्रोलने भरलेला तोफगोळ्याच्या रिकाम्या टोपणातील दिवा जळत होता आणि त्याची पांढरी ज्योत फडफडत होती. जमिनीवर पसरलेल्या ताडपत्रीवर सूपाची भांडी ठेवलेली होती व जवळच वोदकाचे प्याले भरलेले होते. दिव्याकडे डोकी करून दावलात्यान आणि नेचायेव आडवे पडले होते, तर किंचित एका बाजूला मेंढकातडी कोटातली झोया पाय गुडघ्याशी दुमडून बसली होती.

"कोण कुझ्नेत्सोव! आलास बाबा एकदा!" खाण्यामुळे चेहरा लालबुंद झालेला दावलात्यान उद्‌गारला. रात्रभरच्या त्या कष्टदायी कामानंतर तो आणखीच रोडावल्यासारखा दिसत होता. एखाद्या उंदराने आगीकडे बघताना त्याचे जसे नाक डोळे चमकतात, तसे दावलात्यानचे डोळे व बाकदार नाक चकाकत होते. "कुठं गेला होतास? चल, ये आमच्यात! हे तुझं जेवणाचं भांडं! तुझ्या कर्तव्यदक्ष चिबिसोवनं आणलं!"

"थँक्स" कुझ्नेत्सोव उत्तरला आणि आपल्या पायघोळ कोटाची कॉलर मागे वळवून दावलात्यानशेजारी ओणव्याने खाली बसला. दावलात्यानने पटकन बाजूला सरून त्याला जागा करून दिली. एवढा वेळ काळोखात काढल्यानंतर त्या दिव्याच्या फडफडणाऱ्या ज्योतीचा प्रकाश त्याच्या डोळ्यांना खुपत होता. "कोणता प्याला मोकळा आहे?"

"तुम्हाला पाहिजे तो घ्या," नेचायेव म्हणाला आणि झोयाकडे पाहून त्याने एक डोळा मिचकावला. बदामी रंगाचे डोळे असलेला नेचायेव थोड्या रंगेल सुरात म्हणाला, "आमची विमानं मस्त वर गेलीत!"

"कुझ्नेत्सोव, माझा प्याला घे," दावलात्यानने आपल्या मातीने माखलेल्या सडपातळ बोटांमध्ये धरलेला वोदकाने काठोकाठ भरलेला प्याला पुढे केला आणि त्यानेही झोयाकडे कटाक्ष टाकला. "मला आत्ता प्यावीशी वाटत नाही. आणि ही नुसती वोदका आहे असं मला वाटत नाही. तिला कशाचा तरी दुसरा वास येतोय. मला वाटतं रॉकेल असावं."

"तुमचं बरोबर आहे," मिशांमध्ये हसत नेचायेव म्हणाला. "हे मिश्रण आहे. वोदका आणि यू दी कोलन. फक्त मुलींसाठी!"

आपल्या हाताची थरथर सावरण्याचा प्रयत्न करीत कुझ्नेत्सोवने प्याला ओठाला लावला, वासामुळे परत हात लांब नेला, पण मघापासून येणारे शहारे बंद होतील आणि पोटात उबदार वाटेल असे त्याने स्वतःलाच बजावले व कष्टपूर्वक आवाजात तो म्हणाला, "अच्छा... जर्मन आक्रमकांचा नायनाट होवो!"

ते भयानक वासाचे द्रव त्याने मोठ्या कष्टाने गिळले आणि तो ठसकला. त्याला वोदकाचा तिरस्कार होता व आघाडीवर दररोज देण्यात येणाऱ्या वोदकाच्या रेशनची त्याला कधीच सवय होऊ शकली नाही.

"भयानक दारू आहे!" दावलात्यान उद्गारला. "अगदी आत्मघातकी पेय. मी तेच म्हणत होतो..."

"कॉम्रेड लेफ्टनंट, वोदका खाली उतरायला सूपाचा एक छान चमचा मदत करील," तोंडाने च्यॅक असा आवाज करीत नेचायेव मध्येच म्हणाला आणि त्याने सूपाचे भांडे पुढे सारले. "चुकीच्या वाटेनं गेली वाटतं?"

"असं वाटतं खरं," कुझ्नेत्सोव तोंडातल्या तोंडात पुटपुटला, पण सूपकडे दुर्लक्ष करून त्याने ताडपत्रीवरचा रायच्या पावाचा तुकडा उचलला व भिंतीशी टेकून चघळायला सुरुवात केली.

खंदकातल्या भिंतीशी तसाच मागे रेलून कुझ्नेत्सोव अंधाऱ्या सावलीतून झोयाला निरखून पहात होता. पेट्रोलच्या त्या भगभगणाऱ्या ज्योतीच्या

उजेडात ती मान खाली घालून बसलेली त्याला दिसली. तिच्या लांबलचक भुवया, खाली वळलेली तिची नजर, या साऱ्या गोष्टी न्याहाळीत असता त्याच्या मनात कुठेतरी आठवणी जाग्या झाल्या. त्याला काहीतरी परिचित असे जाणवले, जणू त्याने तिला पूर्वी कुठेतरी पाहिले होते, अगदी अशक्य वाटणाऱ्या अशा ऊबदार, स्तब्ध वातावरणात जणू ती पूर्वी कुठेतरी भेटली होती... वेळ संध्याकाळची, खिडकीतून बाहेर पाहताना बर्फाची भुरभुर दिसतेय, रात्रीसाठी घरात छान ऊब पेटवलेली आहे, पांढरे स्वच्छ टेबल क्लॉथ देखणेपणाने टेबलावर अंथरलेले आहे, त्या टेबल कलॉथवर कुटुंबातल्या लोकांच्या फोटोंचा अल्बम उघडा पडलाय, टेबलावरच्या दिव्याच्या उजेडात प्रियजनांचे चेहरे उजळले आहेत.... पाठीमागे खोलीच्या मखमली छाया, नुकत्याच घासलेल्या फरशीचा ताजा वास, भिंतीवर जुन्या आरशाची काळसर आकृती व जुन्या पद्धतीचा, उंच असा निकेलच्या मुठी गूढपणे चमकत असलेला पलंग!.. पण निकेलच्या दांड्यांचा तो पलंग आणि जुन्या पद्धतीचा आरसा मॉस्कोतल्या प्यात्नित्स्काया रस्त्यावरच्या फ्लॅटमध्ये होता आणि एवढ्या शांतपणे, एवढ्या जवळून आणि एवढ्या निकटतेने त्याने फक्त आपल्या आईला आणि बहिणीलाच तेवढे आजवर पाहिलेले होते. त्या सुंदर आणि काळाने पिवळसर पडलेल्या मजेदार आरशाशेजारी त्याने आपल्या आई व बहिणीबरोबर झोयाला बसलेली पाहणे कधीही शक्य नव्हते. तो आरसा म्हणजे त्याच्या आईच्या अभिमानाचा एकमेव ठेवा होता, तिच्या नवऱ्याची ती स्मृती होती; त्यांच्या लग्नाच्या दिवशी तिच्या नवऱ्याने, त्याच्या वडिलांनी, मोठ्या अभिमानाने ही भलीमोठी भेट गाडीत घालून आणून तिला दिलेली होती.

झोयाने कुझ्नेत्सोवकडे नजर टाकली. "कॉम्रेड लेफ्टनंट, तुला झोप लागलेली दिसते? एखादा माणूस सतत गप्प असला की फार चमत्कारिक वाटतं. दारूड्यांमध्ये शुद्धीवर असलेल्या माणसासारखा! तुझी भूक नाहीशी झालीय का?"

"मी झोपलेला नाही," अंधारातच राहून कुझ्नेत्सोवने प्रत्युत्तर दिले. "मी थोडी उबेची मजा अनुभवतोय."

ती वोदका पोटात गेल्यानंतर त्याला खरोखरीच त्या खंदकातली ऊब बरी वाटू लागली होती; तिथला ओलसर दमटपणा, त्या तात्पुरत्या

तयार केलेल्या दिव्याची फडफडणारी ज्योत, लोकांच्या बोलण्यांचे आवाज, ओलसर भिंतींवरल्या कोनदार सावल्या या साऱ्याच गोष्टी त्याला मजेदार वाटू लागल्या होत्या. त्याची हुडहुडी नाहीशी झाली होती, पण कुदळीने खणल्यामुळे त्याला आता घाम फुटला होता व त्या जोरदार वाऱ्याच्या नदीतीरावर त्याला सडकून थंडी भरली होती. त्यांच्या खांद्यावर बर्फाचे पातळ पापुद्रे अजून चिकटले होते, पण आपली जागा बदलण्याची त्याच्यात ताकदही नव्हती आणि त्याला इच्छाही होत नव्हती. तर ती खार्कोवच्या वेढ्यात होती? तिनं लढाईचा थोडा अनुभव घेतलाय? झोयाकडे निरखून पहात असताना त्याच्या मनात विचार आला की, किती विलक्षण चेहरा आहे तिचा! एकूण पाहता ती काही सुंदर नाही. फक्त तिचे डोळे सुरेख आहेत. आणि तिच्या चेहऱ्यावरचे भाव चटकन बदलतात. पण नेचायेवला ती आवडते, उखानोवलाही ती आवडते आणि मलाही... तिचं आणि द्रोझ्दोवस्कीचं काय आहे? ही परिस्थिती मोठी चमत्कारिक आहे...

"कुझ्नेत्सोव, हे बघ!" दावलात्यानने त्यांच्या विचारांची मालिका तोडली. "तू काही खात का नाहीस? सूप एव्हाना गार झालं असणार!"

"कोण म्हणतं सूप गार आहे?" ताडपत्रीच्या पडद्याच्या दुसऱ्या बाजूने दणदणीत आवाजात कुणीतरी विचारले. "सूप अगदी गरमागरम आहे! मी आत येऊ?"

"सार्जंट-मेजर, सरळ आत जा!" उखानोवचा आवाज बाहेरून ऐकू आला. "घूस आत!"

प्रवेशद्वाराशी दोन लठ्ठ दणदणीत पाय उभे राहिलेले दिसले व काठावरची ढेकळे खाली गडगडली. कुणीतरी पडदा चाचपला व टोक सापडताच तो बाजूला केला आणि सार्जंट-मेजर स्कोरिकचा थंडीत गारठलेला निमुळता चेहरा दिसला.

"सार्जंट-मेजर, तुम्ही वाट तर चुकला नाही ना?" स्कोरिकच्या कपाळावर किंचित झुकलेल्या नव्या टोपीचे नुसते दर्शन घडताच जेवण खूप उशिरा आल्याची आठवण होऊन कुझ्नेत्सोवने विचारले.

"तुम्ही फार कडक आहात बुवा कॉम्रेड लेफ्टनंट! अगदी तोफखाना कमांडरपेक्षा कडक!" आपल्या स्थानाला योग्य अशा निगरगट्टपणे

सार्जंट-मेजर म्हणाला. "ठीक आहे, तुमचा जादा वाटा घ्या. आणि तोफखाना कमांडरला तुम्ही नि लेफ्टनंट दावलात्याननी भेटायचं असा हुकूम आहे. तसंच वैद्यकीय मदतनीसानंसुद्धा! मी आत्ताच तोफखाना कमांडरकडून आलो....."

"शिधा इथं ठेव आणि जा."

"मी इथं पिशवी ठेवून जाऊ शकत नाही. तसं केलं तर पुन्हा कधीही सापडणार नाही. आणि दुसरी कुठंही शिल्लक नाही."

"मग लौकर आत ये आणि तुझी पिशवी मोकळी कर."

सार्जंट-मेजरने खंदकात आपले शरीर कसेबसे कोंबले, त्याच्याबरोबर थंड हवेचा झोत खंदकात घुसला. ताडपत्रीवर आपली पिशवी ठेवून तो मोठ्या रुबाबात कोरडी बिस्कीटे, लोणी, साखर आणि तंबाखूची पाकिटे काढून ठेवू लागला. एरवी बहुमोलाच्या वाटणाऱ्या या वस्तू कुझ्नेत्सोवला आता पोटात वोदका गेल्याने व पावाचा तुकडा चघळल्याने तुच्छ वाटू लागल्या होत्या.

"तुम्हा दोघांसाठी मिळून!" सार्जंट-मेजरने त्याला आठवण करून दिली. "तुम्ही आणि लेफ्टनंट दावलात्यान यांच्यासाठी!"

"आता जा," कुझ्नेत्सोवने आज्ञा केली. "आम्ही आमची वाटणी करून घेऊ. का तुला आणखी काही सांगायचंय?"

"सारं काही स्पष्ट आहे."

सार्जंट-मेजरने आपली पिशवी गुंडाळली आणि छातीशी कवटाळून तो खंदकातून मागे सरला. जाताना त्याने मान लांब करून झोयाकडे एक घुबडासारखा तिरस्कारयुक्त दृष्टिक्षेप टाकला. तो तिथे आल्यापासून ती अगदी गप्प राहिली होती. त्याने जोराने पडदा ओढला. झोयाच्या तेथील अस्तित्वाबद्दलची नापसंती त्याने मुद्दाम आणि अगदी उघड तिरस्काराने व्यक्त केली. खंदकाच्या बाहेर उखानोवचा आवाज पुन्हा एकदा ऐकू आला.

"ओहोहो, सार्जंट-मेजर, मी तुमच्यावर किती किती प्रेम करतो! का ते मला ठाऊक नाही, पण माझ्या प्रिय कप्ताना आणि परमपित्या, मी तुझी पूजा करतो. तुझ्या वक्तशीरपणाबद्दल माझ्या मनात प्रगाढ आदर आहे. आमच्या तोफखान्याच्या तुकडीबद्दल जे प्रेम दाखवता त्याबद्दल कमालीचा आदर माझ्या मनात दाटला आहे."

"सार्जंट, काय बकबक लावलीय?" सार्जंट-मेजर ताडपत्रीपलिकडून गरजला. "काय हे बोलणं? कशाला दात काढतोयस? नीट उभा रहा!"

"सबूर, जरा दमानं घ्या सार्जंट-मेजर!" उखानोव हसत म्हणाला. "एवढ्या मोठ्यानं का ओरडता? मी कुठं नीट उभं रहावं अशी तुमची अपेक्षा आहे?"

"या पलटणीच्या कमांडरांनी ह्या नॉन कमिशन्ड ऑफिसरांना पार डोक्यावर चढवून ठेवलंय! काही शिस्त म्हणून नाही! पण मी बरोबर नजर ठेवून राहीन सीनियर सार्जंट!" सार्जंट-मेजर गरजला. आणि जणू काही केवळ उखानोवलाच नव्हे, तर खाली खंदकात त्याचे बोलणे ऐकणाऱ्या दोन लेफ्टनंटनाही ताकीद देण्याच्या स्वरात तो म्हणाला: "माझ्या पोरा, तू अगदी चवड्यावर चालत येशील! तुझ्यासारखे असे मी कैक पचवलेत! माझ्या तोफखान्यात मी असा ढिसाळपणा चालू देणार नाही!"

"एवढा कडक आवाज लावू नका सार्जंट-मेजर, नाहीतर मी चुकून तुमच्या कानाखाली आवाज काढायचा!" उखानोवने मजेमजेने इशारा दिला. "सार्जंट-मेजर, तुमच्या पितृतुल्य प्रेमाबद्दल आभारी आहे. पण माझ्या परमप्रिय बापा, तुमची शिस्त जरा आचाऱ्यांवर चालवा. ते जरा काहीतरी शिस्तीनं वागायला शिकतील."

सुमारे मिनिटभरानंतर अत्यंत शांतपणे उखानोव ताडपत्रीच्या आत आला. मातीने भरलेले आपले हातमोजे त्याने खेचून काढले व ज्योतीवर ऊब आणायला हात खसाखसा चोळले. कशाचा तरी प्रतिकार करताहेत असे वाटणाऱ्या आपल्या धीट डोळ्यांनी त्याने सर्वांकडे एकवार नजर टाकली. तो हसला किंवा बोलला म्हणजे थंडपणे चमकणाऱ्या त्याच्या पुढच्या पोलादी आवरणाच्या दाताने त्याच्या नजरेची परिणामकारकता आणखीच वाढत असे.

"लेफ्टनंट, काम जवळ जवळ संपलंय. आता फक्त त्याला दोन तासांचा अवधी राहिलाय," त्याने सहज सुरात कुझ्नेत्सोवला सांगितले. "हे काय हे? न्याहारी, दुपारचं आणि रात्रीचं जेवण सारं एकत्र? कमाल आहे! माझं पुरं पोट भरलं असं तुम्हाला वाटत असेल तर ती चुकीची समजूत आहे. माझा भलामोठा वाडगा कुठं आहे नेचायेव?"

उखानोवचे भले मोठे ताकदवान शरीर, त्याचा आवाज, अर्धी भिंत व्यापणारे त्याचे रुंद खांदे, त्याच्या पायघोळ कोटाच्या धाग्यान् धाग्याला येणारा गोठलेल्या हिमाचा कडवट वास (काम सुरू झाल्यापासून तो एकदाही उबेसाठी खंदकात आला नव्हता), या सर्वांमुळे खंदक एकदम कमालीचा लहान भासू लागला.

"ही पाणीदार दारू थंड झालीय सीनियर सार्जंट," डब्यातून प्याल्यात वोदका ओतीत नेचायेव म्हणाला. "ती तुमची केव्हापासून वाट पाहतेय."

"दोस्तांनो, मी आता चलते," मेंढकातडी कोटचा पट्टा घट्ट करीत झोया म्हणाली.

"तुला मी एक सांगू झोया–" उखानोव तिच्या शेजारी बसला आणि ताडपत्रीवरच्या खाद्यपदार्थांचा त्याने व्यवस्थित समाचार घेण्याचा पवित्रा घेतला. "सारं काही सोड आणि माझ्या तोफेवरच्या तुकडीत सामील हो. तुला आमच्यापासून काहीही धोका पोहोचणार नाही अशी मी तुला वैयक्तिक हमी देतो. आमची पोरं सज्जन आहेत. आम्ही तुझ्यासाठी एक वेगळा खंदक खणून देतो."

"माझा याला मुळीच विरोध नाही," कुझ्नेत्सोव म्हणाला आणि उभा राहिला. तो असे अचानक का बोलला हे त्याचे त्यालाच समजले नाही आणि झोयासमोर आपला गोंधळ लपविण्यासाठी त्याने आपला पट्टा घट्ट करण्याचा व घसरणारी पिस्तुलाची पिशवी नीट बसवण्याचा आविर्भाव केला. "झोया, तू तोफखाना तुकडीच्या कमांडरकडं निघालीस?"

ती त्या दोघांकडे चकित नजरेने पहात राहिली.

"कुणापासून माझं रक्षण करायला तुम्ही एवढे उत्सुक आहात?" बळजबरीने तोंडावर हसू आणीत ती म्हणाली. "जर्मनांपासून? ते माझं मी करू शकते. तोफेशिवाय. माझी तीक्ष्ण नखं पाहिलीत का?" आणि तिने उखानोवच्या हातावर किंचित ओरखडा काढला. ती आपल्या नखांच्या धारदारतेचे प्रदर्शन करीत असताना त्याने आपला हात दूर करण्याचा मुळीच प्रयत्न केला नाही. उलट आपला चकाकता दात दाखवीत तो हसत राहिला.

"मग?" तिने विचारले. "आहे की नाही संरक्षणाची व्यवस्था?"

"ही नखं रंगवायला आहेत," उखानोव उत्तरला. "तू त्यांनी काय करू शकणार?"

"ते प्रत्यक्ष वेळ आल्यावर समजेल!"

"ओ हो ऽ, झोया, लाडके तू शूर आहेस," आपल्या नेहमीच्या सूचक सवयीनुसार नेचायेवने आपले घोडे दामटले. पण उखानोवच्या आगमनानंतर तो उघडपणे मागे पडला होता. "कुणाचं तुझ्यावर मन बसलं असेल तर या नखांचा काय उपयोग? तू ओरबाडणार? चावणार? ते भलतंच विनोदी दिसेल."

"झालं पुन्हा सुरू," दावलात्यानने असा काही भाव चेहऱ्यावर आणला की, जणू त्याची सारी सहनशीलता संपली होती. "पुन्हा तुमचा मूर्खपणा सुरू झाला? मला आता यापुढं तो क्षणभरही ऐकवत नाही! झोया, तू जा बाई कृपा करून या वाटेनं!"

खंदकाच्या तोंडावरची ताडपत्री त्याने हाताने बाजूला धरली आणि झोयाला रस्ता करून दिला.

## प्रकरण सातवे

कुदळ-फावड्यांचा खडखडाट आणि उकरलेल्या मातीच्या ढेकळांची सळसळ यांनी भरलेल्या रात्रीच्या वातावरणात ते तेथे आले होते. तीराखालच्या बर्फावर रणांगणावरचा भटारखाना अद्याप उभा होता. त्याची काळी छाया अंधुक दिसत होती, निखारे केव्हाच विझले होते आणि आचाऱ्याच्या हातातली पळी भांड्यात खडखडायची थांबली होती. आता तिथे कुणीही नव्हते. तिथे थांबवून ठेवलेला घोडा मात्र पार गारठला होता व पाय आपटून फुरफुर करीत तोंडाला बांधलेल्या पिशवीतला खुराक चघळत होता.

त्या दोन उषःकालांच्या उजेडाने सुळक्यावरचे आकाश उजळले होते व त्यांच्या लुकलुकत्या प्रकाशात जमिनीवरचा प्रत्येक उंचवटा उठून दिसत होता. स्तेपवर विस्तीर्ण पसरलेल्या त्या रात्रीच्या स्तब्धतेने, जर्मनांच्या त्या छुप्या अस्तित्वाने, कुझ्नेत्सोवची छाती दडपून गेल्यासारखी झाली. मात्र तो काहीही बोलला नाही. दावलात्यान

आणि झोयाही काही बोलली नाहीत. चालताना त्यांच्या नमदी बुटांखाली बर्फाचे तुकडे होताना व त्याचा चुरा होताना येणारे आवाज ऐकू येत होते.

तर तोफखान्याच्या कमांडरकडे झोयालाही हजेरी देण्याचा हुकूम सुटला होता. वैद्यकीय मदतनीस या नात्याने तिला तोफखान्यात वावरण्याचे व मोकळेपणाने वागण्याचे स्वातंत्र्य खूप मिळत होते याची कुझ्नेत्सोवला कल्पना होती. तिच्या आवडीच्या कोणत्याही पलटणीबरोबर राहण्याचा तिला खास अधिकार होता आणि द्रोझ्दोवस्कीच्या खंदकाकडे तिला अशी गरीब गायीसारखी येताना पाहून म्हणूनच त्याला राग आला. तिच्यावर वर्चस्व गाजविण्याचा जणू त्याला खास हक्क होता.

"झोया... त्यावेळी तू थट्टेनं सांगत होतीस ना?" स्वतःची इच्छा नसतानाही त्याने विचारले. "तुला नवरा आहे असं तू सांगितलंस तेव्हा?"

ताऱ्यांच्या प्रकाशात निळसर दिसणाऱ्या त्या सुळक्याच्या पायथ्याशी लोकांच्या पावलांनी तयार झालेल्या पायवाटेवरून, अंधारातून ते एकमेकांना चिकटून चालले होते.

"तुला खरंच जाणून घ्यायचंय?" किनाऱ्यावरच्या निसरड्या वाळूत क्षणभर पाय घसरताच व्हावे अशा कापऱ्या आवाजात तिने विचारले, पण दुसऱ्याच क्षणी तिने स्वतःला सावरले. "नाही, मी थट्टेनं बोलत नव्हते."

"तू खरं का सांगत नाहीस?" आपल्या नेहमीच्या सरळसोट स्वभावानुसार दावलात्यान म्हणाला. तो किंचित मागे थबकला आणि उद्गारला, "कुझ्नेत्सोव, इथं नदीकडं पहा. हा रणगाडाविरोधी खंदकासारखा खड्डा आहे. हे झकास! रणगाडे मुसंडी मारून पुढे सुटलेच तर इथं नक्की अडकतील. आपल्याजवळ तोफखाना भरपूर आहे आणि ते बर्फ ओलांडू शकणार नाहीत—त्यांचा तेवढा दम टिकणार नाही! स्तालिनग्राद कोणत्या दिशेला आहे? उत्तरेला?"

"ईशान्येला सुमारे पंचेचाळीस किलोमीटर," कुझ्नेत्सोव म्हणाला. "जर ते दुसऱ्या किनाऱ्याने घुसतील तर मात्र ते फार पुढे जातील. मला ते घडायला नकोय."

झोया थांबली. तिचा पांढरा मेंढकातडी कोट आणि चेहरा त्या उंच सुळक्याच्या बर्फाच्या निळसर छायेत मिसळला होता. फक्त तिचे चमचमत्या आकाशाकडे वळलेले डोळे खूप काळे दिसत होते.

"जर ते घुसले..." तिने हे शब्द पुन्हा उच्चारले आणि दावलात्यान पुन्हा त्यांच्या बरोबर येईपर्यंत वाट पाहून ती कोणतीही तार्किक सुसंगती न राखता पुढे बोलू लागली, "दावलात्यान, तुला मरणाची किंचितही भीती वाटत नाही?"

"कशाला वाटावी?"

"तू जिच्याशी लग्न करणार आहेस ती मुलगी आहे. तू जितका चांगला आहेस तितकीच ती चांगली आहे का रे? छोटचा सुंदर मांजरी-सारखी सुरेख? होय ना?"

दावलात्यानने कपाळाला आठचा घातल्या. "त्याचा इथं संबंध येत नाही. आणि मी छान आहे असं तू का म्हणतेस? मी मुळीच चांगला नाही. आणि मांजरी कशाला? मला मांजरं आवडत नाहीत. आमच्या घरात आम्ही कधीही मांजरं पाळली नाहीत."

"तू कुठं रहात होतास—आर्मेनियात? तिथं शाळेत होतास?"

"स्वेर्दलोवस्कमध्ये. माझे वडील आर्मेनियन आणि आई रशियन आहे. दुर्दैवानं मी कधीही आर्मेनियाला गेलेलो नाही. मला ती भाषासुद्धा येत नाही."

"मला वाटतं आपण येऊन पोहोचलो," कुझ्नेत्सोवने त्यांच्या संभाषणात खंड पाडला. "तुला धुराचा वास येत नाही? त्यांनी स्टोव्ह पेटवून ठेवला असावा. कुठं मिळाला त्यांना?"

"थांबा, कोण आहे तिकडं?" मातीच्या ढिगाआडून कुणीतरी ओरडले आणि अंधारात तीन पावलांवर पहारेकऱ्याची आकृती येऊन उभी राहिली. "वैद्यकीय मदतनीस का?"

"पलटणीचे कमांडर आणि वैद्यकीय मदतनीस," कुझ्नेत्सोव उत्तरला. "तोफखाना कमांडर इथं आहेत?"

"ते तुमची वाट पाहताहेत. इकडून या. तिथं दरवाजा आहे."

आडोसा एव्हाना पूर्ण तयार झाला होता आणि उत्तम अवस्थेत होता. बाहेर कुदळी पडल्या होत्या, मातीच्या ढिगांमधून फावडी डोकावत होती. लाकडी दाराजवळ कोनात ठेवलेली स्टोव्हची नळी सुळक्यावर

घरगुती उबदारपणाची आठवण करून देणारी गंधित हवा सोडीत होती. या सर्व वस्तू अर्थातच शेजारच्या खेड्यामधून टेहळ्यांनी आणि संदेशवाहकांनी वाचवून आणल्या होत्या.

खरेच, त्यांच्याजवळ स्टोव्हसुद्धा आहे; चकित झालेल्या कुझ्नेत्सोवने ही वस्तुस्थिती मनात टिपली.

छोटा दरवाजा करकरला आणि ते एका भल्यामोठ्या, चांगल्या आरामशीर, उंच अशा आडोशात आले. तिथे घुसमटून टाकणारी ओल होती व तापल्या लोखंडाचा वास सुटला होता (कोपऱ्यातला स्टोव्ह तापून लालभडक झाला होता). त्या जमिनीखालच्या खोलीत पॅराफिनचा भला मोठा दिवा होता, मातीच्या कोचांवर भरपूर वाळके गवत टाकले होते आणि मातीच्या टेबलावर ताडपत्री अंथरली होती. आघाडीवरचे ठिकाण म्हणून पाहिले तर सर्व काही स्वच्छ, नीटनेटके आणि फारच आरामशीर वाटत होते. स्टोव्हपुढील कोपऱ्यात संदेशवाहक आपला सेट एका तोफगोळ्याच्या कवचावर बसवीत होता आणि रिसीव्हरमध्ये फुंकरा मारीत होता.

तीन टेहळ्यांना भोवती उभे ठेवून टेबलाशी लेफ्टनंट द्रोझ्दोवस्की कोटाची बटणे उघडी टाकून आणि आपले गवतासारखे दिसणारे, जवळ जवळ पांढऱ्या रंगाचे केस व्यवस्थित विंचरून बसला होता. दिव्याच्या उजेडात त्याचा देखणा चेहरा कठोर दिसत होता आणि त्याच्या लांब बायकी पापण्यांच्या गर्द छाया डोळ्यांखाली पडल्या होत्या. त्याचे डोळे नकाशावर रोखलेले होते.

"तुमच्या हुकुमानुसार पहिल्या पलटणीचा कमांडर हजर आहे," वाटचालीत द्रोझ्दोवस्कीशी घडलेल्या प्रसंगानंतर कुझ्नेत्सोवने स्वतःशी ठरविल्यानुसार कडक नियमाप्रमाणे वर्दी दिली. त्या दोघांमधील संबंध त्यामुळे थोडे सुरळित राहिले असते.

"दुसऱ्या पलटणीचा कमांडर तुमच्या हुकुमानुसार अवतरला आहे!" दावलात्यान थोड्या नाटकी आवाजात उद्‌गारला आणि त्या ठिकाणची आरामशीर सजावट पाहून त्याला आश्चर्याने जोरात हसू फुटले. "बाप रे, कॉम्रेड लेफ्टनंट, तुला तर इथं चक्क राजवाडा रहायला मिळालाय. इथं आपला अख्खा तोफखाना राहील एवढी जागा आहे!"

"इथं गुहेसारखी एक खाण होती—आम्ही ती थोडी रुंद केली एवढंच," एका टेहळ्याने खुलासा केला. "आहे त्याचा उपयोग करून घ्यावा म्हटलं."

"पहिली गोष्ट म्हणजे," नकाशावरची आपली पारदर्शी थंडगार निळी नजर वर उचलीत द्रोझ्दोवस्की मध्येच म्हणाला, "लेफ्टनंट दावलात्यान, केवळ सैतान अवतरतो. अधिकारी हुकुमानुसार हजर होतात. आणि दुसरी गोष्ट म्हणजे—" त्याने स्टोव्हजवळ बसलेल्या झोयाकडे फारसे लक्ष न दिल्यासारखे केले; जणू काही ती तेथे आलीच नव्हती. त्याने कुझ्नेत्सोवला पायापासून डोक्यापर्यंत न्याहाळले—"माऱ्याच्या जागा अर्ध्या तासापूर्वी मी तपासल्या. दोन तोफांमधले दळणवळणाचे चर अगदी अजागळपणे खणले आहेत. खंदक खणायला सर्व माणसांना कशाला जुंपलं? तुम्हाला खंदकातून काही रणगाडे दिसणार नाहीत. का तुमच्याऐवजी उखानोव पलटणीचं नेतृत्व करीत होता?"

"आपल्याला खंदकांचीही तेवढीच गरज आहे," कुझ्नेत्सोवने उलट टोमणा हाणला. "आणि वेळच पडली तर उखानोव पलटणीचं नेतृत्व करू शकतो. आपल्याप्रमाणंच त्याला सर्व प्रशिक्षण मिळालं आहे. त्याला कमिशन मिळालं नाही, एवढंच!"

"सुदैवानं त्याला मिळालं नाही," द्रोझ्दोवस्की पुढे म्हणाला. "कुझ्नेत्सोव, मला ठाऊक आहे, सीनियर सार्जंट उखानोवबरोबर तुझी किती दाट दोस्ती आहे ते!"

"या बोलण्याचा काय अर्थ?"

जोराने फरफरणाऱ्या स्टोव्हजवळ झोया बसली होती. तिने आपली डोक्यावरची टोपी काढली, डोके हलविले त्यासरशी तिच्या पांढऱ्या मेंढकातडी कोटाच्या कॉलरवर तिचे केस रूळू लागले. मघापासून तिरपे कटाक्ष टाकणाऱ्या संदेशवाहकाकडे पाहून तिने मंद स्मित करताच त्याने तात्काळ जबडा फाकून प्रतिसाद दिला. आपला कठोर भाव तसाच ठेवून द्रोझ्दोवस्कीने झोयाकडे क्षणभर कटाक्ष टाकला आणि तो पुन्हा म्हणाला, "लेफ्टनंट कुझ्नेत्सोव, मला सारं काही माहीत आहे!"

"दोस्ती असण्याचा इथं संबंध येतोच कुठं?" खांद्याला कुबड काढीत दावलात्यानने विचारले. त्याचे बाकदार नाक अधिकच बाकदार झाल्याचा भास झाला. त्याने ते आता द्रोझ्दोवस्कीवर रोखले होते.

"माझ्या पलटणीत उखानोवसारखा गोलंदाज असता तर वैयक्तिक-दृष्टचा मला केव्हाही आनंद झाला असता. आणि काही झालं तरी आपण सर्वांनी एकत्रच प्रशिक्षण घेतलंय."

द्रोझ्दोवस्कीने चटकन कपाळाला आठ्या घातल्या.

"उखानोवबद्दल आपण नंतर बोलू. या क्षणाला तुम्ही टेबलाजवळ या आणि तुमचे नकाशे काढा."

याचा अर्थ त्याच्याजवळ काहीतरी बातमी आहे, त्याला काहीतरी ठाऊक आहे, कुझ्नेत्सोवच्या मनात विचार आला.

ते टेबलाजवळ गेले आणि आपल्या पिशव्यांमधून नकाशे काढून पॅराफिनच्या दिव्याच्या थरथरत्या प्रकाशात टेबलावर पसरले. त्या ठिकाणी एकदम कमालीची स्तब्धता पसरली. कुझ्नेत्सोवने नकाशाकडे पाहिले तेव्हा दिव्याच्या काचेची तप्तता त्याच्या कपाळाला जाणवली. पूर्वी कधीही पाहिले नव्हते एवढ्या तपशीलपूर्वक आणि अधिक स्पष्टपणे त्याने द्रोझ्दोवस्कीला निरखून पाहिले. गर्विष्ठपणा व्यक्त करणाऱ्या त्याच्या ओठांची सरळ रेषा, त्याच्या गालांवरची तारुण्यदर्शक कोवळी लव, त्याचे छोटे कान, मुळीच न हसणाऱ्या त्याच्या डोळ्यांमधील स्थिर बाहुल्यांमध्ये प्रतिबिंबित झालेला दिव्याचा प्रकाश, अनावर आकर्षण निर्माण करणारी त्याच्या डोळ्यांमधील नितळ सरोवरासारखी दिसणारी निळाई—हे सारे सारे कुझ्नेत्सोवने निरखून घेतले.

"एक तासापूर्वी रेजिमेंटच्या मुख्य ठाण्यानं मला फोन केला," द्रोझ्दोवस्कीने स्पष्ट शब्दात बोलायला आरंभ केला. "आपल्याला माहीतच आहे की, आघाडीवरची परिस्थिती अत्यंत अस्थिर आहे. मुख्य रस्त्याच्या प्रदेशात माझ्या माहितीप्रमाणं जर्मनांनी पुढं मुसंडी मारली आहे. ते साधारण इथं, खेड्याच्या उजव्या अंगाला, स्तालिन-ग्रादच्या दिशेनं आहेत." त्याने नकाशाकडे निर्देश केला. त्याचे थरथरते हात फारसे स्वच्छ नव्हते आणि त्याच्या बोटांच्या टोकांना लहान मुलासारखी नखे होती. "पण अद्याप आम्हाला निश्चित माहिती मिळालेली नाही. चार तासांपूर्वी पायदळाच्या डिव्हिजननं टेहळ्यांची तुकडी पाठवली आहे. समजलं स्पष्ट?"

"बहुतेक सारं," कुझ्नेत्सोव उत्तरला. अजूनही त्याचे लक्ष द्रोझ्दोवस्कीच्या बोटांच्या नखांकडे होते.

"'बहुतेक सारं' हे शब्द त्यूत्चेवच्या काव्यात्म लिखाणासारखे वाटतात किंवा—कोण तो दुसरा बरं?—फेत्," द्रोझ्दोवस्कीने टोला हाणला. "पुढे ऐका. जर सारं काही सुरळित पार पडलं तर रात्र संपण्यापूर्वी टेहळे परत येतील. या खिंडीतून, खेड्याच्या पूर्वेकडून, पुलावरून ते येतील. हा आपल्या तोफखान्याच्या कक्षेतला भाग आहे. या भागात डोळ्यात तेल घालून नजर ठेवा आणि जर्मनांनी जरी गोळ्या झाडल्या तरी तुम्ही उलट उत्तर देऊ नका. समजलं सारं?"

"हो," दावलात्यानने अस्फुट आवाजात उत्तर दिले.

"पण एक प्रश्न आहे," कुझ्नेत्सोव म्हणाला. "आपल्या समोरच्या खेड्यात जर्मन नसताना ते कसे भडिमार सुरू करतील?"

द्रोझ्दोवस्कीच्या थंडगार निळ्याशार डोळ्यांनी त्याला रोखून पाहिले.

"तिथं आत्ता कुणी नाही, पण पाच मिनिटांनंतर तिथं असतील," कुझ्नेत्सोवचा प्रश्न त्याच्या हुकुमाला विरोध दर्शविणारा होता का त्याने केवळ सहज विचारले याची खात्री न पटल्याच्या सुरात द्रोझ्दोवस्की म्हणाला. "सारं स्पष्ट झालं कुझ्नेत्सोव? का अजून नाही?"

"होय, आता सारं स्पष्ट झालं," कुझ्नेत्सोवने नकाशा गुंडाळला.

"आणि तू दावलात्यान?"

"अगदी पूर्ण समजलं कॉम्रेड तोफखाना कमांडर."

"तुम्ही जाऊ शकता," द्रोझ्दोवस्की टेबलाशी ताठ होत म्हणाला. "आतापासून एक तासानं मी तोफखान्याची पाहणी करायला येईन. सर्व गोष्टींची तपासणी करण्यात येईल."

पलटणींचे कमांडर तिथून निघून गेले. टेबलानजीक उभ्या असलेल्या मुख्य ठाण्यावरच्या पलटणीतल्या तीन टेहळ्यांनी एकमेकांना नजरांनी संकेत केले. त्यांच्या पाठमोऱ्या अवस्थेतही त्यांना झोयाचे अस्तित्व जणू जाणवत होते आणि आपण अडचण होतो आहोत याची जाणीव होऊन टेहळणीच्या जागेवर जाणे अधिक इष्ट आहे हे त्यांना समजले होते. पण आपल्या नेहमीच्या सवयीच्या विरुद्ध, द्रोझ्दोवस्कीने त्यांना तिथून घालवून देण्याची घाई केली नाही व आपल्यासमोर कुठल्यातरी अज्ञात जागी नजर खिळवून तो गप्प राहिला.

"कॉम्रेड लेफ्टनंट, आम्ही जाऊ शकतो काय?"

"होय. आणि तू सुद्धा." त्याने संदेशवाहकाला उद्देशून मान

हलवली. "जा आणि गलोवानोवला ते चर नीट खणायला सांग. मी इथं असताना त्या सेटजवळ तुला बसून रहायचं कारण नाही. तुझी गरज भासेल तेव्हा मी तुला बोलावून घेईन."

क्षणभर दार अंधारात सताड उघडले गेले आणि करकरत बंद झाले. टेहळयांच्या व संदेशवाहकाच्या पावलांचे आवाज तीरावर धपधप ऐकू येत राहिले आणि रात्रीच्या निःस्तब्ध शांततेत विलीन झाले.

"किती शांत आहे नाही!" झोया म्हणाली आणि तिने सुस्कारा टाकला. "दिव्याची वात चुरचुरल्याचा आवाज सुद्धा ऐकू येतोय."

त्या आडोशामधील स्तब्धतेत आता ती फक्त दोघेच तिथे होती. मातीच्या जाड थराखाली सुरक्षित होते, स्टोव्हपासून येणाऱ्या गरम हवेच्या झोतांचा आराम त्यांना लाभत होता, तापलेल्या दिव्यातील वात चुरचुरत होती. झोयाला काहीही उत्तर न देता द्रोझ्दोवस्की त्या अज्ञात स्थळाकडे तसाच स्थिर नजरेने पहात राहिला आणि पाहता पाहता त्याच्या फिकट, रोड चेहऱ्यावर तीव्र राग उमटत गेला. अचानक तो प्रत्येक शब्द तिरस्काराने चावत चावत बोलू लागला.

"हे सारं कधी एकदा संपणार आहे ते मला जाणून घ्यायचंय!"

"काय कसं संपायचं आहे?" मान वर उचलीत तिने सावध सुरात विचारले. "वोलोद्या, पुन्हा सारं तेच का पहिल्यापासून?"

कुलपी गोळयाच्या एका रिकाम्या कवचावर झोया त्याच्या तिरप्या दिशेने बसलेली होती. स्टोव्हच्या त्या धगधगत्या लोखंडासमोर तिने हात धरले, मग आपले गरम तळवे दोन्ही गालांवर दाबून धरले आणि त्या अर्धवट उजेडात त्याच्याकडे पाहून ती मंदपणे हसली. तो पुढे काय बोलणार याची जणू तिला आधीच जाणीव होती व त्याचा इशारा तिच्या नजरेत होता.

"एवढा सारा वेळ तू कुठं होतीस?" द्रोझ्दोवस्कीने मत्सरी सुरात विचारले. एखाद्याला असे प्रश्न विचारण्याचा हक्क असावा आणि दुसऱ्या व्यक्तीला मात्र त्याबाबत आक्षेप घेण्याचा काही एक अधिकार नसावा, असा त्याच्या विचारण्याचा एकूण थाट होता. तिने नुसते खांदे उडवून उत्तर दिले तेव्हा तो पुढे म्हणाला, "मला माहीत आहे सगळं! सर्व तोफखान्याच्या समोर आपल्यामधील नात्याचं प्रदर्शन करायची माझी इच्छा नाही, पण तू फारच मर्यादा सोडून वागतेस!

मला मत्सर अजिबात वाटत नाही, पण कुझ्नेत्सोवच्या पलटणीबरोबरची तुझी जवळिक मला विशेषकरून आवडत नाही. तू निदान दावलात्यानची पलटण निवडायचीस!"

"वोलोद्या..."

"माझ्याऐवजी कुझ्नेत्सोव तोफखान्याचा कमांडर असता तर काय झालं असतं याची मी कल्पना करू शकतो! तर काय घडलं असतं याची मला चांगलीच कल्पना आहे!"

तो झटकन उठून तिच्याजवळ गेला. त्याची उंची फारशी नव्हती पण बांधा पिळदार होता. दोन्ही हात खिशात खुपसून तो तिच्या वर उचललेल्या चेहऱ्यात, तिच्या किंचित अपराधी हास्यात काहीतरी शोधू पहात होता. या तिच्या हसण्यानेच त्याचा संशय बळावत चालला होता. त्याच्या या मनःस्थितीची कल्पना येताच तिने खांद्यावरचा मेंढकातडी कोट बाजूला फेकला, ती उठली आणि त्याच्या बटणे मोकळी सुटलेल्या कोटाच्या आत हात खुपसून त्याच्या छातीवरील पितळी बटणांवर गाल घाशीत त्याला मिठी मारण्यासाठी पुढे झुकली. तो खिशातील हात ना काढता तसाच उभा राहिला. तिने त्याच्या छातीवर गाल टेकला तेव्हा त्याच्या हृदयाची धडधड तिला स्पष्ट ऐकू आली व त्याच्या आखूड लष्करी कोटामधून येणाऱ्या घामाचा तुरट वास तिला जाणवला. आपल्या केसांना धुराचा वास येईल या भीतीने तिने आपले डोके किंचित मागे झुकवले.

"मग आपली बरोबरी झाली," ती म्हणाली. "तू मला तीन तास भेटला नाहीस आणि मी तुला भेटले नाही. पण वोलोद्या, एका गोष्टीत आपली बरोबरी होत नाही. आणि ती तुला ठाऊक आहे."

कोणताही प्रतिकार करण्याचा किंवा प्रतिटोला हाणण्याचा तिच्या बोलण्यात अभिनिवेश नव्हता. त्याच्या केसाच्या झुलुपाखालील एकही सुरकुती नसलेल्या गोऱ्या कपाळावर तिचे आर्जवी डोळे रोखलेले होते. त्याच्या कपाळावरील तारुण्याची टवटवी एखाद्या लहान मुलासारखी दिसत होती.

"कशाबाबतीत साम्य नाही? ओहो, समजलं मला! पण ही लढाई काही माझी कल्पना नव्हती. मी त्या बाबतीत काही करू शकत नाही. आणि सबंध तोफखान्यासमोर मी तुला माझ्या मिठीत घेऊ शकत

नाही. आपले संबंध प्रत्येकाला ठाऊक व्हावेत अशी तुझी इच्छा आहे?"

द्रोझ्दोवस्कीने जोराने तिचे हात झिडकारले आणि कोट स्वत:भोवती गुंडाळून घेऊन तो एक पाऊल मागे सरला. त्याने आपले ओठ घट्ट आवळून धरले होते.

तिने आश्चर्याने विचारले, "तुला एवढा तिरस्कार वाटतो! तू त्याबद्दल खरंच एवढं वाईट समजतोस? माझी मनगटं तू एवढ्या जोरानं का पिरगाळलीस?"

"चूप बैस! मला काय वाटतं ते तुला उत्तम माहीत आहे," तो म्हणाला व अस्वस्थपणे त्याने फेऱ्या घालायला सुरुवात केली. भिंतीवर त्याची खडबडीत सावली उठून दिसत होती. "रेजिमेंटमधल्या कुणालाही आपले संबंध कळता कामा नयेत. तुला कदाचित हे आवडणार नाही, पण हे असंच असलं पाहिजे. मी तोफखान्याचा कमांडर आहे आणि माझ्याबद्दल चर्चा झालेली मला नकोय! माझा जरासा पाय घसरला तर आनंद मानणारी काही माणसं आहेत. ती तेवढ्याचसाठी टपून बसली आहेत! ही बांडगुळं तुला का सारखी चिकटून असतात?"

"तुला भीती वाटते?" तिने विचारले. "लोक तुझ्याबद्दल चुकीचे मत बनवतात अशी तुला भीती का वाटते? मला का भीती वाटत नाही?"

"चूप रहा म्हणून सांगतो ना तुला. मला कशाचीही भीती वाटत नाही! पण ते कसं दिसेल याची तुला कल्पना आहे. रेजिमेंटला किंवा प्रमुख ठाण्याला आपल्याबद्दल कागाळ्या करणारी काय कमी माणसं आहेत? .. तसं झालं तर सगळा आनंदच आहे!" तो विचित्र हसला. "तिकडे लढाई चाललीय आणि इकडं हे गवतावर एकमेकांना मिठ्या मारून एकत्र झोपताहेत! कबूतरांच्या जोडीसारखे! आघाडीवरचे प्रेमिक!"

"तू म्हणतोस त्याप्रमाणं मला तुझ्याबरोबर एकत्र झोपायचं नाही," झोया सामोपचाराच्या सुरात म्हणाली आणि थंडी वाजत असल्याप्रमाणे तिने मेंढकातडी कोट खांद्यावर ओढून घेतला. "पण आपल्याबद्दल रेजिमेंटच्या कमांडरला किंवा डिव्हिजनच्या कमांडरला कुणी काही सांगितलं तर मला त्याची भीती वाटत नाही..." त्याच्याप्रमाणेच संदिग्ध शब्दांचा वापर करीत ती म्हणाली. त्याला आणखी डिवचण्याची

तिची इच्छा नव्हती. "वोलोद्या, प्रश्न तो नाही. तू ज्या पद्धतीनं माझ्यावर प्रेम करतोस ती पद्धत फार विचित्र आहे. अर्थात प्रेम करीत असशील तर! तुझ्या संशयांनी मला छळण्यात तुला काय आनंद मिळतो ते मला समजत नाही. तुला जाणवत नसेल, पण मला दुखावं अशा पद्धतीनं तू चुंबन घेतोस. अशी सूडबुद्धी का येते तुझ्या मनात?"

द्रोझ्दोवस्की तिच्यासमोर थांबला. त्याच्या पायघोळ कोटाचा दमट वास तिच्या नाकात शिरला. त्याचे ओठ विलग झाले होते.

"तुला तो छळवाद वाटतो!" तो बेफिकीर सुरात म्हणाला. "मला हसू आणू नकोस! मी कशाला सूडबुद्धीनं वागीन? तर मी तुझं योग्य तऱ्हेनं चुंबन घेत नाही? मी ते घ्यायला शिकलो नाही. दुसऱ्या पद्धतीनं मला कुणी शिकवलं नाही!"

"वोलोद्या, मी तुला शिकवू शकत नाही! होय की नाही?" झोया पुन्हा नमते घेण्याचा प्रयत्न करीत म्हणाली व तिने स्मित केले. "माझं मलासुद्धा नीट ठाऊक नाही. पण ते एवढं महत्त्वाचं आहे का? मला माफ कर वोलोद्या!"

"मूर्खपणा सगळा!" तो टेबलाकडे वळला व तिथून अत्यंत कडवट सुरात बोलू लागला. "तुला माहितीच करून घ्यायची असेल तर सांगतो, एका वयस्क बाईकडून वयाच्या तेराव्या वर्षी मी पहिली चुंबने शिकलो."

"कुठल्या बाईकडून?" झोयाने अस्फुट आवाजात विचारले आणि आपला चेहरा त्याने पाहू नये म्हणून मान खाली केली. "कशाला बोललास तसं? कोण होती ती?"

"जाऊं दे! विसरून जा! स्पेनमध्ये माझे वडील मारले गेल्यानंतर ताश्कंदमध्ये ज्यांच्याकडं मी दोन वर्षं राहिलो ती दूरची नातेवाईक होती! अनाथ मुलांच्या संस्थेत न जाता मी मित्रांबरोबर राहिलो आणि ते देतील त्या आडोश्याला रहात पाच वर्षं मी काढली! माझं शाळेतलं शिक्षण संपेपर्यंत! मी ते कधीही विसरणार नाही!"

"तुझे वडील स्पेनमध्ये मारले गेले? वोलोद्या, तुझी आईसुद्धा त्या दरम्यान वारली होती?"

प्रेमाच्या व कणवेच्या भावनेने तिचा चेहरा डवरला होता. त्याच्या शुभ्र कपाळावर, त्याच्या कुरळ्या केसांवर तिची नजर फिरत होती.

त्याच्या धारदार निळ्या डोळ्यात पहायचा मात्र तिला धीर होत नव्हता.

"होय," त्याने तिच्याकडे तीक्ष्ण नजरेने पहात म्हटले. "होय, त्या वेळेपर्यंत दोघेही वारले होते. आणि मला त्यांचा फार लळा होता. त्यांनी माझा विश्वासघात केला अशी माझी भावना झाली. तुला समजतं हे? कुणीतरी ताश्कंदहून मला घेऊन जाईपर्यंत मी मॉस्कोच्या फ्लॅटमध्ये एकटा पडलो होतो! एक दिवस तू सुद्धा माझा विश्वासघात करशील अशी मला भीती वाटते. जाशील कुणाबरोबर तरी निघून!"

"किती वेडा आहेस तू वोलोद्या. अरे मी तुझ्यावर प्रेम करते ते समजत नाही तुला? आणि मी तुझा कधीही विश्वासघात करणार नाही. तू मला महिन्यापेक्षा जास्त काळ ओळखतोस की नाही?"

उलगडा होऊ न शकणाऱ्या त्याच्या संशयाच्या क्षणांमध्ये, ते दोघे एकत्र असताना उसळणाऱ्या त्याच्या क्रूर मत्सराच्या भावनांमध्ये, त्याला समजून घेणे झोयाला कठीण जात होते. अशावेळी काहीही बोलण्यात अर्थ नसे. सारा तोफखाना तिच्याकडे दर क्षणाला, दर दिवसाला पुरवीत असलेले लक्ष तिला जाणवत होते. पण असे होणे अपरिहार्य आहे हे तिने स्वतःला समजावले होते व स्वसंरक्षणासाठी थोडे खटचाळ वागणे इष्ट आहे असे ती समजत होती. त्याला कदाचित याची जाणीव झालेली असेल, पण हताशपणातून त्याच्या संशयाचे उद्रेक कदाचित होत होते. ती ज्याच्याकडे पाहून स्मित करील त्या तोफखान्यामधल्या कुणाहीबरोबर जाऊन ती आपला विश्वासघात करील अशी सतत अविश्वासाची भावना द्रोझ्दोवस्कीच्या मनात रुजली होती.

"हे खरं नाही!" तो म्हणाला. "माझा तुझ्यावर विश्वास नाही!"

आणि एकाएकी झोयाला जाणवले की, आपल्या निष्पापतेचा कोणताही पुरावा देणे शक्य नाही, कोणतेही समर्थन सिद्ध करणे शक्य नाही. तिच्या मनाचा थरकाप उडाला. कोणत्याही सबबी सांगण्याची तिची इच्छा नव्हती आणि तिच्यात ताकदही राहिली नव्हती. त्याचा हट्टी स्वभाव जाणून ती मुकाटपणे त्याच्यासमोर उभी राहिली. त्याच्या नितळ, स्वच्छ कपाळाकडे रोखून पहात ती उभी होती. त्या कपाळावर मायेने हात फिरवावा, त्याला जवळ घेऊन कुरवाळावे असे तिला वाटत होते.

"पण मी खरंच तुझ्यावर प्रेम करते", ती म्हणाली. "मी किती प्रेम करते याची तुला कल्पना करता येणार नाही. का विश्वास ठेवीत नाहीस माझ्यावर?"

खिशातले हात बाहेर काढून तो तिच्या दिशेने एक पाऊल पुढे सरला.

"सिद्ध कर! तू माझ्यावर प्रेम करतेस हे सिद्ध कर! तुला ते सिद्ध करायची इच्छा नाही!" तो म्हणाला आणि आवेगाने त्याने तिचे खांदे पकडले. "आपण सिद्ध केलं पाहिजे! सहा आठवडे आपली ओळख आहे! तू माझ्यावर प्रेम करतेस हे सिद्ध कर!"

तिच्या प्रतिकारविहीन पाठीभोवती त्याच्या हातांनी घट्ट विळखा घातला आणि त्याने तिची भराभर चुंबने घेऊन तिला पूर्णपणे गुदमरून टाकले. अर्धवट डोळे मिटून ती वेदना झाल्याप्रमाणे अस्पष्ट विव्हळत चीत्कार काढीत होती. तिने त्याच्या बटणे सुटलेल्या कोटात हात खुपसून त्याला मिठी घातली, त्याच्या गुडघ्यांना आपले गुडघे घट्ट दाबले आणि त्याच्या गुदमरवून टाकणाऱ्या चुंबनांपासून सुटका करून घ्यायला ओठ बाजूला करण्याचा प्रयत्न केला.

त्याने तिचे डोके मागे वाकवले आणि एकदम तो तिच्यापासून दूर सरला.

"मी दिवा विझवतो," घोगऱ्या आवाजात तो म्हणाला. "इथं कुणीही येणार नाही. घाबरू नको. कुणीही इथं येणार नाही, ऐकू आलं तुला? आपण एकटे असू–"

"नको. मला नकोय ते. बोलोद्या, मला माफ कर, माझ्यावर दया कर", डोळे मिटून धापा टाकीत ती म्हणाली. "आपण ते नको करायला, आपण आत्ता करू शकत नाही."

"पण हे असंच चालू ठेवणं मला अशक्य आहे. तुला समजत नाही का–मला शक्य नाही!"

"माझं तुझ्यावर प्रेम आहे, खूप प्रेम आहे", थरथर कापत, प्रतिकार करण्याचा प्रयत्न करीत ती अस्फुटपणे म्हणाली. "पण ते नको. नाहीतर आपण मग एकमेकांचा तिरस्कार करायला लागू. मी तुझ्यावर प्रेम करते आणि आपण एकमेकांचा तिरस्कार करावा असं मला वाटत नाही!"

त्याने पुन्हा तिच्या खांद्यांना धरून स्वतःकडे हिसका दिला.

"का? का?"

"मी सांगितलंय तुला. आपण एकदा तसं केलं... वोलोद्या, त्यानंतर आपण एकमेकांना चेहरा दाखवू शकलो नाही. नंतर तू कपाळाला आठ्या घालून किती सिगरेटी ओढल्यास ते मला आठवतंय... वोलोद्या, थोडं समजून घ्यायचा प्रयत्न कर, ही वेळ नव्हे. मी आता तसं करू शकत नाही, मला तसं वागून चालणार नाही. समजत नाही का तुला? मला माफ कर..."

आपल्या डोळ्यांनी, आपल्या आवाजाने त्याची आर्जवे करीत ती रडू लागली. तिच्या अश्रूंचे कारण मात्र तिचे तिलाच समजत नव्हते. जणू त्याची क्षमायाचना करावी अशा तऱ्हेने तिने आपल्या थरथरणाऱ्या थंडगार ओठांनी त्याच्या हनुवटीची व मानेची चटकन अपराधी भावनेने चुंबने घेतली.

"मूर्खपणा! म्हणे मी तुझा तिरस्कार करीन! खोटारडी तर वागत नाहीस? मला या सर्व गोष्टींचा वीट आलाय! वीट आलाय!"

त्याने तिला बाजूला ढकलले आणि डोक्यावर टोपी ओढून तो तिथून ताडताड बाहेर पडला. जाताना त्याने दार एवढ्या जोराने आपटले की, त्या हादऱ्याने दिव्याची ज्योत त्या धुरकट काचेखाली बराच वेळ थरथरत राहिली.

## प्रकरण आठवे

त्या सुळक्यावर खोदलेल्या पायऱ्या चढून तो वर पोहोचला. बर्फावरून वाहणाऱ्या गार वाऱ्याने त्याचे डोके थोडेसे शांत झाले. दात गच्च आवळून त्याने पुन्हा एकदा म्हटले:

"मूर्ख आहे ती! निव्वळ मूर्ख! सगळा वेडपटपणा!"

आपल्या स्वतःच्या अगतिकतेबद्दल आणि तिच्या वेडपट भीतीबद्दल त्याच्या मनातील तिरस्कार व चीड वाढू लागली. तोफखाना ज्यावेळी प्रथम हलविण्यात आला त्यावेळी वैद्यकीय ठाण्यावर ती एकटीच कामावर होती आणि फक्त त्या एकच वेळी ती दोघे संपूर्ण एकत्र आली होती. आता पुन्हा तशी जवळिक करण्यास तिने नकार दिला होता आणि

त्याचाच त्याला एवढा अपमान वाटला होता की, रागाच्या भरात पुन्हा तिच्याकडे जाऊन तिच्या मुस्कटात भडकविण्याची त्याला जबरदस्त इच्छा होत होती. पण त्याचवेळी तो स्वतःला बोल लावीत होता. आपल्या मनातून सारे काही उपटून काढून टाकायला त्याला जमत नव्हते, याचा त्याला मनस्वी त्रास होत होता. त्याच्या हातांना, त्याच्या शरीराला स्वतंत्र आठवणी होत्या. वैद्यकीय ठाण्यात ती दोघे एकत्र आल्यानंतर, तिच्या स्पर्शानंतर, तिचे मिटले डोळे, तिचे थरथरणारे पाय, तिच्या चपळ शरीराच्या भित्र्या हालचाली—या सर्वांची आठवण ती समोर असेपर्यंत त्याला सतत छळणार होती.

"छे:! सारे काही संपलेय!" त्याने स्वतःला बजावले व आपल्यातील तिरस्कार वाढेल अशा गोष्टी तो आठवू लागला—तिची जिवणी फार मोठी होती, तिची भेदरलेली मुद्रा विचित्र दिसत होती, तिचे स्तन फारच लहान होते, तिच्या पोटऱ्या फारच लठ्ठ होत्या आणि तिच्या अरुंद नमदी बुटांमध्ये ठसून गच्च बसवल्यासारख्या दिसत होत्या. आपल्यामधील चीड पुन्हा उसळून येईल आणि तिच्याबरोबर पुन्हा समेट अशक्य होईल असे काहीतरी तो आठवू इच्छित होता. "एवढे मी पाहिले तरी काय तिच्यात? ती सुंदरदेखील नाही! तिच्यात काहीच नाही. कसले हे वेडगळ नाते! मला या सर्व गोष्टींना कायमचा विराम ताबडतोब दिला पाहिजे. कायमचा!"

आपल्या विचारांच्या नादात त्याच्या लक्षात आले नाही की, वारा आणि हिमवर्षाव थोडा कमी झाला आहे व कोरडा गारठा निर्माण झाला आहे. डिसेंबरामधील त्या रात्रीच्या आकाशातील तारकापुंज क्षितिजाकडे सरकले होते व त्यांच्यातील पहाटेपूर्वीची अखेरची धुगधुग त्या बर्फावरच्या आकाशात पेटत होती. जमिनीवर खेड्यातली घरांची छपरे अधिक जवळ सरकल्यासारखी वाटत होती आणि बर्फाच्या पार्श्वभूमीवर ती अधिक कृष्णवर्णी भासत होती. त्यांच्यापलिकडील आकाशात उजळलेले दोन पट्टे आता फिके पडले होते व त्यांचे अर्धवर्तुळात रूपांतर होऊन खेड्यापलिकडच्या आकाशाचा सबंध दक्षिण गोलार्ध त्याने व्यापला होता.

त्या अर्धवर्तुळाच्या टोकांना काहीतरी चमकत असल्याचा त्याला क्षणभर भास झाला. खिंडीपलिकडच्या छोट्या टेकड्यांच्या टोकाला दूरवर पुढचे दिवे चमकत असल्यासारखे त्याला वाटले. मग त्याला

जाणवले की, वाऱ्याच्या घोंघावण्यात रणगाड्यांच्या इंजिनांची घरघर व घसरणाऱ्या चकांचा खडखडाट मिसळलेला आहे. फळी फोडून जर्मन सेना तर खेड्याच्या दिशेने, त्याच्या तोफखान्याच्या दिशेने येत नव्हती ना?

त्याने तो आवाज ऐकत सिगरेट पेटवली आणि ती जोरजोराने झुरके घेऊ लागला. तीरावर आणि तोफखान्याच्या मोर्चांवर वारा बर्फाचे सपकारे मारीत होता. सुळक्याच्या ऐन टोकावर गोठलेल्या वाळुंजीच्या झाडांच्या फांद्या काटेरी तारांसारख्या दिसत होत्या. आणि एकाएकी तो इंजिनांचा आवाज, ती अदृश्य हालचाल पूर्णपणे थांबली.

हे केवळ मनाचे खेळ अशी त्याने स्वतःची समजूत घातली व विरत जाणाऱ्या अंधारात स्पष्टपणे दिसणाऱ्या टेहळणीच्या मोर्चाकडे तो निघाला.

त्या उंचवटयाच्या माथ्यावर तो पोचला तेव्हा दळणवळणाचा चर केवळ गुडघाभर खोल खणलेला होता आणि माणसे आपली फावडी व कुदळी घेऊन सुतारपक्षांप्रमाणे सतत खणत होती. द्रोझ्दोवस्कीच्या चेहऱ्यावर पुन्हा निर्विकार भाव उमटला. चराच्या पुढच्या बांधावर, मुख्य ठाण्याच्या पलटणीचा उंच, धिप्पाड कमांडर सार्जंट-मेजर गलोवानोव दुर्बीण बसवीत होता. द्रोझ्दोवस्कीला पाहताच तो त्याच्याजवळ गेला.

"कॉम्रेड लेफ्टनंट, मी आत्ताच तुम्हाला फोन केला होता. वैद्यकीय मदतनीस म्हणाली की, तुम्ही नुकतेच तिथून बाहेर पडलात. पाच मिनिटांपूर्वी डिव्हिजन कमांडरची गाडी पुलाच्या जवळपास आलीय. काहीतरी गडबड आहे. डिव्हिजनचं टेहळणी पथक अजून परत आलेलं नाही."

"एवढ्या उशिरा का सांगतोयस तू हे?" द्रोझ्दोवस्की रागाने म्हणाला. "पाच मिनिटांपूर्वीच का फोन केला नाहीस?"

"मी फोन केला होता," गलोवानोव आपल्या मोठ्या आवाजात म्हणाला. "पाच मिनिटांपूर्वीच कॉम्रेड लेफ्टनंट, तुमची बायको म्हणाली – माफ करा, वैद्यकीय मदतनीस म्हणाली –"

"चूप रहा गलोवानोव! काय डोकं फिरलंय तुझं? कुठली बायको?" द्रोझ्दोवस्कीने त्याचे बोलणे तोडले. गलोवानोवचा स्पष्टवक्तेपणामुळे झालेला गोंधळ आणि पुढच्या चरात तीन टेहळ्यांनी यंत्राप्रमाणे भराभरा खणायला केलेली सुरुवात, या सर्वांचा अर्थ द्रोझ्दोवस्कीला पुरता उमगला.

"माझ्याबद्दल अशा अफवा कोण पसरवतंय?" तो खालच्या आवाजात बोलू लागला. "गलोवानोव, तू? कोण मग? सार्जंट-मेजर, याचा मी पुरता छडा लावीन! डिव्हिजनमधून कोण आलंय?"

"तीन गाड्या आल्यात, कॉम्रेड लेफ्टनंट. त्यातली एक मी ओळखतो—कर्नल देयेव यांची."

"स्वतःला टेहळ्या म्हणवतोस—तुला सारं काही माहीत असायला पाहिजे!"

द्रोझ्दोवस्की टेहळ्यांच्या अंगावरून पुढे तोफांकडे गेला. टेहळे फावडी हातात धरून चराच्या भिंतीला पाठी टेकवून स्तब्ध उभे राहिले. "तुमची बायको... तुमची बायको..." त्याचा चेहरा क्रुद्ध झाला. सबंध तोफखान्यामध्ये हा चर्चेचा विषय झाला असणार याची त्याला जाणीव झाली.

टेहळणी मोर्चाच्या डाव्या अंगाला खालच्या तीरावर बांधलेल्या तोफांच्या मोर्चाकडे तो सुळक्याच्या टोकावरून खाली धावत निघाला, तेव्हा द्रोझ्दोवस्कीच्या नजरेला त्या तीन गाड्या दिसल्या व त्यांच्यापासून सुमारे तीनशे मीटर अंतरावर, पहिल्या तोफेच्या मोर्चाभोवती, लोकांचा एक जमाव उभा होता. तोफांमध्ये दळणवळणाचे चर खणणारे लोक त्या जमावातील लोकांच्या दिशेने मधूनमधून पहात होते. द्रोझ्दोवस्की तिथून धावत जात असताना त्या चरामधील एका बुटक्या आकृतीने, नाकाखाली ओला गळपट्टा बांधलेल्या, दाढी वाढलेल्या निमुळत्या चेहऱ्याच्या चिबिसोवने, त्याच्याकडे वळून पाहिले.

"कॉम्रेड लेफ्टनंट, तिथं कर्नल आणि वरचे जनरलसाहेब आहेत, हातात काठी घेतलेले... काहीतरी घडेल अशी त्यांची अपेक्षा आहे. लौकरच लढाईला तोंड फुटेल असं वाटतं!"

"तुझा गळपट्टा ओला झालाय! जरा स्वतःला स्वच्छ कर. तुला बघवत नाही अगदी! चिखलात लडबडलेल्या कोंबडीसारखा दिसतोयस!" द्रोझ्दोवस्की तुसड्या आवाजात म्हणाला. "कुझ्नेत्सोव कुठं आहे? दावलात्यान कुठं आहे?"

"ते सगळे तिथं आहेत," चिबिसोव नाकात सूं सूं करीत म्हणाला.

आपल्या पायघोळ कोटाची बटणे नीट लावली आहेत किंवा नाही याची द्रोझ्दोवस्कीने सवयीनुसार चटकन बोटे फिरवून चाचपणी केली

व तो पहिल्या तोफेकडे धावला. त्या इतर अपरिचित व्यक्तींमध्ये त्याने जनरल बेस्सोनोव व कर्नल देयेव यांना ओळखले व सलाम ठोकला.

"कॉम्रेड जनरल, पहिल्या तोफखान्याचा कमांडर, लेफ्टनंट द्रोझ्दोवस्की!" श्वास रोधून त्याने हजरी दिली.

हुद्द्याच्या कोणत्याही फिती न लावलेले मेंढकातडी कोटातील बेस्सोनोव मागे वळले. ते बुटके, सडपातळ व्यक्तिमत्वाचे असल्याने जनरल म्हणून प्रथमदर्शनी त्यांची अनोळखी माणसाला ओळख पटणे अवघड होते. द्रोझ्दोवस्कीच्या फिकट, निश्चल चेहऱ्यावर त्यांचे कठोर, तीक्ष्ण डोळे रोखले गेले. त्यांच्या पापण्या काहीशा सुजलेल्या होत्या. कान झाकणारी साध्या सैनिकाची टोपी घातलेले, तलवारीचा पट्टा व पिस्तुलाची चामडी पिशवी कमरेला लटकावलेले, तांबड्याबुंद चेहऱ्याचे, रसरशीत प्रकृतीचे कर्नल देयेव आपल्या फिकट तांबूस पिवळसर रंगाच्या भुवया किंचित नापसंती दर्शवीत उंचावून आपल्या खणखणीत आवाजात गरजले :

"एवढा सारा वेळ कुठं होता तोफखाना कमांडर?"

"टेहळणी मोर्चावर, कॉम्रेड कर्नल," द्रोझ्दोवस्कीने स्पष्टपणे उत्तर दिले." चर खणायचं शेवटचं काम पुरं होत आलंय."

कोणत्या कारणामुळे ही माणसे येथे आली याचे त्याला आश्चर्य वाटत होते व त्यामुळे तो अस्वस्थ बनला होता. टेहळणी पथकाच्या परतीची ते वाट पहात होते का? का केवळ तोफखान्याची पाहणी करायला? पण इथे तर सेनापती स्वतः आले होते!

"द्रोझ्दोवस्की?" बेस्सोनोव यांनी आपल्या करकऱ्या आवाजात पुन्हा नांव उच्चारले. "हे नांव कानांना परिचित वाटतं. मला वाटतं, मी पूर्वी केव्हातरी हे नांव ऐकलं आहे?"

आठवणीचा सुटलेला धागा पकडण्याचा प्रयत्न करीत असल्याप्रमाणे त्यांनी द्रोझ्दोवस्कीच्या पलिकडे अज्ञातात नजर टाकली, पण दरम्यान त्यांना दुसरीच कसलीतरी आठवण झाली आणि त्यांनी कपाळाला आठ्या घातल्या. आपली नजर देयेव यांच्याकडे वळवून त्यांनी विचारले,

"कर्नल, तुमच्या टेहळणी पथकाचं काय झालं?"

बेस्सोनोव यांच्या बरोबरची सारी माणसे—नकाशा आपल्या बॅगेवर पसरलेले वयस्क लेफ्टनंट-कर्नल, डिव्हिजनच्या टेहळया पथकाचे प्रमुख

आणि उंच, लांबड्या पायांचे लष्करी मंडळाचे सदस्य वेस्निन, कमालीचे तरुण, तोंडावर चमत्कारिक काळे ठिपके असलेले बसक्या नाकाचे मेजर चेरेपानोव, तीरावरच्या विभागावर मोर्चे बांधलेल्या पायदळ रेजिमेंटचे कमांडर—ही सर्व माणसे बेस्सोनोव जेव्हा द्रोझ्दोवस्कीबरोबर बोलत होते तेव्हा त्याच्याकडे पहात होती, पण सेनापतींनी टेहळ्या पथकाचा उल्लेख करताच द्रोझ्दोवस्कीला चटकन सारे विसरले. साऱ्यांच्या नजरा क्षितिजावरील फिकट होत चाललेल्या उजेडाच्या दिशेने वळल्या. तिकडून आता वाऱ्याच्या झोतांबरोबर लहान-मोठ्या प्रमाणात घरघराट ऐकू येत होता.

"टेहळ्यांशिवायही काहीतरी स्पष्टपणे आपल्याला समजून येतंय," बेस्सोनोव म्हणाले. "विताली इसायेविच, तुम्हाला काय वाटतं?"

"होय, मलाही तसंच वाटतं", वेस्निन उत्तरले. "अगदी स्पष्ट हालचाल जाणवते आहे".

"मला वाटतं आपण टेहळणी मोर्चावर परत जाऊ या", देयेव आपला ठणठणीत आवाज शक्यतो लहान करण्याचा प्रयत्न करीत अस्वस्थ-पणे म्हणाले. "कॉम्रेड कमांडर, टेहळणी पथक अडचणीत सापडलं असावं. कसं समजावून सांगायचं ते मला अजिबात समजत नाही..."

"काय म्हणालात तुम्ही?" सेनापतींचा सूर अचूकपणे दुश्चिन्ह सुचवीत होता. पण तरीही देयेव यांना जे म्हणायचे होते ते त्यांनी बोलून टाकले.

"टेहळणी पथकाची इथं वाट पहात बसण्यात काही अर्थ आहे असं मला वाटत नाही."

"मलाही तसं वाटत नाही", बेस्सोनोव तीक्ष्ण आवाजात म्हणाले. "आणि अशा टेहळणी पथकाबद्दल कुणाला तरी जबाबदार धरले जाणार आहे याची मी तुम्हाला आत्ताच जाणीव करून देतो कर्नल!"

"आता जवळजवळ उजाडलंय", वेस्निन उद्गारले.

टेहळणी पथकाच्या प्रमुखांची दुर्बीण त्यांनी मागून घेतली आणि उजळलेले क्षितिज व पुढे स्पष्ट दिसणारे खेडे त्यांनी न्याहाळले. दुर्बीणीशिवायही जवळची आणि दूरची प्रत्येक वस्तू आता स्पष्ट स्वरूपात दिसत होती—सबंध रात्र झोपेविना असलेल्या आघाडीवरच्या लोकांचे चेहरे नाककानडोळेविरहित भुऱ्या मुखवट्यांसारखे दिसत होते; तोफा,

खंदकांपुढच्या बांधांवरील मातीची ढेकळे, बर्फामधून डोकावणारी झुडुपे, त्यांच्या वाऱ्यामध्ये कडकड वाजणाऱ्या उघड्याबोडक्या तुरकाट्या—या सर्व गोष्टी स्पष्ट दिसत होत्या. पूर्वेला डिसेंबरातली ती अनिश्चित पहाट एव्हाना गुलाबी छटा घेऊन उगवू लागली होती.

एकाएकी सबंध क्षितिजभर हादरवून टाकणारा घरघराट उमटला. जणू काही स्तेपवरून एक प्रचंड लोखंडी गोळा गडगडू लागलाय असा भास झाला. त्याच क्षणाला दोन रंगांच्या प्रकाशशलाका एकापाठोपाठ खेड्यापलिकडे अर्धवर्तुळात उडाल्या आणि लाल व निळया रंगांच्या शेकडो ठिणग्या त्यांनी उधळल्या.

याचीच आम्ही वाट पहात होतो! द्रोझ्दोवस्कीच्या उत्तेजित मनात विचार आला. हा जर्मनांचा इशारा आहे. खरेच ते इतके जवळ आलेत? एवढे कसे ते जवळ आले? आणि हा आवाज कशाचा येतोय?

तो घरघराट आता जणू पृथ्वी आणि आकाश यांच्यामध्ये पिंजून निघत होता. आता तो गडगडणाऱ्या लोखंडी गोळ्यासारखा वाटत नव्हता. कधी तो दुरून ऐकू येणाऱ्या विजांच्या कडकडाटासारखा वाटत होता, तर कधी खळाळत, तुफान वेगाने धावून येणाऱ्या नदीच्या प्रवाहाच्या गर्भात जसा घनगंभीर आवाज उमटतो तसा वाटत होता.

एखाद्या सजीव शरीराप्रमाणे धरती थरथरू लागली. आणि तरीही येणाऱ्या त्या गर्जनेला दिशा दाखविण्यासाठी खेड्यावरून अर्धवर्तुळात त्या तांबड्या—निळ्या प्रकाशशलाका सतत उडत राहिल्या.

"हे काय आहे? रणगाडे का विमाने? आता सुरू होणार वाटतं? का एव्हाना सुरुवात झाली? कुणीतरी "जय्यत तयारी"चा हुकूम दिला पाहिजे! मला काहीतरी केले पाहिजे!"

द्रोझ्दोवस्कीने स्वतःला काबूत ठेवले आणि हुकूम दिला नाही. त्याने पाहिले की, जनरल गंभीरपणे आकाशाकडे पहात आहेत, कर्नल देयेव भुवया जुळवून उभे आहेत, क्षितिजावर जेथे आकाश उजळले होते त्या रेषेवर वेस्निन यांच्या हातातील दुर्बीण स्थिरावली आहे. नंतर वेस्निन यांनी टेहळणी प्रमुखांना दुर्बीण परत दिली, डोळ्यांवरचा चष्मा काढला आणि बेस्सोनोव यांच्याकडे ते वळले. चष्म्याशिवाय त्यांचा चेहरा अगदीच मोकळाढाकळा वाटत होता. एखादी अपरिहार्य बातमी देताना चेहरा फुलावा तसा भाव त्यांच्या मुद्रेवर होता.

"प्योत्र अलेक्सांद्रोविच, ते येताहेत. त्यांच्या झुंडी येताहेत!"

त्या उजेडाच्या पट्ट्याच्या ठिकाणी काहीतरी लालसर चमकू लागले होते, वीज चमकल्यासारखा भास होत होता. वादळी ढगाप्रमाणे तो पट्टा सरळ खेड्याकडे सरकत होता. सतत ऐकू येणारा इंजिनांचा घरघराट त्या मेघाशी एकजीव झाल्यासारखा भासत होता. आणि आता त्या मेघामध्ये खच्चून बाँब भरलेल्या युंकर जर्मन विमानांच्या छाया स्पष्ट दिसत होत्या. आपल्या प्रचंड झुंडींनी त्यांनी दक्षिणेकडून येताना क्षितिजावरचा अर्धा प्रकाश झाकून टाकला होता. द्रोझ्दोवस्कीला त्यांची मोजदाद करणे अशक्य ठरले. ते खेड्याकडे, तोफखान्याच्या दिशेने येत आहेत हे जेवढे अधिकाधिकपणे स्पष्ट होत गेले तेवढे बेस्सोनोव यांच्या मुद्रेवर भाव अधिकाधिक कठोर होत गेले. त्यांचा चेहरा एखाद्या खडबडीत खडकासारखा बनला. वेस्निन यांचे डोळे आकाशाकडे बघत नव्हते तर ते सेनापतीच्या चेहऱ्यावर प्रश्नार्थकपणे खिळले होते आणि त्यांची उघडी बोटे (ते हातमोजे घालायला विसरले होते व त्यांच्या कोटाच्या खिशातून अद्याप ते हातमोजे बाहेर डोकावत होते) अभावितपणे चष्म्याच्या काचा त्यांच्या कॉलरवरच्या लोकरीला पुसण्याचा चाळा करीत होती.

पुन्हा द्रोझ्दोवस्कीच्या मनात विचार आला: "असे हे इथे उभे का आहेत? काही हुकूम का देत नाहीत? ते इथे असताना मी काय केले पाहिजे?"

त्याच क्षणाला रुबाबदार अॅडज्युटंटच्या कोटातील मेजर बोझिच्को बांधावरून तोफेजवळच्या खड्ड्यात स्केटिंग केल्याप्रमाणे घसरत खाली आले—ते मोटारींपासून पळत आले असावेत—आणि सेनापतीला आठवण करून देण्याच्या अथवा विशिष्ट मागणी करण्याच्या आपल्या अॅडज्युटंटच्या अलिखित अधिकाराला अनुसार ते बेस्सोनोव यांना उद्देशून ओरडले.

"कॉम्रेड कमांडर, मी तुमची मोटार आणू? आपल्याला इथून निघालंच पाहिजे!"

"कदाचित बाँबवर्षाव थांबेपर्यंत तुम्ही इथंच थांबणं इष्ट ठरेल कॉम्रेड जनरल?" आपल्या भुवयांमधून डोळे बारीक करून विमान पहात देयेव यांनी सुचविले. "धडाका सुरू होण्यापूर्वी आपण टेहळणी ठाण्याला पोहोचू असं मला वाटत नाही."

"कॉम्रेड कमांडर, आपण पोहोचू अशी मला खात्री आहे!" बोझिच्को यांनी आश्वासन दिले व देयेव यांच्याकडे पुन्हा वळून ते म्हणाले, "स्पीडोमीटरवर मी पाहिलंय, फक्त तीन किलोमीटर अंतर आहे. आपण तिथं नक्की पोहोचू".

"अर्थात आपण पोहोचू!" वेस्निन एकाएकी जाग आल्याप्रमाणे म्हणाले. आपला चष्मा त्यांनी डोळयांवर चढवला आणि पहाटेला झाकोळून टाकणाऱ्या त्या काळया तुकड्या व नदीच्या दुसऱ्या तीरावर टेकडीच्या माथ्यावर वसवलेले टेहळणी ठाणे यांच्यामधील अंतराची त्यांनी तुलना केली. "केवळ चार किलोमीटर, बोझिच्को?" ते म्हणाले आणि देयेव यांना उत्तेजित स्वरात त्यांनी विचारले, "हेच त्यांचं लक्ष्य आहे याची तुम्हाला खात्री पटलीय? ते स्तालिनग्रादकडे जात असणं शक्य नाही?"

"मला ते नक्की सांगता येणार नाही."

बेस्सोनोव शुष्कपणे हसले. "हेच त्यांचं लक्ष्य आहे. आघाडीचा प्रदेश. अगदी नक्की. जर्मन भलता धोका पत्करीत नाहीत. हवाई छत्राशिवाय ते हल्ला चढवणार नाहीत. तेव्हा चला. तीन किलोमीटर काय किंवा चार काय—त्यानं फारसा फरक पडत नाही." आणि आता एकाएकी योगायोगाने त्यांना द्रोझ्दोवस्कीची आठवण झाली. तो अद्याप तिथेच हुकुमाची वाट पहात त्यांच्या बाजूला उभा होता. "लेफ्टनंट, प्रत्येकानं आडोसा घेतला पाहिजे. बाँबच्या हल्ल्यातून सहीसलामत अख्खे सुटा. मग प्रमुख हल्ला येईल—रणगाड्यांचा. तर लेफ्टनंट, तुझं नांव द्रोझ्दोवस्की ना?" पुन्हा काहीतरी आठवायचा प्रयत्न करीत त्यांनी विचारले. "मी हे नांव कुठंतरी पूर्वी ऐकलंय, मला आठवतंय. आणि तुझ्याबद्दल पुढं जास्त जास्त ऐकायला मिळेल अशी आशा धरतो लेफ्टनंट द्रोझ्दोवस्की! एकही पाऊल माघार घ्यायची नाही! त्यांचे रणगाडे जमीनदोस्त करा. भक्कम पाय रोवून उभे रहा आणि मरणाबद्दल सारं काही विसरा! कोणत्याही परिस्थितीत मरणाचा विचार करू नका! लेफ्टनंट, तुझा तोफखाना मोठी कामगिरी बजावू शकेल! उत्तमाची अपेक्षा करू या!"

खंदकापुढच्या बांधावर ते चढले आणि किंचित लंगडत मोटारींकडे निघाले. त्यांच्या मागून ॲडज्युटंट व कर्नल निघाले. टेहळणी प्रमुख

मान्याच्या रेषेच्या अलिकडे घुटमळले. पायरीवर एक पाय ठेवून, नकाशा अजूनही तसाच गुडघ्यावर धरून, समोरच्या खेड्यापुढील मोकळ्या मैदानाची ते अद्यापही दुर्बीणीतून न्याहाळणी करीत होते. आपल्या टेहळ्यांचे काय झाले ते समजल्याशिवाय तेथून जायला त्यांची तयारी नव्हती. वेस्निन यांनी त्यांच्या खांद्यावर समजावणीच्या पद्धतीने थोपटले व चलण्याची खूण केली. गप्प राहिलेले लेफ्टनंट-कर्नल खिन्नपणे दळणवळणाच्या चरातून जड पावले टाकीत निघाले. तोफेपासून पाच मीटर अंतरावर सुळका चढायला आरंभ करताना वेस्निन क्षणभर थांबले व आव्हानात्मक सुरात द्रोझ्दोवस्कीला म्हणाले,

"तोफखाना कमांडर, ते आपल्याला चांगलेच शेकून काढणार असा रंग दिसतोय! पहिल्यांदा तोंड देताना तुला घाबरल्यासारखं वाटतंय?"

"नाही कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार!"

"छान! चालू द्या पुढे, तोफखाना कमांडर!"

काही सेकंद द्रोझ्दोवस्की अगदी ताठ उभा राहिला, पण ज्या क्षणी ते बांधाच्या पलिकडे अदृश्य झाले त्याच क्षणी त्याने एखाद्या आंधळ्या माणसाने पहावे त्याप्रमाणे काळवंडलेल्या आकाशाकडे नजर टाकली. तिथे सारे काही घरघरत होते आणि फिरत होते. आणि एकाएकी त्याच्या छातीमधून विलक्षण अशी आरोळी उमटली "तोफखाना! सारे आडोसा घ्या!"

दुसऱ्याच क्षणी तो टेहळणी टोकाकडे धावत निघाला. तोफांजवळच्या पांढरेफटक चेहरे पडलेल्या माणसांना मागे टाकून तो धावत होता, गडगडणाऱ्या आभाळाखाली दबल्याप्रमाणे पाठी वाकवून बसलेल्या माणसांना मागे टाकून तो धावत होता.

## प्रकरण नववे

इंजिनांचे जोरदार रोरावणे त्यांच्यावर जणू कोसळत होते, सारे आवाज चिरडून टाकून ती घरघर त्यांच्या कानांचे पडदे फाडत होती.

विमानांच्या पहिल्या फेरीने रचना बदलून गोलाकार वर्तुळ धरले. खेड्यातील घरांपलिकडून तांबड्या निळ्या प्रकाशशलाकांची कारंजी

जर्मनांनी उडवलेली कुझ्नेत्सोवने पाहिली. त्यानंतर उत्तरादाखल आघाडीच्या युंकर विमानाकडून धुराची एक रेषा उमटली व तांबडच्या रंगाचा प्रकाश उधळीत ती फुटली आणि चकाकत्या पंखांच्या पृष्ठभागां-मुळे तो तांबडा रंग फिकट पडून गुलाबी आभा पसरली. नेमके लक्ष्य कोठे आहे याचा अंदाज घेण्यासाठी जर्मन एकमेकांना संदेश देत होते, पण कोणते लक्ष्य ते धरताहेत याचा अंदाज करण्याचा प्रयत्न कुझ्नेत्सोवने एव्हाना सोडून दिला होता. आतापर्यंत सारे काही स्पष्ट समजून चुकले होते. एका पाठोपाठ एक युंकर वर्तुळाकार फेरा धरीत झेपावू लागले. त्यांनी खेडयाला, नदीतीराला, पायदळाच्या खंदकांना, शेजारच्या तोफखान्यांना वेढून टाकणारे भलेमोठे रिंगण धरले. आता एकाएकी हवेला एक नवीच घनता प्राप्त झाली आणि या घन, परंतु पारदर्शी अशा हवेने आघाडीच्या प्रदेशात एक कडे धरले. या कडयामधून जणू कुणीही सुटू शकत नव्हते. दूर तीरावर खुले स्तेप उगवत्या सूर्याच्या प्रकाशात चमकताना दिसत होते आणि टेकडया एव्हाना सकाळच्या कोवळ्या उन्हात शांतपणे उजळलेल्या दिसत होत्या, तरी हे कडे भेदून तिथे जाणे अशक्यप्राय ठरले होते.

"लपा! ... लपा!" तोफांच्या मोर्चांपासून आणि खालच्या तीरा-वरून जोरजोराने ठोकलेल्या आरोळ्या अजूनही ऐकू येत होत्या.

एका तोफेच्या डाव्या अंगाला, उखानोव आणि चिबिसोव यांच्याबरोबर कुझ्नेत्सोव एका खंदकात उभा होता. त्या तिघांना त्या खंदकात मावणे जरा कठीणच जात होते. पायाखालच्या जमिनीचे हादरे त्यांना जाणवत होते. वातावरण हलवून टाकणाऱ्या इंजिनांच्या घरघराटाने अंगावर भराभर मातीची ढेकळे कोसळत होती. अगदी जवळ उभ्या असलेल्या चिबिसोवचा त्रिकोणी चेहरा कुझ्नेत्सोवने पाहिला. चिबिसोवचे काळेभोर डोळे आकाशाकडे भेदरून पहात होते आणि मंत्रमुग्ध झाल्यासारखा तो एका जागी खिळून उभा होता. त्याच्या पुढे उभ्या असलेल्या उखानोवची हनुवटी वर उचललेली होती व त्याचे फिकट रंगाचे डोळे काहीतरी जोरजोराने मोजत असल्याचे जाणवत होते. एखादे वाईट स्वप्न पडले असताना माणूस जसा काहीतरी प्रचंड व भयानक वस्तू पाहून अंग ताठरून राहतो, तशा अवस्थेत कुझ्नेत्सोव उभा होता.

"अठ्ठेचाळीस", उखानोवने एकदाची मोजणी पुरी करून सुटकेचा निश्वास टाकला. चिबिसोवकडे त्याने न समजल्याच्या नजरेने पाहिले आणि त्याच्या वाकलेल्या खांद्याला धक्का दिला. "ए, काय झालं रे बाबा तुला? तुला अगदी हुडहुडी भरलेली दिसते. अरे, हे मरणापेक्षा काही आणखी वाईट नसणार. आणि थरथर कापून, हुडहुडी भरून काही उपयोग होणार नाही".

"ते इकडे येताहेत! सरळ आपल्यावर!"

ती आरोळी आणि चिबिसोवचे विस्फारलेले डोळे यांच्यामुळे कुझ्नेत्सोवने चमकून वर पाहिले आणि त्याच क्षणी आकाशातून मृत्यूचा जळता श्वास एखाद्या लोळासारखा तोंडावर कोसळत असल्याचा त्याला भास झाला. काहीतरी चकाकते, प्रचंड आकाराचे झेपावत होते व त्यावरच्या काळयापांढऱ्या फुल्या स्पष्ट दिसत होत्या – आघाडीचे युंकर होते का ते? – उडता उडता मध्येच अडखळल्याप्रमाणे एक सेकंदभर ते थांबल्यासारखे वाटले आणि आपले काळे पंजे पसरून, दोन करवती एकमेकांवर घासल्यानंतर येतो तसा आवाज करीत, प्रचंड कानठळ्या बसविणारा घरघराट करीत ते सरळ कुझ्नेत्सोवच्या डोळ्यातल्या बाहुल्यांवर थेट कोसळू लागले. अजून पुरत्या न उगवलेल्या सूर्याची लालभडक किरणे त्याच्या खालच्या बाजूच्या धातूवर पडून चकचकत होती आणि त्या चकचकाटाने कुझ्नेत्सोवचे डोळे दिपून त्याला काही दिसेनासे झाले होते. त्या चकचकाटात आणि घरघराटात अनेक काळ्या रंगाच्या लांबोळक्या वस्तू त्यातून सुटल्या व जमिनीवर जोराने मुक्तपणे आदळू लागल्या. त्यांच्या स्फोटांनी त्या घरघराटीने भरलेल्या वातावरणात आणखी आवाजांची भर टाकली.

तोफखान्याच्या दिशेने बाँब बेछूटपणे फेकले जात होते. आकाशातून येताना दर क्षणाला त्यांचा आकार वाढल्यासारखा वाटत होता. चकचकीत ओंडक्याप्रमाणे आकाशातून भिरभिरत येताना ते पाहणाऱ्याला धडकी भरवीत होते. आता त्या वर्तुळातल्या दुसऱ्या युंकरने खाली झेप घेतली. पोटात खड्डा पडल्यासारखा वाटून थरथर कापत कुझ्नेत्सोवने खंदकात बैठक मारली. खाली वाकत असताना त्याने पाहिले की, उखानोवचे डोळे अजूनही खाली पडणाऱ्या बाँबवर खिळले आहेत आणि उडणारे दगड चुकवावेत त्याप्रमाणे दर दणक्यागणिक तो डोके खाली करीत होता.

“खाली बैस!” त्या आवाजांच्या कल्लोळात कुझ्नेत्सोवला स्वतःचाच आवाज ऐकू आला नाही. फक्त त्याच्या हाताच्या बोटांनी त्याला सांगितले की, उखानोवच्या पायघोळ कोटाच्या किनारीला तो जोरजोराने खेचतो आहे.

उखानोवच्या कोसळणाऱ्या शरीरामुळे आकाश झाकले गेले आणि त्याचवेळी एक तप्त काळे वादळ खंदकावरून घोंघावत गेले. सारा खंदक गदगदून हलला आणि त्याच्या लक्षात आले की, उखानोव आता त्याच्या शेजारी नव्हता (त्याचे अवजड शरीर बाजूला फेकले गेले होते), त्याऐवजी चिबिसोवचा धुळीने माखलेला भेदरल्या डोळ्यांचा चेहरा त्याच्यासमोर होता. “नको, इथं नको! देवा कृपा कर!”—चिबिसोव पुटपुटत होता. त्याच्या गालावरच्या दाढीच्या खुंटांचा केस न् केस ताठ उभा राहिला होता. कुझ्नेत्सोवच्या छातीवर आपले दोन्ही हात टेकून जोरजोराने ओरडत तो खाली पडला व कुझ्नेत्सोव आणि खंदकाची हादरणारी भिंत यांमध्ये नसलेल्या जागेत दडण्याचा प्रयत्न करू लागला.

“मला मुलं आहेत हो... मुलं... मी मरून चालणार नाही... मला हक्क नाही मरायचा... माझी मुलं!”

धुराने आणि चिबिसोवच्या गच्च पकडीने कुझ्नेत्सोवचा श्वास अर्धा कोंडला गेला होता. स्वतःला मोकळे करून ताजी हवा घेण्याची कुझ्नेत्सोवची धडपड चालली होती. चिबिसोववर खेकसून त्याला गप्प करावे असे त्याला वाटत होते. पण त्याने श्वास घेतला तेव्हा स्फोटांमधून निघालेले वायू त्याच्या नाकातोंडात गेले व त्याला खोकल्याची जबरदस्त ढास लागली. मोठ्या कष्टाने त्याने चिबिसोवची पकड सोडवली. खंदक धुराने पुरता कोंदला होता. त्या धुराच्या काळ्या लोटांमध्ये व घरघरणाऱ्या विमानांमध्ये आकाश लोपले होते. आपले अक्राळविक्राळ काळे पंख पसरून धुरातून विमाने खाली झेपावताना क्षणभर चमकत होती आणि दुसऱ्याच क्षणी बाँबच्या स्फोटांनी खंदक गदगदून हादरत होते, बाँबचे कपचे सर्वत्र विखुरले जात होते, मृत्यूचे विविध सुरांमध्ये थैमान चालले होते, बर्फाचे आवरण बसलेली गोठलेल्या मातीची भलीमोठी ढेकळे उंच उडून परत जमिनीवर कोसळत होती.

एका मिनिटात सारे काही संपेल, अशी कुझ्नेत्सोवने स्वतःची समजूत घातली. आपले दात घट्ट आवळले गेले असल्याचे त्याला जाणवत

होते. वेळ लौकर पसार होईल अशा समजुतीने त्याने आपले डोळे गच्च मिटून घेतले होते. फक्त आणखी एखादे दुसरे मिनिट... पण तोफांचे काय? त्या बत्ती देण्यासाठी सज्ज करून ठेवल्या होत्या. बाँबच्या कपचांनी त्यांच्या माशा फुटल्या गेल्या असत्या...

चटकन उठून तोफांची तपासणी केली पाहिजे हे त्याला माहीत होते, काहीतरी करणे भाग होते, पण त्याचे सारे शरीर जड बनले होते आणि खंदकात गच्च रुतून बसले होते. छातीला आणि कानांना खरचटले होते. बाँबर विमानांच्या रोरावणाऱ्या झेपांनी आणि हवेच्या गरम झोतांनी त्याला थरथरणाऱ्या खंदकाच्या तळाशी अधिकच गच्च दाबून टाकले होते. आपण काहीतरी केले पाहिजे याच विचाराच्या तंद्रीत त्याने डोळे उघडले. खंदकाच्या समोरचा बांध पोलादी पात्याने मधोमध खापलल्यासारखा त्याला दिसला आणि त्यातून करड्या रंगाचे अनेक बारके सजीव प्राणी गव्हाच्या पोत्यातून दाणे सांडावे त्याप्रमाणे खंदकाच्या भिंतीवरून सरसरा खाली पडत होते. त्या खंदकात टपाटपा उड्या मारणाऱ्या त्या प्राण्यांनी ओणव्या बसलेल्या चिबिसोवच्या पाठीवर गर्दी केली होती.

हे बारके प्राणी म्हणजे काय आहेत याची कुझ्नेत्सोवला माहिती होती, पण नेमक्या त्या क्षणाला त्यांना काय म्हणतात आणि यापूर्वी त्याने कुठे पाहिलेत हेच त्याला स्पष्टपणे आठवत नव्हते. पण नेमक्या त्याच क्षणाला त्या गोंधळात उखानोवची आरोळी उमटली. तो सुद्धा अत्यंत आश्चर्यचकित मुद्रेने चिबिसोवच्या पाठीकडे बघत होता.

"बघा लेफ्टनंट, उंदीर टाकलेत बाँबमधून! चला, पकडू या त्यांना!"

उखानोवच्या मातीने माखलेल्या हातमोजातील भल्यामोठ्या पंजांनी चिबिसोवच्या पाठीवर वळवळणारे ते उंदीर उचलून खंदकाबाहेरच्या धुरात फेकण्यास सुरुवात केली.

"चिबिसोव, अरे बेट्या जागा हो! तुला खाऊन टाकतील ना उंदीर! अरे तुला त्यांची वळवळ जाणवली नाही?"

"उखानोव, तोफांवरच्या माशांचं काय? ऐकलंस का? माशांचं काय?" चिबिसोवकडे दुर्लक्ष करीत कुझ्नेत्सोव ओरडला. एकाएकी त्याला जाणवले की, तोफांवरच्या नेम धरण्यासाठी बसवलेल्या माशा

काढून आणायला त्याला उखानोवला सांगायचे आहे, तसे सांगण्याचा, नव्हे तसा हुकूम देण्याचा त्याला अधिकार आहे. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर, पलटणीचा कमांडर या अधिकाराखाली, खंदकातला आडोसा सोडून त्या बाँबच्या वर्षावात उघड्यावर जाऊन तोफांवरच्या माशा काढून आणायचा हुकूम तो उखानोवला देऊ शकत होता आणि स्वत: मात्र खंदकात आडोशाला राहून आपला जीव बचावू शकत होता. पण असा हुकूम त्याला देववेना.

मला असा अधिकार आहे आणि तरीही तसा अधिकार नाही, असा त्याने मनाशी विचार केला. नंतर मी कधीही स्वत:ला क्षमा करू शकणार नाही.

आता ते सारे सारखेच होते आणि सर्व काही कुठल्यातरी महाप्रचंड शक्तीकडून अंतिमत: आणि केवळ योगायोगाने निर्णित व्हावयाचे होते— फक्त काही मीटर दूर किंवा जवळ एवढाच फरक होता. त्या खंदकातल्या छोट्या जागेत त्यांचे सारे जीवन सामावले होते आणि त्या जगात सूर्य, माणसे, दया यांचा लवलेश नव्हता. पूर्णतया रक्षणविहीन अशा त्या महाभयानक पोकळीवर तीक्ष्ण नजरेचे वैमानिक आपल्या बाँबफेक्या विमानांमधून मृत्यूचे रिंगण धरीत होते. प्रत्येक बाँबच्या स्फोटाबरोबर जीवनमरणाच्या काठांवर त्यांची आयुष्ये हिंदकळत होती.

नाही नाही! मला असं वागायचा काही एक अधिकार नाही. मी तसं वागून चालणार नाही! ही चीड आणणारी अगतिकता... माशा वाचवल्या पाहिजेत! मला मरणाची भीती वाटतेय का? का मी घाबरलोय? डोक्यावर बाँबचा कपचा उडेल... डोक्यात कपचा घुसेल अशी भीती मला वाटतेय?... नाही, मी एका क्षणात खंदकाच्या बाहेर जाईन. द्रोझ्दोवस्की कुठं आहे? मी हा हुकूम द्यायला तयार झालोय हे उखानोवला माहीत आहे... पण का? जहन्नम्‌मध्ये गेल्या त्या तोफांवरच्या माशा! या खंदकातून बाहेर पडायचे त्राण माझ्यात राहिले नाहीत... मी हुकूम देऊन स्वत: इथंच थांबीन. खंदक सोडला तर मला संरक्षण लाभणार नाही. लाल तापलेला बाँबचा कपचा सरळ माझ्या कपाळात घुसेल. काय झालंय मला? भ्रम झालाय?

डोक्यावर खंदकाच्या बाजूला एक कानठळ्या बसवणारा बाँबचा स्फोट झाला आणि त्याच्या तोंडावर धुराचा लोट उसळला. त्या स्फोटक द्रव्यांच्या धुराने तो पुन्हा खोकू लागला व त्याचा जीव गुदमरला.

धूर विरला आणि आपल्या ओठांवरची माती पुसून व टोपीवरचा घाणेरडा बर्फ झटकून उखानोवने आपल्या पलटणीच्या खोकणाऱ्या प्रमुखाकडे चमत्कारिक नजरेने पाहिले व जणू काही ते दोघेही बहिरे आहेत अशा समजुतीने तो जोराने ओरडला तेव्हा त्याचा खोटा दात चमकला—"लेफ्टनंट, नाकावर रुमाल धरून श्वास घ्या—त्रास होणार नाही!"

"खरंच, मी बराच धूर गिळलाय. मी काय करतोय याचं मला भान राहिलं नाही आणि तोंडानं श्वास घेतला. धुराला जळक्या लसणीचा आणि लोखंडाचा वास येतोय. त्याची पहिली चव मी ४१ साली घेतलीय. आणि ती आठवण मला जन्मभर राहील... तो कशाबद्दल बोलतोय? कसले रुमाल? हा खोकला माझी फुफ्फुसं फाडून काढतोय. घोटभर गार पाणी मिळालं तर किती बरं होईल!"

"उखानोव!... ऐक!" तो ओरडला व मोठ्या कष्टाने त्याने खोकल्याची उबळ दाबली. "आपल्याला तोफांवरच्या माशा परत आणल्या पाहिजेत! तिथं त्यांचा फुटून चुरा होईल! हे केव्हा थांबेल कुणास ठाऊक?"

"माझ्या मनात सुद्धा तोच विचार चालला होता लेफ्टनंट! आपल्या माशांशिवाय आपली अवस्था मांजरीच्या आंधळ्या पिलांसारखी होईल!"

उखानोव आपल्या पायांवर उकिडवा बसला होता. त्याने आपली टोपी कपाळावर ओढून घेतली आणि उभे राहण्याचा त्याने नुसता पवित्रा घेताच कुझ्नेत्सोवने त्याला दाबले.

"आत्ता नाही! थांब जरा! एक फेरी त्यांनी पुरी करताच आपण तोफांकडं धाव घेऊ या! तू पहिलीकडं जा, मी दुसरीकडं जातो. चटकन माशा काढ! समजलं का उखानोव? मी खुणेचा शब्द उच्चारला म्हणजे. समजलं?" आणि खोकला दाबून धरून त्यानेही पळण्याचा पवित्रा घेतला.

कपाळावर ओढलेल्या टोपीतून आकाशाकडे आपल्या फिक्या रंगाच्या डोळ्यांनी न्याहाळीत उखानोव म्हणाला, "आता योग्य वेळ आहे लेफ्टनंट. अगदी आत्ताच!"

विमानांच्या इंजिनांच्या घरघराटीवरून त्या दोघांना एकाच वेळी जाणवले की, फेरी पुरी करून त्यांनी आकाशात पुन्हा वर भरारी

घेतलेली आहे व बाँबहल्ल्याची चालू फेरी जवळजवळ पुरी झालेली आहे. खंदकापुढच्या बांधावर गरम धुराची वेटोळी उठत होती- एकापाठोपाठ एक युंकर विमानांनी नदीच्या काठाच्या दिशेने पुन्हा आकाशात उंच भराऱ्या घेतल्या व स्तेपवर अखंड घिरट्या घालणाऱ्या विमानांच्या मालिकेत, त्या भिरभिरणाऱ्या काळोखात ती सामील झाली. नदीपलिकडचे खेडे पुढल्या आणि मागल्या बाजूने धडाडून पेटले होते, रस्त्यांवर आगीच्या ज्वाळा वरवर एकमेकींना लपेटत चालल्या होत्या, राखेच्या व ठिणग्यांच्या डोंबात घरांची छपरे कडकडा कोसळून पडत होती, खिडक्यांची काचेची तावदाने खळखळून फुटत होती आणि खेड्याच्या सीमेबाहेर उभी केलेली अनेक वाहने आडोशाला नेण्यापूर्वीच छिन्नभिन्न होऊन धडधडा पेटत होती. सुळक्यावरून पेटत्या पेट्रोलच्या धारा खाली वहात होत्या व तोफखाना, नदीतीर आणि पायदळाच्या खंदकांवर धुराचे कफनवस्त्र ओठंगले होते.

कुझ्नेत्सोवने खंदकाबाहेर पाहिले तेव्हा त्याला या सर्व गोष्टी दिसल्या आणि जेव्हा पुन्हा विमानांनी फेर धरल्यावर इंजिनांचे वेगवेगळ्या पट्टीतले आवाज पुन्हा एका सुरात बदलले तेव्हा त्याने हुकूम ठोकला.

"उखानोव! ... आपण जमवू ते! चल! तू पहिली घे. मी दुसरी घेतो."

स्नायूंच्या किंचित थरथरत्या अवस्थेतच त्याने खंदकाबाहेर उडी घेतली, पहिल्या तोफेभोवतालच्या बांधावर स्वतःला झोकून दिले आणि बाँबच्या खड्ड्यांभोवती काळ्या, भुगा झालेल्या बर्फाला तुडवीत तो दुसऱ्या तोफेकडे धावला.

"लेफ्टनंट, इकडं! त्या पलिकडं!" तो ज्या दिशेने धावत होता तिथून कुणीतरी ओरडले.

तोफेचा मोर्चा जिथे लावला होता ती सबंध जागा, मधली मोकळी जागा आणि खणलेले चर धुराच्या भिंतीमागे झाकले गेले होते. सगळीकडे भाजलेल्या, फुटून पडलेल्या जमिनीचे तुकडे पडले होते. तोफेवरच्या ताडपत्री आच्छादनावर, तोफेमागच्या गोल भागावर, तोफगोळ्यांच्या कवचांवर, सर्वत्र काळ्या बर्फाचा व मातीचा सडा पडला होता. परंतु तोफेच्या माशीची दुर्बीण शाबूत होती आणि घुसमटलेला कुझ्नेत्सोव खोकत खोकत घाईघाईने तिचे स्क्रू ढिले करू

लागला. हे काम करीत असतानाच त्याने तोफेवर काम करणाऱ्यांच्या खंदकांवर मागे नजर टाकली. तेथे धुरामध्ये वाटोळ्या सावलीप्रमाणे एक डोके डोकावले.

"कोण आहे ते? चुबारिकोव, तू का? जिवंत आहेस?"

"इकडून या लेफ्टनंट! आमच्या खंदकात उडी मारा!"

डाव्या बाजूच्या खंदकामधून घाणीने बरबटलेली टोपी एका कानावर सरकलेल्या अवस्थेतील एक डोके हळूच वर डोकावले. ते आपल्या लांब मानेवर डुगडुगले आणि भलेमोठे विस्फारलेले डोळे उत्तेजित दिसत होते व बोलावत होते – तो दोन क्रमांकाच्या तोफेवरचा प्रमुख कनिष्ठ सार्जंट चुबारिकोव होता.

"कॉम्रेड लेफ्टनंट, इकडे या! आमच्या इथं एक टेहळ्या आहे!"

"काय? कुझ्नेत्सोव ओरडला. "तू तोफेवरच्या माशा का काढल्या नाहीस? त्यांच्याशिवाय तुला गोलंदाजी करता येईल असं वाटतं?"

"कॉम्रेड लेफ्टनंट, तो जखमी झालाय. एक टेहळ्या आमच्या इथं आहे, आमच्या खंदकात... तो इथं कसाबसा येऊन पोचलाय... तो जखमी झालाय!"

"कुठला टेहळ्या? बाँबहल्ल्यानं तुझ्या मेंदूला धक्का बसलाय का चुबारिकोव?"

"नाही. माझ्या कानात मात्र काहीतरी थोडेसे आवाज येताहेत. मी थोडासा बहिरा झाल्यासारखा वाटतंय, पण ते महत्त्वाचं नाही. आमच्या इथं एक टेहळ्या आहे. कुठूनतरी अज्ञात भागातून तो आलाय!"

"अरेच्चा! टेहळ्या? डिव्हिजनच्या टेहळणी पथकातला? कुठं आहे?"

कुझ्नेत्सोवने आकाशाकडे नजर फेकली. स्तेपवर पुन्हा भलेमोठे विमानवर्तुळ एव्हाना तयार झाले होते. तो धडपडत मोकळ्या जागेतून पलिकडे गेला आणि खंदकात उडी मारून त्याने तोफेची माशी चुबारिकोवच्या छातीवर जोरात टेकवली. लेफ्टनंटच्या या अचानक कृतीने दचकलेल्या चुबारिकोवने ती दोन्ही हातात पकडली व आपल्या पायघोळ कोटाच्या पुढे खाली धरली.

"तोफेवरच्या माशीची अशी काळजी घेतात वाटतं चुबारिकोव? कुठं आहे टेहळ्या?"

त्या लांबलचक चरामध्ये अगदी भिंतीला खेटून तोफ लावणारा वयस्क येवस्तिग्नेयेव आणि इतर दोन तोफेवरची माणसे बसली होती. त्यांचे मोठे कोट मातीच्या डागांनी माखले होते. जाडजूड वळलेल्या सिगरेटींचे जोरदार दम मारण्यात तिघेही गुंतले होते. आपल्या घोड्यां-पर्यंत जायला सवड न मिळालेले रूबिन आणि सेरगुनेन्कोव हे ड्रायव्हरही तिथेच होते. ते दोघेही गप्प राहून गंभीर चेहऱ्याने एकाच दिशेला, खंदकाच्या टोकाला पहात होते. तिथे बुरखेवजा अंगरख्यातला, कुंची मागे फेकलेला व टोपी नसलेला एक तरुण माणूस अर्धवट बसला होता व अर्धवट पसरला होता. त्याचे जिप्सी थाटाचे काळे कुरळे केस चिखलाने व बर्फाने माखले होते, त्याच्या पांढऱ्याफटक चेहऱ्यावरील गालांचे स्नायू घट्ट ताणले गेले होते, त्याच्या डोळ्यात विलक्षण वेदना उमटली होती. त्याची डावी, रक्ताने माखलेली अंगरख्याची व दुलईदार जाकीटाची बाही खांद्यापर्यंत चाकूने फाडली होती व तो चाकू त्याच्या पायाशी जमिनीत खुपसून ठेवला होता. दात घट्ट आवळून तो आपल्या दंडाभोवती निळ्या-काळ्या पडलेल्या, रक्तांनी माखलेल्या बोटांनी वेड्यावाकड्या पद्धतीने, पण घट्ट खेचून बँडेज बांधत होता.

"ए डुकरा! मला डिव्हिजन कमांडर पाहिजेय, सांगतो ना तुला! कर्नल हवाय!"

"त्याला मदत कर ताबडतोब!" कुझ्नेत्सोव चुबारिकोववर खेकसला. चुबारिकोवचे लांब मानेवरचे डोके अजूनही इकडेतिकडे डुगडुगत होते. जणू तो आपल्या कानातले पाणी खाली झाडून टाकतोय असे वाटत होते. "अरे तू उभा काय राहिलायस शुंभासारखा? त्याची मलमपट्टी कर व्यवस्थित!"

"तो आम्हाला त्याच्या अंगाला हात लावू देत नाही," ड्रायव्हर रूबिन खिन्न आवाजात उत्तरला आणि आपल्या कठीण पंजावर तो पचकन थुंकला व त्यावर सिगरेट विझवून त्याने थोटुक काळजीपूर्वक टोपीच्या घडीमध्ये ठेवले. "साधा टेहळ्या – पण बेट्याचा रूबाब केवढा! स्वत:ला भारी मोठ्ठा समजतो! त्याला म्हणे हात लावायचा नाही! एखाद्या पिसाळलेल्या माणसासारखा सर्वांवर खेकसतो! स्वत:ला टेहळ्या म्हणवतो!"

"बकबक बंद कर रूबिन," कुझ्नेत्सोवने चापले आणि तो टेहळ्यापर्यंत गेला. "दे माझ्या हातात ते बँडेज! मी तुला मदत करतो! तू कुठून आलायस? तुझ्याबरोबर आणखी दुसरं कुणी नव्हतं?"

दातांनी बँडेज घट्ट बांधण्याचा प्रयत्न करणाऱ्या त्या टेहळ्याने तें खांद्यावरून टरटरा फाडले. कोळशासारख्या काळ्याकुट्ट पडलेल्या त्याच्या डोळ्यांनी खंदकाबाहेर रोखून पाहिले. त्याच्या ओठांच्या कोपऱ्याभोवती फेस जमा झाला होता आणि केवळ आत्ताच कुझ्नेत्सोवच्या लक्षात आले की, त्याच्या कानांच्या पाळ्यांवर रक्ताच्या बारीक धारा वहात होत्या. त्याला बाँबच्या स्फोटाचा धक्का बसलेला होता.

"दूर रहा लेफ्टनंट!" तो टेहळ्या फिस्कारला आणि एकाएकी भराभरा ओरडून बोलू लागला, "मला डिव्हिजन कमांडरला भेटलंच पाहिजे, समजलास? कर्नलला! असा डोळे वटारून काय बघतोस माझ्याकडं? मला काय बाई समजला? मी डिव्हिजनच्या टेहळ्या पथकातला आहे, समजलं? मला कर्नलला भेटलंच पाहिजे. लेफ्टनंट, त्याला फोन करा. अरे डुकरा, असा टक लावून पहात काय राहिलास? एका मिनिटात माझी शुद्ध हरपेल आणि मग सगळाच उशीर होईल! माझी शुद्ध हरपेल! लेफ्टनंट, तुला समजत नाही का?" आणि त्याच्या तारवटलेल्या डोळ्यांमध्ये अश्रू जमा झाले.

डोके मागे टेकून त्याने आपल्या धडधाकट हाताच्या रक्तमाखल्या बोटांनी अंगरख्याची बटणे सोडली, नंतर दुलईदार जाकीटाची बटणे खोलली, नंतर आखूड लष्करी कोटाची बटणे मोकळी केली व अखेरीस त्याच्या खलाशी गंजिफ्रॉकच्या आतून डोकावणाऱ्या खांद्याच्या हाडांवर त्याने पंजा दाबून धरला.

"लौकर हालचाल करा! मी शुद्धीवर असेपर्यंत... कर्नलला फोन करा. माझं नांव गेओर्गियेव. लौकर! मला त्यांच्याशी बोललंच पाहिजे!"

"आपण त्याला प्रमुख ठाण्यावर पाठवलंच पाहिजे कॉम्रेड लेफ्टनंट," येवस्तिग्नेयेव म्हणाला.

पण कुझ्नेत्सोव अजूनही टेहळ्याच्या आवळलेल्या बोटांकडे बघत होता. पहाटे ज्या टेहळ्या पथकाच्या परत येण्याची अपेक्षा होती, त्या पथकामधील हा एक टेहळ्या आहे याची त्याला खात्री पटली.

"मला वाटतं, त्याला बॉंबस्फोटाचा धक्का बसलाय आणि बराच रक्तस्त्राव झालाय," कनिष्ठ सार्जंट चुबारिकोव म्हणाला. "आपण त्याला मुख्य ठाण्यापर्यंत कसं घेऊन जाणार? तो वाटेतच गचकेल."

कुझ्नेत्सोवने चुबारिकोवकडे वळून विचारले, "द्रोझ्दोवस्कीच्या फोनची लाईन व्यवस्थित चालू आहे?"

खंदकाच्या मागच्या बाजूस संदेशवाहकाचे ठिकाण होते. चुबारिकोवने तिकडे पाहून नुसती मान डोलावली.

"चुबारिकोव, त्याचं बँडेज नीट बांध! आणि त्याला ते ओढू देऊ नकोस! मी आत्ता सारी व्यवस्था करतो."

"कॉम्रेड लेफ्टनंट, थांबा! ते पुन्हा आपल्याकडं येताहेत!" सेरगुनेन्कोवने ओरडून इशारा दिला व आपले हात कानांवर गच्च दाबून धरले.

पण कुझ्नेत्सोव एव्हाना बत्ती देण्याच्या फलाटावर उभा राहून आकाशाकडे बघत होता. तीरावर युंकर विमानांनी भलेमोठे रिंगण धरले होते आणि पायदळ डिव्हिजनच्या दूरच्या खंदकांवर बॉंब फेकण्यासाठी पहिल्या विमानाने कलता केलेला पंख नेमका सूर्याच्या समोर आल्याने चकाकत होता.

जेव्हा कुझ्नेत्सोवने संदेशवाहकाच्या त्या अरुंद, उथळ बिळात उडी मारली तेव्हा संदेशवाहक स्व्यातोव आपल्या तारयंत्रावर ओणवा वाकून कानाला लावलेला रिसीव्हर नीट करीत होता. कुझ्नेत्सोव त्याच्या अंगावर जवळ जवळ कोसळला. त्यांचे गुडघे जेव्हा एकमेकांना चिकटले तेव्हा कुणाचे गुडघे नक्की थरथर कापताहेत हे आपल्याला सांगता येणार नाही, याची कुझ्नेत्सोवला धक्कादायक जाणीव झाली. तो जास्तीत जास्त मागे सरकता येईल तेवढा भिंतीपर्यंत सरकला.

"टेहळणी मोर्चाला तुला जोडता येईल का? लाईन बंद पडलेली नाही ना? मला रिसीव्हर दे!"

"लाईन चालू आहे लेफ्टनंट, पण कुणीच"–

आपले कापणारे गुडघे स्थिर करण्यासाठी स्व्यातोवने एकमेकांना घट्ट जुळवले आणि जोरजोरात मान हलवली. पांढऱ्या भुवयांचा, त्याचा शेतकऱ्याचा धारदार चेहरा थंडीने पार आकसला होता. त्याने टेप जोडायचा प्रयत्न केला, पण ती सोडविण्याऐवजी एकाएकी झटकन्

हात मागे घेतला आणि टेलिफोन सेटवर तो एकदम वाकला.

"रणगाडे!" कुणीतरी तोफखान्यातले ओरडले, पण विमानांच्या प्रचंड घरघराटात ती आरोळी कुठल्याकुठे विरून गेली.

तो आवाज जसा जवळ आला तशी किनाऱ्यावरची प्रत्येक वस्तू बाँबच्या स्फोटांनी हादरू लागली. संदेशवाहकाचा खंदक हादरला आणि कुझ्नेत्सोव हवेत उडाला तेव्हा क्रूसाच्या आकाराची युंकर विमाने खाली झेपावून मशिनगनमधून आगीच्या ज्वाळा ओकताना त्याच्या नजरेला पडली. सबंध पायदळाच्या खंदकांवर आणि तोफखान्याच्या दिशेने अनुक्षेपकांचे उभे आडवे पट्टे उमटत होते. स्व्यातोवचे थरथरणारे ओठ व कापणारे पाय त्याने पुन्हा पाहिले.

"रणगाडे! रणगाडे!" संदेशवाहकाचे निळेजांभळे ओठ अस्पष्ट आवाजात बोलत होते. "तुम्ही ऐकलं नाही काय? कुणीतरी ओरडलं..."

कुझ्नेत्सोवला त्याच्यावर ओरडावेसे वाटत होते. त्याचे कापणारे पाय आणि त्याच्या चेहऱ्यावरचा भयानक भेदरलेला भाव त्याला बघवेना, तेव्हा त्याने नजर दुसरीकडे वळवली. वस्तुतः "रणगाडे" या शब्दाबरोबर त्यालाही कुठेतरी भीतीने घेरले होते. या नव्या घेरलेल्या भीतीला मान्य करायला त्याचे मन तयार होत नव्हते. पण हे अशक्य होते!

कुणीतरी चुकीने तसे ओरडले असावे, भास झाला असावा! कुठे आहेत रणगाडे? कोण ओरडले? या खंदकातून बाहेर पडून एका मिनिटात मी पाहतो! कुठे आहेत ते रणगाडे?

पण तो खंदकातून बाहेर पडू शकला नाही. त्या नजरेच्या अरुंद पट्ट्यात सर्वत्र अनुक्षेपकांचे सपासप सपकारे बसत होते. खंदकांसमोरच्या बांधावरची माती उसळत होती. एकामागून एक अशी युंकर विमाने खाली झेपावून आगीचा वर्षाव करीत होती. ती एवढ्या खालून उडत होती की, आग ओकणाऱ्या त्यांच्या अवजड मशिनगन्सच्या तापल्या धातूची झळ खंदकात जाणवत होती.

थाडथाड उडणाऱ्या त्या स्वयंचलित मशिनगन्सच्या भडिमारातच कुझ्नेत्सोव मोठ्यांदा ओरडला, "स्व्यातोव!" त्याने संदेशवाहकाला गदगदा हलवले. संदेशवाहक आपले डोके मांडीत खुपसून बसला होता. "टेहळणी मोर्चाला फोन जोड, मला द्रोझ्दोवस्कीशी बोलायचं आहे! लौकर!"

स्व्यातोवने आपला घाबरलेला चेहरा वर उचलला आणि टेलिफोनशी खुडबुडायला आरंभ केला. रिसीव्हरमध्ये फुंकरा मारीत तो ओरडत होता, "टेहळणी मोर्चा! उत्तर का देत नाही?" पण पार खाली झेपावलेल्या विमानाच्या प्रचंड घरघराटाने त्या दोघांनाही जमिनीवर आडवे केले. अगदी डोक्यावर मशिनगनच्या गोळ्यांचा कडकडाट वाजला, मातीचा फवारा टेलिफोनवर आणि अंगावर उडाला, तरीही त्या क्षणाला पाठीत गोळ्या घुसण्याची अपेक्षा करणाऱ्या कुझ्नेत्सोवच्या मनात उपहासात्मक विचार येत होता: बेट्या, तुझा नेम चुकला! तुझा नेम चुकला!

स्व्यातोवच्या हातांनी टेलिफोनवरची माती झटकली व वाफाळणाऱ्या श्वासाने सारा रिसीव्हर भरून टाकत क्षीणपणे त्याचे ओठ उघडले. "टेहळणी मोर्चा! तुमच्यावर मारा बसलाय का?" आणि अचानक त्याचे डोळे पुन्हा तिरपे फिरले.

"र ऽ ण ऽ गा ऽऽऽ डे!" खंदकांच्या बांधावरून एक मर्मभेदक किंकाळी उमटली.

स्व्यातोवचे ओठ क्षीणपणे पुटपुटत होते..

"कॉम्रेड लेफ्टनंट... कुणीतरी उत्तर दिलंय. तुमची लाईन जोडलीय. द्रोझ्दोवस्की तिकडून बोलताहेत. हुकूम झालाय. रणगाडे हल्ला करताहेत–लगाव बत्ती! त्यांना तुमच्याशी बोलायचंय." त्याने टोपी काढली, आपल्या पोरसवदा डोक्यावरून टेप बाजूला केली व रिसीव्हर कुझ्नेत्सोवच्या हाती दिला.

"लेफ्टनंट कुझ्नेत्सोव बोलतोय!"

जणू कुठून तरी दुरून धावत यावे तसा द्रोझ्दोवस्की रिसीव्हरमध्ये धापा टाकीत होता. जणू त्याच्या श्वासाचा गरमपणा कुझ्नेत्सोवच्या कानाच्या पडद्यांना जाणवत होता.

"कुझ्नेत्सोव! रणगाडे अगदी समोर ठाकलेत! तोफांना बत्ती द्या! काही नुकसान झालंय का? माणसं किंवा तोफा?"

"मला अजून नक्की माहीत नाही!"

"कुठं आहेस तू? दावलात्यानची परिस्थिती काय आहे याची काही कल्पना आहे तुला?"

"मी जिथं असावं तिथंच आहे कॉम्रेड तोफखाना कमांडर–

तोफांजवळ!" रिसीव्हरमधून त्याच्यावर कडकडणारा आवाज मध्येच थोपवून कुझ्नेत्सोव कडक शब्दात उत्तरला.

"मी अजून दावलात्यानशी संपर्क साधलेला नाही. ते अजून आमच्यावर बाँबचा वर्षाव करताहेत."

"थेट बाँब पडून दावलात्यानची एक तोफ निकामी झाली," द्रोझ्दोवस्कीचा आवाज फोनमध्ये कडकडला. "दोघे ठार. पाच जखमी. चार नंबरच्या तोफेवरची सारी माणसं!"

म्हणजे एव्हाना सुरुवात झाली होती! किती लौकर! कुझ्नेत्सोवच्या मेंदूत हा विचार खस्सदिशी टोचला. दावलात्यानच्या पलटणीतली सात माणसे कामी आली. आणि एक तोफ! एवढ्यातच!

"कोण ठार झालं?" चार नंबरच्या तोफेवरच्या माणसांची नांवे आणि चेहरे एवढेच त्याला माहीत होते व प्रत्यक्षात त्या लोकांबद्दल काहीही ठाऊक नव्हते तरी त्याने विचारले.

"ते विशेष महत्त्वाचं नाही आता!" द्रोझ्दोवस्की धाप टाकीत ओरडला. "कुझ्नेत्सोव, ताबडतोब हालचाल करा! रणगाडे येताहेत."

"ठीक आहे," कुझ्नेत्सोव म्हणाला. "आता मला तुम्हाला काही सांगायचं आहे. आमच्या इथं एक घायाळ टेहळ्या आहे."

"कुठला टेहळ्या? कुठून आलाय?"

"पहाटे ते ज्यांची वाट पहात होते त्यातला एक टेहळ्या. डिव्हिजनच्या मुख्य ठाण्यावर आपल्याला न्या, असं तो म्हणतोय."

"त्याला माझ्याकडं ताबडतोब पाठव!" द्रोझ्दोवस्की ओरडला.

कुझ्नेत्सोवने स्व्यातोवच्या हातात फोन कोंबला, उडी मारून तो उभा राहिला व दावलात्यानच्या तोफा ज्या ठिकाणी चढवल्या होत्या तिकडे त्याने नजर टाकली.

कुलपी गोळ्यांनी भरलेली एक लॉरी तेथे पेटत होती. तिच्यातून निघणाऱ्या धुराच्या लोटांनी सबंध नदीतीर भरला होता, सर्व तोफांचे मोर्चे धुरात झाकले गेले होते व धडाडून पेटणाऱ्या खेड्याच्या सीमेवरून येणाऱ्या धुरामध्ये नदीच्या पात्रावर हा धूर मिसळून जात होता. लॉरीतला दारूगोळा धडाडून पेटत होता, सारखे स्फोट उडत होते आणि रणगाडे भेदणाऱ्या कुलपी गोळ्यांचे स्फोट आकाशात तिरकस दिशेने उडून डोळे दिपवणारी रोषणाई झडत होती.

बाँबफेक्या विमानांनी आता दूर नदीतीरावर दुसरीकडे रिंगण धरले होते व टेकड्यांपलिकडच्या स्तेपभूमीतील रस्त्यांवर त्यांनी हल्ला चढवला होता. बाँब फेकून झाल्यावर त्यांच्यापैकी काही विमाने जळणाऱ्या खेड्यावरून दक्षिणेकडच्या तांबूस आकाशात सावकाशपणे निघून जात होती.

पिछाडीला अद्याप बाँबवर्षाव चालू होता आणि तेथे माणसे मारली जात होती ही वस्तुस्थिती असूनही क्षणभर कुझ्नेत्सोवला एकदम मोकळे झाल्यासारखे वाटले. युद्धामध्ये ज्या अवस्थेला "मरणाची वाट पहात राहणे" असे म्हटले जाते ती निराशेची, अगतिकतेची आणि अपमानास्पद अशी अनैसर्गिक अवस्था संपल्याचा, तिच्यातून निसटल्याचा त्याला आनंद झाला होता.

पण त्याच नेमक्या क्षणाला समोरच्या स्तेपवर तांबड्या व निळ्या प्रकाशशलाका आकाशात उडून खाली पडताना पेटताना त्याला दिसल्या.

खेड्याच्या डाव्या अंगाला असलेल्या खिंडीपर्यंत उतरत येणाऱ्या सबंध रुंद टेकाडापासूनचा रस्ता आता निळसर करड्या रंगाच्या धुराने आच्छादला होता. करड्या व पिवळ्या रंगाच्या काटकोनाकृतींनी तो सारा भाग एकदम सचेतन झाल्यासारखा वाटत होता. पण पहाटेचा लालिमा ल्यायलेल्या स्तेपवर धुरकट सूर्याने बर्फावर टाकलेल्या त्यांच्या प्रचंड छायेत त्या आकृती मिसळल्याने अद्याप तितक्याशा भयावह वाटत नव्हत्या.

ते रणगाडे आहेत याची कुझ्नेत्सोवला जाणीव झाली. पण नुकत्याच अनुभवलेल्या बाँबहल्ल्यानंतर त्याला या नव्या धोक्याचे तितकेसे आकलन झालेले नव्हते. तो त्यावर विश्वासच ठेवू शकत नव्हता.

पण काही सेकंदातच तो करडा धुरकट प्रकाश खाली बसला व अनेक इंजिनांचा प्रचंड हादरवून टाकणारा घरघराट ऐकू येऊ लागला आणि त्या प्रचंड, दाट छायेतल्या सबंध टेकाडावर पसरलेल्या काटकोनाकृती एकाएकी स्पष्ट दिसू लागल्या तेव्हा त्याला त्या संकटाची कल्पना आली.

आघाडीचे रणगाडे प्रचंड वेगाने धावत येत असलेले कुझ्नेत्सोवने पाहिले. त्यांच्या पट्टेरी दात्यांच्या चाकांमधून चिखलमिश्रित बर्फ उधळत होता व मागील पाईपमधून ठिणग्या उडत होत्या.

"तोफा चढवा!" प्रचंड जोरात ओरडून त्याने हुकूम दिला. स्वतःचाच आवाज त्याला ओळखू आला नाही. आता त्याला स्वतःची तशीच इतरांचीही पर्वा वाटत नव्हती. "हुश्शार!"

सगळ्या खंदकांमधून भराभरा मुंडकी डोकावली. आपल्या कोटाच्या वरच्या खिशातून तोफेची माशी काढीत कनिष्ठ सार्जंट चुबारिकोव प्रथम खंदकातून बाहेर धावला. त्याची मान लांबवलेली दिसत होती, डिव्हिजनच्या पिछाडीच्या दळणवळणांवर अजूनही हल्ले चढवीत असलेल्या उरलेल्या युंकर विमानांकडे, नदीपलिकडचे आकाश आपल्या बटबटीत डोळ्यांनी भिरीभिरी पहात तो धावत होता.

"हुश्शार!"

हुकुमाच्या या शब्दासरशी माणसे भराभरा खंदकांमधून बाहेर पडली आणि तोफांकडे धावली. आता परिस्थितीचे खरे किंवा अचूक आकलन करणे त्यांच्यापैकी कुणालाच शक्य नव्हते. यंत्रवत्पणे त्यांनी तोफांवरची आच्छादने भराभरा बाजूला केली व मागील भागातील कुलपी गोळयांची खोकी उघडली. भुसभुशीत झालेल्या मातीतून धडपडत त्यांनी तोफगोळयांची खोकी तोफांच्या खालच्या बाजूजवळ खेचून आणली.

कनिष्ठ सार्जंट चुबारिकोवने भर्रकन हातमोजे खेचून काढले व आपल्या चपळ बोटांनी दूरपल्ल्याची दुर्बीण खोबणीत बसवीत असताना आपल्या सहकाऱ्यांना जलदी तोफा भरण्याची घाई केली. तोफेला बत्ती लावणारा येवस्तिग्नेयेव दुर्बीणीची काळी काच एवढ्या काळजीपूर्वक पुसत होता की, जणू त्याशिवाय तोफ उडणे अशक्य होते.

"कॉम्रेड लेफ्टनंट, अत्यंत प्रभावी गोळे आपल्याला पाहिजेत का?" मागील भागातून कुणीतरी घोगऱ्या आवाजात ओरडले. "त्यांचा कदाचित उपयोग होईल!"

"लौकर! जल्दी करा!" हातमोजांसकट हातांच्या जोरजोराने टाळ्या वाजवीत कुझ्नेत्सोव ओरडला. "सध्या ते गोळे नकोत! चिलखतभेदी तेवढेच वापरा!"

खंदकातून दोन मुंडकी डोकावताना त्याच्या नजरेला पडली. सेरगुनेन्कोव आणि रूबिन हे दोघे ड्रायव्हर अजून तिथेच उभे राहून तोफेवरच्या लोकांची धावपळ पहात होते.

सेरगुनेन्कोव तोंडाचा आ वासून वाफेचे छोटे फवारे सोडीत घुटमळत उभा होता, तर रूबिन दुर्मुखल्या चेहऱ्याने पहात होता. त्याच्या भल्यामोठ्या तपकिरी चेहऱ्यात त्याचे डोळे ओतीव लोखंडाचे दोन जड छोटे गोळे बसविल्यासारखे दिसत होते.

कुझ्नेत्सोव झपाझपा चालत खंदकाजवळ गेला. "मग? टेहळ्याचं कसं आहे?"

"आम्ही त्याला बँडेज बांधलं. पण त्याचं खूप रक्त गेलं असावं," सेरगुनेन्कोव म्हणाला. "तो बहुधा मरणारसं वाटतंय. आता तो गप्प पडलाय."

"तो नाही मरायचा! कशाबद्दल मरावं त्यानं?" जणू काही याबद्दल खूप ऐकले असावे अशा वैतागाच्या सुरात रूबिन म्हणाला. "नो मॅन्स लँडमध्ये अडकलेल्या त्याच्या सात साथींची चिंता करत पडलाय. मोठे वीर लागून गेलेत! अशांना टेहळे म्हणायचं? मोठ्ठाच विनोद आहे!"

खंदकाच्या भिंतीला डोके मागे टेकवून तो टेहळ्या डोळे मिटून अद्याप तसाच पडला होता. त्याच्या बुरख्यावरचे डाग काळे पडले होते. त्याचा हात बँडेजमध्ये घट्ट बांधला होता.

"ठीक आहे, तुम्ही दोघं त्याला उचला आणि थेट द्रोझ्दोवस्कीकडे टेहळणी मोर्चावर न्या!" कुझ्नेत्सोवने हुकूम केला. "ताबडतोब!"

"पण घोड्यांचं काय कॉम्रेड लेफ्टनंट?" सेरगुनेन्कोव उद्गारला. "आम्हाला घोड्यांची देखरेख केलीच पाहिजे. कदाचित ते जखमी झाले असतील!"

"आता रणगाडे येताहेत ना?" रूबिन दुःखाने विव्हळला. "चांगली कामगिरी बजावली बेट्यांनी! म्हणे टेहळणी पथक!" आपल्या चौकोनी खांद्यांनी सेरगुनेन्कोवला धक्का मारीत तो म्हणाला, "घोडे! आता घोडे तुला दुसऱ्या जगात लागतील—!"

रूबिनला उत्तर द्यायला कुझ्नेत्सोवजवळ वेळ नव्हता. चुबारिकोवच्या भल्यामोठ्या डोळ्यांमधील घायकुतीची भावना पाहताच त्या टेहळ्यांच्या भवितव्याबाबतचे आणि रूबिनच्या कडवट उद्गारानंतर निर्माण झालेले त्याच्या डोक्यातील विचार कुठल्याकुठे पळाले. त्याने पाहिले की, माणसे तोफेच्या खालच्या बाजूला चिपकली होती, गुडघ्यांवर त्यांनी कुलपी

गोळे घट्ट धरले होते, नेम धरण्याच्या यंत्रणेच्या थंडगार धातूवर गच्च हात पकडून तोफेला बत्ती लावणारा येवस्तिग्नेयेव बोटांना ऊब आणायला फुंकरी मारीत होता. पहिला गोळा उडवीपर्यंत ते सारे कमालीचे संरक्षणविहीन अशा दयनीय अवस्थेत उभे होते. तरीही ते हुकुमाची वाट पहात ताणल्या मनःस्थितीत उभे होते; त्या स्तेपवरून गडगडाट करीत जवळ येणाऱ्या व त्या सर्वांना एकाच मापाने जोखणाऱ्या भवितव्याची वाट पहात ते उभे होते.

"कॉम्रेड लेफ्टनंट! ते तोफा का डागत नाहीत? ते सरळ आपल्याकडं येताहेत!"

रणगाड्यांच्या इंजिनांचा वाढता घरघराट, चुबारिकोवचा अपेक्षांनी भरलेला चेहरा, त्याचा आवाज, गोलंदाजांच्या वाकलेल्या पाठी, गळयातून बाहेर पडायला अधीर झालेला हुकूम (हे थांबणे वस्तुतः त्याला असह्य झाले होते), त्याच्या पाठीतून जाणारे थंडगार शहारे आणि पुनःपुन्हा पाणी प्विण्याची होणारी अनिवार इच्छा—अशा परस्पर-विरोधी भावनांचा कल्लोळ कुझ्नेत्सोवच्या छातीत दाटला होता. चुबारिकोववर ओरडताना त्याला कमालीचे कष्ट झाले.

"घाई करू नको! माशा लावेपर्यंत बत्ती देऊ नको! थांब! ऐकू येतंय का तुला? थांब!"

पेटत असलेल्या खेड्याच्या डाव्या बाजूचा धुराने भरलेला सर्व प्रदेश आता भाल्याच्या फाळाच्या त्रिकोणी रचनेत पुढे सरकणाऱ्या रणगाड्यांच्या प्रचंड आकृतींनी अंधारला होता. त्या काळोखात रणगाड्यांच्या पिवळया-करड्या चौकोनी आकृती मध्येच दिसत होत्या आणि मध्येच अदृश्य होत होत्या. रणगाड्यांवरची टेहळणी-आच्छादने मधूनमधून डोकावत होती. त्यांच्या पट्टेरी चाकांनी स्तेपवर बर्फाचे एक जणू वादळच उठवले होते आणि त्या भिरभिरत्या बर्फाच्या लोटांमध्ये रणगाड्यांच्या एक्झॉस्ट पाईपमधून उडणाऱ्या ठिणग्या मिसळत होत्या. धातूच्या खडखडाटाचे आता प्रचंड कल्लोळात रूपांतर झाले होते व सावकाश हिंदकळणाऱ्या त्यांच्या तोफा आणि चिलखतावरचे बर्फाचे पट्टे आता अधिक स्पष्ट दिसू लागले होते.

पण आश्चर्य म्हणजे त्या जवळ येणाऱ्या जर्मन रणगाड्यांमधील गोलंदाज तोफा न उडवता शांतपणे वाट पहात होते. आपल्या हल्ल्याची

ताकद त्यांना माहीत होती व सोविएत तोफखान्यांना आपल्या जागा प्रथम उघड करायला ते भाग पाडीत होते. मग या चिलखती गडगडणाऱ्या समूहावरून एक लाल प्रकाशशलाका उडत गेली आणि त्या इशाऱ्यासरशी त्यांनी त्रिकोणी रचना मोडून नागमोडी वाटांनी चाल करायला सुरुवात केली. त्या बर्फाळ धुक्यातून पुढचे दिवे भगभगीतपणे चमकू लागले.

"त्यांनी दिवे का पेटवलेत?" आश्चर्याने सभोवती पहात चुबारिकोवने विचारले. "आपण प्रथम गोळे उडवावे म्हणून त्यांचा हा प्रयत्न चाललाय? असंच असेल का?"

"लांडगे साले," गोलंदाज येवस्तिग्नेयेव धाप टाकीत आपल्या तोफेच्या माशीजवळ वाकून बघत म्हणाला. "भडवे जनावरांच्या कळपासारखे आपल्या अंगावर चालून येताहेत."

धुराचा तो सबंध लोट पुढे चमत्कारिकपणे सरकत असलेला आणि त्याच्या मध्ये तांबडेलाल डोळे मधून मधून चमकत असलेले कुझ्नेत्सोवला आपल्या दुर्बीणीमधून स्पष्ट दिसत होते. इंजिने रोरावत होती, त्यांचे दिवे पेटत-विझत होते, डोळे दिपवून टाकत होते, मधल्या मोकळ्या जागांमध्ये त्यांच्या प्रचंड सावल्या थरथरत होत्या आणि धुराच्या आवरणाखाली ते मोर्चे बांधलेल्या खंदकांच्या दिशेने पुढे सरकत होते. आपल्या शरीरातील प्रत्येक स्नायू ताणल्याची कुझ्नेत्सोवला जाणीव झाली. कृती करायला तो अधीर झाला होता. आता अधिक थांबणे त्याला अशक्य झाले होते. हे जीवघेणे क्षण मोजत बसणे त्याला शक्य नव्हते. त्याला काहीतरी करणे भाग होते!

"कॉम्रेड लेफ्टनंट!" बांधावरून खाली घसरत, त्या रागीट, पुढे सरकत येणाऱ्या डोळ्यांपासून दूर सरकत, आपल्या बारीकशा मानेच्या देठावरचे डोके थरथर कापवीत, चुबारिकोव म्हणाला. त्याचा पोरसवदा चेहरा कमालीचा भेदरलेला होता. "फक्त नऊशे मीटर, कॉम्रेड लेफ्टनंट! आपण अजून का...?"

"ज्युनियर सार्जंट, मला अजून रणगाडे दिसत नाहीत! मध्ये धूर आडवा येतोय!" आपल्या तोफेच्या माशीतून पहात येवस्तिग्नेयेव ओरडला.

"त्यांना आणखी दोनशे मीटर पुढं येऊ दे!" घोगऱ्या आवाजात कुझ्नेत्सोव उत्तरला. बत्ती लगावण्यापूर्वी आणखी दोनशे मीटर अंतर

रणगाड्यांनी कापण्यापर्यंतचा वेळ सहन केला पाहिजे असे त्याने स्वतःला बजावले. त्याचवेळी चुबारिकोवच्या अचूक अंदाजाचे त्याला विलक्षण कौतुक वाटत होते.

"कॉम्रेड लेफ्टनंट! तुम्ही बत्ती का लावत नाही म्हणून तोफखाना कमांडर विचारताहेत. तुम्ही तोफा का उडवीत नाही, असे ते म्हणताहेत."

संदेशवाहक स्व्यातोव आपल्या बिळात उभा होता. कानाला रिसीव्हर लावल्यानंतर त्याला डोक्यावर टोपी स्थिर राखणे अवघड जात होते. आपला हातमोजा त्याने दुसऱ्या कानावर दाबून धरला होता आणि फोनवर मिळणाऱ्या हुकूमांचा तो पुनरुच्चार करीत होता.

"बत्ती लावण्याचा हुकूम दिलाय! बत्ती लावण्याचा हुकूम दिलाय!"

नाही, मला आणखी थोडं थांबलं पाहिजे! त्याला दिसत नाही काय? पहिले गोळे किती महत्त्वाचे असतात हे त्याला समजत नाही काय? आमच्या जागा ताबडतोब उघडकीला येतील आणि आमचा सगळा मामला आटोपेल!

"स्व्यातोव, मला फोन दे तो!" कुझ्नेत्सोव बिळाकडे धावला, संदेशवाहकाच्या डोक्यावरचा रिसीव्हर त्याने खस्सदिशी हिसकावून घेतला आणि कानांवर द्रोझ्दोवस्कीच्या हुकूमांचे रागीट शब्द आदळत असतानाच तो ओरडला "मी कशावर तोफा झाडायच्या? धुरावर? आधीच आमच्या जागा उघडकीला आणायच्या?"

"लेफ्टनंट कुझ्नेत्सोव, तुला रणगाडे दिसत नाहीत का? का तुला काही दिसत नाही?" द्रोझ्दोवस्कीचा आवाज रिसीव्हरमध्ये कडाडला. "तोफांना बत्ती दे! मी तुला तोफांना बत्ती द्यायचा हुकूम करतोय! या मिनिटाला! लगाव बत्ती!"

"मला इथून जास्त चांगलं दिसतंय!" कुझ्नेत्सोव अस्पष्ट आवाजात उत्तरला आणि रिसीव्हर त्याने स्व्यातोवच्या दिशेने भिरकावला.

आपल्या मनात पूर्वीचा निश्चय ठाम करूनच त्याने रिसीव्हर फेकला होता—"जर आम्ही आत्ता तोफा उडवल्या तर आमच्या जागा उघडकीला येतील आणि एकाच भडिमारात ते आमचा खातमा करतील." पण हा विचार त्याच्या मनात येतो न येतो तोच त्याच्या उजव्या बाजूच्या तोफेकडून गडगडाट ऐकू आला. कुलपी गोळयाचा अनुक्षेपक स्तेपवर धुराची रेषा ओढीत समोरच्या भयाण अंधारपोकळीत गेला.

दावलात्यानच्या एका तोफेने बत्ती लावली होती. आणि पुन्हा एकदा उजव्याच बाजूला, जणू काही प्रतिध्वनी उमटल्याप्रमाणे, रणगाड्याकडून प्रत्युत्तराचा गोळा येऊन आदळला. समोरच्या धुरामधून भराभरा लाल ज्वाळा चमकताना दिसू लागल्या आणि अनेक रणगाड्यांनी आपले दिवे प्रखर पेटवून दावलात्यानच्या तोफांवर आपले मोर्चे रोखले व अक्षरशः आग ओकली. दावलात्यानच्या तोफांच्या मोर्चावर स्फोटांचा कल्लोळ उसळला.

"कॉम्रेड लेफ्टनंट! दुसऱ्या पलटणीचा खिमा झाला!" खंदकातून आरोळी उमटली.

"इतक्या लौकर त्याने कशाला तोफा उडवल्या?" आपल्या आणि दावलात्यानच्या तोफांच्या सीमेवर रणगाडे एकाच वेळी येत असताना कुझ्नेत्सोवच्या मनात विचार चमकला. तरीही अख्खी पलटण एवढ्या चटकन निकालात गेली असेल यावर त्याचा विश्वास बसेना. डोक्यावर कुलपी गोळ्यांच्या कवचांचा पाऊस पडत असताना दावलात्यान आणि त्याची माणसे खंदकाच्या बांधाखाली डोकी खाली घालून वाकून कशी बसली असतील याचे दृश्य क्षणभर त्याच्या डोळ्यांसमोर उभे राहिले आणि एकाएकी त्याला स्वतःचा आवाज कानांवर आदळताना ऐकू आला, "उजव्या बाजूच्या रणगाड्यांवर... पुढच्यावर नेम धरा! रेंज १२, चिलखत भेदी..." आणि "लगाव बत्ती" हा शब्द ओरडण्यापूर्वी एक क्षणभर त्याला एकदम जाणीव झाली की, त्याला जेवढा वेळ थांबणे आवश्यक होते तेवढा वेळ तो थांबलेला नाही आणि त्याने आपल्या तोफांच्या जागा लौकर उघड्या पाडल्या आहेत. पण आता त्याला थांबायचा अधिकार नव्हता. त्याने शेवटचा हुकमाचा शब्द उच्चारला.

"लगाव बत्ती!"

तोफेच्या धडाक्याने त्याचे कानाचे पडदे बधीरले.

कुलपी गोळ्याच्या अनुक्षेपकाचा निश्चित मार्ग त्याला जाणता आला नाही. त्या करड्या, विंचवाच्या जमावासारख्या रणगाड्यांवर त्याच्या जांभळ्या ठिणग्या विझल्या. रेंज दुरुस्त करायला अवसर नव्हता आणि जरासा उशीर प्राणघातक ठरेल याची जाणीव असल्याने त्याने पुन्हा तोच हुकूम घाईने दिला. आणि दुसरा अनुक्षेपक जेव्हा धुरात चकचकला तेव्हा समोरचे सर्व काही एकदम चकाकून उठले आणि अनुक्षेपकाच्या

फैरी उमटल्या. कुझ्नेत्सोवबरोबरच, शेजारच्या तीरावरच्या सर्व तोफा एकाच वेळी धडाडू लागल्या होत्या. सारे वातावरण कंपित होत होते. तांबड्या ज्वालांची आग ओकणाऱ्या रणगाड्यांच्या अंगांवर चिलखतभेदी कुलपी गोळ्यांचा वर्षाव होत होता.

आपण आता एकटे नाही या भावनेच्या जाणीवेसरशी कुझ्नेत्सोवच्या अंगात वीरश्रीचा संचार झाला व त्या बेभान अवस्थेत तो हुकूम ठोकू लागला. त्याच्या कानांना फक्त आपल्या तोफांचा 'धडाड धुम्' ऐकू येत होता. खंदकाच्या पुढच्या बांधावर आदळणाऱ्या गोळ्यांचा त्याला विसर पडला होता. गरम हवेचे झोत त्याच्या तोंडावर बसत होते. कुलपी गोळ्यांची फुटलेली कवचे त्याच्या डोक्यावरून घोंघावत जात होती. तो खाली वाकून बसायच्या आतच तोफेच्या संरक्षक आवरणा-पासून दोन मीटर अंतरावर दोन धुराचे खड्डे निर्माण झाले आणि तोफेवरच्या सर्व माणसांनी क्षणात तोफेच्या खंदकात स्वतःला झोकून दिले. त्यांनी आपली तोंडे मातीत लपवली होती आणि बांधापलिकडे उठणाऱ्या प्रत्येक स्फोटाच्या हादऱ्याबरोबर त्यांच्या पाठी उंचावत होत्या. फक्त गोलंदाज येवस्तिग्नेयेव अजून संरक्षक आवरणाच्या मागे, तोफेच्या माशीला आपले कपाळ अवघडलेपणाने घाशीत उकिडवा बसला होता. त्याला आपली जागा सोडून पळायचा अधिकार नव्हता. नेम धरण्याच्या यंत्रणेवर त्याच्या थरथरत्या हातांची पकड बसलेली होती. तांबड्या झालेल्या एका डोळ्याने तो पालथ्या पडलेल्या सहकाऱ्यांकडे तिरपे कटाक्ष टाकीत होता. त्याचे तोंड उघडले गेले. तो काहीतरी विचारतो आहे असे जाणवत होते.

"ज्युनियर सार्जंट..."

कमांडरच्या खंदकातून ज्युनियर सार्जंट चुबारिकोवने डोके वर काढले, आपल्या कुबड काढलेल्या खांद्यांवरची माती झटकली आणि गळ्यात दुर्बीण लोंबती ठेवून तो सरपटत येवस्तिग्नेयेवकडे आला व जणू काही त्याला जागे करीत असल्याप्रमाणे त्याने त्याच्या खांद्याला धरून गदगदा हलविले.

"येवस्तिग्नेयेव! येवस्तिग्नेयेव!"

"तो बधीर झालाय का?" कुझ्नेत्सोवही सरपटत गोलंदाजाकडे गेला. "येवस्तिग्नेयेव, काय झालं? तुला अजून नेम धरता येतो?"

"होय, मला नेम धरता येतो," आपले डोके हलवीत गोलंदाज कष्टाने म्हणाला. "माझे कान बधीर झालेत... तुमचे हुकूम आणखी मोठ्यांदा ओरडा!"

त्याने बाही वर उचलली व कानातून वाहणारी रक्ताची बारीक लाल धार टिपली. तिकडे अजिबात न पाहता त्याने तोफेच्या दुर्बीणीला डोळा चिकटवला.

"चला उठा! सगळे तोफेकडे या!" अधीऱ्या स्वरात कुझ्नेत्सोवने ओरडून हुकूम दिला. आपल्या हातांनी त्याने त्यावेळी माणसांना खेचून तोफेशी आणले असते अशी त्याची मन:स्थिती होती. त्याला घशात काहीतरी अडकल्याची भावना तीव्रपणे होत होती. "चला, उठा सगळे! तोफांकडे चला! तोफांकडे चला! तोफा ठासा!"

पुढच्या सबंध संरक्षण आघाडीवर आता रणगाड्यांची नागमोडी फळी धावून येत होती. पेटणाऱ्या खेड्याच्या उजव्या कडेने त्यांनी वळसा घातला होता. धुरामध्ये पुढचे दिवे अजूनही पेटलेले दिसत होते. पेटते अनुक्षेपक सरसरत रणगाड्यांवर कोसळत होते, रणगाड्यांच्या गोळ्यांशी त्यांच्या टकरा होत होत्या.

तोफखान्याच्या प्रचंड दणदणाटामध्ये काहीवेळा पायदळाच्या खंदकांतून उमटणारा रणगाडाविरोधी बंदुकांचा कडकडाट ऐकू येत होता. डावीकडे रणगाड्यांनी खिंडीला बगल घातली होती, तीर गाठला होता व पुढच्या चौकीच्या खंदकावर ते चालून येत होते. शेजारचा तोफखाना आणि नदीतीराच्या दुसऱ्या बाजूचा तोफखाना त्यांच्यावर आगीचा वर्षाव करीत होते. खेड्याच्या पलिकडे दूर अंतरावर, धुरकट आकाशात सोविएत विमानांचा काफला, अद्याप न दिसणाऱ्या जर्मन रणगाड्यांच्या दुसऱ्या लाटेवर प्रहार करण्यासाठी, आवाज न करता पुढे सरकताना दिसत होता. पण तोफखान्याच्या प्रत्यक्षात समोर नसलेल्या सर्व गोष्टी अतिदूरच्या धोक्यासारख्या वाटत होत्या. नदीतीरावर उभारलेल्या संरक्षक मोर्चांच्या रेषेभोवती आता रणगाड्यांच्या पहिल्या लाटेने अर्धवर्तुळ धरले होते व ज्या ठिकाणी तोफा उभ्या होत्या तिकडे रणगाड्यांनी मोहरा धरताच त्यांच्या पुढच्या दिव्यांचा प्रकाश थेट गोलंदाजांच्या डोळ्यांमध्ये घुसत होता. दोन करड्या आकृती धुरामधून थेट आपल्या पलटणीसमोर येत असलेल्या कुझ्नेत्सोवला आता स्पष्ट

दिसत होत्या. तोफेकडे घाईने धावणाऱ्या आपल्या लोकांना त्याने हुकूम दिला आणि बत्तीचा धडाका उडताच आपल्या दुर्बिणीतून त्याने तोफगोळ्याचा मागोवा घेतला. त्या समोरच्या बर्फाच्या व धुराच्या कल्लोळातून येणाऱ्या काटकोनी आकृतींपर्यंत तोफेचे लक्ष्य पोचत नाही असे त्याच्या लक्षात आले.

"आणखी वर! माशा आणखी वर चढवा! लौकर! येवस्तिग्नेयेव! माशा वर! लगाव बत्ती!"

पण आता लोकांच्या मागे तगादा लावण्याची गरजच नव्हती. सारेजण एका तंद्रीत काम करीत होते. कुलपी गोळे धडाधड उडत होते, हात भराभरा गोळ्यांना तोफात सारीत होते, स्फोटाने तोफ मागे येताच सगळे पटापटा आडवे पडत होते. ज्युनियर सार्जंट चुबारिकोव जणू अख्ख्या चेहऱ्याने हुकूम उचलीत होता, गुडघ्यावर बसून येवस्तिग्नेयेवला ते पुन्हा ऐकवीत होता. येवस्तिग्नेयेव आपल्या माशी-वरचा डोळा क्षणभरही बाजूला करीत नव्हता.

"तीन फैरी... लागोपाठ!" एका विलक्षण आसुरी आनंदाने कुझ्नेत्सोव ओरडला. आपल्या सहकाऱ्यांच्या त्या क्षणिक एकजुटीच्या जाणिवेने तो रोमांचित झाला होता, जणू जगातले दुसरे काहीही त्यांना मृत्यूइतके जवळ आणू शकत नव्हते.

धुरातून पहिल्या रणगाड्याचे टप सारखे डोकावत होते. एकाएकी तो अडखळल्यासारखा थांबला आणि इंजिनाचा प्रचंड घरघराट करीत तो स्वत:भोवती गिरक्या घेऊ लागला. एखाद्या प्रचंड ड्रिल मशिनने जमीन खोदावी तसे ते दृश्य दिसत होते.

"पट्ट्यांची साखळी तुटली!" आनंदाने व आश्चर्याने आपल्या लांब मानेवरचे डोके नाचवीत चुबारिकोव ओरडला आणि त्याने हातमोजाने मांडीवर जोरजोरात थापट्या मारल्या. "कॉम्रेड लेफ्टनंट!"

"चार फैरी... लागोपाठ!" त्याला ऐकूनही न ऐकल्यासारखे करीत कुझ्नेत्सोवने बेभान होऊन हुकूम ठोकला. कुलपी गोळ्यांची उडणारी रिकामी टोपणे व प्रत्येक धडाक्याबरोबर तोफेमागे लपणारे त्याचे लोक एवढीच त्याला जाणीव होत होती.

रणगाडा अजूनही त्याच जागेवर गरगरत होता. त्याच्या चाकांवरचा एक पट्टा निखळून पडला होता. त्याचे टपही गरगर फिरत होते.

तोफखान्याच्या दिशेने त्याच्या तोफेची नळी रोखली जात होती. त्याच्या नळीच्या तोंडातून आगीचा लोळ बाहेर पडला आणि खंदकाच्या बांधावर प्रचंड स्फोट होऊन त्याची कवचे तोफेवर ठिणग्यांचा पाऊस पाडीत उधळली. त्याचक्षणी त्या रणगाड्याच्या चिलखतावर पेटते काहीतरी आदळले व निमिषार्धात मोठमोठ्या ज्वालांनी त्याला लपेटले. बेभान आनंद व त्वेष अशा संमिश्र भावनांनी कुझ्नेत्सोव ओरडला "शाब्बास येवस्तिग्नेयेव! हे असंच उत्तर दिलं पाहिजे!"

आगीच्या ज्वालांनी लपेटलेला तो रणगाडा एकदम पुढे सरला व तोफखान्याच्या दिशेने कोन करून एकदम हिसका देऊन थांबला. त्याच्या पिवळ्या चिलखतावरचे पांढरे स्वस्तिकचिन्ह स्पष्ट दिसत होते. त्या क्षणाला ते सारे रणमैदान, रणगाड्यांचे ते उसळणारे वादळ आणि शेजारचे धडाडणारे तोफखाने, हे सर्व काही अदृश्य झाल्यासारखे, कुठेतरी दूर पार्श्वभूमीवर विरून गेल्यासारखे वाटले. सर्व लक्ष केवळ त्या आघाडीच्या रणगाड्यावर केंद्रित झाले आणि त्याच्या अद्याप धड असलेल्या बाजूवर, जणू दुसऱ्या ग्रहावरून अवतरल्यासारख्या वाटणाऱ्या स्वस्तिक चिन्हांकित अशा त्या प्रचंड आकाराच्या कोळयावर, तोफेने अखंड सरबत्ती चालवली होती.

मागच्या धुरामधून जायबंदी झालेल्या पुढाऱ्याला वळसा घालून जेव्हा दुसरा रणगाडा अवतरला तेव्हाच कुझ्नेत्सोवने आपला धडाका थांबवला. हा दुसरा रणगाडा आपले दिवे विझवून तोफेच्या माशीचा अचूक नेम चुकविण्यासाठी सतत डावीउजवीकडे झुकत पुढे धावत होता.

"दुसऱ्या रणगाड्यावर चिलखत भेदी! ..." आणि रणगाड्याच्या पहिल्या गोळ्याची अपेक्षा करीत खाली वाकले.

रणगाड्याच्या पहिल्याच गोळ्याने खंदकापुढच्या बांधाच्या चिंध्या केल्या. त्याने जवळून तोफेचे किरण साधले आहे हे लक्षात येताच कुझ्नेत्सोवने बत्ती देण्याच्या फलाटावर स्वत:ला झोकून दिले व बांधावरून उठणाऱ्या दाट ज्वाळांच्या धुरातून तो आपल्या माणसांपर्यंत सरपटत गेला. दुसऱ्या स्फोटाच्या अपेक्षेने घाबरून दबून बसलेल्या आपल्या गोलंदाजांचे काळेमिट्ट चेहरे क्षणभर त्याच्या लक्षातच आले नाहीत. तोफेच्या माशीपासून गोलंदाज येवस्तिग्नेयेवला मागे सरताना पाहून तो

भसाड्या आवाजात ओरडला, "नेम धर! थांबू नको! येवस्तिग्नेयेव! चुबारिकोव!"

कनिष्ठ सार्जंट चुबारिकोव बांधावर एका कुशीवर कलंडून दोन्ही हातांनी डोळे चोळीत होता.

"मला काही दिसत नाही... डोळ्यात खूप माती उडालीय. एक मिनिट, मी..."

रणगाड्याच्या पुढच्या गोळ्याने त्यांच्यावर मातीच्या ढेकळांचा पाऊस पाडला. तोफेच्या संरक्षक कवचाला कपचे घासून गेले आणि टीएन्टीच्या दाट धुरात कुझ्नेत्सोव घुसमटला. त्याला धड श्वास घेता येईना, तरीही त्या अवस्थेत तो बांधापर्यंत सरपटत रणगाडा कुठे आहे ते बघायला गेला. आणि एकदम विजेचा धक्का बसावा तशी त्याला जाणीव झाली. हीच अखेर! एका क्षणात सारे काही संपणार... पण असे कसे झाले?

"येवस्तिग्नेयेव, लगाव बत्ती!"

कुझ्नेत्सोवने आपल्या तोफेवरच्या लोकांकडे पाहिले. त्यांचे चेहरे तेलकट काळे पडले होते. धुरामधून धडपडत, चाकांशी आडवे पडून ते कुलपी गोळे तोफांमध्ये ठासत होते. गुडघ्यावर वाकून तोफेच्या माशीला डोळा भिडवून उभ्या असलेल्या येवस्तिग्नेयेवचे भलेमोठे लालबुंद हातही दगडासारखे निश्चल झाल्यासारखे वाटत होते. त्याची टोपी सारखी कपाळावर घसरत होती व तो ती सारखी मागे सारीत होता. अखेरीस टोपीबरोबर त्याच्या डोळ्यावरचा तोफेच्या माशीचा रबरी तुकडाही घसरून खाली पडला. त्याच्या घामाने भिजलेल्या डोक्यावरून तो घरंगळत त्या रुंद पाठीवरून खाली पडला. त्याने आपले गुडघे किंचित पुढे सरकवले. त्याच्या जाड मानेतून वाफेचे लोट उमटत होते, त्याच्या कुरळ्या केसांमधूनही वाफ उमटत होती. त्याचा खांदा हलला. चापाचा घोडा शोधीत त्याचा उजवा हात हवेत फिरला. एखाद्या भयानक दुःस्वप्नात दिसावा तसा त्याचा तो हात कमालीचा हळू फिरत होता. अगदी सावकाशपणे त्याने चाप चाचपडला; जणू काही तिथे लढाई चालली नव्हती, रणगाडे नव्हते आणि केवळ तो जागेवर आहे किंवा नाही एवढेच चाचपून पहावे तसे त्याचे चालले होते.

"येवस्तिग्नेयेव!... दोन फैरी! लगाव बत्ती!"

मशिनगनच्या गोळ्यांनी बांधाला पिंजून काढले. तोफेच्या संरक्षक कवचावर मातीचा सडा उडाला. उजवीकडून रणगाड्याच्या इंजिनाचा घरघराट डोक्यावर येत असल्याचे जाणवत होते. कुझ्नेत्सोवच्या सर्वांगाला धातूचा खडखडाट जाणवत होता. जणू आपण भूमीत चिरडले जात आहोत असे त्याला वाटत होते. त्याला आपले डोकेही वर उचलता येईना. क्षणभर असे वाटले की, तो रणगाडा आता तोफेला निर्दयपणे चिरडून टाकणार, त्याच्या पोलादी पंजांखाली सर्वांचा चुराडा होणार, कुणीही त्याच्या मगरमिठीतून सुटणार नाही... काय होते आहे मला? जिवाच्या आकांताने त्याने विचार केला. मला उठले पाहिजे! उठले पाहिजे!

"येवस्तिग्नेयेव, दोन फैरी! लगाव बत्ती!"

तोफ लागोपाठ दोनदा उडाली. त्याच्या कानाच्या पडद्यांवर दोन जबरदस्त दणके आदळले. गोळ्यांची रिकामी कवचे वाफाळत मागच्या ढिगांवर आदळली तेव्हा कुझ्नेत्सोवने बांधावर स्वतःला उचलून धरले व अचूक नेमासाठी अनुक्षेपकांचा मागोवा घेतला.

त्याच्या तोंडावर गरम, भाजत्या हवेचा झोत आदळला. जणू एक प्रचंड फिरते चाक नजरेसमोर फिरावे तसे त्याला वाटले. डावीकडच्या तोफेतून सुटलेल्या गोळ्यांचे अनुक्षेपक रणगाड्याच्या चिलखतावर आदळताच ठिणग्या उडाल्या. उखानोव डाव्या बाजूच्या तोफेवरून मारा करीत होता. रणगाड्याला एक स्फोटाचा जबरदस्त हादरा बसला व तो एकदम मागे सरला. पेट्रोलच्या धुराचा एक प्रचंड डोंब त्यातून उसळला.

आपल्या बलवत्तर नशीबावरच्या श्रद्धेने, त्या क्षणी जाणवलेल्या बांधिलकीच्या भावनेने, कुझ्नेत्सोवच्या घशात आवंढा दाटून आला. खळखळून रडावेसे त्याला वाटले. त्याने पाहिले की, येवस्तिग्नेयेवने दोनदा अचूक गोलंदाजी करून त्या रणगाड्याचा भेद केल्यानंतर उरलेले निकाल लावण्याचे काम उखानोव उरकीत होता.

समोरची प्रत्येक वस्तू लालभडक दिसत होती आणि उत्तर किनाऱ्यावरही आग भडकली होती. त्या नरककुंडामध्ये बचाव करणाऱ्या तोफखान्यांचा सतत धडधडाट काळी भगदाडे पाडीत होता. तोफगोळे फुटत होते आणि खेड्यामधून निघणाऱ्या धुरात त्या पुढे घुसणाऱ्या रणगाड्यांच्या

प्रचंड अर्धवर्तुळामधून ओकला जाणारा तेलकट धूर मिसळत होता. सबंध स्तेपवर धुराचे एक आच्छादन पसरले होते व या छताखाली अधिकाधिक संख्येने रणगाडे पुढे सरसावत होते. दक्षिण किनाऱ्यावरील मोर्चांवर ते आपली पकड अधिकाधिक आवळत होते. तोफखान्याच्या अखंड भडिमारानंतरही रणगाड्यांचा हल्ला किंचितही विस्कळित अथवा दुबळा झाला नव्हता. फक्त मध्यभागी तो किंचित मंदावला होता आणि त्यामुळे दोन्ही बाजूंवर त्याने अधिक दबाव आणला होता. दोन्ही फळ्यांवर सतत इशाऱ्याचे अग्निगोलक उडत होते आणि रणगाडे उजव्या बाजूला, टेकाडापलिकडे तोफखाना होता त्या दिशेला व डाव्या बाजूला शेजारच्या तोफखान्याने राखलेल्या पुलावर धडका मारू लागले होते.

"उजवीकडे रणगाडे आलेत! त्यांनी फळी फोडली!"

ही आरोळी कुझ्नेत्सोवच्या मेंदूत खस्सकन घुसली आणि जी गोष्ट पाहण्याची त्याने कधीही अपेक्षा धरली नव्हती ती पाहण्यासाठी तो वळला.

"ते सरळ तोफखान्यावर चालून येताहेत!" कुणीतरी ओरडले.

स्तेपवरील धुराने सबंध आकाश झाकोळून टाकले होते. सूर्याला त्याने इतके गुदमरून टाकले होते की, तो एखाद्या थंडगार ब्राँझच्या गोळ्यासारखा दिसू लागला होता. पण सबंध रणभूमीवर धुराचा बुरखा तोफगोळ्यांनी फाडला जात होता, पाताळातून आगीचे लोळ उमटल्यासारखे वाटत होते, एकूण रणभूमीला नरकाचे रूप प्राप्त झाले होते आणि त्या पुढे सरणाऱ्या झुंडीतून दावलात्यानच्या तोफांच्या दिशेने अचानक तीन रणगाड्यांच्या प्रचंड काळ्या सावल्या अवतरल्या. परंतु दावलात्यानच्या तोफा थंड होत्या.

तिथे कुणीच नाही का? ते सगळे खलास झाले? कुझ्नेत्सोव स्वतःशी आश्चर्य करीत होता. पण एवढ्यात दुसऱ्या वास्तववादी विचाराने तो विचार चटकन पुसून टाकला. जर हे रणगाडे तोफखान्यांच्या पिछाडी-पर्यंत घुसले तर एकामागून एका तोफेचा ते निकाल लावतील.

"उजव्या बाजूला रणगाड्यांवर!..." त्याचा आवाज फाटला आणि त्याने आपला श्वास आवरायचा प्रयत्न केला. दावलात्यानने जर सरबत्ती सुरू केली नाही तर आपण असहाय ठरू याची त्याला जाणीव झाली. "तोफ वळव! उजवीकडे, उजवीकडे! लौकर! येवस्तिग्नेयेव! चुबारिकोव! अरे लौकर तोफ वळवा!"

चाकांना धरून तोफ वळविण्याची पराकाष्ठा करणाऱ्या आपल्या लोकांच्या मदतीला तो धावला. त्यांनीही पुढे धावून येणारे रणगाडे पाहिले होते व तोफा उजवीकडे निदान पंचेचाळीस अंशात वळवल्या पाहिजेत याची त्यांना जाणीव झाली होती. हात धडपडत होते, बर्फात बूट निसरत होते. तोफेच्या संरक्षण कवचापुढे येवस्तिग्नेयेवचा घामेजलेला, डोळे विस्फारलेला, तांबडाभडक चेहरा दिसत होता. खंदकाच्या बांधाला टाचा टेकवून साऱ्या शक्तिनिशी तो एका चाकाला वळवू पहात होता. अजूनही त्याच्या कानामधली रक्ताची धार त्याच्या पायघोळ कोटाच्या कॉलरवर ठिपकत होती. त्याच्या कानाच्या पडद्याला बहुधा इजा झाली होती.

"आणखी!" तो ओरडला. "चला! तिला वळवा आणखी!"

"तोफ उजवीकडं वळवा! लौकर!"

"आणखी! आणखी!"

फळी फोडून रणगाडे तोफखान्याच्या दिशेने रोरावत येत होते. तांबड्यालाल आगीच्या आवरणामधून ते दावलात्यानच्या मोर्चांच्या दिशेने धावत होते. वेग वाढवताना अधिक धूर ओकत होते.

"ते सगळे तिथं ठार झालेत का? ते तोफा का उडवीत नाहीत?" कुणीतरी संतापाने ओरडले. "अरे त्यांना काय धाड भरलीय का?"

"लौकर! आता सगळे मिळून!"

"आणखी उजवीकडं! आणखी!" येवस्तिग्नेयेव घोगऱ्या आवाजात ओरडला.

अखेरीस तोफ उजवीकडे वळविण्यात आली व चाकांखाली ओंडके ठेवण्यात आले. नेम धरण्याच्या यंत्रणेची चाके येवस्तिग्नेयेवने भराभरा फिरवली आणि तोफेची नळी हळूहळू जशी बांधावर चढली तसे त्याच्या घामेजल्या गालांवरचे स्नायू ताणले गेले. नेम धरण्याचे क्षण कमालीचे असह्य झाले, खूप लांबल्यासारखे वाटले. कुझ्नेत्सोवला फक्त स्वतःचाच आवाज ऐकू येत होता, "लगाव बत्ती! लगाव बत्ती! लगाव बत्ती!" तो हुकूम त्याच्या कानांमध्ये घुमत होता, तोफेवर काम करणाऱ्या सर्वांच्या रंध्रा रंध्रात घुमत होता, रणगाड्यांना थोपवायला उशीर झालेल्या त्यांच्या वेगाने काम करणाऱ्या हातांना तो जाणवत होता.

आम्हा सर्वांना आता मेले पाहिजे काय? ते रणगाडे आता आमच्या

मोर्चांवर घुसतील आणि आम्हाला व तोफांना चिरडून टाकायला सुरुवात करतील ! . . . दावलात्यानला काय झालंय ? ते तोफांना बत्ती का लावीत नाहीत ? अजून ते जिवंत आहेत का ? मला काहीतरी केले पाहिजे ! मरण कसं असतं ? नाही, मी मारला जाणार नाही ! . . . जर मी स्वतःला बजावलं की असं होणार नाही, तर तसं होणार नाही ! . . . मला निर्णय घेतला पाहिजे, काहीतरी केलं पाहिजे ! त्या तोफेजवळ कुणी नसलं तरी ! . . .

"कॉम्रेड लेफ्टनंट, आम्हाला आणखी तोफ वळवणं अशक्य आहे !" चुबारिकोवच्या ओरडण्याने त्याची विचाराची तंद्री भंगली. आपले डोळे चोळीत आणि मान हलवीत तो कुझ्नेत्सोवकडे रोखून पहात होता तेव्हा तो लाल अश्रू ढाळीत होता असे वाटत होते.

"लगाव बत्ती ! रणगाड्यांवर !" कुझ्नेत्सोव ओरडला. एकाएकी त्याला स्वतःच्या पायांना हिसका बसल्याची जाणीव झाली व दळणवळणाच्या उथळ चराकडे त्याने धाव घेतली. "मी दुसऱ्या पलटणीकडं जातोय ! चुबारिकोव, तू इथं माझ्या जागी काम कर ! मी दावलात्यानकडं जातो !"

तिथे गेल्यावर आपण काय करू किंवा काय करता येईल याची काहीही कल्पना मनात नसताना तो दुसऱ्या पलटणीच्या थंड पडलेल्या तोफांकडे चरांमधून अंग चोरीत धावत होता. चर कमरेपर्यंतच खोल असल्याने त्याला सारी रणधुमाळी दिसत होती. तोफांचे गोळे दणादण आदळत होते, अनुक्षेपकांचे पट्टे उमटत होते, रणगाड्यांच्या झुंडी काळा धूर ओकीत होत्या आणि तिकडे पेटलेले खेडे आसमंत धुराने भरून टाकीत होते. आणि उजवीकडे, शेजारच्या तोफखान्यांच्या टप्प्यात नसलेल्या मोकळ्या मैदानातून तीन रणगाडे सुसाट धावत येत होते. पिवळसर रंगाची ती तीन प्रचंड धुडे दावलात्यानच्या तोफांच्या मोर्चा-पासून अवघ्या दोनशे मीटर अंतरावर येऊन ठेपली होती. त्यांच्या लांब तोफांच्या नळ्यांमधून आग ओकली जात होती. खंदकांच्या बांधावर फुटणाऱ्या तोफगोळ्यांच्या आवाजात क्षणभर इंजिनांची घरघर दबली जात होती. आपल्या डोक्यावरून मशिनगनच्या दोन फैरी कडकडत गेल्याची कुझ्नेत्सोवला जाणीव झाली.

आत्ताच नको ! खंदकात मी जखमी होऊन पडायला नको ! या काही क्षणांत मी काय करू शकेन ? तोफेपर्यंत पोचायचे, आणि तेवढेच ?

मागे वळता येत नाही या निराश विचाराने, मागे वळण्याचा अधिकार राहिला नाही या जाणीवेने आणि आपण सरळ रणगाड्यांना सामोरे धावत आहोत, आपल्या नाशाकडे आपण धावत आहोत या विलक्षण जाणीवेने कुझ्नेत्सोव जिवाच्या आकांताने ओरडला, "दावलात्यान! अरे तू काय करतोयस? तोफ चढव!" अखेरीस तो चराच्या टोकाला पोचला. चेहरा पार काळा पडला होता, घाण झालेल्या पायघोळ कोटात त्याचे शरीर घामाने थबथबले होते. तोफेच्या मोर्चावर तो धावत गेला आणि खाली उडी घेत तो ओरडला: "अरे तोफ चढवा! तोफ चढवा!"

त्या ठिकाणचे दृश्य पाहताच तो कमालीचा शहारला. बॉंबस्फोटाचे दोन ताजे भले मोठे खड्डे आणि तोफेच्या चाकांखाली, कुलपी गोळ्यांच्या रिकाम्या टोपणांच्या ढिगामध्ये व खंदकाच्या बांधाखाली मुटकुळी करून पडलेली शरीरे त्याला दिसली. तोफेवरची सारी माणसे अनैसर्गिक अवस्थेत पडली होती. पांढरेफटक पडलेले त्यांचे चेहरे (त्यांच्या हनुवट्यांवरची दाढीची खुंटे चमत्कारिकपणे खोटी चिकटवल्यासारखी भासत होती) जमिनीत खुपसलेले होते किंवा त्यांच्या हातांच्या पांढऱ्या बोटांमध्ये गच्च झाकून घेतलेले होते. पाय पोटाशी ओढून घेतलेले होते, खांदे वाकवलेले होते. जणू शरीरातली निघून जाणारी शेवटची ऊब अडविण्याचा त्यांनी प्रयत्न केला होता. त्या छिन्नभिन्न शरीरांमधून, त्या काळवंडलेल्या पांढऱ्या चेहऱ्यांमधून मृत्यूची दुर्गंधी सुटू लागली होती. पण काही लोक जिवंत असावेत. खंदकातून त्याला कण्हण्याचे व विव्हळण्याचे आवाज ऐकू येत होते, पण त्यांना पहायला वेळ नव्हता.

स्फोटाचा तडाखा बसलेल्या तोफेच्या चाकावर त्याचे डोळे वळले. त्या शेजारी, बांधाच्या खाली दोन शरीरे हालचाल करीत होती. रक्ताने माखलेला, डोळे मंद झालेला, रुंद गालाचा कासीमोवचा चेहरा हळूहळू जमिनीपासून वर झाला. त्याचा एक हात चाकाला पकडू पहात होता, काळी पडलेली नखे टायरला ओरबाडत होती. कासीमोव उठायचा प्रयत्न करताना दिसत होता, पण तोफेपर्यंत शरीराला ओढू शकत नव्हता. फाटलेल्या रबरावर त्याची बोटे अगतिकपणे ओरबाडली जात होती. पाठीची कमान करून त्याने वर उठायचा पुन्हा प्रयत्न केला व भ्रमात तो ओरडला:

"नर्स, जा इथून! दूर जा! आम्हाला तोफ उडवली पाहिजे... मला तू पुरतेस कशाला? मी अजून तरुण आहे! जा दूर! मी अजून जिवंत आहे... मी मरणार नाही!"

त्याचे भक्कम शरीर कमरेत मोडल्यासारखे दिसत होते आणि बँडेज बांधलेल्या बाजूने काहीतरी लालभडक वहात होते. तो अद्याप धक्का बसलेल्या अवस्थेत होता आणि त्यामुळेच काही काळ ती अवस्था त्याला मरणापासून दूर राखत होती.

"झोया!" कुझ्नेत्सोव ओरडला. "दावलात्यान कुठं आहे?"

झोया कासीमोवशेजारी बांधाखाली वाकून बसली होती व त्याचे दुलईदार जाकीट फाडून, त्याच्या पोटावर नवे स्वच्छ बँडेज बांधायचा प्रयत्न करीत होती. त्याचा आखूड लष्करी कोट रक्ताने पुरता भिजला होता. तिचा चेहरा ओढला होता व पांढराफटक पडला होता, चेहऱ्यावर धुराची काळी पुटे बसली होती, ओठ विलगले होते, केस अस्ताव्यस्त झाले होते. तिचा चेहरा अगदी अनोळखी, कुरूप दिसत होता. पूर्वीच्या बेचैन करणाऱ्या गोडव्याचा त्यात लवलेशही राहिलेला दिसत नव्हता.

कुझ्नेत्सोवच्या आरोळीने ती धक्का बसावा त्याप्रमाणे दचकली आणि तिने मदतीच्या याचनेने त्याच्याकडे पाहिले. तिचे लिबलिबित ओठ हलले, पण कुझ्नेत्सोवला काहीच ऐकू आले नाही.

"नर्स, तू जा इथून! दूर जा! मी मरणार नाही!" कासीमोव अजून भ्रमात ओरडत होता. "मला तू का पुरतेस? आम्हाला तोफ उडवली पाहिजे!"

तिचा आवाज न ऐकता फक्त कासीमोवचे विव्हळणे त्याने ऐकल्यामुळे, आपल्या ठिकाणावर संरक्षणाची साखळी तोडून रणगाडे धावून येत आहेत हे तिने किंवा कासीमोवने पाहिले नसल्याने किंवा त्यांना माहिती नसल्याने, कुझ्नेत्सोवने पुन्हा एकदा अवास्तवतेची चमत्कारिक भावना अनुभवली. त्याला वाटले की, आपण प्रयत्नपूर्वक एकदा डोके जोराने हलवावे म्हणजे या संभ्रमित स्वप्नामधून आपल्याला जाग येईल आणि सुंदर, शांत सकाळची उन्हे खिडकीतून भिंतीवर पडलेली पाह्यला मिळतील व हे सारे केवळ वाईट स्वप्नच होते अशा जाणीवेने सुटकेचा निश्वास टाकता येईल.

पण ते स्वप्न नव्हते.

अगदी डोक्यावरच त्याला रणगाड्याच्या इंजिनाचा प्रचंड घरघराट ऐकू येत होता आणि तोफेपुढच्या भूमीची मशिनगनच्या गोळया चाळण उडवीत होत्या. ते आवाज एवढे कानठळया बसवीत होते की, रणगाडे बांधापासून अगदी काही मीटर अंतरावर असावेत. हे आवाज म्हणजे नजीक येऊन ठेपलेला आपला काळ आहे याची मात्र त्याला जाणीव झाली.

"झोया! झोया! इकडं ये! तोफेत गोळे भर. मी नेम धरतो तोवर तू तोफ भर! प्लीज! झोया!"

तोफेच्या माशीचे दांडे बुळबुळीत झाले होते, तिची भिंगाची रबरी चकती त्याच्या भुवईला चिकटली आणि हातचाकांवर त्याला पकड बसवता येईना. कासीमोवच्या रक्ताने ती माखली होती. पण याबद्दलचे सारे विचार कुझ्नेत्सोवच्या मनात क्षणभरच टिकले. माशीवरच्या काळया रेषा खालीवर झाल्या व एकाएकी त्याला रणगाड्याचे फिरणारे दातेरी पट्ट्याचे चाक भिंगातून स्पष्ट दिसले. बर्फाच्या चकत्या उडवीत तो राक्षसी पट्टा जणू तोफेच्या माशीवरच चढत होता असा त्याला भास झाला. घामाचे गरम थेंब त्याच्या डोळयांवर ओघळले आणि सारेच अंधुक दिसू लागले. तापल्या उन्हात मृगजळ दिसावे तसे.

"झोया, गोळे भर!"

"जरा थांब... मला शक्य होत नाही... मी त्याला बाजूला ओढून घेते..."

"लौकर गोळे भर म्हणून सांगतो ना! लौकर! गोळा!"

तोफेच्या माशीपासून तो निराश होऊन मागे वळला. कासीमोवचे शरीर तिने चाकापासून दूर खेचत नेले व खंदकाच्या बांधाखाली त्याला निजवले आणि मगच तिने कुझ्नेत्सोवच्या अधीर, क्रुद्ध चेहऱ्याकडे पाहिले. प्रत्यक्षात काय घडत होते याची अर्थातच तिला काहीच जाणीव नव्हती.

"तोफेत गोळा भर म्हणतो ना! तुला ऐकायला येत नाही? गोळा! गोळा!! ... त्या खोक्यातला! गोळा!!!"

"होय लेफ्टनंट!"

ती चाकांजवळच्या खोक्याला उघडायला धडपडत गेली, आपल्या ताठलेल्या बोटांनी कष्टाने तिने एक गोळा उचलला आणि तोफेच्या

मागच्या बाजूत कसाबसा कोंबला. गोळा भरताच तिथले झाकण खटकन बंद झाले आणि ती डोळे मिटून चाकांशेजारी गुडघ्यावर खाली कोसळली.

त्याने हे पाहिले नाही. रणगाड्याच्या प्रचंड फिरत्या चाकाच्या काळ्या रंगाने भिंग व्यापले होते. रणगाड्याच्या कर्कश्य आवाजाने तो तोफेला घट्ट चिकटला होता. जमीन हादरत होती. त्याला वाटले आपलेच गुडघे कापताहेत किंवा हात कापताहेत. चाप ओढायला त्याने हात हलवला तेव्हा त्याच्या कपाळावर घामाचे थारोळे जमले होते. त्या घामेजल्या डोळ्यांना त्या क्षणाला जे दिसत होते ते तिला दिसत नव्हते, कारण स्फोटाच्या अपेक्षेने तिने डोळे मिटून घेतले होते. जणू तोफेपासून अवघ्या पन्नास मीटरवर आलेले ते रणगाडे ती पाहू इच्छित नव्हती.

तोफेच्या माशीच्या उभ्या-आडव्या तारा एका जागी स्थिरावू शकत नव्हत्या, कारण समोर खडखडत्या धातूचा एक प्रचंड समूह दिसत होता व त्याने सारे जग व्यापले होते.

त्याने चाप दाबला. आणि रणगाड्याने अगदी जवळून उडवलेली तोफ अजिबात ऐकली नाही.

## प्रकरण दहावे

अतिशय जोरात तो तोफेपासून मागे फेकला गेला. कसलीतरी कठीण धातूची वस्तू त्याच्या छातीवर आदळल्याची त्याला जाणीव झाली आणि त्या बधीर अवस्थेत त्याला आपल्या घरासमोरच्या आवारातल्या लीपाच्या* झाडाच्या गडद रंगाच्या डहाळ्या झुलताना दिसल्या. त्या डहाळ्यांवरून पावसाचे पाणी टपटपत होते. आपल्या छातीवर एवढ्या जोराने काय आदळले आणि आपल्या डोक्यामागच्या केसांना कसल्या गरम झळा लागताहेत ते जाणून घ्यायचा त्याने प्रयत्न केला. त्याने ओकारी काढण्याचा अयशस्वी प्रयत्न केला आणि या ओकारीच्या भावनेने त्याला मंदपणे जाणवले की, आपण अद्याप जिवंत आहोत. आपल्या तोंडात काहीतरी गरम आणि खारट द्रव भरला असल्याचे त्याला जाणवले आणि तोंडावर दाबलेल्या मनगटावर त्याने

---

* रशियात जून-जुलैमध्ये बहरणारे एक झाड.

तांबडे ठिपके पाहिले. ते रक्त होते? कुठले? तो जखमी झाला होता? काय घडले होते?

"लेफ्टनंट! काय झालं मित्रा? काय आहे ते?"

त्याने रक्त थुंकले आणि डोके वर उचलले. आपल्याला काय झाले ते समजून घ्यायचा तो अजूनही प्रयत्न करीत होता.

पाऊस का पडत होता? मी झाडाखाली का उभा होतो? कोणतं झाड? कुठं? मॉस्कोतलं? माझ्या लहानपणचं? मी कुठं होतो असं वाटलं?

धडाक्यानंतर तो तोफेपासून दोन मीटर अंतरावर चाकांच्या मध्ये तोफगोळ्यांच्या उघडचा खोक्यावर फेकला गेला होता व छातीवर पालथा पडला होता. तोफेचे संरक्षण कवच उजव्या बाजूला कपचे उडून फुटले होते. बांधाचा मोठा भाग फुटला होता व तिथे मोठा खड्डा पडला होता. काही क्षणांपूर्वीच तोफेच्या दिशेने धावून येणारे, साऱ्या जगाला झाकोळून टाकणारे ते धातूचे प्रचंड खडखडणारे धूड सुमारे वीस मीटर अंतरावर उभे होते व दर क्षणागणिक आगीच्या ज्वाळा त्याला अधिकाधिक लपेटत होत्या.

या जळत्या धूडानजीक दुसरा रणगाडा स्तब्ध उभा होता. पुलाच्या दिशेने त्याची तोफ खाली रोखलेली होती. त्याच्यातून काळ्या तेलकट धुराचे लोट उसळत होते.

पहिल्या रणगाडचातील तोफगोळ्यांचे धडाधड स्फोट होत होते व त्याचे धूड हादरत होते. पण चाके मात्र जिवंत असल्यासारखी पुढेमागे खळखळत होती. खरपूस भाजलेल्या मांसाच्या गोडसर वासात जळक्या तेलाचा वास मिसळून तो मिश्रगंध त्याच्यापासून पसरत होता.

मी दोन रणगाडे फोडले? कुझ्नेत्सोव स्वतःशीच बधीरपणे विचार करीत होता. त्या वासाने त्याला मळमळू लागले होते. घडल्या घटनांची उजळणी संगतवार करण्याचा तो प्रयत्न करीत होता. मी केव्हा जखमी झालो? कुठे? झोया कुठे आहे? ती अगदी माझ्याजवळच...

"झोया!" त्याने हाक मारली आणि पुन्हा त्याला उलटीची भावना झाली.

"लेफ्टनंट! काय झालं रे?"

खंदकाच्या बांधाखाली बसून ती आपल्या दोन्ही हातांनी आपल्या

कोटाच्या बटणांशी धडपडत होती. तिचे डोळे मिटलेले होते व ती अर्धवट भानावर होती हे दिसत होते. तिची स्वच्छ, सुंदर पांढरी केसाळ टोपी दिसत नव्हती. तिच्या तोंडावर व खांद्यावर तिचे केस विस्कळितपणे पसरले होते. आपल्या लोंबणाऱ्या झिंज्या नकळत बाजूला सारताना तिचे शुभ्र दात मध्येच चमकत होते.

"झोया!" तो पुन्हा अस्फुट स्वरात म्हणाला व कुलपी गोळयांच्या खोक्यावरून, छातीत टोचणाऱ्या चिलखतभेदी गोळयांच्या पोलादी टोकांवरून, आपल्या शरीराचे अवजड वजन वर उचलण्याचा त्याने एक व्यर्थ प्रयत्न केला.

तिने तोंडावरचे केस बाजूला करीत, वेदना सहन करीत त्याच्याकडे पाहिले व ती काहीतरी पुटपुटली. घण बसणाऱ्या त्याच्या डोक्यातील वेदनेमुळे त्याला ती काय बोलली ते मुळीच ऐकू आले नाही. मग त्याच्या लक्षात आले की, तोफेच्या चाकामधून कासीमोवचा हात डोकावतो आहे व जमिनीवर क्षीणपणे खरवडतो आहे त्याकडे तिचे डोळे रोखले गेले आहेत.

बांधाला डोके टेकलेल्या निश्चल शरीराचा काळा ढीग त्याने पाहिला. कासीमोव आता कण्हत नव्हता. मान खाली टाकून तो पडला होता. बाँबच्या तुकडयांनी त्याच्या जाकीटाच्या चिंध्या केल्या होत्या, स्फोटा-मुळे उडालेल्या बर्फाचा त्याच्या पाठीवर सडा पडला होता आणि त्याच्या नमदी बुटांची टोके आतल्या बाजूस वळली होती. फक्त त्याच्या हातात अजून प्राण होता. ती खरवडणारी बोटे कुझ्नेत्सोव पाहू शकत होता.

तोंडात जमा झालेला खारट द्रव त्याने गिळला. त्याला झोयाला ओरडून सांगावेसे वाटत होते की, आत्ता काय घडले ते त्याला समजले होते; बांधावर गोळा फुटला होता आणि त्याचा त्या दोघांना धक्का बसला होता व कासीमोवची अखेरची घटका भरत आली होती आणि त्याला ताबडतोब तोफेच्या मागच्या बाजूला उचलून नेणे आवश्यक होते. हे ताबडतोब का केले पाहिजे किंवा प्रत्येक क्षण मोलाचा असताना आणि ते दोघेच तेथे जिवंत उरले असताना झोया का घुटमळते आहे हेच त्याला समजत नव्हते.

"झोया!" त्याने पुन्हा हाक मारली, तोंडातले रक्त थुंकून दीर्घ श्वास घेतला, कुलपी गोळयांच्या खोक्यावरून तो खाली सरपटत घसरला

व बांधापर्यंत रांगत गेला. आपल्या दोन्ही हातात त्याने तिचे खांदे आशेने आणि अगतिकपणे धरले. "झोया! तुला स्फोटाचा धक्का बसलाय का? झोया, माझं बोलणं तुला ऐकू येतंय का? तुला जखम झालीय का? जखमी झालीयस का? झोया!"

कोणताही प्रतिकार न करता तिचे खांदे त्याच्या हातांच्या भाराखाली वाकले. फक्त तिच्या डोळ्यात व घट्ट मिटल्या ओठांमध्ये प्रतिकार उमटला होता. अचानक तिने आपल्या हातमोजाने त्याच्या हनुवटीवरचे रक्त पुसले. त्याने हातमोजावर रक्ताचे डाग पाहिले.

"काही विशेष झालं नाही! मी खोक्यावर आपटलो तेव्हा थोडं लागलं!" तो मोठ्यांदा ओरडला. "झोया, कासीमोवचं काय झालंय बघ! तुला ऐकू येतंय? लौकर! मला तोफ चढवली पाहिजे. मला वाटतं कासीमोव..."

तो लटपटत पायांवर उभा राहिला आणि तोफेच्या चाकांकडे तसाच धडपडत गेला. तोफेचा गोळा उचलायची किंवा तोफेच्या माशीकडे जायची त्याला घाई झाली होती. पण एवढ्यात त्याने पाहिले की, झोया बांधापासून सरपटत तोफेच्या चाकाजवळ आली होती. त्याने तिचा आवाज ऐकला.

"लेफ्टनंट! मला मदत कर ना रे!"

त्या दोघांनी मिळून कासीमोवला तोफेच्या मागच्या भागात आणले. झोया त्याच्यावर ओणवी होऊन त्याला तपासू लागली. त्याची छाती व तांबड्या काळपट रक्ताने माखलेले त्याच्या पोटावरील बँडेज तिने तपासले. फुटलेल्या गोळ्याच्या कपचांनी त्याच्या चिंध्या केल्या होत्या.

अखेरीस तिने हताशपणे हात बाजूला टाकले व ती सरळ झाली. कासीमोवच्या चेहऱ्याकडे ती पहात असताना काय घडले होते ते तिच्या डोळ्यात उमटले. होते. शेवटचा गोळा बांधावर फुटला त्यावेळी त्याच्या उडालेल्या कपचांनी कासीमोवच्या छातीत मार बसला होता व त्यातच तो गोलंदाज ठार झाला होता हे कुझ्नेत्सोवलाही उमगले.

मी तोफ उडवू शकतो! या धुरावर, या स्वास्तिकांवर, या रणगाड्यांवर. सबंध स्तेपवर. जोपर्यंत तोफेला ते बंद पाडीत नाहीत, जोपर्यंत तोफेच्या माशीला धक्का पोचत नाही! एखाद्या दारुड्यासारखा झेलपाटत तो तोफेकडे गेला. काहीतरी नुकसान पोहोचले असावे अशा

अपेक्षेने त्याने तोफेची माशी तपासली. पण ती अगदी पूर्ण ठाकठीक होती. स्फोटांच्या कपचांचा अजिबात धक्कासुद्धा लागला नव्हता. अधीरपणामुळे त्याची हाताची बोटे थरथर कापू लागली, जलदी करण्याची त्याला निकड भासू लागली.

कुलपी गोळ्यासाठी तो ओरडला, पण त्याला त्याचा आवाज ऐकू आला नाही. त्याने स्वतःच तोफ भरली आणि माशीला डोळा भिडवून त्याने नेम धरण्याची यंत्रणा एवढ्या भराभरा फिरवली की, जणू तो तोफेच्या नळीशी एकरूप झाला होता. धुरातून तिची नळी आजूबाजूला होत होती, त्याचे जणू ती सारे काही ऐकत होती, एखाद्या माणसा-प्रमाणे त्याला समजून घेत होती.

"लगाव बत्ती!"

तोफेशी झालेली ती एकरूपता, संभाव्य मृत्यूविषयी वाटणारा तिटकारा, तो आव्हानात्मक रणोन्माद या सर्वांचा त्याला पुन्हा प्रत्यय आला. मी वेडा होत असलो पाहिजे, त्याच्या मनात विचार आला. कुठेतरी जाग्या असलेल्या जाणीवेने आपण हे काम करतोय याची त्याला कल्पना आली.

अधीरेपणाने त्याने माशीमधून रणमैदान न्याहाळले. आगीच्या स्फोटांबरोबर धुराचे डोंब उसळत होते. खिंडीच्या डाव्या उजव्या बाजूंना पिवळ्या रणगाड्यांच्या लोखंडी झुंडी सरकत होत्या. तोफेच्या धुराने भरलेल्या मागील भागात त्याच्या थरथरत्या हातांनी गोळे भरले व घाईघाईने, अस्वस्थ मनःस्थितीत त्याच्या बोटांनी चाप दाबला. त्याच्या घामाने भिंग ओले झाले होते व ते एकदम उशी घेऊन त्याच्या कपाळावर आपटले. त्यामुळे धुरामधून, आगीच्या लोळांमधून त्या पुढे सरकणाऱ्या रणगाड्यांपर्यंत चिलखतभेदी गोळ्यांचे अनुक्षेपक पोचले किंवा नाही हे त्याला पहाता येईना. पण असले विचार करीत थांबायला त्याला आता अवसर नव्हता. तो सतत तोफ उडवीत राहिला. आपला एकतरी गोळा नक्की लक्ष्यभेद करील अशी तो स्वतःची खात्री पटवीत होता. त्याचवेळी त्याला एक अननुभूत आनंदही होत होता. न वापरलेल्या कुलपी गोळ्यांची अनेक खोकी तिथे पडली होती व खूप काळपर्यंत त्याला ती पुरली असती या वस्तुस्थितीचा त्याला आनंद झाला होता.

"डुकरांनो! अक्करमाशांनो! तुमचा नायनाट होवो!" तोफेच्या धूमधडाडाबरोबर तो ओरडत होता.

मध्येच एकदा तो तोफेच्या माशीपासून मागे झुकला तेव्हा झोयाच्या विस्फारल्या डोळयांनी त्याचे लक्ष वेधून घेतले. चमत्कारिकपणे चेहरा वर उचलून ती त्याच्याकडे चकित नजरेने पहात होती. मुळात ती तेथे का आहे हेच त्याला प्रथम समजेना.

"तू इथं काय करतेस? खंदकात जा! ताबडतोब! मी तुला हुकूम करतोय!"

"तुला ठार झालेली मला बघायची नाहीय!" आणि एकाएकी त्याने एक भयंकर शिवी हासडली. आजपर्यंत तिच्या सान्निध्यात त्याने एकही अपशब्द कधी उच्चारला नव्हता. "जा इथून म्हणून सांगतो ना!"

"लेफ्टनंट, मी तुला मदत करते. मी तोफ भरण्याचं थोडं काम केलेलं आहे. मी इथं तुझ्याबरोबर राहते लेफ्टनंट."

त्याने हासडलेली शिवी तिने नीटशी ऐकली नाही. जणू त्याला कधी पाहिलेच नव्हते अशा नजरेने ती त्याला टक लावून पहात राहिली. किंवा तिला माहीत असलेला, शहरी संस्कृतीत वाढलेला, अलिप्त राहणारा लेफ्टनंट जणू ती ओळखू शकत नव्हती. छातीशी कुलपी गोळा दोन्ही हातांनी घट्ट धरून ती उभी होती. मग ती बळेच हसली.

"लेफ्टनंट, शिवीगाळ करू नको! शिव्या घालायची काही गरज नाही!"

"खंदकात चालती हो! तू इथं असता कामा नये! समजतं तुला?"

पुन्हा तिने त्याच्याकडे आश्चर्याने पाहिले. जणू ती त्याला शांत करीत होती. तिचे अस्तित्व, तिचा चेहरा, तिचा आवाज यांच्यामुळे जणू त्याचा राग त्याच्यापासून दूर जात होता; आपल्यातल्या संहारक शक्तीची जाणीव व्हायला त्वेषाची विलक्षण गरज आहे याची त्याला आत्ता एकाएकी जाणीव झाली होती. आपल्यातल्या संहारक शक्तीचा त्याला आजवरच्या आयुष्यात शोध लागला नव्हता.

आणि पुन्हा त्याने तोफेच्या माशीला डोळा भिडवताच दाट धूर, यंत्रांच्या पेटलेल्या होळया, स्फोटांनी पाडलेल्या खड्ड्यांमधून डोकावणारी

रणगाड्यांची चपटी नाके, ही सारी दृश्ये भराभरा त्याच्या नजरेला पडली. पण ज्या क्षणाला त्याने चाप दाबला व त्या रणगाड्यांच्या झुंडींवर तोफ डागली, त्याच क्षणाला एक जोरदार चकचकाट आकाशात उडाला व त्याच दणक्यात स्फोटाच्या गरम वायूंचा झोत त्याच्या तोंडाला चटका देऊन गेला. त्या स्फोटाबरोबर तो माशीपासून मागे फेकला गेला आणि त्याच्या पाठीवर मातीच्या ढिकळांचा वर्षाव झाला. आणि त्या अवस्थेत तो पडला असतानाही त्याच्या मनात एक विजयी विचार चमकून गेला: पुन्हा एकदा तो वाचला होता. मग दुसरा विचार त्याच्या मनात चमकला.

"झोया! खंदकात जा! खंदकात!"

ती कुठे आहे ते पाहण्यासाठी त्याने चाकांमधून स्वत:ला वर उचलले, पण आणखी एका चकचकाटाने त्याचे डोळे दिपवले. काहीतरी त्याच्या छातीवर आदळले. झोया त्याच्या बाजूला कोसळली. आपल्या दोन्ही हातांनी तिने त्याच्या कोटाच्या कॉलरी गच्च पकडल्या होत्या. त्याच्या घामेजल्या चेहऱ्यावर तिचा जोरजोराने चाललेला ऊष्ण श्वास जाणवत होता आणि तिने त्याला एवढी घट्ट मिठी मारली होती की, त्याच्या छातीत वेदना होत होती. त्याने तिचे अर्धमिटले डोळे पाहिले, तिच्या पापण्या स्फोटांमधून उडालेल्या मातीमुळे काळ्या पडल्या होत्या. त्याच्या शरीराला तिचे शरीर घट्ट बिलगले होते, त्याच्याकडून रक्षणाची अपेक्षा करीत होते.

"नाही नाही... छातीत आणि पोटात नको... एकदम काही बरंवाईट झालं तर हरकत नाही... पण ते नको!"

तिचे ओठ जवळजवळ त्याच्या ओठांना स्पर्शत होते, पण तरीही ती काय बडबडतेय ते त्याला नीटसे ऐकू येत नव्हते. त्या रणधुमाळीच्या गोंधळात तिचे ते मंत्रासारखे पुटपुटणे त्याला समजणे अवघड होते. प्रत्येक स्फोटाबरोबर तिचे शरीर त्याला अधिकाधिक घट्ट बिलगत होते. तिचे रक्षण करण्याची जाणीव त्याच्यात एकाएकी प्रवृत्त झाली आणि मृत्यूपासून तिचे रक्षण करण्याच्या हेतूने त्याने तिच्याभोवती आपल्या हातांचा विळखा घातला. एखाद्या मोठ्या माणसाने लहान मुलाचे रक्षण करावे तशी भावना त्याच्या मनात जागी झाली होती. आपल्या घामाने निथळणाऱ्या मानेवर त्याने तिचे डोके दाबून टेकवले. तिला घट्ट धरून

तो अंतिम क्षणाची वाट पहात होता, स्फोटामुळे तिचे केस त्याच्या तोंडावर उडाले होते, धुराने त्याचा जीव गुदमरला होता. तो अंतिम क्षणाची वाट पहात होता त्यावेळी त्याला तिच्या स्तनांचा स्पर्श जाणवत होता, तिचे वाटोळे गुडघे, त्याच्या मानेवर टेकलेले तिचे थंडगार ओठ त्याला जाणवत होते. स्फोटाचा एखादा तुकडा पाठीमागून घुसला तर झोयाचे शरीर एकदम कसे लुळे पडेल, या विचारासरशी तो हबकला. तोफेच्या चाकाशी मी तिला दाबून धरली पाहिजे. स्फोटाच्या कपचां-पासून तिचे रक्षण होईल जर...

तो तिला चाकाजवळ ओढायच्या बेतात होता तोच अनंत पोकळीतून एक प्रचंड घरघराट जवळ येताना जाणवला आणि बांधाजवळ प्रचंड काळा ढग उसळला व तोफेच्या मोर्चाच्या पलिकडे कुठेतरी खाली बसला. ती दोघेही तोफेला घट्ट बिलगली होती. आणि रणधुमाळीमुळे अद्याप हवा तापलेली होती व जमीन हादरत होती हे खरे असले, तरी एक विलक्षण स्तब्धतेने भारावलेला छोटा काळ त्या मोर्चावर विराजला. ताज्या हवेचा थंडगार झोत यावा तसे एकदम वाटले आणि एकमेकांना घट्ट चिकटलेल्या त्या शरीरांमधला ताण एकदम ढिला पडला.

खरे म्हणजे ती स्तब्धता नव्हती; सुटकेचे ते काही क्षण होते. झोयाने आपले डोके वर उचलले आणि काळी वर्तुळे उमटलेले डोळे उघडले. त्या वर्तुळांची खोली पाहून त्याला आश्चर्याचा धक्का बसला. तिने हळूच त्याच्या मिठीतून आपली सुटका करून घेतली आणि तोफेच्या मागच्या भागाला पाठ टेकली.

त्याच मंदपणे तिने आपल्या चिखलाने माखलेल्या गुडघ्यांवर कोट ओढून घेतला. तिच्या गुडघ्यावरचा चिखल थिजला होता. स्फोटांच्या हादऱ्यांमुळे तिचे विस्कटलेले केस तोंडावर आले होते ते तिने आपल्या मातीने भरलेल्या बोटांनी मागे सारले.

"संपलं एकदाचं," निश्वास टाकीत घोगऱ्या आवाजात तो म्हणाला.

"लेफ्टनंट, लेफ्टनंट," धापा टाकीत ती अस्फुट आवाजात म्हणाली. "तुझ्या मनात माझ्याबद्दल वेडेवाकडे विचार आले असतील... पण ऐक... जर मला छातीत किंवा पोटात जखम झाली," तिने आपल्या कमरेला घट्ट बांधलेल्या अधिकाऱ्याच्या पट्ट्याकडे बोट दाखविले तेव्हा आपल्या केवळ दोन हातांनी तिची कंबर मापता येईल असे कुझ्नेत्सोवला

वाटले," ... तर माझ्यावर एक दया कर... जर मला स्वतःला जमलं नाही तर... माझ्या पिशवीत एक जर्मन पिस्तूल आहे... कुणीतरी मला भेट दिलंय... समजलं तुला? जर मला इथं जखम झाली... तर बँडेज बांधायचा प्रयत्न करू नको..."

आणि क्षणापूर्वीच, तिच्या पाठीत तोफेच्या गोळ्याचे कपचे घुसले आणि ती जखमी किंवा ठार झाली तर काय होईल अशा कल्पनेने भेदरलेला तो, तिच्या या बोलण्यावर काहीच म्हणाला नाही. जी भयानक गोष्ट घडली असती, पण घडली नाही तिच्याबद्दल आता एवढ्या परखडपणे ती का बोलते आहे हेच त्याला समजले नाही. छातीत किंवा पोटात जखम होण्याची तिला भीती वाटत होती, अशक्तपणाची, अपमानाची, मरणाच्या उंबरठ्यावर असताना होणाऱ्या विटंबनेची तिला भीती वाटत होती, आपले शरीर लोक पाहतील, त्याला त्यांचे स्पर्श होतील, पुरुषांचे हात आपल्या शरीराला बँडेज बांधतील याची तिला लाज वाटत होती.

"अच्छा, तू मला काय करायला सांगतेस याची कल्पना आहे का? मी मुडदेफरासांच्या तुकडीतला आहे अशी तुझी समजूत झाली असेल तर ती चुकीची आहे. तोफांजवळ रहायला तुला कुणी सांगितलं? तू मुळात इथं असायचं कारणच नाही! लढाई अजून थांबली नाही. तुला याची जाणीव आहे का?" तो अस्पष्ट घोगऱ्या आवाजात म्हणाला.

त्याचे म्हणणे योग्य होते. नेमक्या त्याच क्षणाला खंदकाच्या पुढच्या बांधावर अनेक गोळे दाणदाण फुटले. तो सरपटत तोफेच्या माशीकडे गेला आणि त्याने तिला डोळा लावताच तिच्या उभ्याआडव्या काळ्या तारांवर नेमक्या मध्यभागी तांबड्यालाल सुईसारखा तोफेतून आगीचा लोळ बाहेर पडलेला त्याला दिसला. तत्क्षणी त्याच्या मनातून झोया, तिचे जर्मन पिस्तूल, तिची गंभीर विनंती, त्याच्या मानेला अद्याप आठवत असलेला तिच्या केसांचा स्पर्श–या सर्व गोष्टी पार पुसल्या गेल्या आणि एकदम उघडेनागडे, दुष्ट, कठोर, दयेचा लवलेश नसलेले किंवा दयेची आशा नसलेले, जिथे प्रश्नाला वाव नाही, शंकांना थारा नाही असे जग त्याच्यासमोर उभे ठाकले.

हातचाकांवर पकड घट्ट करीत त्याने विचार केला की, आग ओकणारी ती तोफ स्वयंचलित असावी. आणि फारशी दूर नव्हती...

धुरातून रणगाड्यांचा शोध घेणाऱ्या तोफेच्या माशांच्या अचूक शरसंधानात आणि पुन्हा मनात निर्माण झालेल्या संहारात्मक त्वेषातच आता त्याचा विश्वास होता. तो पुन्हा तोफेवर ओणवा बिलगला.

कुठे आहे ती? अगदी जवळून ती मारा करीत होती. कदाचित त्या जळणाऱ्या रणगाड्यांमागे? पण कुठे आहे ती?

पण त्याने हातचाके फिरविली तेव्हा त्याला एकदम हालचालीत ढिलाई जाणवली. तोफेच्या माशीच्या व नळीच्या हालचालींमध्ये सुसंवाद साधत नव्हता. त्याने भिंगातून पाहिले. नळी जोरात मागे घसरत होती व स्प्रिंगच्या जागेतून संरक्षक कवचावर आणि तोफेच्या कडक तापलेल्या नळीवर तपकिरी द्रव ओघळत होता.

'डुक्कर साला! कुठंतरी आडोशाला स्वयंचलित तोफ असली पाहिजे! काय कमनशीब आहे लेकाचं!" काय करावे ते न उमजून कुझ्नेत्सोव ओरडला. निराशेने त्याला रडू कोसळण्याच्या बेतात होते. तोफेत कुलपी गोळा भरायच्या जागी त्याने बुक्क्या मारल्या. स्प्रिंगचा सिलिंडर गोळयाच्या स्फोटाच्या कपचांनी फुटला असावा.

दरम्यान तोफेसमोरचे दोन रणगाडे अजून जळत होते. त्यांच्या टपांवरून उमटणाऱ्या ज्वाळा एकमेकींना चाटत होत्या. आणि उजवीकडे, खिंडीच्या अगदी टोकाला तिसरा रणगाडा धूर ओकत होता. या तेलकट धुरामधून, तोफखान्याच्या आघाडीवर डावीकडून स्वयंचलित तोफेचा मारा केला जात होता. त्या धुराचा आडोसा घेऊन, अवघ्या दोनशे मीटर अंतरावरून, आपल्या लक्ष्याचा चांगला वेध घेऊन ती धडाडत होती.

डावीकडे सुमारे दीड किलोमीटर अंतरावर नदीउताराजवळ रणगाडे खिंड चढून येत होते व जळकी वाहने टाळून धुरामधून पुढची वाटचाल वेगाने करीत होते. आता पुलाजवळचे तोफखाने, कुझ्नेत्सोवच्या पलटणीतील उरलेल्या दोन तोफा आणि पायदळाच्या खंदकांमधील रणगाडाभेदी रायफली एकसमयावच्छेदेकरून त्यांच्यावर आग ओकीत होत्या. चिलखतभेदी तोफगोळ्यांचे अनुक्षेपक, अवजड हॉविट्झर तोफांचे प्रचंड स्फोट, रणगाडाविरोधी कुलपी गोळ्यांच्या चकाकणाऱ्या तीरशलाका, दूर नदीतीरावरून उडणाऱ्या उखळी तोफांच्या अग्निबाणांचा जळता ओघ–या सर्वांची पुलाच्या तोंडाशी एकच गर्दी उडाली होती.

दरम्यान, जळत्या रणगाड्याचा आडोसा घेऊन ती स्वयंचलित तोफ आपले लक्ष्य हेरून अत्यंत शांतपणे फळीवर पुन्हा पुन्हा मारा करीत होती आणि कुझ्नेत्सोवला ती अगदी स्पष्ट दिसत होती.

"लेफ्टनंट!" त्याने झोयाची आरोळी ऐकली. "तू काहीच का करीत नाहीस? तुला दिसत नाही समोर काय चाललंय ते?"

पण आता त्याला तेथे काहीही करता येत नव्हते.

ती स्वयंचलित तोफ चुबारिकोवच्या तोफेवर लागोपाठ भडिमार करीत होती. तोफ एकदम थंडावली आणि शेंदरी रंगाच्या दाट थरात लोपली. आणि आपल्या कुशीला लुचणाऱ्या पेटत्या ज्वाळा केवळ प्रचंड वेगाने धावून बाजूला झटकण्याचा प्रयत्न करीत त्याच क्षणाला डावीकडून एक रणगाडा त्या शेंदरी कल्लोळावर चालून आला. त्या स्वयंचलित तोफेने चुबारिकोवची तोफ हेरायच्या जरा आधी चुबारिकोवच्या चिलखतभेदी गोळ्यांनी त्या रणगाड्याला पेटविले होते हे स्पष्ट होते. आणि स्फोटांची एकच गर्दी उसळल्यामुळे कुणाचेच आता त्या रणगाड्याकडे लक्ष नव्हते व आगीच्या ज्वालांनी वेढलेला तो रणगाडा वेडावाकड्या मार्गाने वेगाने धावत, आपल्या प्रचंड वजनाखाली चिरडून टाकण्यासाठी तोफेच्या मोर्चाकडे सुसाट येत होता. एक प्रचंड स्फोटाने सारा आसमंत हादरला. धुराचा प्रचंड काळा ढग व आगीचा लोळ त्याच्या टपामधून वर उसळला व छिन्नभिन्न झालेल्या तोफेवर आपल्या चाकांचा एक पट्टा रोवून तो रणगाडा स्तब्ध झाला. त्या आगीच्या डोंबावर एकामागून एक अनुक्षेपक आदळत होते. पलटणीच्या पार टोकाला आग ओकणाऱ्या उखानोवच्या तोफेने त्या रणगाड्याला भेदले होते.

त्या जळत्या रणगाड्याच्या माथेफिरू धडकेने कुझ्नेत्सोव थक्क झाला होता. त्या कृतीने त्याला एकच स्पष्टपणे जाणवले होते की, पूल ओलांडून सोविएत फळी तोडण्यासाठी जर्मनांनी जिंकू किंवा मरू अशा ईर्ष्येने हा हल्ला चढवला होता. चुबारिकोव आणि त्याचे साथीदार यांचा चेंदामेंदा झाला असावा, कारण कुणीही मोर्चा सोडून मागे पळाले नव्हते. कुझ्नेत्सोवच्या डाव्या अंगाला आता त्याच्या तोफखान्यातली फक्त एकच तोफ अजून धडाडत होती – उखानोवची.

"झोया, मी तुला खंदकात परत जायचा हुकूम देतोय! इथून दूर जा! मी उखानोवकडं जातोय!" त्याने धाप टाकली. तो बोलत असताना त्याच्या लक्षात आले की, झोयाने आपले सुजलेले ओठ चावले, प्रथमोपचाराची पिशवी पाठीवर मारली व कडेकडेने सरकत एकदम अर्धवट खणलेल्या तोफांना जोडणाऱ्या चराच्या दिशेने ती धावत सुटली.

"मला चुबारिकोवकडं गेलं पाहिजे! कदाचित अजून तिथं कुणी जिवंत असेल! मला वाटत नाही ते सगळेच..." आणि तोंडावरचे केस मागे सारीत, जणू त्याचा हुकूम ऐकूच आला नाही अशा पद्धतीने ती खंदकाकडे झेपावली.

संतापाने दात कराकरा चावीत तो तोफ उडवायच्या फलाटावरून मागे धावला आणि खिंडीच्या टोकावरच्या जळत्या रणगाड्यांकडे टक लावून पहात राहिला. त्यांच्यामागे ती स्वयंचलित तोफ होती आणि तिच्याविरुद्ध कारवाई करण्यास तो आता पूर्ण असमर्थ होता.

## प्रकरण अकरावे

"थांब! कुठं चाललास? मागे फीर कुझ्नेत्सोव!"

टेकाडावरून तोफेच्या दिशेने द्रोझ्दोवस्की धावत होता. त्याचे नमदी बूट बर्फाचा चुरा उधळीत होते आणि ओरडण्यामुळे त्याचा चेहरा लाल झाला होता.

"मागे फीर!"

त्याच्यामागून रूबिन व सेरगुनेन्कोव हे दोघे ड्रायव्हर स्फोटांच्या खड्ड्यांवरून उड्या मारीत धावत येत होते. तोफखान्यासमोर जळणाऱ्या रणगाड्यांकडे, खेड्यातल्या आगींकडे, ते दोघे खिन्नपणे पहात होते. जवळच्या तीरावर एक गोळा फुटला तसा सेरगुनेन्कोव पटकन खाली वाकला.

"कुझ्नेत्सोव, कुठं चाललास? मागे फीर! तुझी तोफ सोडून पळून चाललास?" द्रोझ्दोवस्की संतापाने ओरडला. "तू तोफ डागायची का थांबला? हे काय हे—माघार? मागे फीर!"

डोक्यावर पिस्तूल नाचवीत द्रोझ्दोवस्की धावत होता. त्याच्या डोळ्यात वेडाची लहर चमकत होती, त्याच्या नाकपुड्या फेंदारल्या होत्या, गेल्या चोवीस तासात त्याच्या हनुवटीवर दाढीच्या खुंटाचा निळसर पट्टा उमटला होता.

"तोफेकडं परत जा!" त्याने हुकूम केला आणि त्याच्या डाव्या हाताने कुझ्नेत्सोवच्या खांद्याला खस्सकन मागे खेचले. "माघार घ्यायची नाही! तुझी तोफ सोडून का चाललास? कुठं निघाला होता तू?"

"डोळे फुटले का तुझे?" हिसडा मारून कुझ्नेत्सोवने आपला खांदा त्याच्या पकडीतून सोडवून घेतला आणि द्रोझ्दोवस्कीच्या उजव्या हातातील पिस्तूल त्याच्या पोटासमोर थरथरत रोखले होते त्याकडे त्याने एकदा नजर टाकली. "बाजूला कर तुझं पिस्तूल! डोकं फिरलंय तुझं? बघ तिकडं!" त्याने चुबारिकोवच्या तोफेकडे निर्देश केला. तोफेवर घुसलेला तो छणगाडा अजून पेटत होता. त्यातून ठिणग्यांची कारंजी उडत होती. "दिसत नाही तुला?"

स्वयंचलित गोळ्यांची फैर फाड फाड उडत बर्फाचे खडे विंधून गेली. त्या लपलेल्या स्वयंचलित तोफेवरच्या लोकांना टेकाडावरच्या व्यक्ती दिसल्या असाव्या आणि ते आपल्या लाईट मशिनगन्सचा वापर आता करीत होते.

"खाली बसा!" कुझ्नेत्सोवने मोठ्यांदा इशारा दिला, पण स्वतः मात्र उभा राहिला. द्रोझ्दोवस्की कसा पटकन खाली लपला त्याकडे त्याने सूडाच्या समाधानाने पाहिले. मशिनगनची फैर उडाली तिकडे आपले खडबडीत तोंड वळवून ड्रायव्हर रूबिन आपल्या ठेंगण्या, बळकट पायांवर चटकन खाली बसला. हडकुळ्या आणि लांब मानेच्या सेरगुनेन्कोवने बर्फाच्या ढिगामागे स्वतःला झोकून दिले आणि तोफेचा मोर्चा व बांधामागचा आडोसा यांच्या दिशेने तो सरपटत येऊ लागला. त्याची छोटी बंदूक बर्फाला घाशीत होती.

"कुत्र्याच्या पिल्लासारखा काय सरपटतोस?" द्रोझ्दोवस्कीने शिवी हासडली व सरळ उभे रहात सेरगुनेन्कोवच्या बुटाला लाथ हाणली. "चल उठ! तोफ चढवा सगळ्यांनी मिळून! आणि लगाव बत्ती! झोया कुठं आहे? वैद्यकीय मदतनीस कुठं आहे?"

तोफेकडे त्याने एक पाऊल टाकले, मग पुन्हा कुझ्नेत्सोवचा खांदा पकडला व आपल्या पांढऱ्याफटक, पारदर्शी डोळ्यांनी त्याने संशयाने त्याचा चेहरा न्याहाळला.

"कुठं पाठवलंस तू तिला? क्षणापूर्वी ती इथं होती!"

"ती कुठंतरी पळाली," बसक्या आवाजात रूबिन म्हणाला. "त्या सैतानांनी तिला धरली वाटतं!"

"कुझ्नेत्सोव, तोफ चढव! लगाव बत्ती!"

तोफ उडवायच्या फलाटाकडे ते धावत गेले आणि मागच्या बाजूस गुडघ्यावर खाली बसले. अद्याप संताप न शमलेला कुझ्नेत्सोव कडाडला, "पाहिलंस आता? त्या रिकॉईल सिलिंडरकडं पहा! आणि त्या रणगाड्यांमागून ती स्वयंचलित तोफ मारा करते आहे तिकडं पहा! समजतं तुला काय ते? झोया चुबारिकोवच्या तोफेकडं गेलीय. कदाचित अजून तिथं कुणीतरी जिवंत राहिलं असेल."

द्रोझ्दोवस्कीने घाईघाईने पिस्तूल कमरेच्या पट्ट्याच्या चामडी पिशवीत कोंबले. त्याच्या लांब पापण्यांची जलद उघडझाप होत होती. त्याने मोठ्यांदा विचारले, "रणगाड्यांवर तोफ कुणी उडवली? कासीमोव कुठं आहे?"

"मेला. मागच्या भागात पडलाय. त्याच्याबरोबरचे आणखी तिघंही ठार झाले. ती जर तोफ नसती... त्या रणगाड्यांच्या मागं धुरात ती लपलीय आणि उखानोवच्या फळीवर मारा करतेय. आपण जाऊन त्याला सांगितलं पाहिजे. त्याला ती नीट दिसत नाहीय. इथं बसून आपण काहीही करू शकत नाही."

"थांब! घाबरून घाई करू नको!"

हाताच्या कोपरांवर टेकून द्रोझ्दोवस्की थोडासा वर डोकावला आणि स्फोटांनी छिन्नविच्छिन्न झालेल्या खंदकापुढच्या बांधावर त्याने नजर फिरवली. तेवढ्यात स्वयंचलित मशिनगनची ताजी फैर मोर्चावर उडाली आणि गोळ्यांच्या कडकडाटाने रणमैदानावरचे इतर स्फोटक आवाज क्षणभर बुडवून टाकले.

मोर्चाच्या मागे बर्फाच्या ढिगांवर स्फोटक गोळ्यांच्या निळ्या ठिणग्या चकचकल्या. द्रोझ्दोवस्की बांधाखाली पुन्हा चटकन बसला व

किलकिल्या डोळ्यांनी त्याने रणमैदानावरून झरकन नजर फिरवली. त्याचा ओढलेला चेहरा कमालीचा ताणला होता.

"ग्रेनेड कुठं आहेत?" त्याने तिखट आवाजात विचारले. "रणगाडा-विरोधी ग्रेनेड? प्रत्येक तोफेला तीन रणगाडाविरोधी ग्रेनेड पुरवले होते. कुझ्नेत्सोव, ग्रेनेड कुठं आहेत?"

"आता ग्रेनेडचा काय उपयोग? ती तोफ दीडशे मीटर दूर आहे! तिथपर्यंत पल्ला कसा पोचणार? आणि त्यांच्याजवळ मशिनगनसुद्धा आहे."

"आम्ही इथं नुसतं थांबून रहावं अशी तुझी अपेक्षा आहे? ते ग्रेनेड आण! लौकर! कुझ्नेत्सोव, लढाईच्या दिवसात मशिनगन सगळीकडंच असतात!"

द्रोझ्दोवस्कीच्या पांढऱ्याफटक, वेडयावाकडया झालेल्या चेहऱ्यावर निर्धार उमटला. एकाएकी उंच आवाजात तो पुन्हा ओरडला.

"सेरगुनेन्कोव, ग्रेनेड इकडं आण."

"कॉम्रेड लेफ्टनंट, ते तोफेच्या मागच्या भागात आहेत."

"इकडं आण ते!"

सेरगुनेन्कोव सरपटत खंदकात गेला, मातीने भरलेले दोन रणगाडाभेदी ग्रेनेड त्याने उचलले, आपल्या कोटाच्या कडेने त्यावरची माती झटकून त्यांना त्याने चकचकीत केले व द्रोझ्दोवस्कीसमोर आणून ठेवले. बांधावरून डोकावून पहायला लेफ्टनंट पुन्हा वर झाला.

"ठीक आहे. सेरगुनेन्कोव, ही तुझी कामगिरी! एकतर तुझ्या छातीवर पदकांची माळ लटकेल नाहीतर... समजलं सेरगुनेन्कोव?"

त्या तरुण ड्रायव्हरने भयचकित नजरेने द्रोझ्दोवस्कीकडे पाहिले. त्याच्या डोळ्यांची पापणीही मिटत नव्हती. अविश्वासाच्या सुरात त्याने विचारले, "पण... लेफ्टनंट, ती रणगाडयांच्या मागं आहे. तिथं मी कसा जाणार?"

"सरपटत जा! सरपटत तिथपर्यंत जा! आणि ते दोन ग्रेनेड नेमके चाकांखाली घाल! भडव्यांची चोख वाट लागेल!"

द्रोझ्दोवस्की अशा सुरात बोलला होता की, त्यावर पुढे चर्चा करणे अशक्य ठरले होते. अचानकपणे आपल्या थरथरत्या हातांनी त्याने ते दोन ग्रेनेड उचलले आणि सेरगुनेन्कोवपुढे धरले. यांत्रिकपणे

सेरगुनेन्कोवने ते हातात घेतले आणि त्यांचा त्याच्या तळव्यांना स्पर्श होताच जणू दोन लोखंडाचे तापलेले गोळे हातात धरल्याप्रमाणे जवळजवळ खाली पाडले.

त्याने आपल्या सबंध आयुष्यात कधी दाढी केली नसावी. त्याच्या पांढऱ्याफटक रंगामुळे त्याच्या गालांवरची व वरच्या ओठावरची सोनेरी दाढी काळपट व टोकदार दिसत होती. कुझ्नेत्सोवला आत्ता एकाएकी त्याच्या डोळ्यातील निळाई जाणवली; त्याची पोरसवदा नाजुक हनुवटी, पायघोळ कोटाच्या भल्यामोठ्या कॉलरमधून डोकावणारी त्याची बारीक आणि नाजुक मान त्याने निरखून पाहिली. मग त्याचा अस्पष्ट आवाज त्याला ऐकू आला.

"पण कॉम्रेड लेफ्टनंट... ती रणगाड्यांच्या मागं आहे... मागच्या रस्त्याला..."

"ग्रेनेड्स घे! वेळ वाया घालवू नको!"

"होय लेफ्टनंट, समजलो!"

चाचपडत त्याने कोटाच्या पुढच्या खिशात ग्रेनेड कोंबले. सेरगुनेन्कोवच्या थिजलेल्या निळ्या डोळ्यांनी क्षणभर द्रोझ्दोवस्कीचा बदललेला, खंबीर झालेला चेहरा निरखला. नंतर कुझ्नेत्सोवच्या चेहऱ्यावर त्याची नजर फिरली व तिथून तोफेच्या चाकांमध्ये ओणवे उभे राहून, जोरजोराने श्वास घेत, मुद्दाम खंदकाच्या बांधाकडे एकाकी नजर लावून त्याच्याकडे तिऱ्हाईतपणे पाठ करून उभ्या असलेल्या रूबिनकडे त्याने पाहिले.

""तोफखाना कमांडर!" कुझ्नेत्सोव उसळून म्हणाला. "तुला दिसत नाही? उघड्या मैदानात त्याला शंभर मीटर अंतर सरपटत जावं लागेल! समजत नाही तुला?"

"मग काय झालं?" त्याच तीक्ष्ण आवाजात द्रोझ्दोवस्की उत्तरला आणि आपल्या हाताची मूठ त्याने मांडीवर मारली. "आपण काही न करता इथं स्वस्थ बसायचं? ते आपले तुकडे तुकडे करीत असताना?" तो सेरगुनेन्कोवकडे गर्रकन वळला. "सारं नीट समजलं? त्या स्वयंचलित तोफेच्या दिशेनं तू सरपटत जायचं! मधून संधी मिळाली तर धाव! आगे बढो!" बंदुकीतून गोळी सुटावी तसा द्रोझ्दोवस्की थाडकन हुकूम ओरडला.

"आगे बढो" या हुकूमानंतर सेरगुनेन्कोवला जे करायला पाहिजे होते, आतापर्यंत जे काही घडत होते, त्याला युद्धाच्या कठोर नियमांनुसार डावलण्याचा अथवा विरोध करण्याचा सेरगुनेन्कोवला किंवा कुझ्नेत्सोवला अधिकार नव्हता, हे कुझ्नेत्सोवला समजत होते. हा सारा प्रकार राक्षसी, मूर्खपणाचा आणि पूर्णपणे वाया जाणारा प्रयत्न आहे याची त्याला कल्पना होती. आत्ता जर तोफ शाबूत असती आणि त्यांच्याजवळ एक गोळा असता तरी हा प्रसंग गुदरला नसता असा विचार उगीचच त्याच्या डोक्यात चमकून गेला.

"सेरगुनेन्कोव, जपून खाली वाकून सरपटत जा. सगळी वाट सरपटत जा. त्या पोकळीत खूप झुडपं आहेत. धूर आहे तिकडं उजव्या बाजूनं जात रहा. सावध! डोकं वर उचलू नको!"

कुझ्नेत्सोव सेरगुनेन्कोवपर्यंत सरपटत गेला, त्याच्या दंडाला त्याने गच्च धरले आणि आकाशाची गहिरी निळाई भरलेल्या त्याच्या डोळ्यातल्या बाहुल्या त्याने निरखून पाहिल्या. त्याची नजर बधीर झाली होती. सेरगुनेन्कोवने मान हलवली आणि त्याने फिकट स्मित केले. काही कारण नसताना आपले हातमोजे त्याने कोटाच्या ग्रेनेडमुळे फुगीर बनलेल्या भागावर आपटले. जणू ते त्याची छाती भाजून काढत होते व तो त्यांना थंड करीत होता.

"कॉम्रेड लेफ्टनंट, प्लीज," ओठातल्या ओठात तो पुटपुटला, "जर माझं काही बरंवाईट झालं तर माझ्या आईला कळवा... मी बेपत्ता आहे... तिला दुसरं कुणी नाही..."

"हे डोक्यातून आधी काढून टाक!" कुझ्नेत्सोव ओरडला. "सेरगुनेन्कोव, माझं ऐकतोस का? सारा रस्ता सरपटत जा! अगदी बर्फाला चिकटून रहा!"

"चल सेरगुनेन्कोव!" द्रोझ्दोवस्कीने खंदकापुढच्या बांधाकडे खूण केली. "थांबू नको! आगे बढो!"

"होय कॉम्रेड तोफखाना कमांडर, मी तयार आहे. मी फक्त..." - सेरगुनेन्कोवने आपल्या कोरड्या ओठांवरून जीभ फिरवली, एक दीर्घ श्वास घेतला, पुन्हा एकदा कोटातले ग्रेनेड चाचपून पाहिले आणि बांधाच्या दिशेने सरपटायला सुरुवात केली. बांधावर क्षणभर तो पालथा पडून राहिला, मग जणू काहीतरी विसरल्याप्रमाणे त्याने मान मागे

वळवून पाहिले आणि त्याच्या मृतवत निळ्या डोळ्यांनी रूबिनच्या मख्खं गंभीर चेहऱ्याकडे पाहिले.

"रूबिन, तू जर घोड्यांना वाईट वागणूक दिलीस," एकाएकी तो अत्यंत शांतपणे साध्या आवाजात म्हणाला, "मी परत येईन आणि दुसऱ्या जगातही तुझा पिच्छा सोडणार नाही. तोपर्यंत रामराम."

कुझ्नेत्सोव बांधावर पुढे झुकला. झुडपांच्या दिशेने सेरगुनेन्कोव सुमारे पाच मीटर पुढे सरकला होता. तोफेसमोर स्फोटांमुळे निर्माण झालेले अनेक खड्डे त्याने ओलांडले होते. कुलपी गोळ्यांच्या कपचांनी झोडपून काढलेल्या झुडपांच्या तुरकाट्यांमधून त्याचा तरुण देह सरपटत चालला होता आणि रणगाड्यांमागून कोणत्याही क्षणी मशिनगनच्या गोळ्यांचा पाऊस कोसळेल या धास्तीने कुझ्नेत्सोव डोळ्यात प्राण आणून सेरगुनेन्कोवकडे पहात होता. स्वयंचलित तोफ पुलाच्या व उखानोवच्या तोफेच्या दिशेने गोळाबारी करीत होती. पुलाच्या तोंडाशी आग भडकली होती व हल्ला करणाऱ्या रणगाड्यांना तिची झळ बसत होती. स्वयंचलित तोफेवरच्या मशिनगनवाल्याचे अद्याप सेरगुनेन्कोवकडे लक्ष गेले नव्हते. तो सरपटत चाललाच होता. स्फोटांचे खड्डे व झुडपे यांच्या आडोशाने पुढे सरकत होता, बर्फाच्या ढिगांमागून धाव घेत होता, आपल्या हाताच्या कोपरांवर व डोके घाशीत तो बर्फामधून सरपटत होता आणि त्याच्यामध्ये व त्या दोन पेटत्या रणगाड्यांच्या मागे उभ्या असलेल्या त्या स्वयंचलित तोफगाड्यामध्ये फारच कमी अंतर उरले होते.

तो जर त्या धुरापर्यंत पोचला तर किती छान होईल, असा आशेचा किरण कुझ्नेत्सोवच्या अंतरात लुकलुकला. उरलेले अंतर किती आहे याचा बांधावर पालथे पडून अंदाज घेत असताना त्याच्या छातीत धडधड वाढली होती. जर तो त्या धुराच्या लोटापर्यंत घुसला तर काय बहार होईल!

"एवढा हळू का जातोय तो? त्यानं एकदम धडक मारली पाहिजे!" अखेरच्या घाईच्या अपेक्षेने द्रोझ्दोवस्की धुसफुसला. आपल्या हातमोजे चढवलेल्याहातांनी तो बांधावरची मातीची ढेकळे अस्वस्थपणे उकरीत होता.

"धडक! त्याचं काळीज चिमणीसारखं फडफडत असेल," रूबिन गुरगुरला आणि त्याचे शब्द मोर्चावरच्या गरम धुक्यात जणू वितळून गेले.

"गप्प रहा रूबिन! तुला समजतं की नाही?"

अधीरपणे आपल्या डोळ्यांच्या लांब पापण्या फडफडवीत शेजारी

उभ्या असलेल्या द्रोझ्दोवस्कीकडे आणि आपली गलेलठ्ठ भुरकट तपकिरी मान कॉलरमध्ये खुपसून बांधावर पालथ्या पडलेल्या रूबिनकडे कुझ्नेत्सोवने कमालीच्या तिटकाऱ्याने पाहिले. वाटचालीमध्ये पाय मोडलेल्या घोड्याला गोळी घालण्याचा रूबिनचा प्रयत्न त्याला आठवला. रूबिन बांधावर कडवटपणे थुंकला आणि त्याने आपल्या बारक्या भेदक डोळ्यांनी द्रोझ्दोवस्कीकडे पाहिले.

"कॉम्रेड लेफ्टनंट, तुम्ही मला हुकूम द्यायला पाहिजे होता. मला कशाची पर्वा राहिलेली नाही. माझ्या दृष्टीनं आयुष्याला फारसा अर्थ राहिलेला नाही. आठवण काढायला माझं असं कुणी उरलेलं नाही. माझ्यासाठी कुणी डोळ्यातून पाणी काढणार नाही!"

पुन्हा त्याचे शब्द त्या तापल्या धुक्यात वितळल्यासारखे वाटले.

कुझ्नेत्सोवने पुढचे काही ऐकले नाही. जळणाऱ्या रणगाड्यांच्या आणि त्यांच्यामागील स्वयंचलित तोफगाड्याच्या पुढील मैदानावर त्याचे सारे लक्ष केंद्रित झाले होते. ती सरपटणारी करड्या रंगाची आकृती अधिक मंदपणे, सावधपणे पुढे सरकत होती. मग रणगाड्यांपासून सुमारे दहा मीटर अंतरावर एकदम जमिनीला खिळली. सेरगुनेन्कोव तेथे काय करीत होता ते स्पष्ट होत नव्हते. मग तो हातांच्या कोपरांवर उंचावला, स्वयंचलित तोफेकडे त्याने पाहिले आणि घाईघाईने खिशातला ग्रेनेड बाहेर काढावा त्याप्रमाणे त्याच्या एका खांद्याची हालचाल झाली. पण प्रत्यक्षात काय घडत होते त्यापेक्षा भास वेगळा होत असावा, कारण त्याने प्रत्यक्षात पिन खेचून ग्रेनेड फेकला तो क्षण कुझ्नेत्सोवला पकडता आला नाही.

रणधुमाळीच्या त्या प्रचंड गडगडाटात त्या ग्रेनेडच्या स्फोटाचा आवाज अक्रोड फोडल्यानंतर येतो तसा मंद ऐकू आला. जमिनीवर एक नारिंगी धुराचा ढग उमटला व रणगाड्यांच्या प्रचंड धुरात मिसळला. स्वयंचलित तोफ पुलावर भडिमार करीतच होती.

"हुकला!" दीर्घ सुस्कारा टाकीत रूबिन म्हणाला व बांधावर पचकन थुंकून हाताच्या पालथ्या मुठीने त्याने आपले ओठ खसाखसा चोळले. त्याच्या लालभडक पापण्या आकुंचल्या होत्या.

"काय करतोय तो? आपलं काम का पुरं करीत नाही?" द्रोझ्दोवस्कीची बोटे मातीच्या ढेकळांचा चुरा चुरा करीत होती व

बांधावर आधार पकडू पहात होती. "अरे जा ना बेट्या! जवळ जा आणि फेक दुसरा!"

गाड्यावरची तोफ भडिमार करायची थांबली. तिची रुंद चौकोनी आकृती जळणाऱ्या रणगाड्यांमागून किंचित हलली व तेलकट धुरामध्ये वळली. ती सरपटणारी करडी आकृती स्फोटांच्या काळ्या खड्ड्यांमधून तात्काळ काही मीटर पुढे सरकली, बर्फावर ओणवी झाली, मग एक हात उंचावून ती छोटी करडी आकृती उडी मारून उभी राहिली आणि रणगाड्यांमागे धुरात हलणाऱ्या त्या प्रचंड धूडासारख्या गाड्याकडे सरळ धावून गेली.

त्याच क्षणी त्या धावणाऱ्या आकृतीला मशिनगनच्या गोळ्यांचा चकचकाट भिडला आणि तो हात उंचावलेला असतानाच त्या आकृतीला त्यांनी थांबवले. त्या ठिणग्या छातीवर झेलल्याप्रमाणे ती धावणारी आकृती एकदम अडखळली व लोळागोळा होऊन बर्फात कोसळली.

रणगाड्यांशेजारच्या त्या चैतन्यहीन ढिगाजवळ ग्रेनेड फुटला व त्याच्या धुराचा लोट उमटला. धूर विरला आणि पुन्हा वरून मशिनगनची लांबलचक फैर आधीच मरून पडलेल्या सेरगुनेन्कोव झडली. त्याच्यावर त्या मशिनगनवाल्याने एवढ्या गोळ्या झाडल्या की अखेरीस त्याच्या कोटामधून धूर निघू लागला.

"खपला बिचारा! त्याची हीच लायकी होती! अखेर त्यांनी त्याला ठार मारलं ना?"

कुझ्नेत्सोवने कष्टाने आवंढा गिळला, पण त्याच्या तोंडून शब्द बाहेर फुटला नाही. त्याची बोटे त्याच्या कोटाच्या कॉलरच्या हूकशी धडपडत होती. त्या कोंडल्या भावनेतून त्याला गळा मोकळा करायचा होता. तो ठार मारला गेला असे कोण म्हणाले? रूबिन? आपल्या हातून काय घडेल हे कुझ्नेत्सोवला आता सांगता येत नव्हते. त्याचा त्याच्या डोळ्यांवर अजून विश्वास बसत नव्हता, पण त्याने त्या तोफगाड्यासमोर सेरगुनेन्कोवचा राक्षसी पद्धतीने घडलेला टळटळीत मृत्यू पाहिला होता. कष्टाने श्वास घेत त्याने द्रोझ्दोवस्कीकडे पाहिले.

द्रोझ्दोवस्कीने चेहरा कमालीचा वेडावाकडा करीत म्हटले, "त्याचा धीर सुटला! असा कशाला उठून उभा राहिला तो?" आपण काय बोलतो आहोत याचे आता कुझ्नेत्सोवला भान राहिले नाही. अत्यंत

रुक्ष, चमत्कारिक आवाजात तो द्रोझ्दोवस्कीवर कडाडला, "त्याचा धीर सुटला काय? तोफखाना कमांडर, तुझा धीर सुटला नसता असं म्हणायचंय काय तुला? तिथं अजून एक ग्रेनेड शिल्लक आहे, ऐकू येतंय तुला? शेवटचा. तुझ्या जागी मी असतो तर तो ग्रेनेड घेतला असता आणि त्या तोफेवर गेलो असतो. सेरगुनेन्कोवला ते जमलं नाही, पण तुला ते काम करता येईल. समजलं तुला?"

"केवळ त्याला हुकूम द्यायचा अधिकार होता म्हणून त्याने सेरगुनेन्कोवला पाठवले. हे घडताना मी नुसते पाहिले आणि त्याबद्दल आयुष्यभर माझ्या मनाला टोचणी राहील". हा विचार झर्रकन त्याच्या मनाला चाटून गेला. आपण काय बोलत होतो हे त्याला अजूनही नीटसे समजत नव्हते, त्याचे वागणे कोणत्या मर्यादेपर्यंत योग्य होते हे त्याला समजत नव्हते.

"काय? काय म्हणालास तू?" एका हाताने तोफेला धरीत व दुसऱ्या हाताने बांधाला पकडीत चकित झालेल्या द्रोझ्दोवस्कीने संतापून विचारले. त्याचा चेहरा पांढराफटक पडला होता, नाकपुड्या विस्फारल्या होत्या. त्याची मुद्रा पुरती गोंधळलेली होती. "तो मारला जावा अशी माझी इच्छा होती असं तुला वाटतं?" तो जवळजवळ किंचाळला, त्याच्या डोळ्याच्या कडांवर अश्रू जमा झाले होते. "तो असा उघड्यावर कशाला गेला? तू त्याला स्वतः पाहिलंस की नाही? का धावला तो असा वेड्यासारखा?"

द्रोझ्दोवस्कीच्या त्या चकित, खिळलेल्या नजरेला त्याची नजर भिडली तेव्हा कुझ्नेत्सोव जणू बहिरा झाला. तोफखान्याचा धडधडाट, डावीकडून हल्ला करणाऱ्या रणगाड्यांचा घरघराट किंवा तीरावर फुटणाऱ्या तोफगोळ्यांच्या स्फोटांचे आवाज त्याला अजिबात ऐकू येईनासे झाले. त्याच्या मनःपटलावर सेरगुनेन्कोवचा धुमसता कोट व मशिनगनच्या गोळ्यांनी बर्फात पडलेल्या त्याच्या देहाची केलेली चाळण एवढ्याच गोष्टी खोल ठसल्या होत्या. कासीमोवच्या मरणापेक्षा किंवा चुबारिकोवचा व त्याच्या बरोबरच्या लोकांचा तोफेजवळ चिरडून झालेला संहार यापेक्षा सेरगुनेन्कोवचे मरण अगदी वेगळे होते. सेरगुनेन्कोवच्या मरणासारखे उघडेनागडे मरण, एवढे व्यर्थ मरण आपण कधी पाहू असे त्याला स्वप्नातही वाटले नव्हते.

"व्रोझ्दोवस्की, मला तुझं तोंड पहायची इच्छा नाही!"

कुझ्नेत्सोव झर्रकन दळणवळणाच्या चराकडे वळला व तोफखान्याच्या अगदी डावीकडे उभ्या असलेल्या उखानोवच्या तोफेकडे निघाला. अद्याप ती तोफ तेथे असावी असा त्याचा अंदाज होता. चरातून चालताना त्याचे सर्वांग थरथर कापत होते व बांधावर त्याच्या झुकांड्या जात होत्या. मग त्यानें धावायला सुरुवात केली आणि धावता धावता परत त्याला आत्मसंयमनाची जाणीव झाली. या जाणीवेसरशी पुन्हा त्याच्या मनात आशा पालवल्या व काय करणे आवश्यक आहे आणि आपण काय करू शकू याबद्दलचे विचार त्याच्या डोक्यात येऊ लागले.

आपल्याला काय झाले होते ते त्याला सांगता आले नसते. पण रणगाड्यांवर भडिमार करताना त्याच्या मनात अनावर युयुत्सु राग जेव्हा निर्माण झाला होता तेव्हा आपल्या स्वतःच्या आयुष्याचे सारे मोल तो पार विसरून गेला होता. तीच प्रचीती त्याला पुन्हा येत होती. जणू ते आयुष्य त्याचे राहिलेच नव्हते आणि अगदी सर्वांपासून गुप्तता राखून त्याने आपल्या मनात जरी त्याचे मूल्यमापन केले असते, तरी त्याला फारशी किंमत त्या क्षणाला त्याने दिली नसती. धोक्याची जाणीव, रणगाड्यांची वाटणारी आंतरिक भीती, ठार मरण्याची किंवा जखमी होण्याची भीती, या सबंध हाणामारी करणाऱ्या, रक्तपात करणाऱ्या जगाची भीती, या सर्वांपासून तो पुरता मुक्त झाला होता. जणू काही दैवाने त्याला अमरत्व दिले होते, जणू काही सारे त्याच्या हालचालींवर अवलंबून होते, त्याच्या बेफिकीरीवर अवलंबून होते, त्याच्या शरीराच्या आश्चर्यकारक लवचिकपणावर अवलंबून होते.

त्या अर्ध्या गाडल्या गेलेल्या चरातून धावत जाऊन त्याने उखानोवच्या तोफेजवळ उडी घेतली तेव्हा तोफेतून धडाधड कुलपी गोळे सुटत होते. नळी मागे उशी घेत होती तेव्हा कुलपी गोळ्यांची टोपणे मागच्या भागातून भराभरा खाली पडत होती. माणसे यंत्रासारखी काम करीत होती. त्या धुरात उखानोवला किंवा दुसऱ्या कुणालाही कुझ्नेत्सोव ओळखू शकेना. बांधावर पालथा पडून तो धापा टाकू लागला.

"उखानोव! अजून जिवंत आहेस?"

तोफेच्या मागच्या भागातून खणखण आवाज करीत टोपणे पडत होती व वाफेचा फस्स आवाज होत होता.

"लेफ्टनंट, गोळे पाहिजेत! आमच्याजवळ फक्त पाच चिलखतभेदी शिल्लक आहेत! गोळे कुठं आहेत? लेफ्टनंट, गोळे पाहिजेत!"

उखानोव ओरडत होता. त्याचा आवाज जरी कुझ्नेत्सोवला ऐकू येत होता, तरी तो ओळखणे अगदी अवघड ठरले होते. अंगात फक्त दुलईदार जाकीट घालून बांधावर पालथा पडून उखानोव त्याच्याकडे टक लावून बघत होता. त्याच्या काळया, घामेजल्या चेहऱ्यावर आकुंचलेले डोळे धगधगत होते, छातीशी त्याचे जाकीट उघडे होते व त्याखालचा आखूड कोटही फाटला होता आणि त्याची उघडी छाती स्पष्ट दिसत होती. ओरडून ओरडून त्याच्या मानेवरची शीर तट्ट फुगली होती. त्याच्या भुवया व पापण्या काजळीने माखल्या होत्या.

"लेफ्टनंट, गोळे पाहिजेत! त्या साल्यांच्या चामडी सोलल्या पाहिजेत! रणगाडे आपली फळी फोडताहेत! गोळे द्या लेफ्टनंट!"

दुसऱ्या तोफांबद्दल किंवा तिथे कुणी जिवंत आहे अथवा नाही याबद्दल त्याने कुझ्नेत्सोवला विचारले नाही. तोफखान्याची एकूण अवस्था काय आहे हे त्याने ताडल्याचे उघड होते. काही मिनिटांपूर्वी, त्या तोफांच्या दिशेने फळी फोडून येणाऱ्या रणगाड्यांवर तोफ डागताना त्याने सारे काही स्वतः पाहिले होते आणि आता तो फक्त तोफगोळयांची मागणी करीत होता. तोफगोळयांविना तो आणि त्याच्याबरोबरचे सारेच हतबल होते.

"उखानोव, ऐक! सगळी माणसं तोफगोळयांसाठी पाठव! दुसऱ्या तोफांकडं... तिथं खूप आहेत. सगळी खोकी आणवून घे! उखानोव, तुला जिवंत पाहून मला खूप आनंद झाला!"

"माझ्याकरता बंदुकीची गोळी अजून तयार व्हायचीय!" बांधावर उंचावून कुझ्नेत्सोवकडे तीक्ष्णपणे आणखी एक कटाक्ष टाकीत उखानोव म्हणाला. घामाने भिजलेल्या त्याच्या मानेवरची शीर आणखीच तट्ट फुगली. "तर त्यांचा मामला खलास झाला अं? लेफ्टनंट, आता फक्त आपणच उरलो का?"

"मी सांगतो, ते तोफगोळे आणवून घे! जिवंत असलेल्या प्रत्येक माणसाला गोळे आणायला पाठव!"

## प्रकरण बारावे

दिवसाच्या अखेरीस स्पष्ट झाले की, बेस्सोनोव यांची सेना आणि उजवीकडचा त्यांचा शेजारी यांच्यामधील केंद्रस्थानी जर्मनांच्या रणगाड्यांच्या हल्ल्याचा मुख्य रोख होता व उजवी फळी रणगाड्यांच्या हल्ल्यापुढे हळूहळू ढासळत चालली होती. याचा अर्थ, दिवसअखेरीस बेस्सोनोव यांच्या सेनेतील कर्नल देयेव यांच्या अख्त्यारातील उजव्या फळीच्या डिव्हिजनमध्ये परिस्थिती अत्यंत गंभीर होती. सतत हल्ले चढवून दुपारच्या सुमारास जर्मनांनी खेड्याचा दक्षिण भाग काबीज केला होता आणि तिथे मीष्कोवा नदीवर दोन ठिकाणी त्यांचे रणगाडे पुढे घुसायचा प्रयत्न करीत होते. उत्तर तीर काबीज करायचा आणि संरक्षणफळीत पाचर मारायची व सोविएत सेनेच्या संरक्षण आघाडीत फूट पाडून त्यांना घेरायचे, असा जर्मनांचा व्यूह होता.

सेनेच्या टेहळणी चौकीत बसून टेबलावर पसरलेल्या नकाशाला बेस्सोनोव न्याहाळत होते आणि जनरल यात्सेन्को यांचा ताजा अहवाल फोनवरून ऐकीत होते. लष्करी मंडळाचे सदस्य वेस्निन अत्यंत चिंताक्रांत झाल्याचे स्पष्ट दिसत होते.

वेस्निन किती पोरसवदा दिसतात असे मनाशी नवल करीत असतानाच ते आता काय बोलणार याबद्दल अर्धवट तर्क बांधीत बेस्सोनोव यांनी यात्सेन्को यांच्याबरोबरचे टेलिफोनवरचे संभाषण मध्येच थांबवले.

"विताली इसायेविच, तुम्हाला मला काही सांगायचंय का?"

"उत्तर तीरावर रणगाड्यांनी फळी फोडलीय प्योत्र अलेक्सांद्रोविच! खेड्याच्या अर्ध्या उत्तर भागातले अनेक रस्ते त्यांनी काबीज केलेत. देयेवच्या टेहळणी चौकीतून आम्ही त्यांना अगदी स्पष्ट पाहिलंय. या भागात रणधुमाळी माजलीय," स्टोव्हजवळ उभे रहात वेस्निन म्हणाले. "इथून नैर्ऋत्येला सुमारे दहा किलोमीटरवर. देयेवनी प्रतिहल्ला चढवायचा ठरवलंय आणि खोख्लोवची वेगळी रणगाडा रेजिमेंट रणांगणात घातलीय. पण अजून तरी तिथं काही अनुकूल फलश्रुती मिळाल्या नाहीत."

"एकवटलेल्या भागात रणगाडे आणि यंत्रसज्ज कोअर येताच मला परत फोन करा," बेस्सोनोव फोनवर म्हणाले आणि त्यांनी फोन बंद केला तरी रिसीव्हरवर हात तसाच धरून ठेवला. "आपल्या सेनेच्या

परिस्थितीबाबत सर्वप्रमुख ठाण्याचे प्रतिनिधी चिंतेत आहेत. रणगाड्यांच्या तुकडीशिवाय सर्वप्रमुख ठाण्याच्या राखीव विभागातून आपल्याला यंत्रसज्ज कोअर दिली आहेत," ते पुढे म्हणाले.

"चिंता करायला त्यांना सबळ कारण आहे," वेस्निन म्हणाले. "आपली परिस्थिती अगदीच... आपल्यावर ते जबरदस्त दबाव देताहेत."

वेस्निन यांनी हात चोळले, किंचित वाकलेल्या खांद्यांना झटका दिला आणि एका पायावर दुसरा पाय मारला. जणू गेले दोन तास देयेव यांच्या टेहळणी चौकीवर गोठवणाऱ्या वाऱ्यात गारठून गेल्यानंतर आत्ता त्यांनी अंगात ऊब आणायला सुरुवात केली होती.

"अच्छा, त्यांनी उत्तर किनाऱ्यावर फळी फोडली म्हणता?" बेस्सोनोव म्हणाले.

आसऱ्याच्या दुसऱ्या अर्ध्या भागातून नेहमीप्रमाणे ऑपरेटरांच्या आवाजांचा व सतत वाजणाऱ्या टेलिफोनच्या घंट्यांचा गोंगाट ऐकू येत होता, पण बेस्सोनोव यांच्या छोट्या खोलीत मात्र एकदम शांतता पसरली होती. संदेशवाहकांच्या जाडजूड मिशांच्या वरिष्ठ सार्जंटने टेलिफोनचे हँडल सावधपणे फिरवले. सेनाधिपतीचे सर्वप्रमुख लष्करी ठाण्याशी संभाषण संपल्याची ती खूण होती. उजव्या फळीच्या तुकड्यांशी संपर्क साधू पाहणाऱ्या वायरलेस ऑपरेटरने ताबडतोब आपला आवाज खालावला. कोपऱ्यातल्या कोचावर बसून मेजर बोझिच्को एका फडक्याने पिस्तूल साफ करीत होते. त्यांनी वेस्निन यांच्याकडे एक समंजस कटाक्ष टाकला, मग बेस्सोनोव यांच्याकडे पाहिले आणि पटकन पिस्तुलात गोळ्या भरून ते कमरेच्या पट्ट्यात लटकावले आणि पट्टा गच्च आवळला. आपण कोणत्याही हालचालीला जय्यत तयार आहोत असे जणू त्यांना जनरलना सुचवायचे होते. पण नकाशावर आपला छोटा हात टेकवून एका बोटाने हळुवार टिचक्या मारीत बेस्सोनोव टेबलाशी स्वस्थ बसून राहिले.

नंतर थोड्या वेळाने त्यांनी वेस्निनना विचारले, "खोख्लोवच्या प्रतिहल्ल्यावर देयेव यांची फारशी भिस्त नाही असं तुम्हाला सुचवायचं होतं? त्याबद्दल तुम्ही त्यांच्याशी चर्चा केली?"

"इतर गोष्टींबरोबर केली," जनरलच्या धूर्तपणावर किंचित स्मित करीत वेस्निन उत्तरले. त्यांचा आनंदी स्वभाव हा मुखवटा असेल किंवा खरोखरीचा असेल, पण बेस्सोनोव यांच्यापेक्षा वेस्निनबरोबर

देयेव अधिक मोकळे वागत होते हे स्पष्ट होते. त्यामुळे नव्या सेनापतींजवळ आपल्या शंका व्यक्त करण्याऐवजी त्यांनी त्या केवळ वेस्निन यांनाच बोलून दाखवल्या होत्या.

"तुम्ही देयेव यांच्या टेहळणी चौकीवर असताना," बेस्सोनोव आपल्या कर्कश्य आवाजात बोलू लागले, "आम्हाला आघाडीवरच्या मुख्य ठाण्याकडून कळवण्यात आलं की, पाउलसच्या वेढलेल्या सेनेवर जर्मन हवाई दलाने आपल्या हालचाली वाढवल्या आहेत आणि पाउलसला ते विमानांमधून दारूगोळ्याचा पुरवठा टाकीत आहे. मानष्टेईनशी मिळवणी करण्यासाठी फळी फोडायला ते जय्यत तयार होत आहेत असा याचा अर्थ निघतो. तुम्हाला काय वाटतं?"

"जर्मनांची इथं काय परिस्थिती घडेल त्यावर कदाचित ते अवलंबून राहील," वेस्निन उत्तरले. "आपल्या आघाडीपासून स्तालिनग्राद फक्त चाळीस किलोमीटरवर आहे. जर त्यांनी फळी फोडली तर एका झेपेत तिथं पोचतील."

"त्यांच्या वाहनांवरच्या तुकड्या पोचतील," बेस्सोनोवनी त्यांची चूक दुरुस्त करीत म्हटले. "जर ते फळीतून जाऊ शकले तर!"

"कॉम्रेड कमांडर, मी आत येऊ काय?"

मधला पडदा बाजूला सारून सेनेच्या कारवाईचे उपप्रमुख मेजर ग्लादीलिन आत आले. गंभीर चेहऱ्याचा हा माणूस चाळीशीच्या सुमाराचा होता. पलिकडच्या विभागातील बॅटरींवर पेटलेल्या दिव्यांच्या उजेडाने जणू त्यांना पुढे लोटावे तसे ते आत आले. त्यांच्या उंच, फिकट कपाळावर घामाचे थेंब जमले होते. वस्तुतः त्यांना सरळपणे एवढेच सांगायचे होते की, "कॉम्रेड कमांडर, शत्रूचे रणगाडे खेड्यात घुसलेत!" पण आपण काय अहवाल देत आहोत आणि कुणाला देत आहोत त्याची त्यांना जाणीव असल्याने अनुभवी लष्करी अधिकाऱ्याला शोभेल अशा संयमाने ते बोलू लागले.

"कॉम्रेड कमांडर, ७२ व्या आणि ३३६ व्या रेजिमेंटस्च्या तोंडी बातम्यांनुसार आम्हाला समजलंय की, अर्ध्या तासापूर्वी जर्मन रणगाड्यांनी नदी पार केली व पाचर मारून..."

"मला माहीत आहे मेजर," बेस्सोनोवनी मध्येच अडवले. कारवाई विभागाकडून काहीशा दिरंगाईने आलेल्या या बातमीमुळे व सेनापतीसमोर

अशा भावनाविहीन, निर्जीव अवस्थेतच उभे राहून बोलले पाहिजे अशी मेजरची ठाम समजूत झालेली पाहून बेस्सोनोवना थोडा राग आला होता. विचारी, उत्तम प्रशिक्षित लष्करी अधिकारी स्वसंरक्षणासाठी जेव्हा ही संभाषणाची पद्धत अवलंबित आणि बेस्सोनोवना आपल्यावर लादलेल्या अधिकाराची व वर्चस्व गाजविण्याच्या खास सत्तेची जाणीव करून एकाकीपणाची भावना देत, तेव्हा त्यांना नेहमीच संताप येत असे. "रणगाड्यांनी फळी फोडून उत्तर किनाऱ्याकडे कूच केलंय हे स्पष्ट झालं. आणखी तुम्हाला काय सांगायचंय मेजर?"

"एक तासापूर्वी खोल्लोवची अलग रणगाडा रेजिमेंट मैदानात उतरली, कॉम्रेड कमांडर. खेड्याच्या उजव्या तीरावरच्या क्षेत्रात ती प्रतिहल्ला चढवते आहे, पण शत्रू अजून थोपवला गेलेला नाही. तो आपल्या संरक्षणफळीला कुरतडत चाललाय," मेजर ग्लादीलिन उत्तरले आणि त्यांच्या कपाळावरचे घामाचे थेंब अधिकच स्पष्टपणे चमकू लागले.

"कुरतडताहेत! व्वा! काय रंगतदार शब्द वापरलाय!" आपल्या आवाजात चीड लपवायला असमर्थ ठरलेले बेस्सोनोव ताडकन उद्गारले. "शत्रूचे किती रणगाडे फळी फोडून घुसले? एक कंपनी, एक बटालियन? दोन रणगाडे? किती?"

"कॉम्रेड कमांडर, असा अंदाज आहे की, दुपारच्या सुमाराला जर्मनांनी ताजी रणगाडा डिव्हिजन लढाईत घातली. एकूण पाहता सुमारे दोन बटालियन फळी फोडून घुसल्या असाव्या असं मला वाटते..."

"तुमच्या अंदाजांचा खरेखोटेपणा ताबडतोब तपासून पहा!" बेस्सोनोवनी पुन्हा अडवले व नकाशावर हातातली पेन्सिल फेकली. वस्तुतः ग्लादीलिन यांनी ताज्या जर्मन रणगाडा डिव्हिजनबाबत केलेला निर्देश त्यांच्या अंदाजाशी जुळता होता. "आणि यापुढं नेहमी लक्षात ठेवा की, तुमच्या बातम्यांचा खरेखोटेपणा ताडल्याशिवाय मला सांगायला यायची घाई करू नका. आपण नेहमी ताबडतोब मनात येईल त्याप्रमाणं वागतो. तसं करू नका. आपण जाऊ शकता मेजर."

अजिबात पावलांचा आवाज न करता मेजर खोलीबाहेर गेले. आज्ञाधारकपणा त्यांच्या रोमरोमात भिनला होता. त्यांनी पडदा परत व्यवस्थित ओढून घेतला आणि त्याचे कोपरे सरळ केले. हे करीत

असतानाही ते खालच्या नजरेने बेस्सोनोव यांच्याकडे पहात होते. कारवाई विभागाचे उपप्रमुख ग्लादीलिन हे काही तसे तरुण मेजर नव्हते, पण बुद्धिमत्ता आणि अचूक अंदाजाची क्षमता असूनही ते त्यांच्या कारकीर्दीच्या मानाने खालच्या स्थानावर फार काळ राहिले असा विचार बेस्सोनोव यांच्या मनात येऊन गेला. ग्लादीलिन यांचा भित्रेपणा व मृदुभाषीपणा त्याला कारणीभूत होता. त्यांच्या या स्वभावाची बेस्सोनोवना चीड होती.

थोडा वेळ थांबून बेस्सोनोव यांनी टेबलाच्या कडेला टेकवून ठेवलेली काठी चाचपली आणि ते उठले. आपली बोटांची नखे न्याहाळण्यात एवढा वेळ गुंतलेले बोझिच्को ताडकन उठून उभे राहिले आणि दाराजवळ खिळयावर अडकवून ठेवलेला जनरलांचा मेंढकातडी कोट त्यांनी पटकन काढला. वेस्निन यांनी हातात हातमोजे चढवले आणि त्या एकूण शांततेचा भंग करीत खेळकर सुरात म्हणाले, "मी केव्हाचा जय्यत तयार होऊन बसलोय."

ॲडज्युटंटने धरलेल्या कोटात आपला हात खुपशीत बेस्सोनोवनी एक असमाधानाचा चीत्कार काढल्याचे त्यांनी पाहिले.

आसऱ्यामधील पायाखालची माती हादरू लागली. नकाशावरच्या लाल पेन्सिलीने एक उडी मारली व थरथरणाऱ्या टेबलावर ती घरंगळली.

"देयेव यांच्या टेहळणी चौकीवर चाललोय," वेस्निन यांच्या दिशेने किंचित मान झुकवीत बेस्सोनोव म्हणाले. "माझ्या मोटारीतून येणार का विताली इसायेविच?"

"हो, एकच मोटार सोयीची पडेल," वेस्निन उत्तरले.

"कॉम्रेड कमांडर, मी मेजर तितकोवना सांगू?" बाकावरची सबमशिनगन उचलीत बोझिच्को यांनी विचारले.

"संरक्षणासाठी बरोबर येण्याची गरज नाही. त्यांना राहू दे मागं. तिथं त्यांची गरज पडणार नाही."

बेस्सोनोव त्या आसऱ्याच्या दरवाजाकडे गेले.

देयेव यांच्या टेहळणी चौकीपर्यंतचे दहा किलोमीटर अंतर त्यांनी वेगात कापले.

टेकडीच्या ऐन माथ्यावर कर्नल देयेव आपल्या टेहळणी चौकीत होते. ते आणि अधिकाऱ्यांचा एक गट दुर्बीणीभोवती उभे होते व नदीपलिकडचे तोफांच्या भडिमाराने उजळलेले रणमैदान न्याहाळत होते. पण ज्या क्षणी त्या टेहळणी चौकीच्या खोल खंदकात बेस्सोनोव यांचे आगमन झाले, त्याच क्षणी सारे अधिकारी एकदम ताठ उभे राहिले, टेबलाशी बसलेल्या संदेशवाहकांच्या माना वर झाल्या व कुणीतरी मागून कुजबुजल्यामुळे देयेव चटकन दुर्बीणीपासून मागे सरले आणि एक दीर्घ श्वास घेऊन त्यांनी अहवाल देण्याची पूर्वतयारी केली.

टेकडीवर सुसाटचाचा वारा वहात होता. रणमैदानावरचे आवाज त्या वाऱ्याच्या घोंघावण्यात फाटत होते, विस्कटले जात होते. सूर्यास्ताच्या किरणांमुळे व झोंबणाऱ्या वाऱ्यामुळे लालबुंद दिसणारे सर्व चेहरे अधीर अपेक्षेने पहात होते. डिव्हिजन ज्या परिस्थितीत सापडली होती तिचा खेदही त्या सर्वांच्या चेहऱ्यावर उमटला होता.

बेस्सोनोव यांनी आपल्या समोरच्या सर्वांचे चेहरे निरखले आणि त्यांची नजर देयेव यांच्यावर स्थिरावली.

"कॉम्रेड कमांडर!" देयेव आपल्या दमदार खणखणीत आवाजात बोलू लागले. "एक तासापूर्वी जर्मनांनी दुसऱ्या तीरावरचे आघाडीचे तोफखाने मोडून काढले, खंदकांची पहिली फळी फोडली आणि या टेकडीच्या पूर्व-पश्चिम बाजूंनी दोन बटालियन रणगाड्यांनी नदी पार करून खेड्याच्या उत्तर तीरावरील क्षेत्रापर्यंत मजल मारली. त्यांच्या विरुद्ध सामना करायला रणगाडानाशक ब्रिगेड पाठवली आहे. आपण एक रणगाडा रेजिमेंटही पाठवलीय..." देयेव घुटमळले आणि एकाएकी त्यांचा गोंधळ उडाला. "कॉम्रेड कमांडर, डिव्हिजनच्या फळयांमध्ये गंभीर परिस्थिती निर्माण झाली आहे."

"मला माहीत आहे कर्नल," बेस्सोनोव म्हणाले. पण तुमचा रिपोर्ट पुरा करा. डिव्हिजनला वेढा बसण्याचा किंवा पिछाडीहून शत्रू पसरण्याचा धोका आहे का? असंच आहे की नाही? तुमच्या फळयांचा विस्तार कमी केला जातोय? मला वाटतं, अकादमीमध्ये आपल्याला याच परिभाषेत शिक्षण देतात ना?

"कॉम्रेड जनरल, मी कधीही अकादमीत शिकलो नाही."

"तुम्ही शिकला नाही? हे आणखीच वाईट. तरीही..."

विचारांच्या अचानक निकट साहचर्यामुळे बेस्सोनोव यांना सर्वप्रमुख लष्करी ठाण्यामधील त्या संभाषणाची, त्यांच्या अकादमीमधील वर्षांसंबंधीच्या व जनरल व्लासोव यांच्यासंबंधीच्या त्या चौकस प्रश्नांची आठवण झाली. त्या संभाषणाला जणू प्रचंड काळ लोटून गेला होता असे त्यांना त्यावेळी वाटले. आपली काठी जमिनीत रोवून ते दुर्बीणीकडे गेले. "तरी आत्ताही गोष्ट एवढी महत्त्वाची नाही कर्नल!" आणि खंदकांच्या विविध भागांमधून तेथे येऊन शांतपणे थांबलेल्या अधिकाऱ्यांकडे ते वळले. "कर्नल देयेव, निर्णय घेतला गेलाय. खोख्लोवच्या रणगाडा रेजिमेंटने प्रतिहल्ला चढवून जर्मनांना पुलाच्या पलिकडे रेटले पाहिजे. रॉकेट मॉर्टरचा मारा करणारी अख्खी रेजिमेंट लढाईत घातली पाहिजे. आणि पायदळाच्या रेजिमेंटच्या कमांडरांना माझा वैयक्तिक हुकूम कळवा." बेस्सोनोवनी देयेव यांच्याकडे अशा नजरेने पाहिले की, जणू त्यांचा प्रत्येक शब्द त्यांच्या थंडगार कठोर नजरेतून घणाघात घालीत होता. "कोणत्याही परिस्थितीत रेजिमेंटस्नी लढाई जारी ठेवली पाहिजे. शेवटच्या गोळ्यापर्यंत. शेवटच्या काडतूसापर्यंत. जर्मनांना रोखून धरणे आणि त्यांचे रणगाडे नष्ट करणे हे महत्त्वाचे आहे. काय वाट्टेल त्या मार्गांनी. माघार घ्यायला माझी मुळीच परवानगी नाही! हे सतत लक्षात ठेवा! माझं म्हणणं मी स्पष्ट केलंय कर्नल देयेव? आत्ता एवढंच पुरे आहे कर्नल. मी लढाईच्या अखेरीपर्यंत तुमच्या टेहळणी चौकीवर थांबणार आहे. आत्ताचे मोर्चे अखेरच्या माणसापर्यंत लढवले पाहिजेत. आपली जागा सोडायला प्रत्येकाला फक्त एकच वस्तुनिष्ठ कारण चालेल — मृत्यू." बेस्सोनोव खंबीर आवाजात म्हणाले.

बेस्सोनोव दुर्बीणीच्या शेजारी उभे राहिले आणि कॉलरमध्ये डोके खुपसून टेकडीच्या पायथ्याशी चाललेल्या लढाईचे निरीक्षण करू लागले. नदीच्या गुलाबी छटा पसरलेल्या वळणांच्या पलिकडचा सारा प्रदेश तोफगोळ्यांच्या व बाँबच्या स्फोटांनी छिन्नभिन्न झाला होता. वरच्या तीरावरून सोविएत तोफखाने अद्याप सतत भडिमार करीत होते. खेड्याच्या डाव्या बाजूला, टेकड्यांवरून येणाऱ्या लांबलचक उतारांपासून रुंद खिंडीपलिकडे सबंध आघाडीवर पसरलेल्या धुरामधून रणगाडे मारा करीत होते. सूर्यास्ताच्या लालभडक रक्तरंगात सारे न्हाऊन निघाले होते. लहानमोठ्या आगींमध्ये सर्व गोष्टी लपेटल्या होत्या व त्या

आगींचा एकत्रित गुंफलेला एक समूहच नजरेला जाणवत होता. जळणाऱ्या धातूपासून, जळणाऱ्या तेलापासून आणि पेट्रोलपासून निघणाऱ्या धुराच्या वलयांमध्ये सारे काही लपेटले जात होते. त्या पेटलेल्या आगीं-मुळे आणि सूर्यास्तामुळे जणू सारा बर्फ पेटल्याचा भास होत होता.

नदीच्या तीरानजीक व डिव्हिजनच्या टेहळणी चौकीच्या टेकडीच्या समोर जवळच तोफगोळयांच्या अनुक्षेपकांचा उडालेला कल्लोळ, नजरेला दिसणारे रणमैदान आणि रॉकेट मॉर्टरच्या माऱ्यातून फळी फोडून जर्मन रणगाडे घुसले होते तो टेकडीपलिकडील खेड्याचा धुरात गुरफटलेला उत्तर विभाग—ही सर्व परिस्थिती एकूण लक्षात घेता बेस्सोनोवना समजून चुकले की, कसोटीचा सर्वोच्च क्षण जवळ येत चालला होता. लढाई ऐन शिगेला जाऊन पोहोचली होती व संपूर्ण ताणला गेलेला धागा कोणत्याही क्षणाला तुटण्याची शक्यता होती.

"सेनापतींचा फोन आहे!" खंदकातून आलेले आवाज बोझिच्कोनी पटकन टिपले. "कॉम्रेड कमांडर, कुणाला तरी तुमच्याशी बोलायचं आहे!"

तो यात्सेन्कोचा फोन असणार याची बेस्सोनोवना जाणीव झाली व ते क्षणभर अस्वस्थपणे चुळबुळले. चीफ ऑफ स्टाफचा फार काळ फोन आला नव्हता. आता त्यांना काय सांगायचे होते?

## प्रकरण तेरावे

त्या निवाऱ्याच्या छपरावर लाकडांचे व मातीचे तीन थर टाकले होते. त्यामुळे लढाईचे आवाज अस्पष्ट ऐकू येत होते. एकमेकांचे बोलणे तेथे व्यवस्थित ऐकू येई. त्या भक्कम लाकडी छताला टांगलेले दोन कंदिल एका लयीत घड्याळाच्या लंबकाप्रमाणे डोलत होते. त्यांचा पिवळसर प्रकाश दाढ्या न केलेल्या चेहऱ्यांवर, व दोन टेबलांवरच्या नकाशांवर आणि टेलिफोन्सवर पडला होता.

रॉकेट मॉर्टर रेजिमेंटच्या कमांडरला फोन करणाऱ्या तोफखान्याच्या कमांडरने नकाशावर रिसीव्हर ठेवला व रिपोर्ट करण्याच्या उद्देशाने तो टेबलापासून मागे वळला. पण केवळ मानेच्या इशाऱ्याने बेस्सोनोवनी

त्याला थांबवले आणि वायरलेस ऑपरेटरांच्या नजरा त्यांच्यावर रोखलेल्या असताना ते दूर कोपऱ्यातल्या छोटचा खोलीकडे चालत गेले. तेथे सेनेच्या प्रमुख ठाण्याशी संपर्क राखणारी रेडिओ व टेलिफोनयंत्रणा होती.

बेस्सोनोव यांचा अंदाज चुकला नव्हता. चीफ ऑफ स्टाफ मेजर-जनरल यात्सेन्कोच फोनवर होते. बेस्सोनोव जेव्हा संदेशवाहक यंत्रणेच्या खोलीत शिरले तेव्हा डिव्हिजनच्या टेहळया पथकाचे प्रमुख लेफ्टनंट-कर्नल कुरिशेव यात्सेन्को यांच्याशी बोलत होते. कुरिशेव यांचा बुद्धिमत्तादर्शक चेहरा काळजीने व श्रमांनी काळवंडला होता. "होय, कॉम्रेड पाच... मी समजलो कॉम्रेड पाच," ते पुन्हापुन्हा एकसुरात हे शब्द उच्चारीत होते व त्यांची तंबाखूमुळे पिवळी पडलेली बोटे टेबलावरच्या नकाशावरील पेन्सिलीशी चाळा करीत होती. कोपऱ्यात गुपचूप पाठमोरा बसलेला वायरलेस ऑपरेटर हे सेनेच्या प्रमुख ठाण्याशी चाललेले संभाषण जणू साऱ्या जिवाचे कान करून ऐकत होता असे भासत होते.

"कॉम्रेड कमांडर, फोन तुमच्यासाठी आहे," कुरिशेव म्हणाले आणि त्यांनी रिसीव्हर पुढे धरला.

"थँक्यू."

कवायतीच्या सार्जंटसारखा खणखणीत वाजणारा यात्सेन्कोचा आवाज फोनमध्ये घुमू लागला आणि सुरक्षिततेच्या दृष्टीने त्या दिवसअखेरीचा लढाईचा वृत्तांत जरी ते सैन्याच्या ठराविक परिभाषेत देत होते तरी बेस्सोनोव यांना त्यांच्या बोलण्याचा सरळ अर्थ समजण्यास काहीच अडचण भासत नव्हती. सोविएत सेनेच्या दक्षिण व उत्तर बगलांवर प्रचंड हवाई पाठबळ घेऊन जर्मन अद्याप हल्ले चढवीत होते. संध्याकाळपर्यंत हल्ल्यांचा जोर कमी झाला नव्हता आणि सेनेच्या डाव्या फळीच्या डिव्हिजनमध्ये सुमारे साठ पँझरनी जोरदार धडक मारली होती. संरक्षणफळीच्या पहिल्या पट्ट्यात आतपर्यंत लढाईची जोरदार धुमश्चक्री माजली होती व जर्मनांनी सुमारे दोन किलोमीटर आतमध्ये मुसंडी मारली होती. १७ व्या यंत्रसज्ज कोअरची एक चिलखती व एक रणगाडा ब्रिगेड हाणामारीत गुंतली होती, पण अद्याप परिस्थितीत फारशी सुधारणा झाली नव्हती. सेनेच्या संरक्षण फळीच्या केंद्रस्थानी मात्र परिस्थिती स्थिर होती. सर्वप्रमुख लष्करी ठाण्याच्या राखीव फौजेचे – १ ली

रणगाडा कोअर व ५ वी यंत्रसज्ज कोअर—अद्याप केंद्रित भागात आगमन झाले नव्हते. काही तासांपूर्वी जर्मनांच्या 'दॉन' विभागातील सेनेचा एक संदेश सोविएत हेरांनी पकडला होता. जर्मनांचे त्या विभागातील प्रमुख ठाणे बहुधा आता नवोचेर्कास्क होते. पाउल्सला मानष्टेईनच्या सहीने पाठवलेला मजकूर साध्या भाषेत असा होता: "थोपवून धरा. विजय जवळ आला आहे. आम्ही तुमच्या मदतीला येत आहोत. नाताळच्या हवामानाच्या इशाऱ्याला सज्ज रहा." शेवटच्या वाक्याचा अर्थ लावणे अजून अवघड होते, पण पाउल्सने अपेक्षित कोंडी फोडून मानष्टेईनच्या रणगाड्यांशी दुवा सांधण्याशी त्याचा काहीतरी संदर्भ असावा. जर्मन हवाई तळांवर सोविएत विमानदलांकडून तुफानी हल्ले होत असूनही, पाउल्सला इंधन व दारूगोळ्याचा पुरवठा करण्यात जर्मन वाहतूक विमाने मोठ्या प्रमाणात गुंतल्याचे स्पष्टपणे दिसून येत होते. "वेढ्या"च्या नैर्ऋत्येला मरिनोवकाच्या दिशेने वेढलेल्या जर्मन सेनेचे रणगाडे वाटचाल करीत असलेले दिसत होते.

जनरल यात्सेन्को यांच्या या सूत्रबद्ध, तपशीलवार अहवालात बेस्सोनोव यांनी एकदाही अडथळा आणला नाही. आपल्या चीफ ऑफ स्टाफच्या आवाजात जेव्हा समारोपाची चिन्हे त्यांना जाणवली तेव्हाच फक्त त्यांनी आपल्या मेंढकातडी कोटाच्या कॉलरची बटणे मोकळी केली व ते टेबलाशी बसले.

"संपलं?" थोडा वेळ थांबून त्यांनी विचारले.

उत्तर आधीच तर्कानि हेरून ते पुढे म्हणाले, "आपला मुख्य दणका ते इथे देत आहेत ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ आहे आणि त्यांचा दुसरा हल्ला डावीकडे आहे."

"देयेव यांच्या मोर्चांमधून त्यांना पाउल्सपर्यंतची वाट काढायची आहे याबद्दलही माझी खात्री पटली आहे. आपल्या अंतिम टप्प्याला सर्वांत जवळ असलेल्या आमच्या आघाडीच्या एकच एक अरुंद क्षेत्रावर सतत मारा करून त्याच्या चिंध्या करण्याचा आपला डावपेच मानष्टेईन बदलणार नाही असं मला वाटतं."

"मला मान्य आहे."

"या क्षणाला पाउल्स काय करतोय याबाबत अधिक तपशील मिळविण्याचा मी प्रयत्न करीन. विशेषत: त्याच्या फिरत्या सैन्याच्या

काय हालचाली आहेत व मानष्टेईनच्या दिशेनं तो फळी फोडण्यास खरोखरीच समर्थ आहे किंवा नाही याची शहानिशा करून घेईन. या घडीला हे विशेष महत्त्वाचं आहे."

"नुसत्या महत्त्वापेक्षा त्यात बरंच आणखी काही आहे," बेस्सोनोवनी दुजोरा दिला. "१ ली आणि ५ वी कोअर केव्हा येतील हेही मला समजून घ्यायची इच्छा आहे. त्यांना जलदीनं आणा!"

"सारा वेळ मी त्याच प्रयत्नात आहे प्योत्र अलेक्सांद्रोविच," यात्सेन्को धापा टाकीत उत्तरले. त्यांच्या सेनेच्या दिमतीला देण्यात आलेल्या रणगाड्यांच्या व यंत्रसज्ज कोअर अद्याप येऊन न पोचल्याने त्यांना वाटणारी चिंता व राग त्यांच्या स्वरातून उमटत होता. "तुमच्या भेटीची केव्हा अपेक्षा धरायची?"

"इतक्यात धरू नका. हे अत्यंत महत्त्वाचे क्षेत्र आहे."

यात्सेन्को खोकले व गप्प राहिले.

"पण एकूण परिस्थिती लक्षात घेता तुम्ही देयेव यांच्या ठिकाणावर फार काळ थांबू नये. तुम्ही अगदी उघड्या ठिकाणावर आहात," यात्सेन्को यांचा जड श्वासोच्छ्‌वास रिसीव्हरमधून स्पष्ट ऐकू येत होता. "तुम्हाला सल्ला देणं हे अर्थातच माझं काम नाही, पण सेनेच्या टेहळणी मोर्चावर तुम्ही जाणं अधिक इष्ट ठरेल."

"सेम्योन इवानोविच, आता माझं ऐका", त्यांचे बोलणे मध्येच अडवीत कपाळाला आठ्या घालून बेस्सोनोव म्हणाले, "मी इथं आहे आणि इथंच राहण्याचा माझा इरादा आहे, तेव्हा डाव्या फळीकडं तुम्ही कृपया लक्ष पुरवाल का? आणि सारा वेळ तिथं प्रतिहल्ले चढवा!"

आपल्या डाव्या हाताची बोटे त्यांनी कपाळाकडे नेली. अतिश्रमामुळे ती घामेजली होती व थरथरत होती. मॉर्टरचा हल्ला होत असताना दळणवळणाच्या खंदकात लपताना त्यांचा पाय मुडपला होता. आता त्या पायात ठणकती वेदना सुरू झाली होती.

रिसीव्हर परत जागेवर ठेवल्यानंतर बेस्सोनोव टेबलाशी काही काळ तसेच तंद्रीत बसून राहिले. टेबलाखाली त्यांनी पाय सावधगिरीने सरळ केला. पायातली वेदना कमी होईल आणि आपल्याला उठता येईल असे त्यांना वाटले होते. पण वेदना कमी झाली नाही.

"त्या परत आलेल्या टेहळ्यानं काही ताजी बातमी आणली का? तो शुद्धीवर आहे? कुठं आहे तो?" आपल्या नडगीमधील ठणक विसरण्यासाठी दुसरीकडे अवधान वळवायचा प्रयत्न करीत बेस्सोनोवनी कुरीशेवना विचारले.

आपल्याला जाणवणारा ताण व विलक्षण श्रम दिसू नयेत म्हणून लेफ्टनंट-कर्नल खुणांनी चितारलेल्या नकाशावरच नजर खिळवून बोलू लागले.

"त्याला इथं आणला तेव्हा तो केवळ अर्धवट शुद्धीतच होता. तो जे काही बोलायचा प्रयत्न करीत होता त्यावरून एवढंच समजतं की, परतीच्या वाटेवर इतर टेहळे जर्मनांच्या नजरेला पडले, त्यांनी त्यांच्याशी दोन हात केले व आपल्या चौक्यांच्या पलिकडेच कुठंतरी खऱ्या कैद्याबरोबर अडकून पडलेत. ह्या परत आलेल्या टेहळ्याला वैद्यकीय उपचारांसाठी नेलंय, पण तो आणखी काही आपल्याला सांगू शकेल असं वाटत नाही... या अयशस्वी टेहळणीचा सारा दोष मला पत्करला पाहिजे हे मला मान्य आहे."

"बंद करा!" आपल्या पालथ्या हाताची टेबलावर हलकेच थाप मारीत बेस्सोनोव उद्गारले. "यावर कुढत स्वतःला त्रास करून घ्यायचं थांबवा! त्यात काही अर्थ नाही आणि ही वेळ नव्हे. त्यानं तुम्हाला किंवा मला काहीच मदत व्हायची नाही. आपण एकही कैदी पकडलेला नाही आणि पकडण्याची शक्यता नाही, कारण जर्मन पुढे घुसताहेत. पण मला गरज आहे फक्त एका चांगल्या, उत्तम माहीतगार जर्मनाची! त्याची काय व्यवस्था करता ते सांगा कर्नल?"

"कॉम्रेड कमांडर, मी याबाबत थोडा विचार करू का?"

बेस्सोनोव टेबलावर आपल्या बोटांनी टिचक्या वाजवीत राहिले. लाकडी छतावरून पडलेली नकाशावरची घाण टेहळणी पथकाचे प्रमुख काळजीपूर्वक साफ करीत असलेले त्यांनी पाहिले. बेस्सोनोवना त्यांची ही कृती अगदी अनैसर्गिक आणि अनावश्यक वाटली; जशी अयशस्वी टेहळणी वाटली होती, आपल्या पायातली ठणकती वेदना वाटत होती. आणि एकाएकी त्यांना वोदकाचा एक प्याला प्यायची विलक्षण इच्छा झाली. त्यामुळे आपल्या डोक्यातला गोंधळ थांबेल, वेदना सुसह्य होईल व खूपच बरे वाटेल असे त्यांना वाटले. पण या अनपेक्षित इच्छेचे,

सुटकेच्या आशेचे दुसऱ्याच क्षणी त्यांना स्वतःला आश्चर्य वाटले. आपले शरीर आणि मन यांना पांगळे करून टाकणारी ती वेदना केव्हा नाहीशी होईल याची वाट पहात ते तसेच टेबलाशी बसून राहिले.

सहा नळ्यांच्या मॉर्टरनी टेहळणी चौकीवर भडिमार करायचे थांबवले होते, पण तरीही तो निवारा अंधारामध्ये एखाद्या तराफ्याप्रमाणे हिंदकळत होता. तोफगोळ्यांच्या स्फोटांनी व अंधारात डोक्यावरून सतत उडणाऱ्या मशिनगनच्या फैरींनी हादरत होता. त्या दबलेल्या आवाजांमधून टेकडीच्या दक्षिणेला व उत्तरेला जवळ येत चाललेल्या रणगाड्यांचा घरघराट व टॉमीगनचा तुफानी कडकडाट बेस्सोनोवना स्पष्टपणे वेगळा ऐकू येत होता. त्या आवाजांवरून समजून येत होते की, ती टेकडी त्यांच्या सैन्यापासून, कोअरांपासून आणि डिव्हिजनपासून, बाहेरच्या सबंध जगापासून पूर्णपणे अलग पडली होती.

"...मी तुला सांगितलंय — तुझ्याजवळ फक्त पिस्तूल राहिलं असेल तर ते वापर! खुशाल रणगाडे तुझ्या अंगावरून जावोत, पण जागा सोडायची नाही! समजलं?"

वेदनेमुळे चेहरा वेडावाकडा करीत बेस्सोनोवनी डोके वर उचलले. निवाऱ्याच्या दुसऱ्या अर्ध्या भागात टेलिफोनच्या घंटांचा आणि आवाजांचा एकच दंगा उसळला होता. त्या सर्व आवाजात सर्वांत मोठा व रागीट आवाज देयेव यांचा ऐकू येत होता. त्यांच्या टेलिफोनवरच्या दणदणीत बोलण्यात हुकूम, धमक्या, ओरडणे आणि शिव्या या सर्वांचे मिश्रण झाले होते.

"चेरेपानोव, तू एक मिलीमीटर जरी मागं सरलास, तरी स्वतःवर गोळी झाडून घेणं बरं ठरेल! समजलं? तुझ्या तिथं सगळा तोफखाना आहे, सगळे रणगाडाभेदी गोलंदाज आहेत, तिथं त्यांचं नुसतं मोहोळ उठलं असेल! तुला वेढा बसतोय ते मला समजतंय! पण म्हणून आरडाओरडा करायचं काही कारण आहे का? थोपवून धर नाहीतर त्या प्रयत्नात मरण पत्कर! पूल तोडल्यानंतर आणखी रणगाडे येणार कुठून? तुझं डोकं ठिकाणावर आहे का?"

आपल्याला रणगाड्यांनी घेरले आहे, अर्धा वेढा बसला आहे म्हणून पायदळाच्या रेजिमेंटचा कमांडर चेरेपानोव देयेव यांना ती खबर कळवून मदतीची याचना करतोय आणि त्याला मदत करण्याचे आश्वासन

देण्याऐवजी देयेव संतापाने उत्तर देत आहेत व सर्वनाशाची परिस्थिती निर्माण झालेली असताना चेरेपानोवला जर शत्रूला थोपवता येत नसेल, तर त्याने मरण पत्करावे असे निष्ठुरपणे सांगत आहेत, याची बेस्सोनोवना कल्पना आली. इकडे त्या एकाकी खोलीत बेस्सोनोव नडगीतल्या वेदनांनी तळमळत बसले होते व शेवटचा माणूस पडेपर्यंत मोर्चे लढवा या त्यांच्या हुकुमाचे आता देयेव पालन करीत होते, तोच हुकूम ते आपल्या अधिकाऱ्यांना पोचवीत होते आणि आता त्यात अधिक्षेप करायचा बेस्सोनोवना अधिकार नव्हता, त्यांना सामोरे जाणे बेस्सोनोवना आता सर्वथा अशक्य झाले होते. वस्तुतः देयेव यांचे डोळेही मदतीची याचना करीत असतील, स्वतःसाठी, आपल्या डिव्हिजनसाठी! पूर्ण चेंदामेंदा करून टाकणाऱ्या त्या जर्मन रणगाड्यांच्या हल्ल्याला तोंड द्यावे लागणाऱ्या त्यांच्या डिव्हिजनला देण्यात आलेल्या त्या हुकुमाचा खरा आणि न टाळता येणारा अर्थ काय होता हे त्यांना समजून चुकले होते. पण युद्धात अशी कठोर मागणी अनेकदा होते व अशावेळी दैवाला पत्करण्यावाचून दुसरा कोणताच मार्ग शिल्लक उरत नाही.

"नसत्या सबबी सांगू नको चेरेपानोव!" देयेव आकांताने ओरडत होते. "मला समजत नाही असं तुला वाटत का? तुला हुकूम मिळालेत आणि ते पाळणं तुझं कर्तव्य आहे! कंबर कसून मोर्चे लढवा! तोफखाना तुम्हाला मदतीची शर्थ करतोय. तुला ते दिसत नसेल, पण मला दिसतंय! चिवटपणे जागा लढवा! संकटात सापडलेल्या मुलीसारखा आकांतानं प्रतिकार करा! चावा, ओरबाडा, पण शरण जाऊ नका! आणि पुन्हा मला फोन करू नको! तुझ्याकडून मी हे शेवटचं ऐकून घेतोय!"

देयेव माझ्या हुकुमाचे पालन करताहेत, पण या आज्ञा करताना त्यांना स्वतःला काय वाटत असेल? टेबलाशी निश्चल व गप्प उभे राहिलेल्या टेहळणी पथकाच्या प्रमुखांच्या नजरेला क्षणभरच बेस्सोनोव यांची नजर भिडली. आता ते नकाशावरची घाण झटकीत नव्हते. लेफ्टनंट-कर्नलच्या त्या बुद्धिमान, ओढलेल्या चेहऱ्यावर मूक निषेध उमटला होता, पण त्याचवेळी एक काकुळतीही पसरली होती. डिव्हिजन सध्या कोणत्या परिस्थितीत सापडली आहे याची त्यांना एव्हाना पूर्ण कल्पना आली होती व लढाईचे आवाज आणि देयेव यांचे फोनवरचे

हुकूम ती परिस्थिती स्पष्ट करीत होते. एकाएकी बेस्सोनोवनी आपले कपाळ चोळले व त्यांना जे बोलायचे होते किंवा ज्याचा ते विचार करीत होते त्याहून काहीतरी वेगळेच असे ते बोलले.

"बोला कर्नल, मी ऐकतोय".

"कॉम्रेड कमांडर", कुरीशेव स्थिर आवाजात बोलायचा प्रयत्न करीत म्हणाले, "डिव्हिजनला घेरलं जातंय असं दिसतं."

"तुमची खात्री झाली?"

"अगदी पूर्ण. कॉम्रेड कमांडर, मला वाटतं या टेहळणी चौकीवरही रणगाडे चालून येताहेत."

जणू काही नुकतेच झोपेतून जागे झाल्याप्रमाणे एक मिनिटभर टेहळणी प्रमुखांकडे बेस्सोनोव कंटाळल्या नजरेने पहात राहिले, मग ते उठले आणि कठोर आवाजात त्यांनी चौकस सुरात बोलायला सुरुवात केली.

"तुमच्या डोक्यात जेवढे विचार येतात तेवढे तुम्ही सारेच बोलून दाखवीत नाही, होय ना? तुम्हाला मला असे सांगायचे होते की, लौकरच आपणच खबरेकैदी बनण्याची शक्यता आहे. होय की नाही कर्नल?"

"मी वस्तुनिष्ठ परिस्थितीबाबत बोलतोय, कॉम्रेड कमांडर", कुरीशेवनी त्याच स्थिर सुरात खुलासा केला. "जर्मन लौकरच आपलं दळणवळण तोडतील. नंतर आपला कमांडशी दुवा तुटेल".

"कर्नल, तुमच्या निःपक्षपाती निर्णयाबद्दल थँक्स! पण अजून आपण कमांडशी दुवा गमावलेला नाही", बेस्सोनोव उत्तरले. "आणि खबऱ्याकैदी मिळवून आणण्याबाबतचा मी तुम्हाला केलेला हुकूम रद्द केलेला नाही. आणि जरी आपल्याला कैदी म्हणून धरून नेले व ही परिस्थिती अत्यंत अप्रिय ठरणार असली, तरी माझा हुकूम रद्द करण्याचा तिळमात्र इरादा नाही".

त्यांनी रिसीव्हर उचलला.

"तोफखाना कमांडर... लाईन काम करतेय? छान. मला लोमिद्झे जोडून द्या."

जॉर्जियन हेलांमधला घोगरा आवाज फोनवर ऐकू आला. "जर्मन तुमच्या दिशेनं पिसाळलेल्या कुत्र्यांसारखे धावून येताहेत, कॉम्रेड एक "
पण बेस्सोनोवनी त्यांना प्रश्न करून मध्येच थोपवले.

"रॉकेट मॉर्टरची ४२वी रेजिमेंट देयेव यांच्या क्षेत्रात वापरणं शक्य आहे का?"

"मी ताबडतोब हुकूम देतो प्योत्र अलेक्सांद्रोविच. मी रणगाड्यां-विरुद्ध तिला वापरावं असं तुम्हाला म्हणायचं आहे ना? बरोबर?"

"अगदी बरोबर."

निवाऱ्याच्या ज्या अर्ध्या भागात फोन खणखणत होते व तंबाखूच्या निळ्या धुरात अधिकाऱ्यांची वर्दळ चालली होती, तेथे बेस्सोनोव फार काळ थांबले नाही. कर्नल देयेव यांच्या धिप्पाड मूर्तीवर क्षणभर त्यांची नजर स्थिरावली, पण एकही शब्द न बोलता त्यांनी काठीने दार ढकलले व ते बाहेर गेले. मेजर बोझिच्को त्यांच्या पाठोपाठ निघाले...

सोसाट्याच्या वाऱ्याने आणि रणधुमाळीच्या दणदणाटाने सारी टेकडी गदगदत होती. क्षणात ती झगमगणाऱ्या आकाशात झेप घेणार असे वाटायचे, तर क्षणात ती खोल अंधारात गुडुप व्हायची. चकमकत्या प्रकाशरेषा व सावल्या तिच्यावरून भर्रकन पसार होत होत्या, खंदका-वरून जाताना आतले चेहरे क्षणभर उजळून टाकीत होत्या आणि नंतर अदृश्य होऊन सारे काही काळोखात सोडून जात होत्या.

"कॉम्रेड जनरल! कृपा करून ताबडतोब निवाऱ्यात जा!" बोझिच्को ओरडले आणि दळणवळणाच्या चराकडे झेपावत आव्हानात्मक आवाजात किंचाळले. "थांबा! कोण आहे तिकडं?"

चराच्या टोकाकडून पहारेकऱ्यांचे आवाज येत होते, नंतर अरुंद वाटेत सावल्या दाटल्या आणि भिंतीशी कोन करून हातात टॉमीगन सज्ज ठेवलेल्या पवित्र्यात बोझिच्कोनी पुन्हा धमकावणीच्या सुरात विचारले.

"थांबा! नाहीतर मी गोळ्या झाडीन! कोण आहात तुम्ही?"

त्या सावल्या एकदम निश्चल बनल्या व खालून पहारेकऱ्याचा आवाज ऐकू आला, "सेनेच्या प्रमुख ठाण्यावरची माणसं आहेत. त्यांना कमांडिंग ऑफिसरना भेटायचंय. पाठवू का?"

"थांब!" बोझिच्कोनी आज्ञा केली व अंधारात रोखून पहात चराकडे धावले.

"कोण हुकूम ठोकतंय ते? 'थांब' याचा अर्थ काय?" चरातून दुसरा आवाज आला. "मेजर बोझिच्को, तुम्ही आहात काय? कुणावर ओरडता आहात तुम्ही? कमांडर कुठं आहेत? लष्करी मंडळाचे सभासद कुठं आहेत?"

"कोण कॉम्रेड कर्नल!" बोझिच्को किंचित मागे सरले व एकदम त्यांना हसू कोसळले. "मला वाटलं एखादा जर्मन लपत छपत आलाय! कर्नल, तुम्ही इकडं कसे काय? आमची फार आठवण यायला लागली?"

"मेजर बोझिच्को, फार काळ तुमची भेट नाही. तुमच्यासारख्या आवाजाच्या माणसानं पायदळ पलटणीचं नेतृत्व केलं पाहिजे. जनरल कुठं आहेत? आणि लष्करी मंडळाचे सभासद?"

"कर्नल, आता स्वतःला बदलणं अवघड आहे. वेळ आली तर पलटणीची जबाबदारी नक्की घेईन... ते तिथं आहेत. चला या."

आपल्या अंगावरची धूळ सहजपणे झटकीत व पट्टा, पिस्तूलाची पिशवी आणि बॅग सावरीत सेनेच्या प्रतिहेरखात्याचे प्रमुख कर्नल ओसिन पुढे आले. खूप अंतर ते धावत व बर्फातून सरपटत आले असावेत असे त्यांच्या एकूण अवतारावरून वाटत होते. टॉमीगन घेतलेला त्यांचा ॲडज्युटंटही पायापासून डोक्यापर्यंत बर्फाने माखला होता. बुटक्या उंचीचा, लठ्ठ अंगाचा, धापा टाकणारा तो ॲडज्युटंट डोक्यावरून गोळ्या सुसाटत जाताना पटकन खाली वाकत होता व कर्नल यांच्या मागे उभा राहून काळजीपूर्वक त्यांच्या पाठीवरील व मांड्यावरील बर्फाचे चिकटलेले गट्ठे काढीत होता. मंद हसत बोझिच्को थोड्याशा कुतूहलाने त्यांना पहात होते. चरात त्यांच्यामागे आणखी तिघे उभे होते: बांधिल अंगाचे कुस्तीगिरासारखे दिसणारे मेजर तितकोव आणि सेनेच्या टेहळणी मोर्चावर बेस्सोनोवनी मागे ठेवलेले त्यांचे दोन टॉमीगनधारी संरक्षक.

"अच्छा, तुम्ही पण आलात का?" थोड्याशा आश्चर्याने व आपल्या साम्राज्यात हे आक्रमण झाल्याने किंचित मत्सराने बोझिच्कोनी त्यांना विचारले. "तुम्हाला इथं कुणी यायला सांगितलं?"

"किती चौकसपणा? बोझिच्को, तुम्हाला फार चौकशा बुवा!" ओसिन फटकन उद्गारले आणि अखेरीस त्यांचा श्वास स्थिरावला तेव्हा

त्यांच्या मेंढकातडी कोटाच्या घडीवरील बर्फ घासून काढणाऱ्या ॲडज्युटंटचा मदत करणारा हात त्यांनी बाजूला सारला. "ठीक आहे कस्यान्किन! साफसुफीसाठी एवढा पाठीचा कणा मोडेपर्यंत वाकू नको! तू माझ्या बरोबर यायचं कारण नाही. इथंच या संरक्षकांबरोबर माझी वाट पहा". चरात मागे वळून त्यांनी मान डोलावून म्हटले, "मेजर बोझिच्को, मला लष्करी मंडळाच्या सभासदांकडे घेऊन चला. निवारा कुठं आहे?"

"कॉम्रेड कर्नल, ते कमांडरांबरोबर आहेत. टेहळणी चौकीत."

"चला पुढे मेजर!" ओसिन यांनी सहजपणे हुकूम केला आणि आपली योग्यता व आपली कर्तव्ये यांची सुयोग्य जाणीव असलेल्या माणसाच्या इतमामाने रुबाबदार पावले टाकीत ते बोझिच्को यांच्या पाठोपाठ चालू लागले. चरातून ते जात असताना डिव्हिजनमधील अधिकारी त्यांच्याकडे कटाक्ष टाकीत होते आणि या अशा वेळी ते कोणता हुकूम घेऊन आले असावेत याबाबत तर्क बांधीत होते.

बेस्सोनोव दुर्बीणीशी वाकून उभे होते. प्रतिहेरखात्याच्या प्रमुखांच्या आगमनाची वर्दी बोझिच्कोनी काहीशा मिस्कील चकित स्वरात दिल्यामुळे बेस्सोनोव यांची कृश पाठ किंचित थरथरली व आपल्या काठीवर भार देत मागे वळून ओसिन यांच्या भक्कम गालांच्या घामेजल्या चेहऱ्याकडे मान वर करून पाहिले. क्षणभर त्यांना जणू न ओळखल्यासारखी मुद्रा करून बेस्सोनोव गप्प राहिले व नंतर अविश्वासाच्या सुरात म्हणाले, "मला समजत नाही... कर्नल, तुम्ही इथं कशाला आलात?"

"कॉम्रेड कमांडर, तुमचं कसं काय चाललंय ते बघायची इच्छा झाली म्हणून", आपल्या भरदार, उत्तरेकडील आवाजात ओसिन उत्तरले आणि मनमोकळे हास्य करीत त्यांनी गालांवरचा घाम पुसला. "देयेव यांच्या परिस्थितीबाबत प्रत्येकजण बोलतोय तेव्हा मला इकडे येणं आवश्यक वाटलं. थोडा रस्ता मोटारीतून आलो आणि बाकीचा पोटावर सरपटत. बराच धाडसी प्रवास झाला. चारी बाजूंनी ते आमच्यावर आग ओकीत होते, पण आम्ही निसटून आलो!" "सरळ सैन्याच्या मुख्य ठाण्यावरून?" बेस्सोनोवनी विचारले.

"वाटेत मी टेहळणी मोर्चावर गेलो, मग सरळ इकडं आलो". टेकडीवर उडणाऱ्या अनुक्षेपकांकडे ओसिन यांनी पाहिले आणि हळूहळू

त्यांच्या चेहऱ्यावरील हास्य मावळले. "जर्मन काय करताहेत बघा! पाउल्सपर्यंत पोचायची त्यांना खरंच उमेद वाटतेय का कॉम्रेड कमांडर?"

बेस्सोनोव चर्चा करण्याच्या मन:स्थितीत नव्हते आणि कर्नलच्या अचानक आगमनाचे कारण त्यांना उमगत नव्हते–त्यांना हा माणूस फारसा माहीत नव्हता आणि त्या ठिकाणी त्याची नक्कीच आवश्यकता नव्हती–त्यामुळे त्यांनी तुटक उत्तर दिले, "तुमचा अंदाज बरोबर आहे कर्नल".

"कोण, कॉम्रेड ओसिन तुम्ही?" अंधारातील चरामधून येत, हातातील चष्म्याच्या काचा पुसत, भुवया उंचावून वेस्निन यांनी विचारले. सेनेच्या प्रतिहेरखात्याच्या प्रमुखांच्या अचानक आगमनामुळे त्यांनाही आश्चर्य वाटले होते.

"काय भानगड आहे? काही खास?"

"कॉम्रेड लष्करी मंडळाचे सदस्य..."

ओसिन यांनी आपले वाक्य पुरे केले नाही. त्यांचा गोल गुबगुबीत चेहरा एकदम गंभीर बनला. चरातल्या इतर अधिकाऱ्यांकडे आणि बांधावर एक कोपर टेकून आपल्या टॉमीगनच्या पट्ट्याशी सहजपणे खेळ करीत बसलेल्या बोझिच्को यांच्याकडे त्यांनी मागे वळून एक कटाक्ष टाकला.

"कॉम्रेड लष्करी मंडळाचे सदस्य", नांवाने न संबोधता ते म्हणाले, "माझ्या इथल्या उपस्थितीची आवश्यकता काय असा तुम्हाला प्रश्न पडलाय याची मला जाणीव आहे, पण मी आत्ताच कमांडरांना तसदी देऊ इच्छित नाही. मी तुमच्याशी दोन शब्द बोलू शकतो काय? फार तर दोन तीन मिनिटं लागतील".

## प्रकरण चौदावे

चराच्या टोकाला गोलंदाजांनी बांधलेला छोटा आडोसा रिकामा होता. तेथे गोठलेल्या मातीचा वास येत होता. छपरावरील लाकडाच्या ओंडक्यांमधून पडणारे मातीचे कण मधूनमधून छताला लटकावलेल्या कंदिलावर आदळत होते व त्याला हेलकावा देत होते.

कुलपी गोळयांच्या टोपणांचे टेबल बनवले होते त्याशेजारी बसत व त्याच्या फळीवर सिगरेटचे पाकीट टाकून त्यातील एक सिगरेट उचलून ओठात धरीत वेस्निन म्हणाले, "बोला कॉम्रेड ओसिन, काय आहे? कृपा करून थोडक्यात अचूक माहिती द्या!"

कर्नल ओसिन यांनी आडोशावर चौफेर नजर फिरवली, त्याचे सर्व अंधारे कोपरे निरखले, फळीच्या बिछान्यांपैकी एकाच्या ताडपत्रीवर हात फिरवून पाहिला व नंतर दारावरचा पडदा काळजीपूर्वक ओढून घेतला. एवढे सगळे केल्यानंतर मगच ते टेबलाशी बसले, त्यांनी आपली हॅट उतरवली, मेंढकातडी कोटाच्या कॉलरचा हूक मोकळा केला— बर्फामधून धावतपळत आल्याने अजून त्यांना उकडत होते व घाम फुटत होता—आणि मुद्दाम जाणीवपूर्वक खालच्या आवाजात बोलण्यास त्यांनी आरंभ केला.

"कॉम्रेड लष्करी मंडळाचे सदस्य, अनावश्यक भासणारा असा एक प्रश्न विचारतो त्याबद्दल माफ करा. डिव्हिजनची सध्याची जी अवस्था आहे त्याबद्दल तुमचं वैयक्तिक मत काय आहे?"

"अजून तुम्हाला स्पष्ट झाली नाही?" वेस्निन यांनी क्षणभर सिगरेटला चिमटले, काडी ओढली व पेटविले. "आज संध्याकाळी डिव्हिजन कोणत्या परिस्थितीतून चालली आहे हे तुम्ही स्वतःच पाहिलं असलं पाहिजे. कशाला विचारताय तुम्ही?"

कर्नल ओसिन टेबलाशी सरळ ताठ बसले.

"मी स्वतः सारं काही पाहिलंय".

"मग? बोला पुढं." वेस्निन यांनी सिगरेटचा जोरात झुरका घेतला व कंदिलाच्या ज्योतीवर धूर सोडीत अधीरपणे मान हलवली. या सुरक्षा विभागाच्या माणसाच्या येण्याचे कारण अद्याप त्यांना उमगत नव्हते.

आपल्या ओलसर कपाळावर कर्नल ओसिन यांनी आपली मूठ विचारमग्न अवस्थेत चोळली. त्यांचे कुरळे केस राठ बनले होते आणि तुळतुळीत दाढी केलेले गाल लालबुंद झाले होते. त्यांनी एक दीर्घ श्वास घेतला आणि अधिक ठाम आवाजात ते बोलू लागले.

"माझं इथं येणं अत्यंत आश्चर्यकारक वाटलं असणार याची मला कल्पना आहे. परंतु डिव्हिजनच्या परिस्थितीबाबत काळजी वाटणारा मी

एकटाच आहे असं नाही. जनरल यात्सेन्को आणि आघाडीवरचे लष्करी मंडळाचे सदस्य गोलुबकोव या दोघांचीही मतं मी ऐकली आहेत".

"काय प्रकार काय आहे हा सगळा?" वेस्निननी आपल्या भुवया परत ताणल्या. "तुम्ही आता गोलुबकोवबद्दल बोललात? तेसुद्धा सेनेच्या प्रमुख ठाण्यावर आहेत? त्यांना पाहिलंत तुम्ही?"

"होय, ते तिथं आहेत... आणि ते असंही म्हणाले की, डिव्हिजनच्या कठीण परिस्थितीबाबत त्यांना चिंता वाटते. ते मुख्य ठाण्याहून टेहळणी मोर्चावर गेले आहेत. तुम्हाला भेटायची त्यांची इच्छा होती, पण तुम्ही इथं आहात".

कर्नल ओसिन बोलायचे थांबले, आपल्या भल्यामोठ्या पंजांनी त्यांनी टेबलाच्या ओबडधोबड फळ्यांवर टिचक्या मारल्या व वेस्निनच्या नजरेला पकडण्याचा प्रयत्न करणाऱ्या आपल्या निळसर डोळ्यांनी पहात ते ओशाळवाणे हसले. बेस्सोनोव यांच्याबरोबर बोलताना त्यांनी जो संरक्षक रांगडा पवित्रा घेतला होता तो गेला. आता आपल्याला अवमान करायची इच्छा नाही; आपल्या मर्यादा ओलांडायची इच्छा नाही हे ते नम्रपणे सुचवू पहात होते.

"असं सुचविण्यात आलंय की, तुम्ही आणि सेनापतींनी लढाईचं मार्गदर्शन इथल्यापेक्षा कमी धोक्याच्या ठिकाणाहून करावं. उदाहरणार्थ, सेनेच्या टेहळणी मोर्चावरून".

"याचा अर्थ आम्ही डिव्हिजनच्या टेहळणी चौकीवरून सेनेच्या टेहळणी मोर्चावर जायला पाहिजे? आत्ता?"

"तुम्ही मला नीट समजून घ्या. सावधगिरी बाळगण्याची गरज असताना तुम्ही आणि सेनापती तिकडे दुर्लक्ष का करता आहात? आपल्या सेनापतींचा स्वभाव मला माहीत आहे आणि या क्षणाला ते माझं ऐकणार नाहीत याची मला कल्पना आहे. म्हणून याबाबतीत मी तुमच्याशी मोकळेपणानं चर्चा करतोय, पक्षाचा एक सदस्य या नात्यानं."

"ठीक आहे, बोला पुढं", वेस्निन म्हणाले आणि टेबलावर ते आणखी खाली झुकले. ओसिन यांच्या अद्याप काहीही व्यक्त न करणाऱ्या स्थिर डोळ्यात ते रोखून पहात होते. पण कदाचित आपल्या संयमाच्या सवयीमुळे किंवा आपल्यापेक्षा अधिक अधिकार असलेल्या लष्करी मंडळाच्या सदस्यांच्या हजेरीत दडपण वाटल्यामुळे प्रतिहेरखात्याच्या प्रमुखांनी

अद्याप काहीतरी सांगायचे बाकी ठेवले होते व ते तर्काने जाणून घेण्याचा वेस्निन यांचा प्रयत्न चालला होता.

"कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार", ओसिन यांच्या भुवया किंचित आकुंचित झाल्या. "तुमच्यापासून काहीच गुप्त नाही. गेल्या जूनमध्ये वोल्खोव आघाडीवर घडलेल्या सर्व दुर्दैवी घटना तुम्हाला चांगल्या ठाऊक आहेत. अर्थात तुम्हाला त्या आठवतात ना?"

"नक्की काय म्हणायचंय?" टेबलापासून एकदम मागे होत वेस्निन म्हणाले. त्यांनी खिशात हात घातले व आडोशात चार पावले टाकली. एकाएकी त्यांना एवढी थंडी वाजली की, खिशातून आपले हात बाहेर काढणे त्यांना अशक्य ठरले. "मला नीटसं समजलं नाही! तुम्ही २ऱ्या चढाई सेनेबाबत बोलताय?"

"होय. २ऱ्या चढाई सेनेचं काय झालं त्याबाबत बोलतोय. ती हकिकत कुणीही कधीही विसरू शकणार नाही. अगदी तसंच..." जवळ होणाऱ्या स्फोटांमुळे हादरणाऱ्या छताकडे आणि हेलकावणाऱ्या कंदिलाकडे पहात ओसिन यांनी स्वतःच्या म्हणण्याला दुजोरा दिला. "बघा! रणगाडे सारा वेळ टेहळणी चौकीवर मारा करताहेत".

वेस्निन अचानक मटकन खाली बसले व छतावरून माती सांडत असलेल्या सिगरेटच्या पाकिटाला तसाच अचानकपणे त्यांनी हात घातला. पण दुसऱ्याच क्षणी त्यांनी ते बाजूला सारले, डोकेदुखी सुसह्य करावी त्याप्रमाणे कपाळ चोळले आणि ओसिन यांच्याकडे कमालीच्या चकित नजरेने त्यांनी सरळ पाहिले. एकदम उसळून बोलावे, टेबलावर दाणकन् मूठ आपटावी अशी त्यांना जबरदस्त इच्छा झाली, पण ती आवरून ते केवळ रागाने म्हणाले, "पण हे एवढं सगळं पुराण लावायचं कारण काय? कॉम्रेड ओसिन, तुम्हाला कसली चिंता वाटतेय? डिव्हिजन जर पुरती घेरली गेली तर बेस्सोनोव आणि मी...हा असा विचार तुमच्या डोक्यात आलाच कसा?"

"आता तसं कशाला बोलायचं?" ओसिन यांनी आपल्या पांढऱ्या पापण्या खाली वळवल्या आणि अत्यंत तळमळीने व काहीशा अपमानित स्वरात ते बोलले. "मला जनरल बेस्सोनोव यांचं धैर्य माहीत आहे आणि मी तुम्हाला ओळखतो. तुम्ही मला पुरता मूर्ख का समजता हेच

मला कळत नाही. माझ्याबद्दल चुकीचा समज होऊ नये असं मला वाटतं".

"चुकीचा समज कोणत्या अर्थानं?"

"मी अपघातासंबंधानं बोलतोय. कमांडरांचा मुलगा – सेकंड लेफ्टनंट बेस्सोनोव – याची काय शोकांतिका घडली ते तुम्हाला माहीत नाही?"

नव्या स्फोटांच्या धडाक्यांनी पुन्हा एकदा आडोसा हादरला व टेबलावर करकरत्या छतामधून मातीची बारीक ढेकळे कोसळत असतानाच क़ंदिलाने आणखी एक जोरदार हेलकावा घेतला. आडोशापलिकडच्या चरात पावलांचा आवाज झाला. एका आरोळीला अस्पष्ट आवाजांमध्ये उत्तर मिळाले. पण वेस्निन यांनी चरामधल्या या गडबडीकडे दुर्लक्ष केले.

"नाही", ते उत्तरले. "मला एवढंच ठाऊक आहे की, वोल्खोव आघाडीवर कमांडरांचा मुलगा बेपत्ता म्हणून जाहीर करण्यात आलं. तुम्हाला त्याबद्दल काय माहिती आहे?"

ओसिन पुन्हा आडोशाच्या दरवाजाकडे वळले, टेकडीवरच्या स्फोटांचे आणि खंदकातले आवाज त्यांनी ऐकले, नंतर काहीसे घुटमळत त्यांनी आपली एकही ओरखडा न पडलेली नवीकोरी फुगीर बॅग टेबलावर ठेवली आणि तिची चेन खेचून ती उघडली. त्यांच्या शोधक बोटांमध्ये कागदांचा सळसळ आवाज होत होता.

"वाचा हे कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार. अगदी ताजं वृत्त. हे पत्रक नुकतंच माझ्या हातात आलं आणि ते तुम्हाला ताबडतोब दाखवलं पाहिजे असं मला वाटलं".

आपल्या बॅगेतील कागदपत्रांमधून ओसिन यांनी अत्यंत काळजीपूर्वक बाहेर काढून वेस्निन यांच्या हाती सुपूर्द केलेले ते पत्रक वेस्निन यांनी टेबलाच्या फळीवर ठेवताच एखाद्या उंदराप्रमाणे त्या पत्रकाची सळसळ झाली. त्या अत्यंत सामान्य दर्जाच्या पिवळ्या वृत्तपत्रीय कागदावर अत्यंत वाईट तऱ्हेने पुन्हा छापलेला एक फोटो एखाद्या काळ्या डागासारखा दिसत होता. त्यात ठळक अक्षरात वर छापले होते: "सुप्रसिद्ध बोल्शेविक जनरलचा मुलगा जर्मन इस्पितळात विश्रांती घेतोय". आजारपणातून उठल्यानंतर कृश दिसणाऱ्या एका मुलाचा तो फोटो होता. त्याचे डोके

पूर्ण तासलेले होते व त्याने सेकंड लेफ्टनंटचा आखूड लष्करी कोट घातला होता. काही कारणामुळे त्याची कॉलर उघडी होती व स्वच्छ परंतु वेडीवाकडी शिवलेली कॉलरची पट्टी उघडी पडलेली दिसत होती. दोन जर्मन अधिकाऱ्यांच्यामध्ये एका टेबलाजवळच्या आरामखुर्चीत तो बसला होता व त्या दोन्ही अधिकाऱ्यांच्या चेहऱ्यावर हास्य विलसत होते. त्या मुलाच्या चेहऱ्यावरही बळेच हसू आणलेले दिसत होते व तो टेबलावरील उंच मद्य-चषकांकडे रोखून पहात होता. त्याच्या खुर्चीच्या हाताला एक कुबडी टेकवून ठेवलेली दिसत होती.

"काय आहे हे, खोटा फोटो? का हा खरंच जनरल बेस्सोनोव यांचा मुलगा?" हा डोके तासलेला कृश मुलगा बेस्सोनोव यांचा पोटचा पोर असू शकेल ही कल्पना मुळातून सहन न झाल्याने वेस्निन यांनी विचारले आणि हे विचारताना त्यांनी ओसिन यांच्याकडे अशी नजर फेकली की, ही बातमी जर चुकीची असेल तर त्यांना क्षमा केली जाणार नाही.

"आम्ही सारी शहानिशा करून घेतलीय", आपल्याला कोणत्या जबाबदारीला तोंड द्यायचे आहे याची पूर्ण कल्पना असलेल्या माणसा-प्रमाणे ओसिन यांनी अत्यंत गंभीरपूर्वक त्यांची खात्री पटवीत म्हटले. "हा फोटो खरा आहे याबाबत शंका धरायला तिळमात्र जागा नाही. पुढचा मजकूर वाचावा".

ओसिन मागे टेकले तेव्हा ते ज्या खोक्यावर बसले होते तो खोका करकरला आणि त्यांनी नाकपुडयांमधून जोराने श्वास सोडला.

फोटोखालचा छोटा मजकूर वेस्निन यांनी निरखला. प्रथम त्यांना नीटसा अर्थ पूर्णपणे कळला नाही व ती कपटी वाक्ये पुन:पुन्हा वाचावी लागली. त्या मजकुरावर लक्ष केंद्रित करणे त्यांना अवघड जाऊ लागले. जेव्हा जेव्हा ते वाचायचे थांबत तेव्हा तेव्हा त्या काळपट फोटोकडे, त्या खुर्चीच्या हाताला टेकून ठेवलेल्या कुबडीकडे, त्या बटणे मोकळ्या सुटलेल्या कॉलरखालील स्वच्छ, वेडयावाकडया शिवलेल्या पट्टीकडे व जनरल बेस्सोनोव यांच्या मुलाच्या त्या करूणाजनक, हडकुळ्या मानेकडे त्यांचे लक्ष वेधत होते. पुढील उताऱ्यावर वेस्निन यांचे पुन:पुन्हा लक्ष वेधत होते: "युद्धाच्या आरंभापासून एका मोठ्या सेनाविभागाचे आधिपत्य करणारे नामवंत सोविएत जनरल बेस्सोनोव, यांच्या मुलाने

जर्मन सेनेच्या प्रतिनिधीला निवेदन केले की, त्याच्या अधिकाराखाली दिलेल्या भिकार प्रशिक्षित व भिकार शस्त्रे पुरविलेल्या कंपनीला अक्षरश: तोफेच्या तोंडी चारण्यात आले. शेवटची लढाई असह्य होती... अत्यंत घायाळ होऊनही खूप शौर्याने लढलेल्या लेफ्टनंट बेस्सोनोवने अत्यंत श्रद्धापूर्वक असेही म्हटले: "इस्पितळात मला ठेवून पुन्हा मी बरा होईपर्यंत माझ्यावर उपचार केल्याबद्दल मला अत्यंत आश्चर्य वाटले. इस्पितळात मी अनेक सोविएत युद्धकैदी पाहिले. त्यांना संपूर्ण वैद्यकीय उपचार लाभतात. जर्मनांच्या राक्षसी वागणुकीच्या खोट्यानाट्या बातम्या सोविएत कमिस्सार प्रचारयंत्रणा पसरवते. इथं मला इस्पितळात उत्तम जाणीव झाली की, जर्मनी हे अत्यंत सुसंस्कृत व मानवतावादी राष्ट्र आहे आणि रशियातील बोल्शेविकवाद उलथून टाकून तेथे खरेखुरे स्वातंत्र्य स्थापण्याची त्याची इच्छा आहे..."

"कॉम्रेड लष्करी मंडळाचे सदस्य, झालं तुमचं वाचून?" ओसिन यांच्या कणखर आवाजाने त्यांची विचारमालिका तुटली. "मला परत देता ते पत्रक?"

याचा अर्थ बेस्सोनोव यांचा मुलगा अद्याप जिवंत आहे. त्या करड्या, अस्पष्ट फोटोवरून वेस्निन यांची नजर बाजूला निघत नव्हती. बेस्सोनोव त्यांना यातील काहीच माहीत नाही. त्यांचे काही अंदाज असतील, पण यांना काही ठाऊक नाही. मजकुराबाबत काय? धादांत खोटा मजकूर रचलाय हे स्पष्ट आहे, पण ही अशी काही पहिलीच वेळ नव्हे. त्याच्याबरोबरच कैद झालेल्या कुणा नालायकाने जर्मनांना सांगितले असणार की, तो जनरलचा मुलगा आहे. म्हणून असेच काहीसे घडले असणार. अर्थात तसेच घडले. दुसरे काय? आणि त्यानंतर त्याला इस्पितळात ठेवले. पहिल्या प्रश्नोत्तरांच्या दरम्यान त्यांनी त्याचा फोटो घेतला आणि नंतर हा बनाव रचला. हा आमच्या शाळकरी मुलांपैकी एक आहे, आमच्या कम्सोमोलने, आमच्या सोविएतांनी शिकवून मोठा केलेला आहे! मी त्याच्याबद्दल दुसऱ्या काही गोष्टींवर विश्वासच ठेवू शकत नाही.

"आपल्या लक्षात आलं असेलच की, हे पत्रक जाहीर करायचं नाही. म्हणजे मला असं म्हणायचंय... सेनापतींना हे समजावं असं मला नक्कीच वाटत नाही."

"एक मिनिट थांबा."

होय. आपला मुलगा बेपत्ता आहे एवढेच कळवल्याचा बेस्सोनोव यांनी उल्लेख केला होता. ठार झालेल्यांच्या याद्यांमध्ये त्याचे नांव आले नव्हते. पत्रकावरची तारीख कोणती होती? १४ ऑक्टोबर १९४२. दोन महिन्यांपूर्वीची.

"कृपया ते पत्रक मला परत द्या. जनरल कोणत्याही क्षणी इथं येण्याची शक्यता आहे. त्यांना असा धक्का देण्याचा आपल्याला अधिकार नाही."

बेस्सोनोव मॉस्कोत होते तेव्हा मुख्य लष्करी ठाण्याला ते समजले होते? "आपल्या लक्षात आलं असेलच की, हे पत्रक जाहीर करायचं नाही..." "त्यांना असा धक्का देण्याचा आपल्याला अधिकार नाही." याचा अर्थ जनरल यांच्या मुलावर जी आपत्ती कोसळली होती तिच्या-पासून जनरल यांचे कुणीतरी संरक्षण करीत होते? पण का? कोणत्या हेतूने?

"कॉम्रेड ओसिन, मला सांगा, तुमचा या पत्रकावर विश्वास बसतो?" खालच्या आवाजात वेस्निन यांनी विचारले. "हा मुलगा फितूर झाला यावर तुमचा विश्वास बसतो?"

"मला वाटत नाही तसं," ओसिन उत्तरले आणि त्यांच्या हाताची सहज हालचाल झाली. मग त्यांनी स्वतःला सावरले. "तरीही, लढाईत सारं काही शक्य आहे. अगदी सर्व काही. मला हेही माहीत आहे."

"तुम्हालाही ठाऊक आहे?" वेस्निन यांनी पुनरुच्चार केला आणि आपली थरथरती बोटे लपविण्याचा प्रयत्न करीत त्यांनी त्या पत्रकाला चार घड्या घातल्या, आपल्या मेंढकातडी कोटाची बटणे उघडली आणि छातीवरच्या खिशात ते ठेवले. "हे पत्रक मी माझ्याजवळ ठेवतो. तुम्ही म्हटल्याप्रमाणं ते 'जाहीर करायचं नाही'". आपल्या वळलेल्या मुठी त्यांनी टेबलावर ठेवल्या. "कर्नल ओसिन, मला आता तुम्हाला काही सल्ला द्यायचाय. इथून ताबडतोब जा! या मिनिटाला टेहळणी चौकी सोडा! ते सर्वांत उत्तम ठरेल. ताबडतोब जा."

आपल्या मुठींवर ओणवीत वेस्निन उठून उभे राहिले.

ओसिनही उठले, पण अचानक उठताना त्यांचे गुडघे टेबलाला

आपटले. त्यांच्या चेहऱ्यावर क्षणभर लाली पसरली आणि गालांवरची कातडी ताणली गेली.

"कर्नल ओसिन, वेढ्यात जर काही घडलं," थांबत थांबत वेस्निन म्हणाले," जर काही घडलं तर हे आवश्यक ती सर्व सुरक्षितता देईल." त्यांनी आपल्या पट्ट्यावर हात ठेवला आणि पिस्तुलाच्या पिशवीवर थापट्या मारल्या. "हे पुरेसे आहे."

ओसिन नम्रपणे गप्प राहिले. वेस्निन यांच्या मोठ्या अधिकाराची, सबंध आघाडीचे लष्करी सल्लागार सदस्य असलेल्या गोलुबकोव यांच्या-बरोबरच्या त्यांच्या चांगल्या संबंधांची, मॉस्कोशी थेट संपर्क साधण्याच्या त्यांच्या हक्काची त्यांना पूर्ण जाणीव होती. तसेच वेस्निन हे जरा अधीऱ्या वृत्तीचे, गाफील, दूरदृष्टी कमी असलेले व थोडेसे गलथान गृहस्थ आहेत असे त्यांचे मत होते. अशी माणसे आपल्या अधिकारामध्ये विश्वास निर्माण करीत नाहीत. कमिस्सारबद्दल ओसिन यांना सर्व काही ठाऊक होते. ते नियमित लष्करामधील नाहीत, पक्षाच्या उच्च विद्यालयात आणि राजकीय अकादमीत ते अधिव्याख्याते म्हणून नागरी काम करीत होते हे ओसिन यांना माहीत होते. त्यांना आणखीही आठवले की, वेस्निन यांची दुसरी बायको आर्मेनियन राष्ट्रजमातीची असून रसायन-शास्त्राची शिक्षिका होती आणि त्यांना पहिल्या बायकोपासून नीना नांवाची दहा वर्षांची एक मुलगी आहे. चौथ्या दशकाच्या अखेरच्या सुमारास या पहिल्या बायकोच्या भावाला राजकीय खटल्यांमध्ये शिक्षा झाली होती व त्याबद्दल वेस्निन यांना पक्षाकडून सक्त ताकीद मिळाली होती. युद्धापूर्वी जरा अगोदर त्यांच्यावरील ही ताकीद काढून घेण्यात आली होती. ओसिन यांना हेही ठाऊक होते की, १९४१ मध्ये, एका डिव्हिजनचे कमिस्सार या नात्याने, वेस्निन यांनी येल्न्या येथील वेढा तोडून अख्खी रेजिमेंट आपल्याबरोबर बाहेर काढण्याची कामगिरी बजावली होती. वेस्निन बहुधा ज्या गोष्टी फार पूर्वीच विसरले असतील अशा कितीतरी गोष्टी ओसिन यांना त्यांच्याबद्दल ठाऊक होत्या व आत्ता त्यांना आठवत होत्या. पण आपल्या भक्कम स्मरणशक्तीनुसार या सर्व आठवणी काढीत असताना ओसिन यांनी नेहमीप्रमाणे आपल्या निर्विकार हसण्यामागे सर्व भावना लपविल्या.

कोणत्याही तऱ्हेने कबुलीत न सापडता ते म्हणाले, "मी वैयक्तिकरीत्या

कशाचाच आग्रह धरीत नव्हतो, कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार. मी फक्त माझे कर्तव्य बजावीत होतो–सैन्यासाठी आणि पक्षासाठी."

"ठीक आहे. आता तुम्ही ते पार पाडलंत," वेस्निन गंभीरपणे पहात म्हणाले, "तुम्ही आता इथं थांबायला काही एक कारण नाही. मी पुन्हा एकदा सांगतो. टेहळणी चौकी ताबडतोब सोडा आणि अपघातांची चिंता करू नका! सावधगिरीच्या तुमच्या कल्पना अगदी वेडगळ आहेत! 'वेढ्याच्या' नुसत्या कल्पनेनं एवढ्या धास्ती निर्माण झाल्या?"

वेस्निन टेबलाशी गेले, आपल्या चष्म्यामधून त्यांनी ओसिन यांच्याकडे एक तीक्ष्ण कटाक्ष टाकला, माती विखुरलेले सिगरेटचे पाकीट उचलून घेतले आणि खाली वाकून ते आडोशाबाहेर आले. अंधारात आगीच्या ज्वालांचा चकचकाट होत होता, बांधावरून घोंघावणाऱ्या वाऱ्यामध्ये स्वयंचलित भडिमाराचा व बंदुकांमधून सुटणाऱ्या गोळयांचा दणदणाट मिसळत होता.

•

## प्रकरण पंधरावे

आडोशामधून वेस्निन बाहेर आले तेव्हा तांबड्या आणि हिरव्या प्रकाशगोलकांनी त्यांचे डोळे एवढे दिपले आणि मशिनगनच्या फैरींनी कान एवढे बधीर झाले की, त्यांना चटकन बेस्सोनोव दृष्टीस पडले नाहीत.

ओसिन यांच्या भेटीचे कारण ते मला विचारतील. काय सांगणार मी त्यांना? त्यांच्या तोंडावर मी खोटे बोलायचे? त्यानंतर आम्ही दोघे एकत्र काम कसे करू शकणार? नाही, काहीच घडले नाही असा बहाणा करून मी त्यांच्याकडे जाऊ शकणार नाही. आमच्यात संपूर्ण नेकी आणि प्रामाणिकपणा असला पाहिजे. पण या क्षणाला त्यांच्या मुलाबद्दल त्यांना सांगताना माझ्या घशात अडकल्यासारखे होईल.

त्या दोघांमध्ये एक प्रकारचा तणाव होता याची त्या दोघांनाही पुरेपूर कल्पना होती. तरीही वेस्निन यांना वाटत होते की, अशी मुत्सद्देगिरीची पळवाट काढण्याचा त्यांना हक्क नाही किंवा तेवढा खंबीरपणाही अंगी नाही. काहीतरी गुळमुळू बोलून किंवा विषयाला

बगल देऊन बोलायला आपल्याला जमणार नाही असे त्यांना वाटले आणि आता मागल्या बाजूस ते घुटमळत उभे होते तेव्हा जणू काही चार लोकात ओकारी झाल्यावर शरमेने अर्धमेले व्हावे, तशी भावना त्यांना झाली होती.

"प्योत्र अलेक्सांद्रोविच!" अगदी अनपेक्षितपणे ते मागल्या भागातून पुढे झाले व दुर्बीणीजवळ अधिकाऱ्यांच्या घोळक्यात बेस्सोनोव उभे होते तेथे घाईने गेले.

"ओहो, विताली इसायेविच, अगदी तुमचीच मी आत्ता आठवण करीत होतो," बेस्सोनोव म्हणाले आणि मागे वळून आपल्या तोंडावरील बर्फाचे कण रुमालाने पुसू लागले. "३०५ वी लढाईत उतरलीय. त्याचा काय परिणाम होतो ते आपण पाहू. पण आता मुख्य गोष्ट आहे..." विमनस्कपणे ते चेहरा पुसतच राहिले होते. "मुख्य गोष्ट आहे रणगाडे आणि यंत्रसज्ज कोअर. त्यांनी घाई करणं आवश्यक आहे! केंद्रित भागात जाऊन तुम्ही रणगाडा कोअरांना भेटावं आणि तुमची काही हरकत नसेल तर तिथं राहून हालचालींचं सुसूत्रीकरण करण्यात मदत करावी अशी मी तुम्हाला विनंती करतो विताली इसायेविच. मला वाटतं हे आवश्यक आहे."

वेस्निन यांना आपला गळा आवळल्यासारखे वाटले आणि कसेबसे ते उत्तरले, "मी सर्व काही करीन. या मिनिटाला मी निघतो."

"मग ताबडतोब निघा तर. पण खेड्यातून जाताना जरा सावध. उत्तर तीरावरची परिस्थिती अजून सावरलेली नाही."

...चराच्या ज्या भागात मेजर बोझिच्को बांधावरून गोळ्या झाडीत होते तेथे वेस्निन आले. प्रत्येक फैरीबरोबर त्यांच्या खांद्याला हिसका बसत होता व टोपी डोक्यावरून मागे सरकत होती.

"मेजर बोझिच्को, मला तुमची गरज आहे."

वेस्निन यांच्या ओरडण्यासरशी बोझिच्को मागे वळले, आपली टोपी त्यांनी पुढे ओढली आणि जणू आयुष्यातली महत्त्वाची घडी जवळ आल्यासारखे उद्गारले, "हे लेकाचे अखेरीस घेरा घालायला लागले. चिलखती गाड्यांमधून त्यांच्या अक्षरशः झुंडी येताहेत! तुमचे काय हुकूम आहेत कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार?"

मान खाली घालून वेस्निन चरामध्ये उभे होते.

"बोझिच्को, ऐका. मला आता सरळ रणगाडा कोअरांना जाऊन भेटलं पाहिजे. एक गोष्ट विसरू नका: सेनापतींकडे लक्ष ठेवा! सारा वेळ तुम्ही त्यांच्याबरोबर रहा असा मी तुम्हाला सल्ला देतो."

"ठीक आहे, कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार!" बोझिच्कोनी बंदूक खाली केली व प्रश्नार्थक चर्येने वेस्निन यांच्याकडे पाहिले. "तुम्ही आता चालला म्हणता? हे थोडंसं...? टेकडीवर चारी बाजूंनी वर्षाव होतोय."

"कर्नल ओसिन आणि त्यांचा रक्षक माझ्याबरोबर येतील." मेजरचा खांदा हलकेच दाबून वेस्निन म्हणाले. "काही काळजी करायचं कारण नाही. ओसिन ज्या मार्गानं आले तोच रस्ता आम्ही धरतो. आम्ही सुखरूप जाऊ. यापेक्षा वाईट कोंडीतून मी पूर्वी निसटलोय."

"गुड लक टू यू, कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार!"

वेस्निन हसले आणि त्यांनी हात हलवला.

"बोझिच्को, तुम्हालाही गुड लक!"

तोफखान्याच्या आडोशात कर्नल ओसिन आणि कस्यान्किन अजून टेबलाशी बसून होते. डोक्यावर गरजणाऱ्या तोफांचा धडधडाट ऐकीत गंभीर चेहऱ्याने ते कशाची तरी वाट पहात होते. कोणत्याही घाईचे चिन्ह न दाखवता वेस्निन यांनी बारकाईने ओसिन यांना न्याहाळले. वेस्निन आत येताच ओसिन चटकन उठून उभे राहिले. वेस्निन यांच्या आवाजात आता अपरिचित अशा अधिकाराची धार होती.

"कर्नल ओसिन, आपण सारे एकाच रस्त्यानं जाणार आहोत. ग्रिगोऱ्येवस्काया खेड्याकडं. मोटार कुठं आहे? आणि रक्षक बरोबर घ्या!"

"हे ऐकून मला आनंद झाला कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार... खूप आनंद झाला. थँक्यू. उतारावर एका कोठारात मोटार झाकून ठेवलीय. थँक्यू" टेबलावरून आपली कातडी बॅग उचलत असताना ओसिन पुनःपुन्हा तेच शब्द समाधानाने उच्चारीत होते. मग त्यांनी सावधपणे विचारले, "पण... जनरल बेस्सोनोव यांचं काय? ते आपल्याबरोबर येत नाहीत?"

वेस्निन भडकले.

"मी माझ्या सुरक्षिततेसाठी तुमच्याबरोबर येतोय अशी तुमची कल्पना झाली? तुम्हाला त्याबद्दल एवढी खात्री वाटते?"

"कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार," ओसिन यांच्या पांढऱ्या पापण्यांची उघडझाप झाली. त्यांचा चेहरा खट्टू झाला. "माझ्यावर चिडायचं काही कारण नाही. सेनेच्या टेहळणी मोर्चावर मला वाटतं तुमची आघाडीवरच्या लष्करी मंडळाच्या सदस्यांशी भेट होईल. आपल्या चिंता ते स्वतःच तुम्हाला बोलून दाखवतील."

"उगीच वेळ काढू नका ओसिन. मोटारीकडे मला घेऊन चला!"

"आपण वायव्य सीमेवरून स्तेप रस्त्याला जाऊ," ओसिन म्हणाले, "तो अजून मोकळा आहे."

टेकडीच्या पायथ्याला मोटारी जेव्हा खेड्याच्या अरुंद रस्त्याला वळल्या आणि ओसिन यांच्या हुकुमाच्या शब्दासरशी वायव्य सीमेवरून वेगाने धावू लागल्या तेव्हा कुठे देयेव यांच्या डिव्हिजनची परिस्थिती किती नाजुक आहे याची वेस्निनना जाणीव झाली. टेकडीच्या माथ्यावरच्या टेहळणी चौकीतून त्यांच्या जागेवरून उत्तर तीरावरची परिस्थिती थोडी वेगळी भासत होती. एवढी आणीबाणी तिथे असेल असे वाटत नव्हते.

चारी बाजूंनी लढाईची प्रखरता वाढली होती व तिच्या धडाक्यांनी कानाचे पडदे फाटत होते.

खेड्याचा सबंध उत्तर तीर पेटला होता. जवळून ती आग प्रचंड भासत होती. जळत्या घरांमध्ये गोळे फुटत होते तेव्हा आगीचे लोळ आणखी वर उसळत होते. पेटणाऱ्या खोल्यांमधून मशिनगनच्या फैरी ठिणग्यांची रांग उडवीत होत्या. मोटारींमधली हवासुद्धा घुसमटण्याइतपत तापली होती व धुराने भरली होती. तो धूर डोळ्यांना झोंबत होता आणि घशाला भाजून काढीत होती. वेस्निन यांच्या मोटारीचा ड्रायव्हर सतत चाकावर वाकून बसला होता, खोकल्याची ढास लागून बेजार झाला होता. रस्त्याच्या पार दूर टोकाला लाल धूसर प्रकाशात वेस्निन यांना रणगाड्यांची रांग येत असलेली अस्पष्ट दिसली. मोटारी पुढे

गेल्या तसे ते दृष्टीआड झाले व वेस्निन यांना ते रणगाडे कोणाचे होते ते ओळखता आले नाही.

"वेग वाढव! तितकोवच्या मागे जा! त्यांना ठाऊक आहे रस्ता! खेड्यातून बाहेर पडताच उजवीकडं!" जणू काही आपल्यावरच सारे अवलंबून आहे अशा अविर्भावात ओसिन ड्रायव्हरवर ओरडले. आपला गोल, भक्कम चेहरा त्यांनी वेस्निन यांच्याकडे वळवला. "कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार, आपण यातून बाहेर पडू."

"मला त्याबद्दल शंका नाही."

"सारं काही एकदम ठीक होईल," असे पुढे बोलून ओसिन यांनी नाकपुड्यातून जोराने श्वास घेतला.

"पुढचे फक्त तीन किलोमीटर जरा धोक्याचे आहेत."

ते बोलायला खूप उत्सुक होते, पण या क्षणाला वेस्निन यांना नेमकी तीच गोष्ट नको होती.

मोटारीच्या मागच्या सीटवर ते कस्यान्किनच्या शेजारी बसले होते. कस्यान्किन कोपऱ्यात शांतपणे मुटकुळी करून बसला होता. आपल्या गुडघ्यावर त्याने धरलेल्या टॉमीगनची नळी मोटार खड्ड्यातून उसळी घेई तेव्हा वेस्निन यांच्या बरगडीत टोचली जाई. ड्रायव्हरच्या वाकलेल्या पाठीपासून ते पेटणाऱ्या घरांच्या उजेडाने उजळलेल्या बर्फाळ रस्त्यापर्यंत तो सतत नजरा फेकीत होता. ओसिन यांनी तसे बोलताच आणखी तीन किलोमीटर असा प्रवास करण्याच्या कल्पनेने कस्यान्किन दचकला व अधिक सावधपणे रस्त्याच्या दोन्ही बाजू न्याहाळू लागला. ॲडज्युटंट वाजवीपेक्षा जास्त भीती बाळगीत आहे हे वेस्निन यांच्या लक्षात आले. माणूस विक्षिप्त आहे अशी त्यांनी मनाशी नोंद केली.

"कस्यान्किन, तुझी बंदूक नीट धर. नाहीतर माझ्याकडं दे", ते म्हणाले.

"म् म् मी धरतोय, कॉम्रेड ड् ड् डिव्हिजनल कमिस्सार," कस्यान्किन चाचरत म्हणाला व दिलगिरीदर्शक मान हलवीत म्हणाला, "मला माफ करा."

उजवीकडच्या आगी विरळ होऊ लागल्या आणि खेड्याच्या रस्त्याचे टोक स्पष्ट दिसू लागले. मोटार नदीच्या तीराजवळून भरधाव चालली होती. टेहळणी चौकी उभी होती ती टेकडी आता मागे पडली होती,

तर नदीच्या दुसऱ्या तीरावर डाव्या बाजूला घरांच्या छपरांवर, लढाईच्या धुमाळीने पेटलेला प्रचंड किरमिजी पट्टा आकाशात ओठंगलेला दिसत होता. त्या आकाशात ज्वाळांचे उंच झोत व स्फोटानंतरचे तुकडे उडत होते.

त्या किरमिजी रंगात न्हाऊन निघालेली मोटार उजवीकडे वळली, दूर किनाऱ्यावर चाललेल्या लढाईच्या आगीपासून बाजूला वळली आणि खेड्यातल्या शेवटच्या घराजवळचा चढाचा रस्ता चढायला तिने सुरुवात केली, तेव्हा वेस्निन यांना थोडे हायसे वाटले. खेड्याच्या सीमेपलिकडे चकचकीत आरशासारख्या उतारांवरून, रणक्षत्राच्या मर्यादेपलिकडे आघाडीची मोटार दौडत असलेली त्यांनी पाहिली. अंधुक उजेडात स्तेपचे मैदान रात्रीच्या वेळी चमकत होते.

"काय झालं? डोकं फिरलं काय? वेग कमी का करतोयस?" ओसिन एकाएकी ओरडले आणि जोरात ड्रायव्हरच्या बाजूला झुकले. "काय झालं? काय भानगड आहे?"

"कॉम्रेड कर्नल! पहा!" खोकता खोकता धापा टाकीत ड्रायव्हर म्हणाला. "पुढं काय आहे पहा!"

"तितकोव... तितकोव मागं वळतोय," ड्रायव्हरच्या मागून खांद्यावरून डोकावून बघत कस्यान्किन कापऱ्या आवाजात म्हणाला व आपली सीटची मागची बाजू त्याने दोन्ही हातांनी गच्च आवळून धरली. त्याची टॉमीगन खाली घसरली व वेस्निन यांच्या पायांशी आदळली.

"रणगाडे!" ड्रायव्हर घाबरून ओरडला व त्याने भोवताली भेदरून पाहिले. "समोर जर्मन रणगाडे आहेत!"

"कुठं? कुठले जर्मन?" ओसिन ओरडले. "कुठून आले? ते आपले टी-३४ आहेत! चल पुढे! तुझं डोकं ठिकाणावर नाही बाबा! वाढव वेग!"

वेस्निनच्या पायाशी पडलेल्या टॉमीगनचा जोरदार नाच सुरू झाला.

कस्यान्किनला ती उचलायला सांगण्याचा वेस्निन यांचा विचार होता, पण समोर काय घडते आहे ते पाहताच त्यांचे शब्द घशात थिजले.

खेड्याबाहेरच्या त्या चढावर मोटार रोरावत चालली होती. समोरच्या क्षितिजाच्या काळ्या भिंतीपुढे स्तेपचा फिकट गुलाबी प्रकाश

पसरला होता आणि आगीच्या उजेडात उजळलेल्या अंधारात पुढल्या उंच मैदानात गवताच्या पेढ्यांसारख्या दिसणाऱ्या अनेक काळ्या प्रचंड आकृतींसमोर रक्षकांची आघाडीची मोटार मागच्या मागे येऊन परत वळण्याचा आकांताने प्रयत्न करीत होती. अखेरीस ती मागे फिरली व खडबडीत रस्त्यांवरून धडधडत येऊ लागली. ड्रायव्हरच्या उजवीकडचे दार उघडे होते व मेजर तितकोव बाहेर ओणवले होते. ते काहीतरी ओरडत असल्यासारखे दिसले, मग आपली टॉमीगन त्यांनी उंचावली आणि हवेत एक बार काढला.

"ते आपले टी-३४ रणगाडे आहेत अशी तुमची खात्री आहे ओसिन?" वेस्निन यांनी एवढ्या शांतपणे विचारले की, त्यांनाच त्यांचा आवाज ओळखू आला नाही.

पुढच्याच क्षणी मोटारीचे जोरात ब्रेक लागले आणि पुढच्या सीटच्या मागच्या भागावर ते दाणकन आदळले. पण दरम्यान त्या काळ्या आकृत्यांमधून जांभळ्या-निळ्या बर्फावर ठिणग्यांचा वर्षाव होत असलेला त्यांच्या नजरेला पडला होता आणि रणगाड्यांच्या इंजिनांचा खडखडाट कानांवर आदळू लागला होता. पुढच्या अंधारात एक ज्वाला उमटली आणि पाठोपाठ स्फोटाचा प्रचंड आवाज झाला. पुढच्या मोटारच्या पुढ्यात आगीचा प्रचंड लोळ उठला व चढाच्या माथ्यावर ती मोटार उलटली. फक्त एका माणसाने बाहेर उडी टाकली. धडपडत, ठेचकाळत तो रस्त्यावर खाली धावत आला. धावताना तो ओरडत होता व टॉमीगन डोक्यावर उंचावून हलवीत होता.

"मागं फीर!" ओसिन यांनी तिरीमिरीने हुकूम दिला व ते सीटवर एकदम मागे रेलले. ड्रायव्हरच्या खांद्यावर चापट्या मारीत ते ओरडले, "मागं वळव! लौकर! खेड्याकडं परत चल!"

"जर्मन! जर्मन! ते इथं कसे पोचले?" कस्यान्किन विव्हळला व कोपऱ्यात अक्षरश: पाय पोटाशी घेऊन बसला. त्याच्या या वेडगळ हालचालींनी व आवाजात उमटलेल्या भीतीने वेस्निन यांच्या अंगातून भीतीचा शहारा गेला.

"गप्प रहा कस्यान्किन!" त्याचा कापणारा गुडघा रागाने व

तिरस्काराने त्यांनी बाजूला लोटला व ते पुन्हा ओरडले, "गप्प रहा! स्वत:ला सावरून घे!"

"ते थेट डोक्यावर आहेत आपल्या! आपण अगदी सरळ त्यांच्या पुढ्यात जाऊन पडलोय!" हुंदके देत कस्यान्किन विव्हळला. "आता आपण काय करायचं?"

"गप्प रहा म्हणून मी सांगतो ना!"

वेस्निन यांनी ओसिन यांचे हुकूम ऐकले—"मागं! लौकर! मागं वळव! वेग वाढव!"—ड्रायव्हरचे भयंकर खोकणे त्यांच्या कानांवर आले, चाक वळवण्यासाठी त्याचे खांदे व हात भराभरा हालचाल करीत असलेले त्यांनी पाहिले, एखाद्या जंगली श्वापदाप्रमाणे पुढे झुकून अधीरपणे पुढच्या स्पीडॉमीटरवर ओसिन बुक्क्या मारीत असलेले त्यांनी पाहिले. बाजूच्या खिडकीतून रणगाड्यांवर दृष्टिक्षेप टाकण्याचा वेस्निन यांनी प्रयत्न केला. मोटार वळली आणि उतारावरून घसरू लागली याची त्यांना ज्या क्षणाला जाणीव झाली त्याच क्षणाला अगदी जवळून दुसरी लाल ज्वाळा उमटली आणि त्यांचे डोळे दिपले. एकाएकी त्यांना रोरावणाऱ्या अंधाराने वेढले. काच फुटली आणि अंधार घुसमटणाऱ्या उष्णतेने भरला. एका जोरदार धक्क्यासरशी ते कुठल्यातरी सजीव व मऊ आकृतीवर आदळले. ती आकृती किंचाळली व त्यांच्या अंगाखाली धडपडली. अनपेक्षितपणे घडलेल्या या दैवाच्या कलाटणीमधून निसटण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न करीत असताना त्यांनी स्वत:ला ठामपणे बजावले की, काय वाट्टेल ते झाले तरी बेशुद्ध पडायचे नाही. मग त्यांना किंचाळी ऐकू आली. कस्यान्किन होता का? तो जखमी झाला होता? का किंचाळत होता तो?

डोक्यावर दुसरा कसलातरी कठीण आणि धातूचा प्रहार झाल्यामुळे ते मिनिटभर बधीर झाले असावेत. पण अंगाखालच्या किंचाळ्यांनी व धडपडीने आणि जवळच्या राखी धुक्यात कुणावर तरी वेडेवाकडे चिरडले जात असल्याच्या भावनेने ते पुन्हा भानावर आले. मोटारचे दार उजवीकडे नव्हते तर डोक्यावर होते आणि त्यांना अंधुक जाणीव झाली की, मोटारीने रस्ता सोडला असावा व ती उलटली असावी. भोवतालचे सर्व काही त्यांच्याभोवती गरगर फिरत असल्याचा त्यांना भास होत होता. त्यांचा चष्मा हरवला होता. त्याच संभ्रमित अवस्थेत यंत्रवतपणे

ते चष्मा चाचपडत असताना एकाएकी त्यांना ड्रायव्हरच्या टोपीविहीन निश्चल चेहऱ्याचे अगदी जवळून दर्शन झाले. बर्फाला घट्ट चिकटून बसलेल्या खालच्या दाराला त्याचा गाल दाबला गेला होता. पुढची काच फुटली होती, बॉनेट फाटले होते आणि उकलले होते आणि प्रचंड घरघराटाने भरलेली थंड चावरी हवा मोटारीत घुसत होती. त्यांच्या अंगाखाली दाबल्या गेलेल्या कस्यान्किनच्या किंचाळ्या त्या प्रचंड घरघराटात लोपल्या होत्या व त्याच घरघराटाने त्यांना शुद्धीवर आणले होते.

"कस्यान्किन, तुला जखम झालीय का? कशाला किंचाळतोयस?" त्यांचा स्वतःचाच आवाज त्यांना मंदपणे ऐकू आला.

"माझा पाय... माझा पाय!" कस्यान्किन विव्हळला.

"कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार, तुम्हाला लागलंय का? लौकर बाहेर पडा! कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार!"

उजळलेले आकाश दोन रुंद खांद्यांनी झाकून टाकले. कुणीतरी दाराला जोरात हिसका मारला व ते उघडताच दोन हातांनी वेस्निन यांच्या खांद्याला पकडून धाप टाकली. ओसिन यांचा पांढुरका चेहरा त्यांना ओझरता दिसला.

"जल्दी करा कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार! आपल्याला इथून ताबडतोब निसटलं पाहिजे. तुम्हाला कुठं लागलं नाही ना? चालता येईल?"

"ओसिन... कस्यान्किनला मदत कर. मला वाटतं तो जखमी झालाय," वेस्निन अस्पष्टपणे म्हणाले. मोटारीच्या दरवाजातून ते कसेबसे बाहेर पडले, बर्फावर त्यांनी उडी मारली व उभे राहताच येणारी चक्कर सावरण्यासाठी त्यांनी मोटारीचा आधार घेतला.

"कस्यान्किन!" दारावर ओणवीत ओसिन रागाने फूत्कारले. "तुला खरंच जखम झालीय? का नुसता बहाणा करतोयस? बाहेर नीघ! ताबडतोब! अर्धमेला झाला असलास तरी! तुझी टॉमीगन कुठाय? कुठाय तुझी टॉमीगन?"

त्याच क्षणाला अंधारातून कुणीतरी धावत वेस्निन यांच्याजवळ आले व त्यांच्या कानात धापा टाकीत कुजबुजले, "कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार!" नंतर वाक्यही पुरे न करता त्या व्यक्तीने आपल्या पोलादी

पकडीत त्यांचा हात धरला व धापा टाकीत त्यांना ओढत ती ओरडली, "मोटारीच्या मागं चला! कृपा करून असे पूर्णपणे उभे राहू नका. कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार! आपण संकटात सापडलोय! हे रणगाडे इथं कसे आले समजत नाही! आधी त्यांचं अजिबात चिन्ह नव्हतं!"

रक्षक दलाचे कमांडर मेजर तितकोव बोलत होते. इशाऱ्याची गोळी त्यांनीच झाडली व पहिली मोटार उलटल्यावर तेच धावले हे वेस्निन यांच्या लक्षात आले. तितकोव यांनी वेस्निनना उलटलेल्या मोटारीच्या मागे त्यांचे रक्षण करण्याच्या इराद्याने ढकलले व इंजिनांचा धडकी भरविणारा धडधडाट ज्या दिशेने येत होता त्या उतारावर आपली टॉमीगन त्यांनी रोखली. परंतु वेस्निन यांनी त्यांना रोखले.

"तितकोव, गोळी उडवू नका! रणगाड्यांना जाऊ दे! गप्प रहा! रणगाड्यांविरुद्ध टॉमीगनचा काहीएक उपयोग नाही! ... थांबा!"

"माफ करा कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार," तितकोव धापा टाकीत म्हणाले. "तुमच्या आयुष्याला मी जबाबदार आहे..."

"आता माफी वगैरे मागण्याचं विसरा!" वेस्निन त्यांचे बोलणे तोडीत मध्येच म्हणाले. "माझ्या स्वतःच्या आयुष्याला मी जबाबदार आहे!"

"ते तिकडे चाललेत! डावीकडे खेड्याला वळसा घालून!" तितकोव उद्गारले.

"कदाचित ते आपल्याला पाहणार नाहीत... फौजा घेऊन सुमारे बारा रणगाडे चाललेत."

तितकोव यांच्या मांजरासारख्या डोळ्यांना जो तपशील स्पष्ट दिसत होता तो वेस्निन चष्म्याशिवाय पाहू शकत नव्हते. मोटार जिथे खड्ड्यात उलटली होती तिथून सुमारे शंभर मीटर अंतरावरून त्या प्रचंड काळ्या अंधुक आकृती इंजिनांच्या घरघराटात सर्व आवाजांना बुडवून टाकीत आणि एक्झॉस्ट पाईपमधून ठिणग्या ओकीत स्तेपच्या जांभळट काळसर अंधारातून पुढे सरकत होत्या. आपल्या असहायतेची वेदनादायी जाणीव होत असतानाच वेस्निन यांच्या मनात विचार आला की, खेड्याच्या वायव्य सीमेवरून हे रणगाडे फळी फोडून घुसून आले आहेत याबद्दल टेहळणी चौकीवर देयेव आणि बेस्सोनोव यांना अद्याप काहीही कल्पना नसणार.

ते असा विचार करीत असतानाच अनुक्षेपकांचा झोत मोटारीवर उमटला आणि वेस्निन यांचे डोळे कमालीचे अधू आहेत हे मेजर तितकोव यांच्या लक्षात आले. वरच्या उंचवटयावरून सुमारे दहा जर्मन खाली येत होते. मोटारीत कुणीही जिवंत राहिले नाही याची खात्री करून घ्यायला टेहळे पथक येत होते हे उघड होते.

उतारावरून जर्मन अत्यंत सावधपणे पुढे येत होते. त्यांच्यापैकी दोघे उंचवटयावर हातात लाईट मशिनगन घेऊन उभे राहिले. एक वाकला आणि दुसऱ्याने त्याच्या पाठीवर नळी ठेवून फैर झाडली. काहीही न पाहता जर्मन पुढे निघून जातील अशी केवळ क्षणापूर्वीच आशा करणाऱ्या तितकोवनी वेस्निन यांच्याकडे असहायपणे नजर टाकली. पण वेस्निननी शांतपणे हातातले मोजे काढले व कमरेच्या पिशवीतून पिस्तूल बाहेर काढले. तितकोव यांच्या कटाक्षाचा अर्थ त्यांना उमगला: जर्मन मोटारीकडे येत होते.

"तुम्हाला इथून दूर गेलं पाहिजे! कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार, घरांच्या दिशेनं धाव घ्या! तुम्हाला आडोसा घ्यायला आम्ही फैरी झाडतो! कस्यान्किन, कमिस्सारना तुझ्याबरोबर घे! उठ कस्यान्किन! उभा रहा, मी तुला हुकूम देतोय!"

कर्नल ओसिन यांनी दरम्यान कस्यान्किनला मोटारीतून ओढून बाहेर काढले होते. डाव्या हातात बंदूक धरून उजव्या हाताने आपल्या ॲडज्युटंटला बॉनेटशी टेकवून उभे करण्याचा ओसिन यांचा प्रयत्न चालला होता. पण कस्यान्किन खाली घसरला व बर्फावर खाली बसण्याचा प्रयत्न करीत वेडयासारखा कण्हू लागला, आर्जवे करू लागला.

"कॉम्रेड कर्नल... माझा पाय... माझा पाय मोडलाय... मला उभं राहता येत नाही..." या बाजूवरून त्या बाजूवर उसळया मारीत त्याने ओसिन यांच्या पोलादी पकडीतून स्वतःची सुटका करून घ्यायचा प्रयत्न केला. त्याचा चेहरा वेडावाकडा झाला होता व डोळयातल्या आसवांनी ओला झाला होता. वेस्निन एकदम तिरसटून बोलले.

"सोडा त्याला एकटयाला!" मरणाचा संकेत देणाऱ्या त्या किंचाळयांनी व आर्जवांनी त्यांच्या पाठीतून एक थंडगार शहारा सरसरत गेला.

कमालीच्या रागाने ओसिन यांनी कस्यान्किनचे गलितगात्र शरीर खाली टाकले व ते झटकन तितकोव आणि वेस्निन यांच्याजवळ आले. जणू काही आपल्यावरच सर्व जबाबदारी आहे अशा थाटात भराभरा त्यांनी हुकूम फेकले.

"कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार, तुम्ही त्या घरांकडे ताबडतोब धावा! धावा किंवा सरपटत जा! तुम्हाला तिथं आडोसा सापडेल! दोनशे मीटर अंतर आहे! तितकोव! आपण इथं मोर्चा धरू. कस्यान्किनचा काहीच उपयोग नाही."

कस्यान्किनच्या त्या वेदनेतून उमटलेल्या किंचाळ्या वेस्निन यांच्या कानात अजून घुमत होत्या. तो मोटारीखाली आता लोळागोळा होऊन कण्हत पडला होता.

"नाही ओसिन," मोटारीमागे उभे रहात वेस्निन उत्तरले आणि पिस्तुलावरचा सेफ्टी कॅच त्यांनी मोकळा केला." मी कुठंही धावणार नाही. काय अर्थ आहे? त्याचा काही उपयोग होणार नाही, ओसिन."

"कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार... पण तुम्हाला समजत नाही का?" ओसिन ओरडला. "तुम्हाला समजत नाही?" त्याचा पांढराफटक चेहरा वेस्निन यांच्या चेहऱ्याशी भिडला.

"होय, मला समजतं... आपण त्यांना इथंच तोंड देऊ ओसिन."

आशा धरायला कोणतीही जागा राहिलेली नाही हे नग्न सत्य वेस्निन यांना एव्हाना उमजले होते. त्या उजळत्या आकाशात बर्फावरून दोनशे मीटर अंतर कापून आपण त्या घरांपर्यंत पोचणे कधीही शक्य नाही याची त्यांना खात्री पटली होती. आता सुटका नाही हे त्यांना समजून चुकले होते. जी गोष्ट इतर अनेकांच्या बाबतीत घडली होती ती आता अकल्पितपणे त्यांच्या बाबतीत घडली होती. अत्यंत कठोर अशा बंद दरवाजांमधील जणू ते दुःस्वप्न होते. उतारावरून मोटारीकडे जर्मन येत आहेत हे त्यांना समजले होते व दुसरा पर्याय नसल्याने फार थोडा वेळ चालणारी ही व्यर्थ लढाई त्यांनी पत्करली होती, याचीही त्यांना जाणीव होती. पण एका तासाने किंवा अर्ध्या तासाने आपण मरू, सारे काही एकदम अदृश्य होईल आणि आपले अस्तित्व संपेल ही कल्पना अद्याप ते करू शकत नव्हते.

आपल्या अधू डोळ्यांनी समोरचा अंधार न्याहाळीत, मोटारीच्या

मडगार्डवर पिस्तुलाचा हात टेकवून ते उभे होते. हातातल्या धातूचा थंडगारपणा त्यांना हाताला न जाणवता छातीत जाणवत होता व दोन्ही बाजूंना किंचित घासणाऱ्या तितकोव आणि ओसिन यांच्या खांद्यांचा स्पर्श त्यांना जाणवत होता.

जमिनीला हादरवून टाकणारा धडधडाट करीत ते रणगाडे स्तेपमधून खेड्याला व्यापीत चालले होते. उतारावरून येणाऱ्या टॉमीगनवाल्यांच्या सावल्या आता लांब लांब पसरल्या. मशिनगन आता फैरी झाडीत नव्हती. त्या पहिल्या फैरी झाडून जर्मनांनी प्राथमिक चाचपणी केली होती हे उघड होते व आता ते अधिक विश्वासाने पुढे येत होते, एकमेकांच्या नांवाने अस्पष्ट हाका मारीत होते.

"फायर!" एक कडवट शिवी हासडीत ओसिन यांनी हुकूम दिला व जवळ येणाऱ्या आकृतींवर त्यांनी पहिली फैर उडवली. उडणाऱ्या गोळ्यांच्या त्या क्षणिक उजेडात त्यांचे भक्कम गाल व गच्च आवळलेला जबडा चमकला. "तितकोव, उडव फैरी! पाड फडशा डुकरांचा! जवळ येऊ देऊ नको त्यांना! कापून काढ साल्यांना!"

वेस्निन यांच्या डाव्या अंगाला तितकोव यांनी लांबलचक आडवी फैर झाडली.

आपली काडतूसे शिलकी राखण्याच्या उद्देशाने वेस्निन यांनी त्या लालसर उताराच्या पार्श्वभूमीवरून येणाऱ्या अस्पष्ट आकृतींवर दोनदा गोळ्या झाडल्या. त्या आकृती चटकन बर्फाशी एकरूप झाल्या. एक क्षणभर गोळीबाराला उत्तर मिळाले नाही. नंतर बर्फातून गोळ्यांचा कडकडाट उमटला व मोटारीचे छत त्यांनी विंधले. लाईट मशिनगन अजून शांत होती, पण टॉमीगन एवढ्या जवळून फैरी उडवीत होत्या की, हवासुद्धा थरथरत असल्याचे जाणवत होते. त्या गोळ्यांच्या कडकडाटात मोडक्या रशियनमधून एक आवाज ओरडत होता, "रशियनांनो! गोळ्या झाडू नका! गोळ्या झाडू नका!" आपल्या पिस्तुलाच्या माशीवरून वेस्निन यांनी एक आकृती बर्फातून वर उठताना पाहिली. तिने एक इशाऱ्याची गोळी उडवली व नंतर पुन्हा आरोळी उठली, "रशियनांनो, कापुत्त, शरण या!" पण दयेचे आश्वासन देणाऱ्या त्या परकी आवाजाचा तिटकारा वाटून वेस्निन यांनी ओठ चावून, काळजीपूर्वक नेम धरीत त्याच्यावर दोनदा पिस्तूल झाडले.

दरम्यान, दूर धुक्यातून ऐकू यावी तशी ओसिनची कर्णभेदी संतापलेली आरोळी त्यांच्या कानांवर आली.

"भडव्यांनो तुमचं कापुत्त तुमच्या...! फॅसिस्ट डुकरांनो, तुमचं काही ऐकायचं नाही! काहीही नाही!"

मोटारीपासून सुमारे वीस मीटर अंतरावरून जेव्हा लाईट मशिनगनने फैरी उडवल्या तेव्हा जर्मन एवढे जवळ येऊन पोचलेत ही वस्तुस्थिती मान्य करायला अद्यापही वेस्निन तयार नव्हते. नजीक येणारी अपरिहार्यता त्यांनी सपशेल अमान्य केली आणि हातातल्या पिस्तुलाचा जसा त्यांना झटका बसत होता तसा त्यांचा विश्वास बसत चालला होता, तसा विश्वास ठेवणे त्यांना भाग पडत होते की, ही अपरिहार्यता आत्ता येणार नाही, परंतु जेव्हा ओसिन आणि तितकोव यांच्याजवळचा दारूगोळा संपेल आणि जेव्हा त्यांच्या स्वतःजवळ एकच काडतूस राहील तेव्हा येणार होती. किती राहिली काडतुसे माझ्याजवळ? चापावरचा आपल्या बोटांचा ताण अजमावीत त्यांनी विचार केला. शांत राहून घाई न करणे हे सर्वांत महत्त्वाचे होते. तितकोव यांनी काडतुसे राखून ठेवली असली पाहिजेत. त्यांच्याजवळ...

"मेजर तितकोव, तुमच्याजवळ—"

एकाएकी ते घुसमटले. एक सणसणीत भाजणारा दणका त्यांच्या छातीत बसला व ते मागे फेकले गेले. आपले शब्द घशात विरत असताना त्यांनी एवढेच पाहिले की, मेजर तितकोव यांचे डोळे त्यांच्याकडे वळले व अतर्क्य अशा दुर्दैवाची कहाणी ते मूकपणे बोलून गेले.

"कॉम्रेड कमिस्सार! ... कॉम्रेड कमिस्सार! ..."

त्यांनी माझ्या चेहऱ्यावर काय पाहिले? तितकोव यांच्या चेहऱ्यावरची अगतिकता आणि तितकोव यांच्या डोळयांमधील आश्चर्याचा भाव याबद्दल वेस्निन नवल करीत होते. ज्या हातात त्यांनी पिस्तूल धरले होते त्या हाताने त्यांनी आपली छाती चाचपली. जणू आपल्या बाबतीत घडलेली ती अपरिहार्यता ते छातीतून उपटून फेकू पहात होते. आत्ता तर नाही? हेच तर नाही? एवढया लौकर तर नाही? ते काय घडले याची त्यांना अचानक जाणीव झाली, किंचित सुटकेचा त्यांनी निश्वास टाकला व आपल्या हातावर कुठे रक्त आहे का ते त्यांनी पाहिले... पण त्यांना रक्त दिसले नाही.

"कॉम्रेड डिव्हिजनल कमिस्सार! तुम्हाला जखम झाली का? कुठे?" त्यांना परिचित असलेला पण तरीही अपरिचित भासणारा आवाज ऐकू आला व तो हळूहळू मंद होत अफाट पोकळीत विरून गेला. त्यांच्या डोळ्यांसमोर किरमिजी लाटा उसळल्या आणि एखाद्या तापलेल्या, भाजून कोळसा बनलेल्या वाळवंटाप्रमाणे किंवा रात्रीच्या वेळच्या दक्षिणेकडील खाली ओठंगलेल्या आकाशाप्रमाणे काहीतरी प्रचंड मोठा असा आकार अंगावर कोसळत असल्याचा त्यांना भास झाला. आणि हे काय आहे ते समजून घेण्याचा आकांताने प्रयत्न करीत असतानाच एका-एकी त्यांना सोचीनजीकच्या किनाऱ्यावरील ती दक्षिणेकडील अंधाराने दाटलेली रात्र स्पष्ट दिसली व आपण आपल्या मुलीबरोबर–नीनाबरोबर–असल्याचे त्यांनी ढळढळीत पाहिले. त्यांच्या घटस्फोटानंतर १९३८ साली ते आपल्या मुलीला घेऊन सोचीला गेले होते. त्यांनी पांढरी फ्लॅनेलची पॅंट घातली होती व काळ्या रंगाचे जाकीट चढवले होते. त्या पूर्ण निर्जन किनाऱ्यावरील वाळूत ती दोघेच उभी होती, सूर्यस्नान घेण्याच्या फळ्यांच्या काळ्या, ओलसर आकृती किनाऱ्यावर पसरलेल्या दिसत होत्या. त्यांच्या घशात शरमेने घुसमटून टाकणारा कडू आवंढा येत होता, कारण आपल्या मुलीबरोबर दिवसा तिथे भटकल्यानंतर ते त्याच ठिकाणी एका स्त्रीला भेटणार होते व पुढे ती त्यांची दुसरी पत्नी बनणार होती. आणि काहीतरी वाईट घडणार या जाणीवेने नीना रडायची आणि अस्वस्थ व्हायची, त्यांच्या पांढऱ्या पॅंटला घट्ट पकडून धरायची व अश्रूंनी डवरलेला आपला चिमणा चेहरा वर उचलून मॉस्कोतल्या आईकडे घरी घेऊन चला म्हणून हट्ट करायची. "डॅडी, मला आता इथं आणखी रहायचं नाही. मला घरी जायचंय. मला मम्मी पाहिजे. घेऊन चला ना मला..."

आपल्या मुलीची इवलाली थरथरती बोटे पॅंटला ओढत असल्याचे त्यांना जाणवले, तिचे छोटे, कृश शरीर त्यांच्या पायाला रेटत असल्याचा त्यांना भास झाला आणि काहीही घडले नाही, सर्व काही ठीक होईल असे तिला सांगावेसे त्यांना खूप वाटत होते, पण त्यांना बोलता येत नव्हते किंवा हलता येत नव्हते आणि त्यांच्या अंगाखालची जमीन सरकत होती.

वेस्निन यांना ठार करणाऱ्या त्या मशिनगनच्या गोळ्यांचा तडाखा एवढा जोरात बसला होता की, दोन पावले मागे उडून ते खाली कोसळले

होते व हा अनपेक्षित जोरदार आघात झाल्यानंतर आपल्या पिस्तुलाचा हात त्यांनी स्वतःच्या छातीवर धरीपर्यंतच्या काही क्षणांच्या अवधीत ते एव्हाना बर्फावर पार उताणे पडले होते आणि त्यांच्या घशामधून रक्ताचा लोंढा लागला होता.

"तितकोव? कमिस्सारना काय झालं? काय घडलंय?"

गोळीबार थांबवून ओसिन बर्फातून वेस्निन यांच्याकडे धावत आले तेव्हा वेस्निन यांनी त्यांना पाहिले नाही किंवा त्यांचा आवाजही ऐकला नाही. भेदरलेल्या चेहऱ्याने मेजर तितकोव वेस्निन यांच्याजवळ उकिडवे बसले होते व मोठ्या कोटाचा छातीकडील चिंध्या झालेला ओलाचिप्प भाग हातांनी चाचपीत होते. तितकोव यांचे तुटक उत्तर वेस्निनना ऐकू आले नाही, त्याचप्रमाणे ओसिन यानी त्या रात्रीच्या वातावरणात सडकून हासडलेली शिवीही त्यांना ऐकू गेली नाही.

"या भडव्या हूणांचा नायनाट होवो! मेजर तितकोव! कमिस्सार ठार झाले असले तरी आपण त्याना घेऊन जाऊ या! ठार झाले असले तरी! समजलं? उचला त्यांना! घरांच्या बाजूनं चला! खड्ड्याच्या कडेनं! मी तुम्हाला गाठतो!"

रक्त येईपर्यंत ओठ घट्ट चावीत तितकोव यांनी आपल्या भल्याभक्कम रुंद पाठीवर वेस्निन यांचे मुटकुळे उचलून घेतले व ते तिथून निघाले. काही मिनिटांपर्यंत ओसिन मोटारीजवळ पालथे पडून जर्मनांवर लांबलचक फैर झाडीत राहिले व त्याचबरोबर त्यांनी भयानक शिव्यांचा भडिमार केला. जेव्हा जर्मन मशिनगन थंडावली तेव्हा त्यांनी उडी मारली आपल्या टॉमीगनच्या दांड्याने मोटारीचे मडगार्ड दाण्‌दिशी ठोकले. मोटारच्या काळोख्या तळाशी जेव्हा दबलेले कण्हण्याचे आवाज ऐकू आले तेव्हा ते संतापून ओरडले.

"कस्यान्किन! भेकडा! लोक इथं ठार मरताहेत आणि तू अजून जिवंत? जर्मनांसमोर तुला नाक घाशीत जायचंय? स्वतःचा जीव वाचवायचाय? गोळ्या झाडण्यापासून तुला तुझ्या पायानं अडवलं होतं? बाहेर ये भडव्या! बाहेर ये!"

"कॉम्रेड कर्नल! नका हो, कॉम्रेड कर्नल! नको नको! माझा दोष नाही हो!" मोटारीखालून कस्यान्किन विव्हळला. "ठार मारा मला! इथल्या इथं ठार मारा!"

"चूप बैस!" गच्च आवळलेल्या दातांमधून ओसिन ओरडले. "तुझ्यावर एक गोळी वाया घालवायची इच्छा नाही माझी! चल भेकडा! तितकोवच्या मागं धाव! चल! माझा विचार बदलायच्या आत!"

आणि एका जोरदार हिसक्यासरशी त्यांनी मोटारीखालून एक थरथरता, भेदरलेल्या डोळ्यांचा देह खेचून बाहेर काढला. कस्यान्किन तेच तेच शब्द पुन:पुन्हा उच्चारत राहिला होता.

"चूप बैस साल्या! चालायला लाग!"

नंतर ओसिन यांनी स्वत: मोटारीपासून झेप घेतली व खाली वाकून तितकोव यांचा मागोवा घेत ते खड्डयाच्या दिशेने निघाले. दरम्यान तितकोव अर्धे धावत, अर्धे रांगत कमिस्सार वेस्निन यांचा एव्हाना गार पडत चाललेला देह घेऊन बरेच पुढे गेले होते.

•

## प्रकरण सोळावे

एखादा चमत्कार घडावा त्याप्रमाणे बचावलेली तोफखान्यातील उखानोवची एकमेव तोफ भाजून कोळसा झालेल्या, तोफगोळ्यांनी उध्वस्त झालेल्या पुलापासून सुमारे दीड किलोमीटर अंतरावर उभी होती आणि तोफखान्याच्या बंद पडलेल्या इतर तीन तोफांकडून आणलेला दारूगोळा जेव्हा संपला, तेव्हा उत्तररात्रीच्या सुमारास तीही थंडावली.

कर्नल-जनरल गोटच्या सेनागटाने बेस्सोनोव यांच्या सेनेच्या उजव्या फळीत दोन ठिकाणी मीष्कोवा नदी यशस्वीरीत्या पार केली व सतत रेटा मारून रात्रीच्या सुमारास देयेव यांच्या डिव्हिजनच्या मोर्चांमध्ये आतपर्यंत धडक घुसवून त्यांच्यात पाचर मारली आणि खेड्याच्या उत्तर तीरावरील क्षेत्रात चेरेपानोवच्या रेजिमेंटला ते भिडले आहेत, याची कुझ्नेत्सोवला किंवा उखानोवला अर्थातच काही निश्चित कल्पना नव्हती. पण त्यांना एवढे मात्र समजले होते की, दिवसअखेरीला काही रणगाड्यांनी —त्यांची संख्या सांगणे अवघड होते—शेजारच्या तोफखान्यांना चिरडून टाकले होते, समोरच्या आणि डावीकडच्या पायदळ बटालियनांचा खातमा केला होता, द्रोझ्दोवस्कीच्या तोफखान्यासकट सुळक्यावरचे तोफांचे मोर्चे

मोडून काढून पुलावरून दुसऱ्या तीरापर्यंत मजल मारली होती, त्यानंतर पुलाची थोडी मोडतोड झाली होती व 'कात्युशां'च्या भडिमाराने तो पेटला होता.

समजायला आणखीच कठीण झालेली गोष्ट म्हणजे अंधार पडत असतानाच लढाईचे क्षेत्र तिथून दूर सरकले होते आणि त्यांच्यापलिकडे हळूहळू थंडावत गेले होते. आतापर्यंत ज्या भागाला ते आपली पिछाडी समजत होते त्या सबंध उत्तर तीरावर आकाश आगीने अर्धवर्तुळाकार उजळले होते आणि इथे दक्षिण तीरावर, पायदळाच्या छिन्नभिन्न झालेल्या आघाडीच्या खंदकांच्या मोर्चांच्या पुढे आणि उध्वस्त झालेल्या तोफखान्याच्या मोर्चांच्या पुढे काही न समजण्याजोग्या कारणाने लढाई थंडावली होती व हल्लेही थांबले होते. तरीही सर्व गोष्टी ज्वाळांमध्ये लपेटलेल्या होत्या, पेट्रोलची थारोळी भडकलेली होती, टेकाडावर एकटादुकटा रणगाडा किंवा त्यांचा पुंजका जळत होता किंवा धुमसत होता. फौजा वाहून नेणाऱ्या चिलखती गाड्यांना तोफगोळ्यांनी पाडलेली काळी भगदाडे आ वासून उभी होती आणि ओपेल लॉऱ्यांचे धुमसते लोखंडी सांगाडेही उभे होते. रणधुमाळीच्या वेळी कुझ्नेत्सोवने या लॉऱ्या पाहिल्या नव्हत्या, कारण त्या रणगाड्यांच्या मागून पुढे सरकत आल्या होत्या.

वारा खिंडीच्या टोकावरचा बर्फ उधळीत होता व खाली धुमसणाऱ्या वाहनांवर ठिणग्यांचा जाळ भडकवीत होता. बर्फाचे उडणारे अणकुचीदार तुकडे व स्तेपमध्ये भडकलेल्या त्या आगी आपल्या मौनामुळे अतिभीषण भासत होत्या व तारवटलेल्या डोळ्यांना पाणी आणीत होत्या. तोफखान्याच्या मोर्चापुढील ते तीन रणगाडे अद्याप जळत होते. काळयाठिक्कर पडलेल्या पोलादी पत्र्यावरून तेलकट धूर उसळत होता आणि सर्वत्र जळक्या धातूचा, रबराचा व भाजलेल्या मानवी मांसाचा उलटी आणणारा गोडसर वास पसरला होता.

भाजलेल्या मांसाच्या प्रचंड घाणीने जेव्हा मळमळू लागले तेव्हा कुझ्नेत्सोवने आपले डोळे उघडले. बांधावर आडवे पडून खूप वेळपर्यंत त्याने ओकाऱ्या काढल्या व तो खोकला. पण त्याचे पोट रिकामे होते. त्याला आराम लाभत नव्हता आणि भयानक आकड्या येऊन त्याचा घसा व छाती दुखू लागले होते. अखेरीस त्याने ओठ पुसले व तो

बांधावरून खाली घसरत खंदकात आला. आपल्या दुबळेपणाचे उखानोव-समोर आणि त्याच्या लोकांसमोर प्रदर्शन झाले या विचाराने आश्चर्य म्हणजे त्याला अजिबात शरम वाटली नाही. अशा गोष्टींची इतःपर अजिबात क्षिती राहिली नव्हती.

आपल्या पूर्वीच्या सर्व संवेदना तो हरवून बसला होता. जणू ज्या गोष्टींचा त्याने विचार केला होता व त्या गोष्टी केल्या होत्या त्या मुळी त्याच्या डोक्यात आल्याच नव्हत्या व त्याने केल्याच नव्हत्या, तर दुसऱ्याच कुणीतरी घडवल्या होत्या. या एका दिवसाच्या क्रमात सारे काही उलटेपालटे झाले होते, बदलले होते. चोवीस तासांपूर्वी ज्या मोजमापाने सर्व गोष्टी तोलल्या जात होत्या ती मोजमापे बदलली होती. सर्व बाबतीत आपण ठार नागडे आहोत असे त्याला आता वाटत होते.

"काही इलाज नाही माझा," अखेरीस तो अस्पष्ट आवाजात म्हणाला. "माझी सगळी हिंमत मी ओकून टाकतोय..."

तोफखान्यासमोर पसरत चाललेल्या निःस्तब्धतेची त्याला अजून जाणीव होत नव्हती. आपली दुखणारी छाती त्याने चोळली व तोफेभोवतालच्या लोकांकडे नजर टाकली. लढाईच्या काळात जणू तो ऐकण्याची सारी संवेदना हरवून बसला होता.

वरिष्ठ सार्जंट उखानोव तोफ डागायच्या फलाटावर बसला होता. अतिश्रमांनी थकून गेल्यामुळे बांधाच्या टोकावर मान टाकून तो पडला होता. अर्ध्या मिटलेल्या त्याच्या पापण्यांखालील डोळे निश्चल दिसत होते आणि डोळे न मिटता तो झोपला आहे असे वाटत होते. अर्ध्या तासापूर्वी जेव्हा नेचायेवने तोफगोळे संपल्याचे ओरडून सांगितले तेव्हा तो अत्यंत विचित्र असा हसला होता व आपल्या तोफेशेजारीच त्याने बसकण मारली होती. चेहऱ्यावर ते भकास हसू तसेच ठेवून तो अजूनही बसलेला होता, त्याच्या उघड्या जाकीटावर दुर्बीण लटकत होती, आकाशात नव्याने उजळलेल्या लालसर प्रकाशाकडे आणि नदीच्या दुसऱ्या तीरावर आता लढाई चालली होती तेथे मधून मधून उडणाऱ्या अनुक्षेपकांकडे तो मंद नजरेने पहात होता.

अतिशय तापलेली तोफेची नळी अद्याप लालबुंद होती आणि तिच्यातून उडणाऱ्या निळसर ठिणग्या अंधारात काजव्यांसारख्या चमकताना दिसत होत्या. तोफेच्या रक्षक कवचावर हिमकण विखुरत होते.

"उखानोव! तुला ऐकू येतं?" खालच्या आवाजात कुझ्नेत्सोवने विचारले.

कुझ्नेत्सोवचे बोलणे उखानोवला फारसे ऐकू आले नाही, कारण तोफेच्या सतत आवाजाने त्याच्याही कानाचे दडे बसले होते. उजळत्या आकाशाकडे लावलेली आपली तिऱ्हाईत नजर त्याने कुझ्नेत्सोवकडे वळवली, थोडा वेळ रोखून पाहिले आणि आपला हात उंचावून हवेत एक वर्तुळ काढले. कुझ्नेत्सोवने आपले ठणकणारे डोके हलवले.

"कदाचित तसं असेल," तो पुटपुटला आणि लढाई कशी संपली हे तोफेवरच्या इतर माणसांना समजले किंवा नाही हे जाणण्यासाठी त्याने मंदपणे सर्वांचे चेहरे न्याहाळले. सात लोकांपैकी फक्त दोघे उरले होते—नेचायेव आणि चिबिसोव. लढाईच्या काळात शारीरिकदृष्टचा व मानसिकदृष्टचा वास्तवतेची जाणीव पूर्णपणे विसरल्याने ते कमालीचे थकले होते, त्यांच्या सर्व संवेदना बधीरल्या होत्या, त्यांना काही ऐकू येत नव्हते आणि ते काहीही विचारीत नव्हते. तोफेला बत्ती देणारा नेचायेव अजून तोफेच्या माशीवर वाकून बसला होता, आडव्या टाकलेल्या आपल्या हातावर तो डोके टेकून बसला होता. त्याला सतत जांभया येत होत्या व त्या आवरणे कठीण झाल्यामुळे त्याचे तोंड सारखे उघडे पडलेले दिसत होते. जणू त्याला कधी पुरेशी हवाच मिळाली नाही असे त्याच्या वासलेल्या तोंडाकडे बघून वाटत होते. तोफेच्या दुसऱ्या बाजूला चिबिसोव आपल्या पायघोळ कोटात कुबड काढून बसला होता. त्याच्या कॉलरमधून आणि टोपीच्या गळपट्ट्यातून दाढीचे खुंट वाढलेल्या त्याच्या निळसर चेहऱ्याचा फक्त थोडा भाग उघडा दिसत होता. त्याचे कण्हणे आणि धापा टाकीत आवंढे गिळणे पाहून समजत होते की, त्यालाही अजून स्वतःला सावरणे जमलेले नव्हते.

"परमेश्वरा, आता नाही रे बाबा सोसवत... मला नाही आणखी सहन होत..." तो कण्हत होता.

"लेफ्टनंट... ए लेफ्टनंट! आपण अजून जिवंत राहणार आहोत का भुताला बळी द्यायचा आपला? साला मी अख्खा घोडा खाईन आत्ता! मरणाची भूक लागलीय! अरे तुम्ही सगळे एवढे गप्प का? सगळे झोपलात? लेफ्टनंट, अजून जिवंत आहात का?"

वरिष्ठ सार्जंट उखानोव बोलत होता. आता काहीही उपयोग

नसलेली दुर्बीण त्याने गळ्यातून ओढून काढली व बांधावर टाकली. आपले दुलईदार जाकीट त्याने अंगाभोवती ओढून घेतले, लटपटत तो उभा राहिला व एक पाय दुसऱ्यावर आपटू लागला. नंतर फारशी गडबड न करता त्याने सरळ नेचायेवच्या बुटावर लाथ मारली. नेचायेव अजूनही आपल्या हाताच्या आढीवर डोके टेकून तोफेच्या माशीवर वाकून बसला होता व जोरजोरात जांभया देत होता.

"ए खलाशा, एवढ्या जांभया कशाला देतोयस? तुझा वेळ असा वाया घालवणं चांगलं नाही!"

"उखानोव, त्याला बिचाऱ्याला नको त्रास देऊ," कुझ्नेत्सोव वैतागलेल्या सुरात म्हणाला. "देऊ दे त्याला जांभया. कुणालाही त्रास देऊ नको. थोडा वेळ इथंच निवांत बैस." यांत्रिकपणे त्याने आपल्या पिस्तुलाचा पट्टा सरळ केला. "मी लौकर परत येतो. आसपास कुठं जर्मन आहेत किंवा नाहीत हे पहायला मी तोफांच्या मोर्चांभोवती फेरी मारून येतो. काय चाललंय ते मला पहायचंय."

उखानोवने दोन्ही हातमोजे जोरात झटकले आणि आपले पाडलेले खांदे उडवले.

"चला आपण जाऊ या आणि तोफा बघू या." उखानोवने आपली टॉमीगन खांद्यावर लटकावली. "आपण भोवतालची जरा पाहणी करू या. तसे आपण आपल्या लोकांपासून पुरते तोडले गेलो आहोत हे अगदी स्पष्ट आहे. एक मात्र मोठी गंमत आहे. समोरच्या खेड्यापर्यंत इथून फक्त सातशे मीटर अंतर आहे आणि तिथं एकही जर्मन दिसत नाही."

"खेडं त्यांनी काबीज केलंय. उघड्या स्तेपमध्ये ते कशाला राहतील? रणगाड्याला सातशे मीटर अंतर काय फार आहे? इथं कुणीही जिवंत राहिलं नाही अशी त्यांची समजूत झाली असावी असं मला वाटतं. विशेषतः त्यांनी नदी पार केली आहे म्हणून."

"लेफ्टनंट, तुम्ही अगदी नमुनेदार आहात. पण झकास! तुमच्या-बरोबर राहून लढाई करणे शक्य आहे."

"ऐकायला फार बरं वाटलं. पुन्हा एकदा बोलून पहा. तू आणखी माझ्याबद्दल चांगलं बोललास तर मी आता वितळून जाईन."

"ठीक आहे. समजलं मला. आपल्या त्या डॉक्टर पोरीला काय झालं? कुठं आहे ती? अजून जिवंत आहे?"

"होय. जखमींबरोबर खंदकात आहे. तुझ्या तोफेच्या मागूनच ती जखमींना घेऊन जात होती. तू पाहिलं नाहीस?"

"रणगाड्यांशिवाय दुसरं काहीही पाहिलं नाही. दुसऱ्या कशाचा त्यावेळी डोक्यात विचारही येत नाही."

तोफ सोडून ते जेव्हा दळणवळणाच्या अरुंद चरामधून जाऊ लागले तेव्हा भोवतालची शांतता जणू त्यांना खायला उठली. त्या शांततेच्या प्रचंड वजनाखाली जणू ते दबले गेले. कुझ्नेत्सोव प्रथम थांबला. कानात पाणी गेल्यासारखे त्याने डोके हलवले. उखानोव त्याच्या मागे थांबला. आता त्याच्या कपड्यांची सळसळ नव्हती किंवा पावलांचा आवाजही नव्हता. ती भयानक शांतता दुसऱ्या तीरावर उडालेल्या मशिनगनच्या छोट्या फैरीमुळे अधिकच तीव्र बनली. फैर थंडावली आणि रात्र अगदी बधीर व मृतवत् बनली. कानात मात्र सतत त्रासदायक गुणगुण आवाज होत होता. मग उखानोवचा आवाज नि:स्तब्धता मोडीत ऐकू आला, "लेफ्टनंट, तुम्ही काय ऐकलंत? पिछाडीला जर्मन मशिनगन?"

"उखानोव, तुझ्या कानात आवाज होताहेत का?" शंकाकुल होत टोपी काढीत कुझ्नेत्सोवने विचारले. आपण ठार बहिरे झाले आहोत यावर विश्वास ठेवायची त्याची तयारी नव्हती. "तुला काही ऐकू येतं?"

"लेफ्टनंट, माझ्या डोक्यात नाकतोडे शिरलेत असं वाटतंय. आता मशिनगनची फैर उडाली."

"आणखी काही नाही?"

"दुसऱ्या किनाऱ्यावरची लढाई थांबलीय एवढं सांगण्यापुरतं मला नक्की ऐकू येतंय. त्यांनी फळी फोडून सरळ मुसंडी मारली असं वाटतं तुम्हाला?"

"सगळीकडं एवढं शांत आहे."

"स्मशानशांतता!" उखानोव म्हणाला. "असं वाटतंय की, त्यांनी आघाडी फोडली आणि आपल्या लोकांचा पाठलाग करीत स्तालिन-ग्रादकडं ते धावताहेत. आपण मात्र इथंच राहिलो... लेफ्टनंट, ईशान्येकडं पहा. स्तालिनग्रादवर आकाश उजळलंय. इथून सुमारे तीस किलोमीटरवर."

"ऐक! ..." बांधावर पुढे झुकून कान देऊन ऐकण्याचा प्रयत्न करीत कुझ्नेत्सोव म्हणाला. "कुणीतरी तिकडं ओरडतंय... का माझ्या कानांना तसा भास होतोय?"

पायदळाच्या खंदकांपलिकडे कुणी माणसाने आरोळी ठोकल्याचा त्याला भास झाला होता. त्या तांबड्या बर्फामधून निःस्तब्धता मोडून एकदम ती आरोळी उठली होती. श्वास रोखून कुझ्नेत्सोवने टोपी काढली आणि कानात घुमणाऱ्या आवाजांमधून ऐकायचा प्रयत्न केला. दूर तीरावर चमत्कारिक शांततेत उमटलेला लाल प्रकाश त्याने पाहिला, स्तालिनग्रादच्या दिशेने ईशान्येकडे उमटलेल्या फिकट उजेडाकडे त्याने नजर टाकली, या तीरावर पेटलेल्या व तोफखान्यासमोर जळणाऱ्या धातूच्या शेकोट्यांकडे त्याने रोखून पाहिले. आग, वारा, हिमकण, जळून गेलेल्या चिलखती गाड्या व टेकाडावरचे रणगाडे यांच्या भयानक अंधुक आकृती यांच्याशिवाय तेथे काहीही नव्हते.

"स्तालिनग्रादपर्यंत ते फळी फोडून जाणं शक्य नाही," कुझ्नेत्सोव शांतपणे म्हणाला.

आपण ऐकलेली माणसाची आरोळी हा आपल्याला झालेला भास होता असे त्याने स्वतःला• बजावले व एक दीर्घ श्वास घेतला. एकही गोळीचा आवाज नाही. काहीही हालचाल नाही. एकही आवाज नाही. सारी पृथ्वी जणू मेली होती. तिने शेवटचा श्वास टाकला होता आणि ती त्या चावऱ्या वाऱ्यात, त्या मरणःप्राय वाळवंटासारख्या उजेडात होती, येथे ते दोघे व तोफेशेजारी थकून बसलेले दुसरे दोघे, असे चौघेच फक्त या जगात जिवंत राहिले होते आणि त्यांच्याभोवती केवळ मृत्यू व एकाकीपणा पसरला होता. त्या महाभयानक डिसेंबरातल्या रात्रीची गोठलेली स्तब्धता गर्भगळित करणारी होती.

"मला भास झाला असावा," डोक्यावर परत टोपी ठेवीत व ओठांवर हसू आणीत तो म्हणाला. "तुझं बरोबर आहे. हे बेटे नाकतोडेच आहेत."

चरातून ते पुढे निघाले. त्यांच्या पावलांचे आवाज, कपड्यांची सळसळ याच काय त्या जिवंतपणाच्या खुणा होत्या.

"लेफ्टनंट, आपल्याला जर असे भास व्हायला सुरुवात झाली असेल," उखानोव हसून म्हणाला, "तर आपलं लक्षण काही फारसं बरं नाही. तरीही, एखादेवेळी जखमी झालेला एखादा जर्मन कण्हला असावा. किंवा आपल्या पायदळातला कुणीतरी."

"तिथं कुणी फारसं शिल्लक राहिलं नसावं असं मला वाटतं. सारा

दिवस रणगाडे त्यांच्यावर कोसळून पडत होते. आपण तिथं जाऊन पाहिलं पाहिजे."

"लेफ्टनंट, मला समजलं. आणि तुम्हाला टेहळणी मोर्चाशी संपर्क ठेवला पाहिजे. कदाचित द्रोझ्दोवस्कीचा अजून कमांडरांशी टेलिफोनवर काही संपर्क असेल."

"प्रथम आपण तोफखान्याची तपासणी करू आणि नंतर काय करायचं ते ठरवू." कुझ्नेत्सोव काही पावले चालला व एकदम चमत्कारिक आवाजात म्हणाला, "चुबारिकोवची तोफ... मला तिथं एक गोष्ट समजत नाही – रणगाडा अंगावर येतोय हे त्यांना कसं दिसलं नाही?"

"मलाही ते समजत नाही. तो रणगाडा अगदी बांधावर होता तेव्हा मी तोफ डागली," उखानोव स्वतःशीच बोलल्यासारखा मोठ्याने म्हणाला. "कदाचित तो त्यांच्या अंगावर येण्यापूर्वीच ते सारे जखमी झाले असावेत."

"तू तोफ उडवताना मी पाहिलं."

आता ते तोफेच्या अगदी जवळ आले होते.

पूर्वी त्या जागेवर दुसऱ्या तोफेचा मोर्चा होता व कनिष्ठ सार्जंट चुबारिकोव तिचा प्रमुख होता. रणगाड्यांचा पहिला हल्ला सुरू झाला तेव्हा सकाळी कुझ्नेत्सोव या ठिकाणी होता. आता तिथे कशालाच काही अर्थ राहिला नव्हता. आपल्या पोलादी पट्ट्यांखाली रणगाड्याने तोफेला चिरडले होते आणि आता उध्वस्त बांधावर तो निश्चल काळा राक्षस उभा होता, जमिनीमधून बूट, कोटांचे तुकडे, दुलईदार जाकीटांचे अवशेष डोकावत होते, तोफगोळ्यांचे कपचे पडलेले होते. वेळेवर कुणालाच निसटता आले नव्हते.

सर्व काही चिरडलेले, भाजलेले, थिजलेले होते. सर्व गोष्टींना जळक्या धातूची, जळलेल्या रंगाची घाण येत होती. बर्फात खोल घुसलेल्या दारूच्या पावडरीचा दुर्गंध पसरला होता. रणगाड्याच्या चाकामध्ये अडकून चिंध्या झालेल्या तोफेच्या थिजलेल्या रक्षक कवचामधून घोंघावणारा वारा जोरात शीळ घालीत होता. त्या अंधारात धातूवर धातू घासल्याचा होणारा तो एकमेव आवाज भेसूरतेत भर घालीत होता.

बर्फाचे थर बसलेला तो काळवंडलेला रणगाडा आणि छिन्नभिन्न झालेली ती तोफ मृत्यूचे असे काही वातावरण निर्माण करीत होती की, कुझ्नेत्सोवला आपल्या गालांवरचे स्नायू ताणल्याचा भास झाला आणि त्याच्या पाठीतून थंडगार शहारे गेले.

असे कसे घडले हे? त्यांनी तोफ लौकर का उडवली नाही?

त्याच्या गळ्यात आवंढा अडकला, त्याला स्वतःला अपराधी असल्याची जाणीव झाली–त्याने त्यांची तोफ का सोडली?–तो आणि झोया दावलात्यानच्या तोफेवरून रणगाड्यांवर भडिमार करीत होते त्यावेळचे ते मरणांतिक क्षण कसे गेले ते आठवण्याचा कुझ्नेत्सोव प्रयत्न करीत होता. ते दृश्य कल्पनेने उभे करण्याचा त्याने प्रयत्न केला. त्यांनी तोफ डागायचा प्रयत्न केला होता? बांधावर जळता रणगाडा चालून आला तेव्हा त्यांच्या चर्या कशा झाल्या असतील, त्यांनी काय हालचाली केल्या असतील?

ते घडताना त्याने दुरून पाहिले होते व त्यावेळी तो काहीही करायला समर्थ नव्हता. त्या काही सेकंदांनी त्याच्या तोफेवरची सारी माणसे गारद करून टाकली होती. अजून त्या लोकांची त्याला पुरती ओळखही पटलेली नव्हती: सूर्यफुलाच्या देठासारखी लांब, निष्पाप मान असणारा कनिष्ठ सार्जंट चुबारिकोव, लहान मुलासारखे डोळे चोळीत "माझ्या डोळ्यात घाण गेलीय," असे म्हणणारा त्याचा आवाज; अत्यंत शांतपणे, अचूकपणे, कार्यक्षमतेने तोफेवर काम करणाऱ्या गोलंदाज येवस्तिग्नेयेवची पाठमोरी आकृती व त्याच्या फाटलेल्या कानाच्या पडद्यातून वाहणारी रक्ताची बारीक धार. "कॉम्रेड लेफ्टनंट, तुमचे हुकूम आणखी मोठ्यांदा ओरडून द्या! मोठ्यांदा!"

त्याला अजून त्यांच्या नजरा आठवत होत्या, त्यांचे आवाज आठवत होते आणि त्यांचा हा संहार म्हणजे काहीतरी जादू आहे असेच त्याला वाटत होते. नक्की तो परत त्यांना पाहील, त्यांचे आवाज ऐकील... तसे झालेच पाहिजे, कारण अजून त्याला या लोकांची पुरती ओळख पटली नव्हती, त्यांना समजून घ्यायला, त्यांच्याशी दोस्ती करायला अजून अवसर मिळाला नव्हता.

त्याचा चेहरा आणि हात गोठले होते, पण अजूनही तो तेथे उभा होता, त्या घटनेला आपण थोपवू शकलो नाही म्हणून स्वतःला दूषणे

देत होता आणि त्या अंतिम क्षणांमध्ये काय घडले असावे ते आठवण्याचा, ते सर्व समजून घेण्याचा प्रयत्न करीत होता.

पण त्या तोफेच्या खड्डयात त्याने जे पाहिले त्या दृश्याने त्याला उत्तर दिले. त्याच्या माणसांच्या त्या अवशेषांनी, त्या काळ्या, आकारविहीन आकृतींनी आपल्या मरणशांततेने त्याला सर्व काही सांगितले. त्यांचे दफन करण्याचीही आवश्यकता नव्हती, कारण ते आधीच जमिनीत गाडले गेले होते. या सर्व घटनेचे त्यांच्याशिवाय कुणी उत्तर देणार नव्हते आणि तेच जिवंत नव्हते.

तिथे फक्त एकच मंद आवाज होत होता – रणगाड्याच्या चाकाशी घासणाऱ्या तोफेच्या रक्षक कवचाच्या बकलाचा.

कुझ्नेत्सोवने थिजलेला चेहरा वर उचलला. त्याच्या मागे फावड्याच्या जोरदार आवाजाने शांततेचा भंग केला. उजळलेल्या क्षितिजाच्या पार्श्वभूमीवर उखानोवची काळी छाया खालीवर होत होती. तोफगोळ्यांसाठी तो तोफेच्या मागच्या भागात जमीन उकरीत होता. कुझ्नेत्सोव शांतपणे त्याच्याजवळ गेला व पाहू लागला. भुईसपाट झालेले एक शरीर सार्जंट खणीत होता. त्या शरीराच्या हातांनी काहीतरी गच्च धरले होते, त्या देहाच्या पायघोळ कोटाच्या पाठीच्या चिंध्या झाला होत्या. कदाचित अगदी जवळून रणगाड्यामधून मशिनगनची फैर त्याच्या पाठीवर उडवलेली असावी.

"कोण आहे तो?" घोगऱ्या आवाजात कुझ्नेत्सोवने विचारले. "उखानोव, कोण आहे तो?"

काहीतरी करड्या रंगाच्या पसरट आकारापासून उखानोवने ते ताठरलेले शरीर दोन्ही खांद्यांना धरून मागे खेचले व त्याचा चेहरा वरच्या बाजूला वळवला. गोठलेल्या मातीच्या आवरणाखाली त्या मृताचा चेहरा ओळखणे अशक्य ठरले होते. तो करडा, पसरट आकार म्हणजे तोफगोळ्यांचा खोका होता.

"तोफगोळे वाहणारा," उखानोव म्हणाला व एक बारीक उसासा टाकून पहार घुसवावी त्याप्रमाणे त्याने फावडे जमिनीत घुसवले. "त्याला पाठमोरा असताना मारलाय. मला वाटतं तो तेव्हा तोफगोळा उचलत होता. लेफ्टनंट, त्यांचं रणगाड्याकडं कसं लक्ष गेलं नाही हेच मला समजत नाही. किंवा ते सगळे जखमी झाले असावेत?" त्याने

मान हलवली. "अजून त्यांच्याजवळ काही तोफगोळे शिल्लक होते, होय की नाही? आणि चुबारिकोव नि येवस्तिग्नेयेव अचूक गोलंदाज होते! रणगाडा आधीच पेटलेला होता!"

त्याला आता कोणतेही उत्तर देऊ न शकणारी ती माणसे जणू स्वतःच आपल्या मरणाला जबाबदार होती, अशा तऱ्हेच्या उखानोवच्या बोलण्यातील त्या रागीट निषेधात्मक सुराने, त्या एकूण अभिनिवेशाने कुझ्नेत्सोव थक्क झाला. तो घोगऱ्या आवाजात म्हणाला, "काय घडलं ते आपल्याला माहीत नाही. कोण दोषी धरणार?"

"मी स्वतःला क्षमा करू शकत नाही," उखानोवने झटक्यात तोफगोळ्यांचा खोका जमिनीवरून उचलला आणि जोरात बांधावर आदळला. "मी दोनदा तोफ डागायला पाहिजे होती! पण माझ्यावर एकूण सात रणगाडे चालून येत होते! मी त्यातला एक टिपला, क्षणभर तो थेट माझ्या तोफेच्या माशीसमोर होता!" तोफेच्या मागल्या भागातून तो बाहेर पडला व त्या मृत माणसाच्या काळ्या आकृतीकडे त्याने नजर टाकली. "दोस्तांनो, कसंही असलं तरी तोफगोळ्यांबद्दल थँक्स! लेफ्टनंट, मी याला कुठं पुरू?

"तोफेच्या मागच्या भागात," कुझ्नेत्सोव उत्तरला. "मी दावलात्यानच्या तोफांवर जातो."

दुसऱ्या पलटणीच्या मोर्चांच्याही पुरत्या चिंध्या उडाल्या होत्या, तिथे तोफगोळ्यांनी व बाँबनी मोठमोठी खिंडारे पाडली होती. तोफगोळ्यांच्या कवचांचा जमिनीवर एवढा जाड थर बसला होता की, चालताना त्यांचा पायांखाली चुरा होत होता. मोर्चाचे अस्तित्व राहिले नव्हते. त्या ठिकाणी एके वेळी तोफेचा मोर्चा होता हे सांगणाऱ्या, भाजून निघालेल्या बांधाच्या खुणा शिल्लक उरल्या होत्या, तोफगोळ्यांची रिकामी टोपणे विखुरली होती आणि कुझ्नेत्सोव जी तोफ डागत होता तिची स्प्रिंग तुटलेली नळी थंडगारपणे विसावत होती. त्या तोफेमागच्या चरात संदेशवाहक स्यातोवबरोबर कुझ्नेत्सोवने प्रथम जेथे आडोसा घेतला होता तेथे सरळ स्फोट होऊन मोठा खड्डा पडला होता. टेलिफोनच्या तुटलेल्या तारेत त्याचा पाय अडकला आणि चालताना त्याच्याबरोबर फरपटत येणारा तिचा प्रतिकारविहीन लुळेपणा त्याला विलक्षण दारुणतेने खूप काही अर्थ सांगून गेला.

सर्वांत महाभयानक जाणीव झाली होती ती त्या दिवसभराच्या लढाईतील अनुभवांची नव्हे, तर या अचानक लादलेल्या एकटेपणाची, या खाऊन टाकणाऱ्या नि:स्तब्धतेची! जणू एखाद्या उकरलेल्या स्मशानभूमीवरून तो चालत होता आणि त्याच्याशिवाय सबंध जगात जणू कुणीही जिवंत राहिले नव्हते.

उखानोवला पाहण्याच्या व त्याचा आवाज ऐकण्याच्या इच्छेने तो घाईघाईने चुबारिकोवच्या तोफेकडे परत आला. काय करायचे आणि कोणत्या क्रमाने करायचे हे त्यांना ठरवायला पाहिजे होते. त्यांना तोफगोळे हलवायला पाहिजे होते, टेहळणी मोर्चाशी संपर्क साधायला पाहिजे होता, झोयाला शोधायला पाहिजे होते, तिच्याबद्दल आणि आडोशामधील जखमींबद्दल चौकशी करायला पाहिजे होती, दावलात्यानची व इतरांची खबर घ्यायला पाहिजे होती.

रणगाड्याच्या जळून खाक झालेल्या धुडाशी किंवा दारूगोळा ठेवण्याच्या तोफेच्या मागच्या भागात उखानोवचा मागमूस नव्हता. फाटलेल्या धातूमधून वारा जोरात घोंघावत होता आणि ताज्या उकरलेल्या मातीच्या ढिगावर रोवून ठेवलेले फावडे त्याच्या संपूर्ण एकाकीपणाचा आणखी पुरावा देणारे प्रतीक होते.

"उखानोव!"

उत्तर आले नाही. कुझ्नेत्सोव अधिक मोठ्यांदा पुन्हा ओरडला.

"उखानोव! माझ्या आवाज तुला ऐकू येतोय?"

खंदकाच्या बांधापलिकडून त्याला प्रतिसाद आला.

"लेफ्टनंट, इकडं या. लौकर, इकडं या!"

पांगळ्या पडलेल्या तीन रणगाड्यांच्या दिशेने कुझ्नेत्सोवने धाव घेतली. स्फोटांच्या खड्ड्यांभोवतालच्या बर्फाच्या उंचवट्यांवरून उड्या मारीत जाताना सर्वांत दूरच्या रणगाड्याच्या पलिकडे वाकलेली, दूरच्या आगींच्या पार्श्वभूमीवरची सार्जंटची छाया त्याला दिसली.

"काय आहे? उखानोव, तू काय पाहिलंस?" त्याने धापा टाकीत विचारले.

"लेफ्टनंट, मला वाटतं तिथं कुणीतरी जिवंत आहे."

रणगाड्याच्या पट्टेरी रुंद चाकावर आपली टॉमीगन जय्यत रोखून उभ्या असलेल्या उखानोवची आकृती त्या धूसर प्रकाशात त्याला स्पष्ट

दिसत होती. त्याच्या पायाशी उघडपणे जर्मन बनावटीची दिसणारी वाटोळी कातडी पिशवी पडली होती. उखानोवने आपले हातमोजे जाकीटाच्या पुढच्या खिशात कोंबले होते व बोटांना ऊब आणण्यासाठी तो त्यांच्यावर फुंकरी मारीत होता. आपल्या डोळ्यांच्या कोपऱ्यांमधून त्याने कुझ्नेत्सोवकडे एक ओझरता कटाक्ष टाकला.

"तिकडे पहा. आणि ऐका... होय, तिथं लेफ्टनंट. त्या उंचवट्यावर मोडून पडलेल्या दोन गाड्या पहा. तुम्हाला काही दिसतं?"

"काहीही नाही! पण मला इंजिनाचा आवाज ऐकू आल्यासारखं वाटलं."

"बरोबर! आता पहा! तो टॉर्च पेटतोय पहा! पाहिलात?"

तो विजेरीचा उजेड असावा किंवा लायटरची ज्योत असावी, पण त्या टेकाडाच्या टोकावर बंद पडलेल्या दोन धूडांच्यामध्ये प्रकाश चमकताना दिसत होता हे मात्र खरे होते. मग काहीतरी हलल्यासारखे वाटले. अंधुक उजेडात एकदम अनेक आकृती स्तेपमध्ये उभ्या असलेल्या दिसल्या. त्या काहीतरी लांब व काळे असे उचलून नेत होत्या. ज्या क्षणी त्या सावलीतून बाहेर आल्या त्या क्षणी उजळलेल्या आकाशाच्या प्रकाशात त्या स्पष्ट दिसल्या.

"होय, ते हूण आहेत खरं," कुझ्नेत्सोव अस्पष्ट आवाजात म्हणाला.

"लेफ्टनंट, तिथं काहीतरी भानगड आहे," उखानोव परत म्हणाला. "मला सर्व काही नीटसं समजत नाही. आपण काय करू या? माझ्याजवळ गोळ्यांची अख्खी थाळी आहे आणि ही टॉमीगन बेटी मोठी मस्त आहे." उखानोवचे डोळे कुझ्नेत्सोवच्या चेहऱ्याशेजारी पाऱ्यासारखे चमकले. "आपण त्यांना आणखी थोडं जवळ येऊ देऊ या आणि मग त्या सगळ्यांची पार चटणी करू या. सगळे मिळून फार तर दहा असतील."

"गोळ्या झाडू नको!" कुझ्नेत्सोवने उखानोवचा हात त्याच्या सबमशिनगनवरून मागे खेचला. "थांब! ते काय करताहेत ते पाहू या. ते शुश्रूषा पथकातले ऑर्डर्ली असावेत किंवा मूठमाती देणाऱ्या पथकातले असतील. आपल्या मेलेल्या सैनिकांचा ते शोध करताहेत असं वाटतंय."

पुन्हा एकदा तो झाकलेला दिव्याचा झोत टेकाडावर मंदपणे चमकला, मग इंजिन सुरू झाले आणि टेकाडाच्या टोकावरून डाव्या अंगाला काटकोनी आकृती आपली पट्टेरी चाके चोरटेपणे घाशीत सरपटत निघाली. त्या अंधुक आकृती परत बर्फावर दिसल्या, वाहनापर्यंत त्यांनी काहीतरी उचलून नेले व गाडीत ठेवले.

रणगाड्याच्या चाकावर ओणवा उभा राहून उखानोव स्तेप निरखीत होता आणि त्याच वेळी हातांना ऊब आणीत होता.

"मुडदे उचलणारे वाटतात खरं. आपले मेलेले लोक उचलताहेत," तो खात्रीशीरपणे म्हणाला. "मग, आपण काय करायचं लेफ्टनंट?"

कुझ्नेत्सोवने कपाळाला आठ्या घालीत कानोसा घेतला. पुन्हा सारे काही शांत झाले होते. ते जर्मन आणि त्यांचे वाहन सुमारे तीनशे मीटर अंतरावर होते.

"गोळ्या झाडू नको," थोड्याशा डळमळीत सुरात पुन्हा तो म्हणाला. "शुश्रूषा पथकातले लोक किंवा मुडदे उचलणारे! ते काही रणगाडे नव्हेत. त्यांना करू दे त्यांचं काम." क्षणभर तो विचार करीत उभा राहिला. "जहन्नम्मध्ये गेले ते! उगीच काही कारण नसताना आपण गोळीबाराची घाई करायची नाही. परत तोफेकडं जाऊ या."

"तुम्ही संधी गमावताय! आपण इथं आहोत याचा त्यांना अजिबात पत्ता नाहीय! दोन फैरी आणि ते सगळे खतम! आपण छान दबा धरून आहोत. मग उडवू या? कसं काय?" उखानोवने डोळा घातला. "त्यांची शोधाशोध थांबवून टाकू."

"गोळ्या झाडू नको म्हणून सांगतो ना! मुडदेफरास पथकावर गोळ्या झाडण्यात काय अर्थ आहे? दोघांना तू टिपशील–पण त्यानं तुला काय मिळणार? आपल्याजवळ आधीच दारूगोळा कमी आहे. लढाई संपली असं तुला वाटतं काय? तिकडं खेड्याकडं नजर टाक. आणि तुझ्या मागंसुद्धा!"

"ठीक आहे, दंगलीच्या कायद्याची कलमं वाचून दाखवायचं काही कारण नाही लेफ्टनंट."

जाकीटातले हातमोजे उपसून काढताना कुझ्नेत्सोव ज्या दिशेला लक्ष वेधीत होता तिकडे उखानोवने साधा कटाक्षही टाकला नाही किंवा

समोरच्या अर्ध्या जळलेल्या खेड्याकडे आणि उजवीकडे, किंवा त्यांच्या मागच्या जर्मनांनी काबीज केलेल्या उत्तर किनाऱ्याकडेही त्याने पाहिले नाही.

"तुमचं म्हणणं मला समजलं," समजुतीच्या सुरात तो म्हणाला आणि त्याने हातमोजे चढवले. "माझी लूट पाहिलीत का?" आपल्या जाकीटाभोवती बांधलेल्या रुंद पट्ट्यावरील दोन जर्मन पिस्तुलांवर त्याने थापट्या मारल्या आणि ती वाटोळी प्रवासी बॅग त्याने उचलली. "मोडलेल्या गाडीत सापडली. तिच्यातल्या धुरकट सॉसेजेसचा वास येतोय. त्यांचा काही आपल्याला त्रास होणार नाही. आणि लेफ्टनंट, हे तुमच्या शौर्याबद्दल! तुमच्या तोफेच्या कमांडरकडून भेट म्हणून घ्या."

उखानोवने पट्ट्याचे बक्कल सोडले व भलीमोठी चकाकणारी पिस्तुलाची चामडी पिशवी काढायला त्याने सुरुवात केली. पण कुझ्नेत्सोवने त्याला अडवले.

"आपल्या माणसांपैकी कुणाला तरी दे. माझ्याजवळ आधीच एक आहे." आपल्या मोठ्या कोटाच्या फुगलेल्या खिशावर हात मारीत त्याने म्हटले आणि मानवी घामासारखा वास येणाऱ्या तेलाचा वास त्याला आठवला. "पिछाडीला कारकुनांना ते असल्या भेटी देतात. तेव्हा चल आता."

उखानोव शांतपणे मनापासून हसला.

"खरं सांगतो, अगदी आजपर्यंत माझी समजूत होती की, तुम्ही बायकी, शिकलेल्यांच्या जातीतले आहात. तुम्ही काही वेळा लाजता, होय की नाही? पण साला तुमच्यात पीळ आहे! कुठून आला एवढा कणखरपणा? आत्ता कुठं शाळेचं शिक्षण संपवून बाहेर पडलाय ना?"

"उखानोव, तूच पुन्हा सारी बडबड कर. हे सारं मी पूर्वी ऐकलंय. माझ्या आयुष्याची कहाणी मी तुला सांगावी अशी तुझी इच्छा आहे?"

"प्रश्नाचं उत्तर द्या–तुम्ही सरळ शाळेतून आलात का कॉलेजात गेला होता? आपण शिकत असताना वेगवेगळ्या तोफखान्यात होतो. मी तुम्हाला फक्त लांबून पाहिलं होतं."

"शाळेतून आलो. तुझ्यासारखंच की नाही?"

"नाही लेफ्टनंट. मी शाळेत फक्त सातवीपर्यंत शिकलो आणि नंतर बाहेर पडलो. मी नॅट पिंकरटन आणि शेरलॉक होल्म्सबद्दल खूप वाचायचा नि मला संधी मिळाली. मला लेनिनग्रादमध्ये गुप्त पोलिसात नोकरी मिळाली. काकाचा वशिला! तोसुद्धा तिथं नोकरीला होता. बेटं मस्त मजेदार आयुष्य होतं. आम्ही एक धाड घातली तेव्हा हाणामारीत माझा हा दात पडला."

"ऐकायला मजेदार वाटतं खरं!"

"खरंच होतं तसं. लाखात असं काम मिळायचं नाही. माझी अनेक गुंडांशी, मवाल्यांशी आणि चोरांशी गाठ पडायची. त्या जगाची तुम्हाला फारशी माहिती नाही. काहीवेळा जिवावर बेतलं, पण मला ते धाडसी आयुष्य आवडायचं. ते आयुष्य तुम्हाला अद्भुत वाटेल."

"होय, बरोबर आहे. प्रशिक्षणाच्या शाळेत कुठं बिघडलं? तुला त्यांनी कमिशन का दिलं नाही?"

उखानोव हसला. "विश्वास ठेवा अगर ठेवू नका, पण पासिंग आऊट परेडच्या आधी मी चोरून दांडी मारली होती आणि मी परत येत असताना नेमका बटालियन कमांडर समोर आला. चौकीदाराच्या घराच्या जवळच्या पहिल्या संडासची खिडकी आठवते? तर मी तिच्यातून आत चढत होतो नि तिथंच मेजर टमरेल घेऊन बसलेला..."

"तू दांडी मारायला वेळ पण नामी शोधून काढलीस!"

"हे बघा लेफ्टनंट, असे बालिश प्रश्न आता विचारू नका. मी दांडी मारली, बस्स! पण त्यातली विनोदी बाजू तुम्ही पाहता की नाही? मी त्या खिडकीतून आत आलो आणि गपचूप पळून जाण्याऐवजी मेजरला त्या अवस्थेत बसलेला पाहून खो खो हसत सुटलो. तो माझ्याकडे टवकारून पहात होता आणि मी खिडकीच्या तावदानाशी बसून बरगड्या दुखेपर्यंत हसत होतो. मग मात्र अर्थात चांगलाच गोंधळ माजला. त्यानं पलटणीचा उपप्रमुख द्रोझ्दोवस्कीला झोपेतून उठवलं आणि द्रोझ्दोवस्की सगळ्याच बाबतीत उपप्रमुख म्हणून अगदी नमुनेदार होता. आमची चौकीपर्यंत पळत धिंड निघाली. विश्वास बसत नाही ना?"

"नाही." "तो ठेवणं अथवा न ठेवणं तुमच्यावर अवलंबून आहे." उखानोवचा खोटा दात त्याच्या स्मिताबरोबर चमकला.

## प्रकरण सतरावे

तोफेशेजारच्या खंदकामधून एक भेदरलेली आरोळी आली: "थांबा, कोण आहे ते? मी गोळी झाडीन..."

"खुशाल झाड, पण जरा लौकर," उखानोव उपहासाने म्हणाला आणि तोफेच्या चाकांच्या मध्ये त्याने तोफगोळयांचा खोका आदळला. "'थांब, कोण चाललंय तिकडं!' असं ओरडलं पाहिजे चिबिसोव. आणि जरा मोठ्यांदा ओरड. त्यांचे पाय थरथर कापले पाहिजेत. चल, तुझी आरोळी परत ऐकू या!"

"म... म... मला शक्य नाही... शक्य नाही कॉम्रेड सार्जंट... ते गोळ्या झाडताहेत. शप्पत!" हुडहुडी आणि हुंदका यांचे मिश्रण झाल्याच्या आवाजात चिबिसोव खंदकातून पुटपुटला. "मी आत्ता काडी पेटवीत होतो आणि—बापरे!—थेट माझ्या डोक्यावरून बांधावर! आणि कसली फैर ती!"

"कुठून गोळ्या झाडताहेत ते?" कुझ्नेत्सोवने कणखरपणे विचारले. खंदकाजवळ येऊनही कुझ्नेत्सोवला चिबिसोव नीटसा दिसत नव्हता.

चिबिसोव खंदकाच्या भिंतीला पालीसारखा चिपकला होता व त्याची अंधुक आकृती सरकताना दिसत होती. स्वतःलाच चीड आणणाऱ्या हुकमी आवाजात कुझ्नेत्सोव ओरडला,—"कशासाठी स्वतःला मातीत खुपसून घेतोयस चिबिसोव? दुर्बीण लावूनही तू मला दिसत नाहीस. बाहेर नीघ तिथून! नेचायेव कुठं आहे?"

"कॉम्रेड लेफ्टनंट, मी नजर ठेवून होतो. नेचायेव आडोशात आहे... ते सगळे तिथं आहेत. झोया, रूबीन... कशाबद्दल तरी बोलताहेत. दुसऱ्या किनाऱ्यावरून आपल्यावर गोळीबार होतोय. मी माझा लायटर नुसता पेटवला आणि गोळी सू सू करीत बांधावरच्या मातीत घुसली. डोकं सारखं खाली ठेवलं पाहिजे. नेम नाही कधी गोळी..."

"चिबिसोव, बारीक लक्ष ठेव!" कुझ्नेत्सोवने आज्ञा केली. "पण खंदकाच्या तळाशी बसून नव्हे, समजलं? जर काही घडलं तर इशारा म्हणून तुझ्या बंदुकीतून एक गोळी उडव आणि सरळ आडोशात ये! मी सांगितलेलं पुन्हा म्हणून दाखव!"

"जर काही घडलं तर मी बंदूक झाडायची कॉम्रेड लेफ्टनंट."

"आणि झोपू नको! उखानोव, चल आडोशात जाऊ या!"

सुळक्यावर खोदलेल्या मातीच्या पायऱ्यांवरून ते निघाले. क्षितिजावरच्या आगींच्या प्रकाशाने नदीच्या बर्फाला हलकासा किरमिजी रंग चढला होता.

आडोशाच्या खंदकाचे दार एका वस्त्राने झाकले होते. माणसांच्या श्वासांची गरम हवा व हलक्या आवाजातली कुजबुज त्यामागून येत होती. झोयाचा आवाज कुझ्नेत्सोवने चटकन ओळखला. क्षणभर त्याचे अंग शहारले आणि डोळे मिटून ती त्याला कशी बिलगली होती, तिचे सारे शरीर रक्षणाची कशी मागणी करीत होते ते त्याला आठवले. अद्याप त्याला तिचे चिखलाने माखलेले गुडघे दिसत होते. ते जणू मरणापूर्वीचे अखेरचे क्षण भासले होते, त्या स्वयंचलित तोफेने जेव्हा त्यांना हेरले होते तेव्हा अजाणतेपणे, आत्मप्रेरणेने, त्याने आपल्या शरीराने तिचे शरीर झाकले होते व उडणाऱ्या स्फोटांच्या कपचांपासून तिला इजा होऊ नये म्हणून तिच्यासाठी मरायला तो तयार झाला होता. त्या क्षणाला आपल्याला काय झाले होते आणि विशेषत: तिला काय वाटले होते त्याबद्दल अगदी आत्तासुद्धा अत्यंत पुसट कल्पना होती. कदाचित अतिप्राचीन काळापासून चालत आलेली ती प्रवृत्ती असावी. कदाचित वंश चालत रहावा म्हणून प्रसंगी आत्मसमर्पण करून बाईचे रक्षण करण्याची पुरुषाची ही अदम्य, अंत:करणात खोलवर रुजलेली स्वयंप्रेरणा असावी.

आत जाण्यापूर्वी क्षणभर कुझ्नेत्सोवने मनात कल्पना केली की, तो आणि उखानोव आत जातील तेव्हा आता तिचा चेहरा कसा दिसेल, तिच्या डोळ्यांमध्ये आता कोणते भाव दिसतील. कपाळाला आठ्या घालीत त्याने दारावरचे वस्त्र बाजूला केले.

आवाज एकदम विरले. कुणीतरी घोगऱ्या आवाजात खोकले.

"पडदा नीट ओढून घे... पलिकडे लपलेले शत्रू आमच्यावर गोळ्या झाडताहेत."

आडोशामध्ये गारवा आणि ओल होती. ओल्या भिंतींवर पेट्रोलची ज्योत निळसर प्रकाश टाकीत होती. तात्पुरत्या तयार केलेल्या त्या

चुरचुरणाऱ्या दिव्याभोवती ऊबेसाठी झोया, नेचायेव आणि रूबिन अंगाच्या मुटकुळया करून बसले होते. त्या सर्वांच्या नजरा एकदम कुझ्नेत्सोवकडे वळल्या.

सार्जंट नेचायेव झोयाशेजारी ओणवा बसला होता आणि त्याचे कोपर जवळ जवळ तिच्या गुडघ्यांना स्पर्शत होते, त्याने आपल्या कोटाची बटणे मोकळी टाकली होती व त्याचे खलाशी गंजिफ्रॉक त्यातून उघडे दिसत होते. त्याने झोयाकडे नजर टाकली व त्याच्या मिशांखाली मुलामेदार हसू चमकले. "झोया, लाडके, बघ तुझे लेफ्टनंट आले एकदाचे!"

तोफगोळ्यांच्या रिकाम्या खोक्यावर बसलेला ड्रायव्हर रूबिन एकाएकी आपली भक्कम बोटे दिव्याच्या ज्योतीवर शेकण्यात कमालीचा गुंतला. नेचायेवच्या बोलण्यावर जणू आपला विश्वास बसला नाही अशा तऱ्हेने झोयाने पटकन डोके वर उचलले तेव्हा तिच्या नजरेत काळजी उमटली होती, पण नंतर ती हळूच हसली आणि तिने सुटकेचा निश्वास टाकला. ते दोघे तोफ चढवून एकत्र डागीत होते तेव्हा तिच्या चेहऱ्यावर जे भाव होते, त्यांचा आता मागमूसही नव्हता. तिचा चेहरा आणखी बारीक झाला होता, जवळ जवळ रोड दिसत होता. तिच्या डोळ्यांखाली वर्तुळे उमटली होती आणि खूप चावल्याप्रमाणे तिचे ओठ काळे व खरबरीत झाले होते. त्या ओठांचे कदाचित आता कुणीही चुंबन घ्यायला धजावणार नाही असा विचार कुझ्नेत्सोवच्या मनात पटकन चमकून गेला. काय झाले तिच्या ओठांना? नेचायेव तिच्याकडे अशा नजरेने का पहात होता?

"दोस्तांनो, तुम्ही परत आलात हे किती छान झालं!" आपला आनंद लपविण्याचा प्रयत्न न करता ती हसत म्हणाली. "तुम्हा सगळ्यांना पहावंसं वाटत होतं. तुम्हाला जिवंत पहायची इच्छा होती. परमेश्वराची कृपा, तुम्ही सुखरूप आलात. एवढा सारा वेळ तुम्ही कुठं होता?"

"फार लांब गेलो नव्हतो. हूणांना जरा भेटायला गेलो होतो झोया. लेफ्टनंटनी आणि मी जर्मन चौक्या तपासल्या," उखानोव उत्तरला आणि त्याने ती वाटोळी प्रवासी बॅग खाली टाकली. तिचे बर्फाचे थर बसलेले निकेलचे चाप दिव्याच्या उजेडात चकाकले.

"मंडळी, ही घ्या आपली पहिली लूट. नेचायेव[1], ताडपत्री पसर! तुम्ही सारे अख्खा घोडा खाल असं मी पैजेवर सांगतो. आपल्या परमप्रिय सार्जंट-मेजरला आघाडीवरून सप्रेम नमस्कार! साला थेरडा तिथं बॉयलरवर बसून आपल्या बिल्ल्यांशी खेळत बसला असेल आणि आपल्या आठवणी काढीत असेल!"

नेचायेव हसला, पण झोयाचे हास्य विरले आणि आपले ओठ चावीत तिने कुझ्नेत्सोवकडे नजर टाकली. तिच्या चेहऱ्यावर अनुकंपा आणि काळजी यांचे मिश्रण झाले होते. आपल्या जांभळट चेहऱ्यावर गंभीर भाव ठेवून रूबिन आपले भलेमोठे पंजे अजूनही शेकत होता. त्याचे नाक श्वासाबरोबर फुरफुरत होते.

"लेफ्टनंट," झोया हलक्या आवाजात म्हणाली. तिच्या आवाजा-पेक्षा तिच्या रोड चेहऱ्यावरील मोठे डोळेच अधिक बोलत होते. तिने मानेने त्याला जवळ येण्याची खूण केली. "कृपा करून माझ्याजवळ येऊन बसा मला तुमच्याशी काही बोलायचंय. नाही," तिने पुन्हा ओठ चावून चूक दुरुस्त केली, "तुमच्यासाठी एक चिठी आहे. दावलात्याननं दिलीय. त्यानं मला ती तुम्हाला द्यायला सांगितली. काल संध्याकाळी मी तुमच्याजवळ येऊन ती देऊ शकले नाही, कारण मला जखमींना सोडून जाता येत नव्हतं. सुदैवानं माझ्या मदतीला रूबिन मिळाला. लेफ्टनंट, आपण खरंच घेरले गेलो आहोत का?"

त्याने ती चिठी घेतली व तिच्या प्रश्नाला उत्तर देण्याऐवजी विचारले, "झोया, तो कसा आहे? शुद्धीवर आहे?"

"अर्धा या जगात आणि अर्धा दुसऱ्या," रूबिन गंभीरपणे पुटपुटला. "तो सारखा तुम्हाला विचारीत होता. तुम्हाला काही सांगायचंय म्हणतो."

लढाईच्या सुरुवातीलाच दावलात्यानला झालेली जखम प्राणांतिक होती. झोयाकडे एक कटाक्ष टाकल्यानंतर त्याला जाणवले की, त्याची अवस्था निराशाजनक आहे. काळजीपूर्वक त्याने चिठी उलगडली. कॉपिंग पेन्सिलने ती खरडलेली होती.

"खाजगी. लेफ्टनंट कुझ्नेत्सोवला लेफ्टनंट दावलात्यानकडून. कोल्या, मला इथं घायाळ अवस्थेत सोडू नको. मला विसरू नको. माझी तुला ही खास विनंती आहे. आणि पुन्हा जर आपली नजरभेट झाली नाही,

तर माझ्या छोट्या कोटाच्या डाव्या खिशात कम्सोमोलचं कार्ड आहे आणि त्याबरोबर सही केलेला एक फोटो व दोन पत्ते आहेत. आईचा आणि तिचा. त्यांना लिही. काय सांगायचं ते तुला माहीत असेल. पण भावनावशता मात्र नको! बस्स! मी काहीच साध्य करू शकलो नाही. मी अपयशी ठरलो. सदैव तुझा, दावलात्यान."

झोया उभी राहिली. अर्धवट हास्याने तिचे ओठ विलग झाले.

"दोस्तांनो, आपली स्वतःची नीट काळजी घ्या. मला जखमींकडं गेलं पाहिजे.

"झोया," कुझ्नेत्सोव गंभीरपणे म्हणाला व ती चिठी खिशात सारीत तिच्यापाठोपाठ दाराकडे गेला. "मी पण तुझ्याबरोबर येतो. मला दावलात्यानकडं घेऊन चल."

आडोशातून ते बाहेर गेले तेव्हा कुणीही काहीही बोलले नाही.

•

"झोया, दावलात्यान कसा आहे? मी त्याच्याशी बोलू शकतो का?"

"आत्ता नाही. मला तुला सांगायचं होतं... जेव्हा तो शुद्धीवर येतो तेव्हा तू जिवंत आहेस किंवा नाहीस ते विचारीत राहतो. तुम्ही दोघे एकाच प्रशिक्षण शाळेत होता काय?"

"होय. पण काही आशा आहे काय? तो जगेल का? त्याला जखम कुठं झालीय?"

"सर्वांत वाईट जखम त्याला झालीय. डोक्यात आणि मांडीत. त्याला मेडिकल बटालियनमध्ये ताबडतोब नेलं नाही, तर त्याचा फार वाईट शेवट होईल. इतरांचीही तशीच अवस्था आहे. मी त्यांच्यासाठी आणखी काहीही करू शकत नाही. मी अगदी अगतिक आहे! मला त्यांना खोटं सांगावं लागतंय आणि गाड्या लौकरच येतील असं मी त्यांना सांगतेय. पण मला वाटतं की, आपला आपल्या सैन्यापासून पुरता संबंध तुटलाय. मेडिकल बटालियन कुठं आहे कुणाला ठाऊक?"

"टेहळणी मोर्चाचा कुठं काही संपर्क आहे का?"

"नाही, काहीही नाही. रेडिओवरून संपर्क साधायचा ते प्रयत्न करताहेत. मला ते ठाऊक आहे. द्रोझ्दोवस्कीबरोबर संदेशवाहक आहेत.

मी चुबारिकोवच्या तोफेकडं धावल्यानंतर तू कुठं होतास लेफ्टनंट? रणगाड्यानं तिला चिरडलं तेव्हा तू पाहिलं?"

"तू पाहिलंस ते मला ठाऊक नव्हतं."

"विसरून जा ते लेफ्टनंट. मलाही काहीसुद्धा आठवत नाही. माझे पाय थरथर कापत होते. होय, आणि मला वाटतं मी माझ्या जर्मन पिस्तुलाबाबतही काहीतरी म्हणाले. अर्थात तो माझा सगळाच मूर्खपणा होता. माझ्यावर आणि दुसऱ्यांवर राग काढण्यासाठी मला शंभर वर्षं जगायचंय आणि दहा मुलांना जन्म द्यायचाय. नुसती कल्पना कर, पांढुरक्या केसांची, नकट्या नाकाची, सबंध तोंडभर पेज बरबटलेली टेबलाभोवतालची दहा इवलाली बाळं!"

"झोया, तुला थंडी वाजतेय ना? चल, जाऊ या. असं उभं राहणं ठीक नाही."

"लेफ्टनंट, खार्कोवहून माघार घेताना मला जखमींना मागं टाकावं लागलं. मला अजून त्यांचे आवाज कानात ऐकू येतात, त्यांच्या विनवण्या ऐकू येतात..."

"झोया, हे काही खार्कोव नव्हे. आपण इथं कोंडी फोडायचा प्रयत्न करणार नाही. त्यात काही अर्थही नाही. आपल्याकडं फक्त सात तोफगोळे शिल्लक आहेत. तेव्हा कुणीही कुणाला मागं टाकणार नाही. त्याबद्दल तुला विचार करण्याची गरजसुद्धा नाही."

सुळक्याच्या टोकावर जाण्याच्या नमदी बुटांच्या वर्दळीने तयार झालेल्या अरुंद वाटेवर आडोशापासून वीस पावलांवर ते थांबले होते.

"इथं मरणाची थंडी आहे," तो म्हणाला. "तू नक्की गारठली असणार."

"नाही नाही, केवळ मानसिक ताण होता. त्यांना मागं टाकावं लागणार नाही या कल्पनेनंच मला आता खूप बरं वाटायला लागलंय. आपल्याला जायला कुठंही वाव नाही, होय ना? असंच तू आत्ता म्हणाला ना?"

आपले थडथड वाजणारे दात आवरायचा प्रयत्न करीत तिने कोटाची कॉलर उलट केली व दूर शत्रूने व्यापलेल्या किनाऱ्यावर कुझ्नेत्सोवच्या खांद्यापलिकडून नजर टाकली. मेंढकातडी कोटामुळे अरुंद दिसणारा तिचा पांढुरका फिकट चेहरा, तिच्या भुवयांचे लांबलचक पट्टे आणि

विचित्र दिसणारे काळे डोळे कशाचा तरी प्रतिकार करीत आहेत असे वाटत होते, त्यांच्यात विलक्षण थकलेपण व्यक्त होत होते आणि यातनांची गहिराई जाणवत होती.

"मला पुन्हा एकदा जखमींना मागं टाकायची इच्छा नाही. मी तसं करणार नाही... त्यापेक्षा दुसरं भयंकर काहीही नाही."

कुझ्नेत्सोवच्या अंगातून एक शहारा गेला आणि तोफखान्याला जर्मनांनी वेढा घातला आहे व एकमेकांना हुकूम देत धावत ते साखळी आवळत आहेत असे एक चित्र त्याच्या मन:पटलावर उमटले; जिथे जखमींना ठेवलेले आहे त्या आडोशामध्ये जर्मन घुसतात, आणि आपले पिस्तूल काढायलाही अवधी न मिळालेली झोया हात पसरत मागच्या कोपऱ्यात सरकत जाते व जणू ती क्रूसावर चढवली जात आहे असे भासते, असे दृश्य त्याच्या मनासमोर तरळले. त्याने खालच्या सुरात विचारले, "मला सांग, तुला गोळी कशी झाडायची माहीत आहे ना? तुला पिस्तूल किंवा टॉमीगन हाताळता येते?"

तिने चटकन त्याच्याकडे कटाक्ष टाकला व ती चमत्कारिक हसली.

"पण अगदी वाईट पद्धतीनं! आणि लेफ्टनंट, तोफेशेजारी तू मला तसं आपल्या मिठीत का घेतलंस? मी घाबरले होते तेव्हा? माझं तुला रक्षण करायचं होतं म्हणून ना? थँक्स लेफ्टनंट. मी फारच घाबरले होते."

"माझ्या त्यावेळी ते लक्षात नाही आलं."

"एक मिनिट हं!" आपल्या ओठांवर येणारी कोटाची कॉलर तिने बाजूला केली. "मी चुबारिकोवच्या तोफेकडं गेल्यावर काय घडलं?"

"सेरगुनेन्कोव मारला गेला."

"सेरगुनेन्कोव? तो लाजरा तरुण मुलगा–ड्रायव्हर? एक मिनिट, मला काहीतरी आठवलं. आम्ही इकडं येत असताना रूबिननं मला काहीतरी भयंकर हकिकत सांगितली. 'सेरगुनेन्कोव आपल्या मरणाबद्दल कुणालाही माफ करणार नाही, अगदी दुसऱ्या जगातसुद्धा!' याचा अर्थ काय?"

"कुणालाही माफ करणार नाही?" कुझ्नेत्सोवने परत तेच शब्द उच्चारले आणि त्याने मान फिरवली. ओल्या खरखरीत कागदाप्रमाणे

त्याची बर्फाने माखलेली कॉलर गालाला घासत होती. "त्यानं ते कशाला सांगितलं तुला?"

होय, त्याबद्दल मीही दोषी आहे आणि मी स्वतःला कधीही क्षमा करणार नाही, त्याच्या मनात विचार येत होता. त्याला थांबवण्याची माझ्यात इच्छाशक्ती असती तर किती बरे झाले असते! पण त्याच्या मरणाबद्दल मी तिला काय सांगणार? एकदा सुरुवात केली म्हणजे सारे काही तिला समजावून सांगावे लागेल. तोफखान्याची दोन तृतीयांश माणसे मेलेली असताना या घटनेला मी एवढे महत्त्व कशाला चिकटवावे? तरीही मला तो प्रसंग विसरता येत नाही!

"सेरगुनेन्कोवच्या मरणासंबंधी बोलण्याची माझी मुळीच इच्छा नाही," तो ठामपणे म्हणाला. "त्यात काही तथ्य नाही."

"देवा रे, तुम्हा साऱ्यांबद्दल मला किती वाईट वाटतं," ती अस्पष्ट आवाजात म्हणाली.

सदैव वेदनेने आणि अनुकंपेने भरलेला तिचा आवाज जेव्हा त्याने ऐकला तेव्हा त्याला स्वतःलाच आश्चर्य वाटले की, ही मुलगी द्रोझ्दोवस्कीवर प्रेम कसे करू शकते? तिला एकूण सर्वांबद्दलच – त्यात त्याचाही समावेश होता – अनुकंपा वाटत होती. काही कारणाने फाटलेले व सुजलेले तिचे ओठ प्रत्यक्षात त्याला कधी स्पर्शले असतील का? बघायलासुद्धा तिटकारा वाटणाऱ्या द्रोझ्दोवस्कीच्या थंडगार, कठोर डोळ्यांकडे तिचे कधीसुद्धा लक्ष गेले नसेल हे कसे काय शक्य आहे?

"लाडक्या, असा माझ्याकडं रोखून पहात काय राहिलायस?" ती अस्फुट उद्‌गारली आणि तिचा आवाज त्याला एखाद्या हळुवार लाटेसारखा वाटला. "तू असा काही सतत टक लावून मला पहात राहिलायस, की जणू काही पूर्वी तू मला कधी पाहिलंच नाहीस."

तो घोगऱ्या आवाजात उत्तरला, "मी नंतर येऊन दावलात्यानला पाहीन. आणि मला तशी 'लाडक्या' म्हणून हाक मारू नको. माझ्याबद्दलही तुला दया वाटते? मी जखमी झालो नाही किंवा ठारही झालो नाही. आणि मूर्खासारखं किंवा अर्थशून्य मरण्याची माझी मुळीच इच्छा नाही."

"लेफ्टनंट, मरणाबद्दल काही हुशारी नांवाची चीज आहे काय? लाडक्या, तू जगावं आणि खूप काळपर्यंत जगावं असं मला वाटतं.

एकशेपन्नास वर्षं. आणि तुला एक बायको नि पाच मुलं असावी. असो! मी चलते आता, मला जखमींकडं गेलं पाहिजे... पण लेफ्टनंट, तू नेहमी माझ्याकडं असं का पाहतोस? कदाचित मी तुला थोडीशी आवडते का? माझ्या हे कधी पूर्वी लक्षातच आलं नाही!" ती त्याच्या अधिक निकट आली, आपल्या ओठांपासून तिने कॉलर दूर सारली आणि त्याच्याकडे प्रश्नार्थक चकित मुद्रेने ती पहात राहिली. "साऱ्या गोष्टी किती वेडगळ आणि चमत्कारिक आहेत नाही का रे कुझ्नेचिक!"*

"कुझ्नेचिक का म्हणतेस?"

"कुझ्नेत्सोव, कुझ्नेचिक... तुला कुझ्नेचिक आवडत नाहीत? मी जेव्हा त्यांचा आवाज ऐकते तेव्हा मला एकदम खूप बरं वाटतं.

माझ्या डोळ्यांसमोर छान उबदार रात्र उभी राहते, शेतात गवत पडलंय आणि तळ्यावर भलामोठा तांबूस चंद्राचा गोळा उगवलाय. आणि कुझ्नेचिकांची किरकिर चालू आहे."

नदीवरून येणाऱ्या थंडगार वाऱ्याने तिच्या मेंढकातडी कोटाची किनार उडवली. आपल्या पांढऱ्या हातमोजांच्या हातांनी तिने धरलेल्या लोकरी कॉलरवर तिचे हसरे डोळे चकाकले. तिच्या भुवया पांढऱ्या झाल्या होत्या, एवढेच नव्हे तर तिच्या पापण्यांच्या कडांवरही हिमाचा हलकासा थर बसला होता. ती अगदी आत हाडांपर्यंत गारठली असावी तसे तिचे दात वाजताहेत व खांदे कापताहेत असा पुन्हा कुझ्नेत्सोवला भास झाला. पण त्याला असे वाटत होते की, हा तिचा आवाज त्याच्याशी मुळी बोलतच नाही आणि तिथे उभे राहून तिचे थरथर कापणे चाललेलेच नाही. हे कुणीतरी दुसरेच वेगळ्या आवाजात त्याच्याशी गप्पा मारतेय आणि तिथे नदीतीर नाही, आकाश आगीने उजळलेले नाही, जर्मन रणगाडे नाहीत आणि डिसेंबरच्या त्या रात्री स्केटिंग रिंगवरून परत आल्यानंतर जणू तो पुढच्या दाराशी कुणाबरोबर तरी बोलतोय! छपरांवरचा बर्फाचा थर वारा जोरात उडवतोय आणि

---

*कुझ्नेत्स या मूळ शब्दापासून हे दोन शब्द झाले आहेत. कुझ्नेत्स म्हणजे लोहार. पण रशियन भाषेत कुझ्नेचिक म्हणजे टोळ अथवा नाकतोडा. – अनुवादक

बर्फाने झाकलेल्या कुंपणांशेजारच्या रस्त्यावरच्या दिव्यांना झोके देतोय व संबंध रस्त्यावर बर्फाचे चक्रीवादळ उटलेय... हे केव्हा घडले होते? कधी घडले होते का? त्यावेळी त्याच्याबरोबर कोण होते मग?

"तुला माझं चुंबन घ्यायचंय? मला वाटतं, तुला घ्यायचंय. तुला बहीण आहे का? कुझ्नेचिक, कदाचित आपण दोघेही मारले जाऊ."

"तू असं का बोलते आहेस? तू मला कोण समजतेस – लहान पोर? तू याला काय म्हणतेस – प्रेमचेष्टा किंवा आणखी काही?"

"प्रेमचेष्टा! मुळीच नाही!" आपल्या कॉलरखाली तिने आपले हसू दाबले. त्या कॉलरमागे तिने अर्धाअधिक चेहरा झाकला व तिचे डोळे विस्फारले. "बायका प्रेमचेष्टा पहिल्यांदा डोळ्यांनी सुरू करतात. प्रथम त्या तिरपे कटाक्ष टाकतात, मग आपल्या नाकांकडे नजर लावतात आणि मग आपल्या लक्ष्यावर नजरेचे बाण मारतात. जर तू लक्ष्य असशील... पण मी तसं करीत नाहीय, होय की नाही? लेफ्टनंट, तू आपल्या बहिणीसारखी माझी तोफेजवळ राखण करीत होतास. मला जाणवलं ते. तुला खरंच बहीण नाही का रे?"

तोफेशेजारी? जेव्हा आमच्या दिशेने रणगाडे चालून येत होते तेव्हा. आम्ही एकत्रपणे तोफ चढवत होतो. कासिमोव ठार झाला होता. ती माझ्याबरोबर होती, नंतर चुबारिकोवच्या तोफेवर रणगाड्याने धडक मारली तेव्हा ती तिकडे धावली. नंतर त्या मशिनगनने सेरगुनेन्कोवला जमिनीवर लोळवले... त्याच्या मोठ्या कोटातून धूर यायला लागला. मग द्रोझ्दोवस्कीचा विद्रूप चेहरा: "त्यानं ठार मरावं अशी माझी इच्छा होती असं वाटलं तुला?"

"नाही, तुझी गैरसमजूत झाली."

द्रोझ्दोवस्की! तू आणि द्रोझ्दोवस्की एकत्र अशी मी कल्पनाच करू शकत नाही! त्याने हे वाक्य जवळ जवळ मोठ्याने म्हटले, पण तिचा वर उचललेला, चौफेर न्याहाळणारा चेहरा एकाएकी एका लाल प्रकाशगोलकाने उजळला. तिचे रोखून पाहणारे डोळे, तिचे ओठ, तिच्या सुंदर पापण्यांची कड क्षणभर एवढी स्पष्ट उजळली की, काय घडले हेच त्याला एक सेकंद समजले नाही.

"लेफ्टनंट..." तिचे ओठ पुटपुटले. "जर्मन?"

त्याचक्षणी सुळक्याच्यामागे सबमशिनगनच्या फैरी उडाल्या. आकाशात पुन्हा प्रकाशगोलक उडाले. त्याने तोफ उभी होती तिकडे नजर टाकली आणि धुमश्चक्री परत सुरू झाली, जर्मनांनी गोळीबार सुरू केलाय आणि ही बहुधा सर्वांची अखेर आहे असे तिला ओरडून सांगावेसे त्याला वाटले, पण प्रत्यक्षात मात्र त्याच्या मनात होते त्यापेक्षा काहीतरी वेगळेच तो फाटलेल्या आवाजात ओरडला.

"आडोशाकडं पळ! ताबडतोब! लक्षात ठेव—मला कुणी बहीण नाही! मला कुणीही बहीण नाही. आणि मूर्खासारखं बरळू नको. मला कधीही बहीण नव्हती!"

तिला खोटे सांगून त्याने एका परीने स्वतःवर सूड उगवल्यासारखे केले आणि आपल्या या कृतीचा त्याचा त्यालाच तिरस्कार वाटून त्याने रस्त्यावरून निघण्यापूर्वी तिला जवळ जवळ दूर ढकलले. ती एक पायरी मागे खाली कोसळली. तिच्या चेहऱ्यावर चमत्कारिक भाव उमटला होता व ती अस्फुट आवाजात म्हणाली, "मला काय म्हणायचं होतं ते तुला समजलं नाही!"

पण एव्हाना तो सुळक्यावरच्या आडोशातील लोकांकडे धावत सुटला होता. त्याच्या डोक्यावर उडणाऱ्या गोळ्यांचा सू सू आवाज त्याला ऐकू येत होता, तर आगीच्या ज्वालांमध्ये खालचा नदीतला बर्फ नाचतो आहे असे वाटत होते. तोफेच्या मोर्चावरून छोटी बंदूक कडकडली. एक गोळी उडाली व पाठोपाठ दबती आरोळी उमटली. चिबिसोव इशारा देत होता.

म्हणजे ते हल्ला चढवीत होते तर! एकूण असे होते! आमच्या-जवळ फक्त सात तोफगोळे शिल्लक आहेत. फक्त सात...

कुझ्नेत्सोव आडोशात धावत गेला, दारावरचा पडदा त्याने बाजूला खेचला आणि पेट्रोलच्या दिव्याच्या उजेडात त्याला ताडपत्रीवर पावाच्या कापलेल्या फाकी दिसल्या व उखानोव, रूबिन आणि नेचायेव यांचे भेदरलेले डोळे त्याच्याकडे रोखून पहात होते.

"तोफ चढवा!" वरच्या पट्टीत तो ओरडला.

# प्रकरण अठरावे

इतर सारेजण आडोशामधून बाहेर यायची वाट पहात तो उभा राहिला. रात्रीला बाजूला सारून प्रकाशाचे हात आकाशाला पकडू पहात होते. छोटया बंदुकीतून अधीरपणे तिसरा बार उडाला. सबमशिनगन सतत फैरी उडवीत होत्या. चकाकणाऱ्या गोळयांच्या झुंडी सारा नदीतीर विंधून काढीत होत्या.

"लौकर! लौकर!" कुझ्नेत्सोवने अधीरपणे आज्ञा केली. "तीरावर चला! तोफेकडं!"

त्याच्या आज्ञेचा पुनरुच्चार करणारा उखानोवचा आवाज आडोशात घुमला आणि अद्याप आरामात चघळत बसलेले नेचायेव, रूबिन एकदम दचकले. उखानोवने स्वतः दिवा विझवला आणि सर्वांत शेवटी तो बाहेर आला. त्याच्याही तोंडात अर्धा तोबरा भरलेला होता आणि खांद्याला टॉमीगन लटकावताना त्याने जोरात शिव्या हासडल्या.

"च्यायला, एक घास खायला धड फुरसत देत नाहीत! लेफ्टनंट हे घ्या, थोडंसं चघळायला होईल!" त्याने कुझ्नेत्सोवच्या हाती सॉसेजचा एक घट्ट तुकडा दिला. "तोफ चढवा रे! जरा जोमानं काम करा!"

"चला! पळत चला!"

कुझ्नेत्सोवने तो तुकडा यांत्रिकपणे कोटाच्या खिशात कोंबला आणि मातीच्या पायऱ्यांवरून किनाऱ्याकडे सर्वांच्या पुढे धाव घेतली. वारा त्याच्या डोळयात बर्फाचे तीक्ष्ण कण उडवीत होता, समोर अगदी खालून गोळया सू सू उडत होत्या आणि तोफेच्या मोर्चावरील प्रकाशाच्या कल्लोळातून आकांताची आरोळी त्याला ऐकू आली.

"कॉम्रेड लेफ्टनंट! कॉम्रेड लेफ्टनंट!"

तो चिबिसोव होता. डोक्यावर उडणाऱ्या प्रकाशशलाकांनी तोफेच्या माऱ्याची जागा व खंदक इतका स्पष्टपणे उजळून टाकला की, दहा मीटर अंतरावरून कुझ्नेत्सोव त्याला बांधाखाली दबून बसताना पहात होता आणि त्याच्या दुसऱ्या बाजूला मानवी देहासारखी दिसणारी एक काळी आकृती बर्फावर पालथी पडली होती.

जर्मन असला पाहिजे! इतक्या जवळ येऊन पोचला? तोफेवर ते हल्ला करताहेत? कशाचा विचार करावा हे न समजून, कुझ्नेत्सोव

दबकत दबकत चिबिसोवपर्यंत धावत गेला आणि त्याच्या शेजारी कोसळला.

"काय चाललंय?"

बांधाखाली बसून चिबिसोव थरथर कापत होता. त्याने त्याची छोटी बंदूक बाजूला टाकली होती. डोके मागे टेकून व दोन्ही हात छातीवर बडवीत तो किंचाळत होता: "मी त्याला ठार मारलं!... कॉम्रेड लेफ्टनंट!... तो या बाजूनं धावत होता. मी खंदकात बसलो होतो आणि पुरता गारठलो होतो. तो या बाजूनं धावत होता... जर्मन गोळ्या झाडीत होते आणि तो तोफेकडं धावत येताना ओरडत होता 'मी रशियन आहे! मी तुमचा माणूस आहे!' पण मी... कसा मी त्याच्यावर विश्वास टेवणार? जर्मनांनी गोळीबार चालू केला होता..."

कुझ्नेत्सोवने चिबिसोवचे खांदे घट्ट पकडले आणि त्याला गदगदा हलविले.

"शांत हो! ऐकतोस का? काय झालं ते नीट समजावून सांग!"

"मी त्याला ठार मारलं! मी त्याला ठार मारलं!" थरथर कापत, छाती आवळीत चिबिसोव पुन्हा म्हणाला. त्याची नजर बधीर दिसत होती. "तो या बाजूनं धावत होता आणि ओरडत होता 'मी रशियन आहे! मी तुमचा माणूस आहे!' पण मी... मी कसा त्याच्यावर विश्वास ठेवणार? आणि आता मी त्याला ठार मारलाय!"

"लेफ्टनंट, बघा, ही आपल्या बनावटीची टॉमीगन आहे," बांधाच्या टोकावर गुडघे टेकून तेथे पडलेली सबमशिनगन व गोळ्यांची थाळी न्याहाळीत उखानोव म्हणाला. त्याने ती कुझ्नेत्सोवला दाखवली. "तो रशियन असावा असं वाटतं, पण तो आला कुठून?"

बर्फाचा थर बसलेली सबमशिनगन कुझ्नेत्सोवने तपासली. "होय, ही आपल्या बनावटीची आहे," त्याने होकार भरला. "उखानोव, त्याला खंदकात आण! पण सांभाळून! बांधावरून उडचा मारीत जाऊ नको!"

"ठीक आहे लेफ्टनंट!"

त्याच ओणव्या अवस्थेत बांधाच्या टोकावरून उखानोव पुढे झुकला आणि निष्प्राण दिसणाऱ्या त्या देहाचे खांदे पकडून हळूहळू त्याने त्याला

खाली ओढत आणले. बांधाच्या भिंतीला अधिक सोयीस्करपणे त्याला टेकवण्याचा तो प्रयत्न करीत असताना काळ्या, रुंद पुढा असलेल्या जर्मन बनावटीच्या रणगाड्याच्या शिरस्त्राणामधील त्या माणसाचे डोके एकदम आपटले व गच्च आवळलेल्या दातातून बाहेर पडलेला अस्पष्ट कण्हण्याचा आवाज आला. उखानोवने त्या माणसाचा चेहरा न्याहाळला.

"जिवंत दिसतोय."

तोफेभोवती जमलेले इतर लोक त्या कण्हणाऱ्या माणसाकडे, उडणाऱ्या प्रकाशशलाकांकडे आणि सू सू उडणाऱ्या गोळ्यांकडे संशयित नजरांनी आळीपाळीने पहात होते. काय घडले होते ते कुझ्नेत्सोवला समजत नव्हते, पण तो माणूस जर्मन नव्हता याची मात्र त्याला खात्री पटली होती. त्या काळ्या जर्मन शिरस्त्राणामधील बसक्या नाकाचा, रशियन धाटणीचा, रुंद गालफडांचा वेदनेने वेडावाकडा झालेला चेहरा, दाढीचे खुंट वाढलेली हनुवटी, बर्फाचा थर बसलेली गळघाटी, बर्फाळ पुटे चढलेले दुलईदार जाकीट, मेलेल्या अवस्थेत छातीशी हात दुमडलेले असतात त्याप्रमाणे हातमोजेविरहीत गच्च आवळलेले हात, नमदी बुटांची टोकेही मृत्यूची अवस्था दाखविणारी होती. अनेक तास तो बर्फात पडून असावा असे दिसत होते.

"कोण आहे तो लेफ्टनंट? बहुधा पायदळातला असावा? का रणगाड्यातला?" नेचायेवने विचारले. "तो जखमी झालाय? वाईट हिमबाधा झालेली दिसते? त्याचे हात लाकडासारखे कडक बनलेत."

"मी त्याला गोळी घातली, मी त्याला गोळी घातली," मागून चिबिसोव हुंदके देत म्हणाला.

"तो धावत होता, ओरडत होता आणि मी..."

"विव्हळणं बंद कर चिबिसोव!" कुझ्नेत्सोव ओरडला. "एक शब्द बोलशील तर खबरदार!"

"पायदळातला तो कसा असेल? किंवा रणगाड्यावरचा? आपल्यापैकी तिथं कुणीही नाही... ए बाबा!" उखानोवने त्या माणसाच्या गालावर हळूच थोपटले. "माझं बोलणं तुला ऐकू येतंय का बाबा? तुला काही ऐकायला येतंय?"

त्या माणसाने दात कराकरा चावले आणि जणू काहीतरी गिळावे तशी त्याच्या गळ्याची घाटी खालीवर झाली. पुन्हा एकदा दबल्या आवाजात तो कण्हला.

"त्याच्याजवळ काही कागदपत्र आहेत का पहा," कुझ्नेत्सोवने हुकूम केला. "त्याचे खिसे धुंडाळ."

'उलटचा खोपडीच्या, त्याच्यावर गोळी झाडायचं तुला काय नडलं होतं?" रूबिन चिबिसोववर गुरगुरला. "तो रशियन आहे म्हणून ओरडत असताना का गोळी झाडलीस त्याच्यावर?"

मला माहीत नाही! चूक माझी आहे, सगळी चूक माझी आहे!"

कुझ्नेत्सोवने निर्णय घेतला. "रूबिन! पटकन झोयाला बोलव!"

"ठीक आहे लेफ्टनंट," थोडयाशा अनिच्छेनेच रूबिन उत्तरला. "काही उपयोग होणार असेल तर मी तिला आणतो बोलावून."

"जा आणि झोयाला घेऊन ये रूबिन. पळत जा, समजलं?"

चवडयावर बसून उखानोवने त्या माणसाच्या जाकीटाची बटणे खोलली व त्याच्या आखूड लष्करी कोटाचे आणि दुलईदार पँटचे खिसे उलटे केले. "मोकळे!" आश्चर्य करीत तो म्हणाला.

"नेचायेव, तुझ्या जवळची बाटली दे!" गोलंदाजाकडे वळत तो झटकन करडया स्वरात म्हणाला. "तुझ्या पट्टयात ठेवली आहेस ती, जर्मन रम भरलेली."

बाटलीच्या तोंडाने त्याने त्या माणसाची दातखीळ उघडण्याचा प्रयत्न केला. छळवाद झाल्याप्रमाणे त्या माणसाने कण्हत तोंड फिरवून प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला, पण त्याच्या डोक्याखाली एक हात गच्च धरून उखानोवने जवळजवळ जबरीने थोडीशी रम त्या माणसाच्या तोंडात ओतली.

"ठीक आहे पोरा, एका मिनिटात तुला आता बरं वाटेल ..."

ते सारे वाट पहात राहिले. तो पोरवयाचा सैनिक घुसमटला, तोंडाने त्याने श्वास घेण्याचा प्रयत्न केला आणि मागे शरीर ताणून तो खोकू लागला व बांधाच्या कडेवर डोके घासू लागला. त्याचे डोळे किंचित उघडले व भ्रमात असल्याप्रमाणे पांढरी बुबुळे किंचित थरथरली. छातीशी गच्च आवळलेले त्याचे हात एकदम सुटले व टॉमीगन चाचपडू लागले.

कुझ्नेत्सोवने त्याला विचारले, "पोरा, तू कोण आहेस? कुठून आलास तू? आम्ही रशियन आहोत! रशियन! तू कोण?"

त्या तरुणाचे डोळे भराभरा त्या सर्वांच्या चेहऱ्यांवरून फिरले. कदाचित त्याला काहीच ऐकू येत नव्हते आणि आपण कुठे आहोत याची त्याला अद्याप जाणीव होत नव्हती. अखेरीस तो कसाबसा बोलला, "हेल्मेट ... हेल्मेट ... काढा!"

"लेफ्टनंट, त्याला ऐकू येत नाही. त्याला हे जर्मन हेल्मेट कुठून मिळालं? पोरा, तुझं बरोबर आहे!"

उखानोवने ते शिरस्त्राण त्याच्या डोक्यावरून काढले आणि उशीसारखे डोक्याखाली धरले. तो कण्हला, त्याने पाय सरळ केले, दुसऱ्या तीरावरून उडणाऱ्या प्रकाशगोलकांमुळे उजळलेल्या आकाशात त्याने अस्वस्थ नजर टाकली, मग त्याने तोफेकडे, कुझ्नेत्सोवकडे, उखानोवकडे रोखून पाहिले आणि एकाएकी त्याला सतावणारे कोडे सुटल्यासारखा भाव त्याच्या चेहऱ्यावर उमटला.

"तुम्ही गोलंदाज आहात? ... होय ना?" धाप टाकीत तो बोलला. "आमच्या एका तोफखान्यातले? मी तुमच्याकडंच येत होतो! ... गेओर्गियेव? गेओर्गियेव कुठाय? ... आज सकाळी ..."

तो बोलायचा एकदम थांबला आणि उरलेले प्रश्न त्याच्या नजरेतच तरळत राहिले. झटक्यासरशी कुझ्नेत्सोवला साऱ्या घटना भराभरा आठवल्या ... सकाळची बाँबफेक, चुबारिकोवच्या तोफेच्या मोर्चाजवळचा खंदक, बाँबस्फोटाचा धक्का बसलेला तो टेहळ्या डिव्हिजन कमांडरना भेटण्याची करीत असलेली अर्धवट शुद्धीतली मागणी. अर्थात, इतरांना अज्ञात स्थळी आपण मागे सोडल्याचे तो टेहळ्या बोलला होता.

अवघ्या एक दोन मिनिटांपूर्वी तो पोरगा नुकत्याच पळालेल्या युद्धकैद्यासारखा किंवा एखाद्या चौकीवरून चुकून भरकटत आलेल्या पायदळातल्या सैनिकासारखा वाटला होता. आणि लढाई सुरू होण्यापूर्वी जरा आधी, पहिल्या टेहळ्याने उल्लेखलेल्यांपैकी मागे अडकलेल्या टेहळ्यांमधला हा एक असेल, हा विचार अगदी आत्तासुद्धा अशक्य कोटीतला वाटत होता. एवढ्या सर्व रणधुमाळीतून तो वाचला कसा? लढाईच्या वेळी तो कुठे होता? त्या मैदानावर शेकडो रणगाड्यांचा वरवंटा फिरला होता, त्यांच्या वाटेत येणाऱ्या सर्व गोष्टींचा त्यांनी पार चक्काचूर केला होता. सबंध दिवस भूमी खणून काढणाऱ्या तोफगोळ्यांनी जमिनीचा प्रत्येक मीटर भाजून काढला होता.

"उखानोव, त्याला आणखी थोडी रम दे," कुझ्नेत्सोव म्हणाला. "त्याला बोलायला त्रास होतोय."

"मला वाटतं, त्याला अगदी वाईट हिमबाधा झालीय लेफ्टनंट. त्याचं अंग न् अंग गोठलंय," बाटली त्या तरुणाच्या तोंडात कोंबीत उखानोव उत्तरला. श्वास घ्यायची अद्याप धडपड करणाऱ्या त्या तरुणाने आपले डोके मागे टेकले व आता कुझ्नेत्सोव त्याला अगदी स्पष्ट शब्दात विचारू लागला.

"तुला बोलता येतं? मी प्रश्न विचारीन आणि तू उत्तरं दे. तसं तुला सोपं जाईल. गेओर्गियेव हा टेहळ्या का? एक टेहळ्या आज सकाळी तोफखान्यात आला होता. तूसुद्धा टेहळ्या आहेस का?"

डोक्याला आधार देणाऱ्या त्या शिरस्त्राणावर तो तरुण डोक्याची मागची बाजू सतत घासत राहिला होता. पण अखेरीस बोलण्यासाठी पुन्हा त्याचे ओठ विलगले.

"ऐका ... त्या तिथं बाँबनं पडलेल्या खड्ड्यात आपल्यापैकी दोघंजणं आहेत ... त्यांनी एका जर्मनाला धरलं आहे ... तो जर्मन अर्धमेला झालाय ... त्या दोघांनाही जखमा झाल्यात. पार गोठून गेलेत. सबंध दिवस आम्ही त्या जर्मनाला धरून आहोत. पहाटे आम्ही त्याला पकडलं. मुख्य रस्त्यावर. मोटारीतून बाहेर खेचला. कुणीतरी फार मोठा अधिकारी आहे ... गेओर्गियेवबरोबर आम्ही निरोप पाठवला होता..."

"ऐकलंत लेफ्टनंट?" उखानोवने कुझ्नेत्सोवकडे नजर टाकली. "आज सकाळी आलेला तो टेहळ्या असावा. आयला, कमाल आहे नाही? उरलेलं टेहळं पथक तिथं असावं!"

"बरोबर". कुझ्नेत्सोवने त्या तरुणाच्या खांद्याला स्पर्श केला. डोळे मिटून तो बांधावर डोके टेकून निर्जिव पडला होता. "दुसरे इथून फार लांब आहेत? तू जखमी झालायस? त्यांच्याजवळ जर्मन कैदी आहे असं तू म्हणालास? कोण तुझ्यावर गोळ्या झाडीत होतं?"

त्या टेहळ्याचे डोळे मिटलेलेच राहिले. पण या सर्व प्रश्नांचा मतितार्थ त्याला समजत असावा. तो कण्हला आणि त्याच्या ओठांच्या कष्टाने होणाऱ्या हालचालींवरून, त्याला काय म्हणायचे आहे ते समजून घेण्याचा कुझ्नेत्सोवने प्रयत्न केला.

"सुमारे पाचशे मीटरवर ... अगदी सरळ. खिंडीच्या कडेला. मला अजून हालचाल करता येत होती ... त्यांनी मला इथं पाठवायचं ठरवलं. मी धाव मारली, पण तिथं सगळीकडं जर्मन होते. दोन ट्रक्समध्ये ... मला गोळ्या झाडता येईनात. हात लाकडासारखे ताठ झाले होते. पण ते माझ्यावर गोळ्या झाडीत होते ... तुम्ही जाऊन त्यांना आणलं पाहिजे दोस्तांनो. आपले दोघे आणि तो जर्मन ... तो फार मोठा अधिकारी आहे!"

"पाचशे मीटर म्हणालास? पण नक्की कुठं?" कुझ्नेत्सोवने परत विचारले व खंदकापुढच्या मातीच्या बांधावरून पलिकडे नजर फेकली.

कोरड्या थंडगार चावऱ्या वाऱ्याचा झोत त्याच्या तोंडावर आला. सबमशिनगनचे शेवटचे बार त्याने विस्कळून टाकले आणि स्तेपमधली बर्फाची धूळ उंच उडवली. प्रकाशगोलकांच्या थरथरत्या उजेडात सबंध स्तेप अर्धवटपणे उजळून निघाले. जळून गेलेल्या रणगाड्यांच्या काळ्या धूडांनी स्तेपचा पांढरा विस्तीर्ण पठार मधूनमधून छेदला गेला होता व दूर क्षितिजाला खाली ओठंगलेल्या काळ्या क्षितिजात मिसळून गेला होता. डिसेंबरच्या त्या कडक थंडीच्या भयाण प्रहरी वारा व बर्फ जोराने उडत होते आणि लढाईच्या शेवटच्या ज्वाळा भडकवीत होते. त्या थिजलेल्या, रणगाड्यांनी दळून पीठ केलेल्या मैदानात कुठेतरी कुणी जिवंत होते—टेहळ्या पथकातले उरलेले दोघे जिवंत होते—यावर विश्वास ठेवणे जड जात होते. जर्मन कशावर गोळीबार करताहेत ते जाणण्याचा, अनुक्षेपकांची दिशा समजून घेण्याचा त्याने प्रयत्न केला. पण जळून पडलेल्या रणगाड्यांमुळे पलिकडचे काही दिसत नव्हते.

"पाचशे मीटर?" त्याने तरीही पुन्हा विचारले आणि टेहळ्याच्या तोंडावर तो सरळ वाकला. "आणखी काही तू मला सांगू शकणार नाहीस का? आणखी काही अचूक माहिती?"

आपली आखडलेली बोटे टेहळ्याने हनुवटीशी नेऊन त्यांना श्वासाची ऊब देण्याचा प्रयत्न केला, पण त्याला त्यांना हलवता येईना. मग उठण्यासाठी त्याने पाय हलविण्याचा प्रयत्न केला, पण ही एवढी हालचाल त्याला जड पडली व थकून तो परत बांधाच्या कडेवर पडला.

"दोस्तांनो, मला उठवा," तो पुटपुटला. "माझे पायही नीटसे

काम देत नाहीत ... दोन चिलखती गाड्या. खिंडीपासून अगदी जवळ ... तुम्ही जल्दी केलीत तर फार बरं होईल!"

"झोया कुठं आहे?" कुझ्नेत्सोवने विचारले. "रूबिन कुठं आहे?"

"मला वाटतं हा पोरगा हात गमावणार. आपण त्यांना बर्फ चोळला पाहिजे," उखानोव म्हणाला व त्याने भोवती नजर टाकली. "चिबिसोव! जरा जल्दी कर आणि भांडं भरून बर्फ आण. पण स्वच्छ बर्फ आणायची काळजी घे! दारूची पावडर मिसळलेला नको. तुला आघाडीच्या मागं जावं लागेल. समजलं?"

टेहळ्याशी संभाषण चालले होते त्या काळात तोफेवर अगदी खाली वाकून चिबिसोव एकतानतेने सारे बोलणे ऐकत होता. उखानोवच्या या आज्ञेसरशी त्याने एकदम भेदरलेल्या जनावराप्रमाणे त्याच्याकडे पाहिले व पायघोळ कोट छातीशी गच्च आवळून धरला. त्याचे तोंड व हनुवटी यांना झाकलेल्या बर्फाचा थर बसलेल्या मफलरमधून वाफेच्या लोटासकट एक अस्पष्ट हुंदका बाहेर पडला.

"चिबिसोव, काय झालंय तुला? उठ ताबडतोब आणि पळ!" कुझ्नेत्सोव उद्गारला.

पण तोफेच्या खोलगट भागातून सरपटत, हुंदके देत, असंबद्धपणे पुटपुटत चिबिसोव निघाला व अंधारात दिसेनासा झाला. नेचायेवने आपल्या मिशांवरच्या बर्फाच्या बारीक गोडसर सुया चावल्या.

"आधीच तो गारठून मरायच्या पंथाला लागला होता. आणि त्यात भरीला भर म्हणून त्यानं या पोरावर गोळी झाडून गोंधळ केलाय. स्वारीचं डोकं ठिकाणावर राहिलेलं दिसत नाही. मी जातो सीनियर सार्जंट."

"आहेस तिथं थांब!" उखानोवने हुकूम सोडला. "जाऊ दे त्याला—त्याला जरा फायदा होईल त्याचा. नेचायेव, स्वतःचे गाल चोळ. तुलाही उपयोग होईल. तोंडाला पावडर फासल्यासारखा तुझा चेहरा दिसतोय." आपल्या हातमोजांनी हलकेच टिचकी मारून त्याने नेचायेवचा गाल आपल्याकडे वळवला. "गाल नीट चोळ, नाहीतर गमावून बसशील."

आत्यंतिक गारठ्याचा कुझ्नेत्सोववरही परिणाम झाला होता. त्याचे हातपाय बधीर झाले होते व तोंडावर बर्फाचा मारा अधिक जोराने होत

होता. त्याने टेहळ्याकडे पाहिले, हनुवटीखाली आवळून धरलेल्या त्या हाताच्या बोटांकडे पाहिले, त्यांचा गारठल्यामुळे आलेला कडकपणा त्याने जाणला व पाचशे मीटर अंतर गोळी न झाडता तो तोफखान्यापर्यंत कसा पळत आला असेल याची त्याने कल्पना केली—चाप ओढण्यापुरतीही त्याच्या कडक झालेल्या बोटांना हालचाल करता आली नसणार! हिमकणांनी त्याचे केस पांढरे झाले होते, त्याच्या नाकपुड्यांवर व पापण्यांवर हिमाचा जाड थर बसला होता. मोठ्या कष्टाने जेव्हा तो पुटपुटला तेव्हा वाफेचे लोट त्याच्या तोंडातून बाहेर पडले, "गोलंदाजांनो, जल्दी करा! इथून पाचशे मीटर अंतरावर! आपले दोघे आणि एक जर्मन. चिलखती गाड्यांच्या पलिकडं. बाँबस्फोटाच्या खड्ड्यात."

"उखानोव, त्याचं हेल्मेट डोक्यावर चढव," कुझ्नेत्सोवने हुकूम केला. तो तोफेच्या एका चाकावर बसला व उखानोव टेहळ्याचे शिरस्त्राण बसवीपर्यंत वाट पहात राहिला. "उखानोव, आपण काय केलं पाहिजे?" खालच्या आवाजात त्याने विचारले. "पाचशे मीटर ... डावीकडं ते जर्मनांचं मुडदेफरास पथक आहे. समज, आपण तिघे तीन टॉमीगन घेऊन गेलो तर? आपण ग्रेनेड घेऊ या. आणि नेचायेवला नि चिबिसोवला तोफेजवळ ठेवू या. आपण जाणं आवश्यक आहे नाही? तुला काय वाटतं?"

ती कोणत्या प्रकारची मोहीम ठरणार आहे त्याची त्याला पूर्ण कल्पना होती. पण त्याचवेळी त्याचे मन त्याला पटवीत होते की, न जाण्याचा त्याला अधिकार नाही, एकही गोळी न झाडता ते पाचशे मीटर पळत येऊन या तरुणाने तेथे अडकून पडलेल्या दोन जखमी टेहळ्यांबाबत माहिती दिल्यानंतर त्यांच्या मदतीला जाण्याचा प्रयत्न करणे आवश्यक होते. आपल्या दारूगोळ्याच्या साठ्याबाबत—तीन टॉमीगन आणि ग्रेनेड—तो जे काही बोलला होता ती एकप्रकारची आत्मवंचना होती. पण हा निर्णय घेतला नसता, तर पलटणप्रमुख म्हणून त्याला किंवा उखानोवला पुन्हा कधीही मनाला शांतता लाभली नसती. दुसरा काहीही पर्याय नव्हता. स्वतःवर विश्वास ठेवण्यापेक्षा त्याचा उखानोवच्या थंड डोक्याने विचार करण्याच्या पद्धतीवर, त्याच्या अधिक अनुभवावर जास्त विश्वास होता, म्हणून तो त्याच्या उत्तराची वाट पहात राहिला.

"ही माझी सूचना आहे. उखानोव, आपण निर्णय घेऊ या. टेहळे आपल्या तोफखान्याच्या दिशेनं यायचा प्रयत्न करीत होते. आता आपल्यावर अवलंबून आहे ... आपण पत्करायचा धोका?"

नुकत्याच हातातून काढलेल्या आपल्या हातमोजांमध्ये उखानोवने मुकाटपणे व जोराने फुंकरा मारून त्यांना आपल्या श्वासाने ऊब आणली, मग ते पुन्हा हातात चढवले, मांड्यांवर जोरात थापट्या मारल्या आणि बर्फाने माखलेल्या भुवयांमधून कुझ्नेत्सोवकडे काहीशा नाराजीने पाहिले.

"माझ्या डोक्यात कोणत्या चमकदार कल्पना आहेत असं वाटतं तुम्हाला? लेफ्टनंट, आपल्याला दुसरा पर्याय नाही! अर्थात, पाचशे मीटर म्हणजे पाच मीटर नव्हेत. मुख्य गोष्ट म्हणजे आपली टॉमीगन थंडावून उपयोग नाही. ऐका लेफ्टनंट, हूणांची गडबड थांबलीय."

आघाडीवर सर्व काही शांत आणि स्तब्ध होते. एकही अनुक्षेपक उडत नव्हता, एकही बार होत नव्हता, एकही प्रकाशगोलक उडत नव्हता. फक्त जळलेल्या रणगाड्यांचे मृतवत करडे आकार निश्चल उभे होते, बर्फाच्या नागमोडी वावटळी त्यांच्यावर उमटत होत्या, वारा घो घो वहात होता, सपाटून बर्फ पडत होते, खंदकासमोरच्या बांधावर बर्फाची कोरडी सळसळ होत होती.

"चिबिसोव!" उखानोव ओरडला. "कुठं गेलायस तू? लौकर इकडं ये बघू! बर्फ कुठाय? केवढा उशीरं हा?"

चमत्कारिक लगबग करीत चिबिसोवची ठेंगणी आकृती बांधावरून सरपटत आली. त्याच्या बर्फाने माखलेल्या मफलरच्या वरती त्याच्या काळ्या डोळ्यात अमाप भीती दाटलेली दिसत होती. आपल्या हातापायांवर धडपडत, बर्फाने भरलेले भांडे फरपटत तो तोफेशेजारी घसरत खाली आला व घोगऱ्या आवाजात ओरडला:

"कुणीतरी तिकडं धावतंय! नदीच्या काठानं! तो या दिशेला येतोय!"

"कोण धावतंय?" उखानोवने त्याच्या हातून बर्फाने भरलेले भांडे हिसकावून घेतले. "तू अगदी कहर करतो बाबा. नेचायेव, त्याला त्या बाटलीतला एक घोट दे. बेटा ठिकाणावर येईल नंतर."

"ते या बाजूला येताहेत. कोण होतं ते मला समजलं नाही," चिबिसोव अस्पष्ट आवाजात पुन्हा म्हणाला. उखानोवने बचकभर बर्फ हातात घेऊन चोळताच तो टेहळ्या एकदम मोठ्यांदा विव्हळला.

तसा त्या टेहळ्यापासून चिबिसोव भित्रेपणाने दूर सरपटत गेला.

धावणाऱ्या पावलांचा आवाज व बुटांखाली चुरडणाऱ्या बर्फाचा आवाज उजव्या बाजूने येत असलेला आता कुझ्नेत्सोवनेही ऐकला आणि "कोण चाललंय तिकडं?" अशी आरोळी ठोकून त्याने त्या टेहळ्याची पडलेली टॉमीगन चटकन खेचून घेतली. पण बर्फावर दोन काळ्या आकृती उभ्या झाल्या व उत्तर आले, "तुमची माणसं. आम्हाला ओळखलं नाही?"

त्याने त्या दोघांनाही ओळखले. द्रोझ्दोवस्की आणि मुख्य ठाण्याच्या पलटणीचे कमांडर सार्जंट-मेजर गलोवानोव असे ते दोघे होते. दुसऱ्या तीरावरच्या विझत चाललेल्या आगींच्या मंद प्रकाशात त्यांचे चेहरे उजळून उठले.

मारा करण्याच्या फलाटावर ते दोघे धावत आले व नेहमी टापटिपीत असणाऱ्या द्रोझ्दोवस्कीने धापा टाकीत विचारले, "कुणी गोळ्या झाडल्या?"

अधिकार गाजविणारा तो आवाज ऐकताच कुझ्नेत्सोवच्या साऱ्या शिरा एकदम आवळल्यासारख्या झाल्या आणि टॉमीगन छातीशी घट्ट धरून, ओठ गच्च आवळून तो तोफगाड्याच्या एका चाकावर बसला. आपण काहीही विसरलो नाही हे त्याने आपल्या गप्प राहण्याने सूचित केले.

"काय चाललंय इथं? सिनियर सार्जंट उखानोव, काय करताय तुम्ही? तो माणूस जखमी झालाय? कुठून आला तो?"

द्रोझ्दोवस्की कुझ्नेत्सोवच्या अंगावरून पुढे चालत गेला व चालताना तो सतत प्रश्न विचारीत होता. उखानोव व तो टेहळ्या यांच्यावर तो ओणवा झाला आणि त्याने विजेरी पेटवली. पिवळसर अंधार कापीत तिच्या झोताने टेहळ्याचे गच्च आवळलेले दात, त्याच्या गालावरचे गोठलेले आसू व बांधाच्या टोकावर मागे टेकलेले डोके क्षणात दाखवले.

"गोलंदाजानो! ... गोलंदाजानो! ... ते त्या बाँबच्या खड्ड्यात ..–मला हेल्मेट का घातलंत ... मला तुमचं बोलणं ऐकू येत नाही ..."

"तोफखाना कमांडर, टॉर्च विझवा! त्यानं काय फायदा होणार?" उखानोवने रागाने विजेरी बाजूला सारली व तो टेहळ्याचे हात बर्फाने चोळीत राहिला.

सारखा गारवा त्याच्या तोंडाला झोंबत होता. त्याची पाठ व छाती गारठली होती. त्याचे हात पुरते बधीर झाले होते. त्याला आताच हालचाल करायला हवी होती, धोका पत्करायला हवा होता. काहीही घडले तरी त्याला पुढे काहीतरी हालचाल करणे भाग होते.

तोफखान्याच्यापुढे जळून गेलेल्या रणगाड्यांचा आडोसा घेऊन त्या दोन मोडून पडलेल्या चिलखती गाड्यांपर्यंतचे पाचशे मीटरचे अंतर ते कापू शकतील व त्यांच्यामागे बॉंबस्फोटाचा तो खड्डा असेल आणि त्यात ते दोन टेहळे असतील, याची त्याला खात्री होती. पण ते अजून जिवंत आहेत का? तिथला गोळीबार का थांबला होता?

खरेच, आता आम्हाला गेले पाहिजे. त्या खड्ड्यापर्यंत जर्मनांना आम्ही सामोरे गेलो नसलो म्हणजे मिळवली. तिथपर्यंत गोळ्या न झाडता, आमचे अस्तित्व जाणवू न देता पोचायला पाहिजे.

द्रोझ्दोवस्कीकडे दुर्लक्ष करून त्याने आपली मूठ टॉमीगनच्या थाळीवर विसावली, तो चटकन खंदकावर उभा राहिला आणि छातीत विलक्षण हलके वाटत असल्याच्या जाणीवेने त्याने घोगऱ्या आवाजात म्हटले. "उखानोव, रूबिन, तुमच्या सबमशिनगन आणि ग्रेनेड घ्या आणि माझ्याकडं या."

उखानोव आणि रूबिन एव्हाना त्याच्या शेजारी येऊन उभे राहिले. गोठलेल्या कडक जमिनीवर त्यांचे पायघोळ कोट जोरात घासत होते. ते दोघेही आपल्या खिशांमध्ये भराभरा ग्रेनेड कोंबण्यात गुंतले होते.

द्रोझ्दोवस्की नेहमीप्रमाणे ताठ पावले टाकीत रुबाबदार चालीने त्यांच्याजवळ आला. आगगाडीत किंवा वाटचालीत आपल्या थंड, तुसड्या स्वभावानुसार तो जसा वागला होता तोच पवित्रा त्याने आता घेतलेला होता. "कुझ्नेत्सोव आता ऐक," जणू काही आधीच निर्णय घेतला आहे अशा थाटात द्रोझ्दोवस्की बोलू लागला. "त्या टेहळ्यांकडं आपण आणखी मोठ्या गटांनी जायला पाहिजे. तीन माणसं आणखी तिघांना आणू शकणार नाहीत. मीही तिथं येतो. दोन संदेशवाहकांना घेऊन. मी तुमच्या पाठोपाठ येतो. जळलेल्या दोन गाड्यांच्या उजव्या अंगाला."

"तोफखाना कमांडर, आपण काळजी करायचं काही एक कारण नाही," कुझ्नेत्सोव परकेपणाने उत्तरला. "जर तिथं अजून कुणी जिवंत असेल, तर कसंही करून त्यांना आम्ही आणू."

"कुझ्नेत्सोव, मी काळजी करीत नाहीय. पण मी तुझ्यानंतर येईन!" कुझ्नेत्सोवला पायापासून डोक्यापर्यंत न्याहाळताना द्रोझ्दोवस्कीच्या नाकपुड्या व लांब, बायकी पापण्या थरथरल्या.

तेवढ्यात माऱ्याच्या फलाटावर एकदम हालचालींचा गोंधळ माजला. झोया आणि नेचायेव टेहळ्याला खाली तीरावर घेऊन जात होते. बँडेज बांधल्यानंतर त्या टेहळ्याचे पाय एकाएकी प्रचंड मोठे वाटू लागले होते. जेमतेम अस्पष्ट ऐकू येईल असा झोयाचा आवाज वाऱ्याबरोबर कुझ्नेत्सोवच्या कानांवर आला.

"गुड लक दोस्तांनो! सुखरूप परत या!"

कुझ्नेत्सोवने उत्तर दिले नाही.

## प्रकरण एकोणीसावे

टेहळणी करून परतायला उशीर झाल्यामुळे लढाईच्या धुमश्चक्रीत सापडलेल्या डिव्हिजनच्या टेहळणी पथकातल्या टेहळ्यांना खरोखरीच त्या खिंडीपलिकडच्या शंभर मीटर अंतरावरच्या बाँबस्फोटाच्या प्रचंड खड्ड्यात नाइलाजाने आसरा घ्यावा लागला होता. स्तेपच्या त्या सूर्यप्रकाशित पांढऱ्या विस्तारात तो काळा खड्डा धुराचे कुंड बनला असणार व त्यामुळे खिंडीकडून हल्ला चढवीत आलेले रणगाडे त्या खड्ड्याला वळसा घालून गेले होते. नंतर फौजा भरलेल्या दोन चिलखती गाड्या त्या खड्ड्याजवळून काही मीटर अंतरावरून गेल्या होत्या आणि त्या सोविएत तोफखान्यांच्या थेट माऱ्यात सापडल्यामुळे पटकन जळून भस्मसात झाल्या होत्या.

त्या खड्ड्याच्या टोकाशी रूबिनला पाठीशी घेऊन कुझ्नेत्सोव जेव्हा आला आणि खालच्या निळसर खोलगट भागात तळाशी उखानोव कशाशी तरी धडपडत असल्याचे जेव्हा त्याने पाहिले तेव्हा ते टेहळे तेथे आहेत किंवा नाहीत आणि ते अद्याप जिवंत आहेत किंवा नाहीत एवढेच त्याला जाणून घ्यायचे होते. त्या उभ्या उतारावरून धावत धापा टाकीत खाली येत त्याने विचारले, "ते जिवंत आहेत?"

"त्यातले दोघं इथं आहेत," उखानोव उत्तरला.

मृत्यूच्या पकडीत सापडावे तशा दोन अंधुक आकृती त्या खड्ड्याच्या तळाशी एकमेकात अडकून पडलेल्या दिसत होत्या. उखानोव त्यांच्याशेजारी

बसला होता व त्यांची पकड सोडविण्याची व्यर्थ धडपड करीत होता. तो त्यांच्या खांद्यांना धक्के देत होता व गदगदा हलवीत होता आणि आश्चर्य म्हणजे ते जिवंत असल्याची काही अस्पष्ट चिन्हे दाखवीत होते. त्यांच्यातल्या एकाने बुरखा पांघरला होता व त्या गारठलेल्या कुंचीमधून वाफाळणारा श्वास उसळत होता. बर्फाचा जाड थर भोवती बसल्यामुळे जेमतेम दिसणारे त्याचे डोळे आपल्या हिमाने पांढुरक्या झालेल्या भुवयांमधून उखानोवकडे पहात होते व त्याच्या घशातून काहीतरी चमत्कारिक आवाज निघत होते.

"पोरा, सोड तुझे हात, सोड! आम्ही तुझीच माणसं आहोत— रशियन! माझं बोलणं ऐकू येतंय का तुला?" उखानोव बोलत होता. "ठीक आहे! पोरा, आता माझ्याकडं बघ!"

"त्या बुरख्यातला जर आपला माणूस असला आणि दुसरा जर्मन असला तर सगळा सत्यानाश!" रूबिन चकित होऊन म्हणाला. "बघा, त्यांचा श्वास चालू आहे! साल्या डोमकावळ्यांना दगड मारून बघा!"

"दुसरा जर्मन आहे!" उखानोवने माहिती पुरवली. "लेफ्टनंट, जरा नजर टाका."

खड्डयाच्या तळाशी गोठलेल्या मिठीत अडकून पडलेल्या त्या दोघांना एकमेकांपासून वेगळे ओळखणे आत्ता कुठे कुझ्नेत्सोवला पहिल्यांदा शक्य झाले. त्यात त्यांचा एक टेहळ्या होता आणि दुसरा साधारण धिप्पाड बांध्याचा, फर टोपी व पायघोळ कोट घातलेला, अंगावर बर्फाचा मिठासारखा थर बसल्याने करडा दिसणारा जर्मन होता. त्या जर्मनाचे कातडी मोजातले हात त्याच्या पाठीशी मागे बांधलेले होते, त्याच्या पांढऱ्या हाडकुळ्या चेहऱ्याला फर कॉलरने अर्धे झाकले होते, पण त्याच्या तोंडात बोळा मात्र कोंबलेला नव्हता. आपल्याभोवती माणसे उभी आहेत याची जाणीव होताच आपला भलामोठा रुंद जबडा न उघडताच तो गुरगुरू लागला आणि बर्फात गाल घासू लागला. त्याच्या रुंद, फेंदारलेल्या नाकपुड्यांखाली ओल्या मिशांप्रमाणे बर्फाच्या बारीक काड्या लोंबत होत्या.

"ए पोरा! तुझी मिठी सैल कर! आम्ही तुझी माणसं आहोत, समजलं? आम्ही तुला मदत करायला आलोय."

थोडे बळ वापरूनच उखानोवने त्या जर्मनाला त्या टेहळ्याच्या

मगरमिठीमधून सोडवले. त्या टेहळ्याने बारीक चीत्कार करीत हात सोडले. आपल्या कैद्याला असे घट्ट पकडून, एकमेकांच्या शरीरांमधली शेवटची ऊब पुरवीत तो कित्येक तास तसा बसून राहिला असावा. उखानोवने त्या टेहळ्याला बाजूला खेचले व तो कुझ्नेत्सोवला म्हणाला, "तो जर्मन अजून जिवंत आहे नि लाथा झाडतोय! पण आपलं पोरगं गेल्यात जमा आहे. या कुत्र्याचा कोट त्यानं का घेतला नाही? बघा लेफ्टनंट, त्याला उबदार अस्तर आहे! त्याला एवढं जपण्याइतका तो मोलाचा आहे असं वाटलं का त्याला? त्याचे पंजे मी सोडू का? आता तो काही पळून जाणं शक्य नाही."

"तिसरा माणूस कुठं आहे? मला तो इथं कुठंच दिसत नाही," ताणलेल्या मनःस्थितीत कुझ्नेत्सोव म्हणाला. "तो दुसरा पोरगा म्हणाला, इथं दोन टेहळे असतील. रूबिन, वर जाऊन जरा चौफेर नजर टाक. तो सरपटत गेला असेल. खड्ड्याच्या भोवताली सगळीकडं तपास कर!"

पाठीवर शांतपणे पडलेल्या त्या टेहळ्याकडे कुझ्नेत्सोवने पाहिले. त्याच्या मिटलेल्या डोळ्यांवर पांघरलेली कुंची साखरेच्या मुखवटयासारखी दिसत होती. त्याच्या उपवस्त्राच्या पुढच्या बाजूच्या चिंध्या झाल्या होत्या, त्याचा पट्टा हरवलेला दिसत होता आणि त्याचे दुलईदार जाकीट बर्फाने पुरते माखले होते. बर्फ आणि चिखल यांचे थर बसल्यामुळे त्याच्या पँटीतले व नमदी बुटांमधले पसरलेले पाय लाकडाच्या ओंडक्यांसारखे दिसत होते. गुडघ्यावर काहीतरी गुंडाळल्यामुळे त्याचा एक पाय विशेष जाड दिसत होता व त्या ठिकाणाहून काहीतरी गोठलेल्या पट्ट्याप्रमाणे बारीक पट्टी लोंबताना दिसत होती. तो खरोखरीच त्या टेहळ्याचा पट्टा होता आणि रक्तस्त्राव बंद करण्यासाठी त्याने तो वापरला होता. त्या पट्ट्यामुळेच केवळ रक्तस्त्राव बंद होईल या भरवशावर बूट न काढता किंवा पँट न फाडता त्याने काही वेळापूर्वी तसाच घाईघाईने तो पट्टा बांधला असावा.

जेव्हा बाँबहल्ला सुरू झाला तेव्हा वाचलेले टेहळे सरपटत जेमतेम या खड्ड्यापर्यंत येऊन पोहोचले होते. पण त्यांची शस्त्रे कुठे गेली? त्यांची एकूण संख्या किती होती? दुसरा टेहळया कुठं होता?

खड्ड्यात टेहळ्याचे एकही शस्त्र नव्हते. परकी धाटणीची एक भलीमोठी पिस्तुलाची पिशवी उतारावर अर्धी बर्फात गाडली गेली होती.

कदाचित ती त्या जर्मनाकडून हिसकावून घेतलेली होती. कुझ्नेत्सोवने ती खेचून काढली. पण ती मोकळी आहे असे आढळताच त्याने ती फेकून दिली. मग तो टेहळ्यावर वाकला आणि हळुवारपणे त्याच्या चेहऱ्यापासून कुंची ढिली करण्याचा त्याने प्रयत्न केला. पण ते अशक्य ठरले. चेहरा व कुंची जणू एकरूप झाले होते. त्याचा कडकड आवाज होताच त्याने झटकन हात मागे घेतला.

"ऐक पोरा," त्या टेहळ्याला काही ऐकू जाईल अशी आशा अजिबात न राखता कुझ्नेत्सोव म्हणाला. "आम्ही तुझ्या बाजूचे आहोत, रशियन आहोत ... तुम्ही इथं दोघं होता. दुसरा कुठाय? दुसरा कुठं गेला?"

पण त्या टेहळ्याच्या अस्पष्ट पुटपुटण्यातून काहीच समजले नाही. त्यातली दोनच अक्षरे ऐकू येत होती, "जर्म ... जर्म ..."

"जर्मन?" कुझ्नेत्सोवने तर्क केला. त्याला जर्मनाबद्दल काही सांगायचे होते का? की तो मला जर्मन समजतोय?

"लेफ्टनंट, आपण त्यांना घेऊन जायला लागू या का?" उखानोवच्या आवाजाने त्याची विचारमालिका तुटली. "हे भलं मोठं धूडसुद्धा आपण पाठीवरून वाहून न्यायचं का? लेफ्टनंट, हा हूण काय करतोय बघा! तो वेडा झालाय का पिसाळलाय? त्याच्या कपाळावर मधोमध एक ठेवून देऊ का, म्हणजे शांत होईल?"

त्या जर्मनाला एकाएकी काय झाले आहे ते कुझ्नेत्सोवच्याही प्रथम लक्षात येईना. उखानोवने त्याचे हातपाय सोडल्यानंतर त्या खड्ड्याच्या तळाशी तो गडाबडा लोळत होता, आपल्या फरच्या बुटांनी व मुठींनी वेड्यासारखा बर्फावर प्रहार करीत होता, फेफरे आल्याप्रमाणे डोक्याला हिसके देत होता, पाठीला कमान करीत होता, छातीवर धाडकन पालथा पडत होता आणि हुंदके देत पिसाळल्यासारखा ओरडत होता. जणू तो मूक हास्य करीत असावा त्याप्रमाणे त्याचे दात निळसर चमकत होते आणि एखाद्या उन्मादवायू झालेल्या माणसाप्रमाणे त्याचे डोळे विस्फारलेले होते. एकतर थंडीने त्याची विवेकशक्ती नष्ट झाली होती किंवा इत:पर त्या रशियन टेहळ्याच्या महाभयानक मगरमिठीत अडकून मरावे लागणार नाही या आनंदात, छळवाद संपला या आनंदात स्वत:ला ऊब आणण्याचा प्रयत्न करीत तो पाशवी हर्ष व्यक्त करीत होता. "Verfluchter,

verfluchter!..." जर्मनाने विचित्र परकी शब्द उच्चारले. त्याच्या तोंडाला फेस आला होता आणि तो या कुशीवरून त्या कुशीवर गडबडा लोळत होता. " "Rus... Rus... verfluchter!"

"बऱ्याच मोठ्या हुद्यावरचा असावा," त्या जर्मनाकडे कमालीच्या एकतानतेने पहात उखानोव म्हणाला. "लेफ्टनंट, तो शिव्या घालतोय का? अगदी इरसाल अशा?"

"असं वाटतंय," कुझ्नेत्सोव उत्तरला.

मग तो जर्मन एकदम लुळा पडला, एका कुशीवरून गडगडत गेला आणि कातडी हातमोजातले त्याचे हात कोटाच्या घड्यांमध्ये गुरफटले. एकाएकी त्याची पाठ पुन्हा ताठ झाली, त्याने डोक्याला हिसका दिला, त्याचे डोळे गरगर फिरले आणि तो आता मोठ्यांदा ओरडणार किंवा रडणार असे वाटले. आपल्या फरच्या बुटांनी तो बर्फ उकरत राहिला.

"बेटचा जर्मना, पँटीतच कर! तुला तेवढी ऊब राहील," त्या जर्मनाच्या हालचालींचा अर्थ लावीत उखानोव हेटाळणीच्या सुरात म्हणाला. "तुझ्या पँटीची बटणं सोडायला इथं कुणी नाही. हिटलरच्या कुत्र्या, इथं सगळं तुझं तुलाच निस्तरलं पाहिजे. शौचाचं भांडं धरून बसायला आमच्याकडं तुझ्यासाठी माणूस नाही."

"Verfluchter, Rus, verfluchter! Ich sterbe, Rus..."

"Steh auf! !" शाळेत शिकलेल्या जर्मन भाषेतले शब्द आठवण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असता अचानक कुझ्नेत्सोवने हुकूम केला आणि एकाएकी गप्प झालेल्या त्या जर्मन अधिकाऱ्याकडे तो गेला. "Steh auf!" त्याने पुन्हा म्हटले. "उभा रहा!"

त्या जर्मन माणसाचे रोड चेहऱ्यावरील डोळे बधीरपणे बघत राहिले व कुझ्नेत्सोवच्या टॉमीगनवर स्थिरावले. त्याचे दात कडकड वाजायचे थांबले आणि उत्तरादाखल एक दबता आवाज बाहेर पडला. कुझ्नेत्सोवने बंदुकीच्या दस्त्याने त्याच्या खांद्याला रेटले व अधिक तीक्ष्ण आवाजात तो पुन्हा म्हणाला: "Steh auf, schnell! Schnell!" म्हणतो ना!"

जर्मन चटकन सरळ बसला व उठायचा त्याने प्रयत्न केला, पण त्याचे पाय लटपटले आणि तो खड्ड्याच्या भिंतीवर एका बाजूला कलंडला. आणखी एक दबता हुंदका देऊन तो आपल्या हातापायांवर धडपडत राहिला व अखेरीस लडबडत पायांवर कसाबसा उभा राहिला.

कुझ्नेत्सोवपेक्षा तो डोकेभर अधिक उंच होता, मजबूत बांध्याचा, आडव्या हाडाचा होता व त्या फर कोटामध्ये त्याचा धिप्पाडपणा अधिकच जाणवत होता. त्याचा तो परका चेहरा अगदी जवळ होता, दणका खाण्याची अपेक्षा करीत होता, धास्तावलेला होता, पण त्याचवेळी गुर्मी दाखवण्याचा प्रयत्न करीत होता.

"उखानोव, तू याला सांभाळ. फार महत्त्वाचा मोठा माणूस दिसतोय साला डुक्कर," कल्पनेतही तिरस्करणीय वाटणारा नाझी असा जिताजागता समोर एवढ्या जवळ उभा असलेला पाहून कुझ्नेत्सोव मनस्वी तिटकाऱ्याने म्हणाला. खरेच, त्याने त्या सर्वांबद्दल ते असेच वागत असतील अशी कल्पना केली होती आणि आता त्याची खात्री पटली की, या कैद्याच्या अंतःकरणात माणुसकी औषधालाही शिल्लक उरलेली नाही.

त्या दोघांमध्ये यातनांची, रक्तपाताची, तिरस्कारामधून एकमेकांविषयी निर्माण झालेल्या कल्पनांची, पूर्णतया परकी आणि अतर्क्य, वैरभावी, विसंगत विचारांच्या जीवनपद्धतीची एक प्रचंड खोल दरी होती.

"आणि त्याची सर्व जबाबदारी तुझ्यावर राहील!" कुझ्नेत्सोव कडक आवाजात उद्‌गारला.

"लेफ्टनंट, मी त्याची जबाबदारी घेतो. अगदी सोनं जपल्यासारखी त्याची काळजी घेतो," उखानोवने आश्वासन दिले. तो त्या जर्मनाजवळ गेला आणि धसमुसळेपणाने त्याने त्याचे खिसे तपासले, त्याचा लायटर व चुरगळलेले सिगरेटचे पाकीट घेतले, मुद्दाम त्याच्या कोटाची बटणे उघडून ठेवली, त्याच्या पदके लटकावलेल्या आखूड लष्करी कोटामधून पाकीट लांबवले आणि त्याच्या गोठलेल्या बाहीचे टोक दुमडले व अर्धवट प्रश्नार्थक सुरात तो म्हणाला, "बघा, टेहळ्यांनी केवढा घोटाळा करून ठेवलाय. त्यांनी त्याच्याजवळ सर्व काही ठेवून दिले... मी त्याचं घड्याळ घेऊ का लेफ्टनंट?"

"जहन्नम्‌मध्ये जाऊ दे! आणि त्याचा लायटर नि सिगरेटी त्याच्याजवळच राहू देत! तीसुद्धा जहन्नम्‌मध्ये गेली!" कुझ्नेत्सोव संतापाने म्हणाला. "भिकारड्या फॅसिस्ट डुकराच्या वस्तू घेतोय!"

"मला काही त्यांच्यावर घाण दिसत नाही," झटक्यासरशी उखानोवने जर्मनाची बाही सोडली व त्याचे पाकीट उघडले. "लेफ्टनंट

हे पहा—फोटो. पाहिलेत तुम्ही? सर्व जर्मनांच्या फोटोंमध्ये त्यांची पोरं अगदी देवदूतांसारखी दिसतात. विशेष म्हणजे पोरी. आणि सगळे पांढऱ्या पायमोजात!"

"नाही, मी पाहिले नाही. दे त्याला सर्व काही परत," जर्मनाच्या खाजगी पाकिटातसुद्धा जणू काहीही साधे, मानवी असणार नाही अशा धारणेने कुझ्नेत्सोवने त्या फोटोंकडे दुर्लक्ष केले.

"लेफ्टनंट, मला जरा सांगा. च्यायला आपण एवढं त्यांना हळुवार का वागवतो?"

दरम्यान त्या जर्मनाच्या थोडे काही लक्षात आले होते. "लेफ्टनंट" हा शब्द सारखा सारखा ऐकल्यानंतर त्याच्या चेहऱ्यावरचा बळेच आणलेला गुर्मीचा भाव विरला आणि एक विनंती त्याने बिचकत बिचकत केली. अत्यंत रागीट आवाजात हुकूम देणाऱ्या, कपाळाला आठ्या घालून उभ्या असलेल्या कुझ्नेत्सोवकडे, या रशियन पोरसवदा तरुणाकडे तो झुकला व घोगरट आवाजात रेकला, "Zigaretten... meine Zigaretten... Herr Leutnant, rauchen, rauchen... Ich will rauchen, Herr Leutnant! Rauchen."

त्याचे पाय पुन्हा लटपटले आणि ढुंगणावर तो बर्फात आपटला. जणू गिळायला त्रास होतोय अशा पद्धतीने मानेला झटके देत तो कुझ्नेत्सोवकडे वर पहात होता.

"परत दे त्याला. त्याला सिगरेट ओढायची आहे, पाहिलंस?" कुझ्नेत्सोव तुच्छतेने म्हणाला.

अद्याप कपाळाला तशाच आठ्या घालून तो टेहळ्याजवळ गेला. तो अजून त्याच अवस्थेत पाय पसरून पडला होता, त्याच्या चेहऱ्यावर गोठलेल्या कुंचीमधून वाफेचे बारीक झोत उमटत होते. त्याला तिथून हलवणे त्यांना आवश्यक होते, पण त्याचा घायाळ पाय आणखी न दुखावता ते करणे कसे शक्य होते?

त्या दुसऱ्या टेहळ्याचे काय झाले? कदाचित जो निसटून आला होता त्याची सांगण्यात चूक झाली? रूबिन कुठे आहे?

खड्ड्याच्या संपूर्ण कडेवर बर्फाची भिरभिरी उमटत होती व फुटणाऱ्या प्रकाशगोलकांमुळे ती उजळून उठत होती. मात्र ज्या खोलगट भागात ते उभे होते तिथून त्या प्रकाशशलाका दिसत नव्हत्या. गोठलेले हिमकण

सतत खड्डयाच्या वर्तुळावर कोसळत होते व तिथून घसरत ते तळाशी येत होते. रात्रीने वेढलेल्या त्या स्तेपवर वारा सुसाट भणाणत होता आणि अवघ्या दोनशे पावलांच्या अंतरावर जर्मन होते—खेड्याच्या टोकाशी त्यांचे रणगाडे होते, त्यांची टेहळणी चौकी होती. रूबिन परत आला नव्हता.

जायची वेळ झालीय! आम्ही आणखी थांबू शकत नाही... मला रूबिनला बोलावले पाहिजे आणि परतीच्या वाटेला लागले पाहिजे. आम्ही आणखी धोके पत्करू शकत नाही! स्वत:ला आणि इतरांना एवढ्या मोठ्या धोक्यात एवढा वेळ ठेवल्याबद्दल त्याला क्षणभर विलक्षण कावरेबावरे झाले, मनाला जबरदस्त यातना झाल्या आणि त्या टेहळ्याला उचलून ताबडतोब चालायला लागू या असे उखानोवला सांगण्याच्या तो बेतात होता, पण एव्हाना फार उशीर झाला होता.

त्याच्या ऐन डोक्यावर मशिनगनची फैर उडाली व अंत:प्रेरणेने तो उतरत्या भिंतीवरून वर धडपडत निघाला आणि उखानोवला काही वेळ तेथेच थांब अशी त्याने खूण केली. वरच्या टोकाला जाऊन त्याने भिर-भिरणाऱ्या बर्फाच्या चक्रांमधून डोळे बारीक करून पाहिले तेव्हा रूबिन जर्मनांच्या तावडीत सापडला असावा हाच पहिला विचार त्याच्या डोक्यात आला.

खेड्याच्या टोकापासून एक हेवी मशिनगन सतत धडधडत होती आणि खड्डयाच्या डाव्या बाजूला जळून गेलेल्या गाड्यांवरून अनुक्षेपकांची सतत ओळ लागली होती. त्या गोळीबाराच्या वादळात सारे काही चमकत होते, चकाकत होते, पण खड्डयाच्या डावीकडून जर्मनांच्या गोळीबाराच्या कक्षेतील क्षेत्रात कुणीही शिल्लक उरलेले दिसत नव्हते.

"रूबिन!" हाताच्या कोपरांवर स्वत:ला उंचावीत त्याने हाक मारली. "रूबिन, इकडं ये!"

त्या क्षणी समोर पन्नास मीटर अंतरावर आणि गाड्यांच्या डाव्या अंगाला बर्फातून अस्पष्ट आकृती उठल्या, एका तोफगोळ्याच्या खड्डयाच्या दिशेने धावल्या व पुन्हा बर्फावर पालथ्या पडल्या. मशिनगनचे अनुक्षेपक त्यांच्या दिशेने तात्काळ चकाकत गेले.

तो द्रोझ्दोवस्की असणार! पण चिलखती गाड्यांपासून तो एवढा लांब का? ते कुठे होते हे त्याला समजले नाही का?

"उजवीकडं! उजवीकडं! या वाटेनं!" कुझ्नेत्सोव ओरडला आणि त्यांना अधिक नीट पाहण्यासाठी कोपरांवर आणखी उंचावला.

खड्डयाच्या दिशेने त्यांनी सरपटायला सुरुवात केली. मशिनगनच्या गोळ्या त्यांचा सतत पिच्छा पुरवीत होत्या. खड्डयाच्या कडेपासून दहा मीटरवर पुढच्यातला एक क्षणभर उठला व ओरडला, "लेफ्टनंट! आम्ही आहोत!"

कुझ्नेत्सोवने रूबिनचे भक्कम खांदे पटकन ओळखले आणि त्याच्या किंचित डाव्या बाजूला द्रोझ्दोवस्कीची सडपातळ, चपळ आकृती मुख्य ठाण्याच्या दोन संदेशवाहकांबरोबर सरड्यासारखी खड्डयाकडे सरपटत येत होती. आणि त्याच्या शेजारी पांढऱ्या टोपीत एक परिचयाचा आणि तरीही अपरिचित असा तेथे कधीही यायला नको असलेला चेहरा होता. तो झोयाचा चेहरा होता. धोक्याच्या फाजील कल्पनेने थरारून जाऊन तो चेहरा जणू असे सांगायचा प्रयत्न करीत होता की, ठार होण्याची किंवा जखमी होण्याची तिला मुळीच चिंता वाटत नव्हती, तिथे मुळी जणू धोकाच नव्हता.

त्यांनी कशाला आणली तिला? इथं कुणाला तिची मदत होणार होती? ती इथं कशाला? आश्चर्यापेक्षा कुझ्नेत्सोवला राग अधिक आला होता आणि डोक्यावरून उडणाऱ्या अनुक्षेपकांकडे झोया जेव्हा त्याच चेहऱ्याने पाहू लागली तेव्हा त्याने बंदूक हलवली व तो रागाने ओरडला, "लौकर! पुढं सरकत रहा! सगळे इथं ह्या खड्डयात या!"

"कॉम्रेड लेफ्टनंट!" सरपटत जवळ येत धापा टाकीत रूबिन म्हणाला. "मी सगळीकडं पाहिलं, सगळीकडं सरपटत बघून आलो. इथं दुसरा टेहळ्या नाही... मी जमिनीचा इंच न इंच धुंडाळला.. मग आपली माणसं डावीकडं धावताना दिसली. म्हणून त्यांना रस्ता दाखवायला मी त्यांच्यामागं धावलो नि आम्ही शत्रूच्या नजरेला पडलो!"

"अर्थात तुम्ही धावत होता! तुम्हाला काय वाटलं घरी परत आलात?" कुझ्नेत्सोव मध्येच रागाने उद्गारला व "धावत" या शब्दावर त्याने विशेष जोर दिला. "त्यांच्यासाठी काय करमणुकीचा कार्यक्रम करीत होता? चला सगळे या इकडं खाली!"

बर्फाने माखलेली शरीरे धापा टाकीत खड्डयाच्या टोकाला आली,

मग गडगडत खड्ड्याच्या तळाशी गेली. द्रोझ्दोवस्कीचा आवाज अधीरपणे उमटला, "कुझ्नेत्सोव, सारं ठीक आहे? टेहळे इथं आहेत?"

उत्तर देण्यात काही अर्थ नव्हता. त्यांनी निर्माण केलेल्या गोळीबाराने कुझ्नेत्सोव कमालीचा चिडला होता. खड्ड्यात परत न जाता तेथेच टोकावर राहून तो चिलखती गाड्यांच्या डाव्या बाजूला उडणाऱ्या गोळ्यांचा चकचकाट पहात होता. तिथूनच त्यांचा तोफेकडे परत जायचा रस्ता होता. गोळीबाराखालचा प्रदेश तो न्याहाळून पहात असतानाच त्याला जाणवले की, अद्याप कुणीतरी खड्ड्याच्या तोंडाशी आहे व सरपटत त्याच्या दिशेने येते आहे. त्याच्या गालांवर त्याला जलद श्वासोच्छ्वास जाणवला आणि एक आवाज त्याच्या कानांशी म्हणाला, "कुझ्नेचिक, लाडक्या!.. तू अजून जिवंत आहेस? बरं झालं बाई तू भेटलास... ही मी इथं आहे बघ कुझ्नेचिक!"

"मी पाहिलंय तुला," तिरसटपणे तो उद्‌गारला. "काय आहे काय सगळा प्रकार?"

झोया खड्ड्याच्या कडेवर बसली व तिने पाय लोंबते सोडले. तिची टोपी एका बाजूला कलली होती, तिचे केस व लांब भुवया बर्फाने माखल्या होत्या. तिच्या पापण्यांवर जमलेल्या हिमकणांमुळे तिचे काळे, किंचित कलते डोळे निष्कारणच प्रश्नार्थक, विस्फारलेले वाटत होते. तिच्या त्या कलत्या टोपीमुळे व हसऱ्या ओठांमुळे ती थोडीशी गुलजार तरुणासारखी वाटत होती, तिचे व्यक्तिमत्व आव्हानात्मक वाटत होते.

"हॅलो कुझ्नेचिक!" ती पुन्हा एकदा प्रेमळ आवाजात उद्‌गारली. आपण शोधून काढलेले हे मजेदार नांव उच्चारताना तिला मोठी गंमत वाटत होती. तिने त्याच्या अगदी नजीक असलेल्या थंडगार भावहीन चेहऱ्याकडे निरखून पाहिले.

"मी कुझ्नेचिक नाही! तू काय जखमींना उचलून न्यायला आलीस? काय हा मूर्खपणा! पाचशे मीटर सरपटत यायला तुला कुणी सांगितलं?"

"माझ्यावर ओरडू नको, कुझ्नेचिक." तिचे किंचित सुजलेले ओठ विलग झाले व ती पुन्हा हसली. "मी वैद्यकीय मदतनीस आहे. तू प्रेम करीत नसलेली तुझी बायको नव्हे. कुझ्नेचिक, खरं म्हणजे तुला माझ्यावर ओरडायची इच्छा नव्हती, होय ना? मग का

ओरडलास? कुझ्नेचिक, तू मला हुकूम सोडायला सुरुवात केली आहेस. पण मी तुझ्या हाताखाली काम करणारी थोडीच आहे?"

"तिथं खाली जा!" त्याने हुकूम केला. "खाली एक जखमी टेहळ्या आहे. पण आत्ता त्याची मलमपट्टी बदलण्यात काही अर्थ नाही. प्रथम आपण त्याला परत घेऊन गेलं पाहिजे. खाली जा! मिनिटभरात आपण परत निघू!" झोया खाली उतरेपर्यंत तो अलिप्तपणे वाट पहात राहिला व नंतर ओरडला: "रूबिन, मला वर्दी दे!"

"कॉम्रेड लेफ्टनंट, आपण निघायचं?" उतारावरून संशयित सुरात रूबिनने विचारले व खोकल्याच्या उबळीबरोबर त्याने वाफेचा लोट उडवला. "आपण थोडं थांबलं तर चालणार नाही? आत्ता ते सपाटून गोळ्या उडवताहेत!"

"अर्थात ते गप्प होईपर्यंत आपल्याला वाट पाहिलीच पाहिजे. इथून नजर ठेव!"

हुकूम दिल्यानंतर कुझ्नेत्सोव काठावरून खाली उतरला, उतारावर उभा राहिला, छातीवर टॉमीगन त्याने आडवी लटकावली आणि खड्ड्याच्या तळाशी तो चालत गेला.

सारे जणू त्याची वाट पहात होते. कानांवर आवरणे घातलेले दोन संदेशवाहक ती धोक्याची वाटचाल पार केल्यानंतर श्वास घेण्यासाठी बर्फात आडवे पडले होते. ते दोघेही आळीपाळीने त्या जखमी टेहळ्यावर, झोयावर आणि उखानोवशेजारी बसलेल्या त्या कैद केलेल्या जर्मनावर कटाक्ष टाकीत होते. त्या जर्मन कैद्याने आपल्या उंच टोपीतले डोके गुडघ्यांपर्यंत खाली झुकवले होते, आपल्या फरच्या पायघोळ कोटाच्या झालरीमध्ये त्याने आपले कातडी हातमोजातील हात खुपसले होते. त्यांना पाठ करून झोया टेहळ्याजवळ बसली होती व त्याचा सुजलेला जखमी पाय चाचपून पहात होती. मात्र तिची औषधोपचाराची पिशवी अद्याप तशीच कमरेला बांधलेली होती. आत्ता मलमपट्टी न करण्याचा तिने निर्णय घेतला होता हे स्पष्ट दिसत होते. ती फक्त काहीतरी त्याला अस्पष्ट आवाजात सांगत होती. बाकी सारे जवळच मशिनगनचा सतत चालू असलेला फडफडाट ऐकत गप्प बसून होते.

बर्फातून दूरवर सरपटत आल्यामुळे वेडावाकडा झालेला आपला पिस्तुलाचा पट्टा सरळ करीत तो टेहळ्या आणि जर्मन यांच्यामध्ये

द्रोझ्दोवस्की उभा होता व त्या दोघांकडे आळीपाळीने अनिश्चित नजरेने पहात होता. पहाटेच्या त्या अर्धवट उजेडात त्याच्या फिकट, ओढलेल्या चेहऱ्यावर अधीरता उमटलेली होती.

कुझ्नेत्सोवला खाली येताना पाहताच तो त्याच्यापाशी गेला व अर्धवट चौकशीच्या अधिकारवाणीने त्याने विचारले, "दुसरा टेहळ्या कुठं आहे? माझ्या माहितीप्रमाणं या जर्मनाबरोबर दोघे असायला हवे होते. दुसरा कुठं आहे?"

"कुणास ठाऊक! या खड्ड्याभोवतालचा सारा भाग आम्ही शोधला, पण तो काही सापडला नाही," द्रोझ्दोवस्कीला उद्देशून बोलण्याऐवजी उखानोवला उद्देशून कुझ्नेत्सोव उत्तरला. त्या जर्मनाशेजारी बसून आपल्या टॉमीगनच्या मागील भागावरील बर्फ उखानोव अगदी काळजीपूर्वक पुसत होता. "तो जर्मनांच्या हवाली झाला असावा असं काही मला वाटत नाही! आमच्याकडं सरपटत यायचा प्रयत्न केला असावा आणि ते जमलं नसावं. तो अर्ध्या वाटेत अडकला असावा किंवा चौकीजवळच्या खंदकात पोचला असावा. दोन्हीपैकी काहीतरी एक घडलं असलं पाहिजे."

"आपण त्याचा शोध घेतल पाहिजे! आपण शोधलंच पाहिजे!" तीव्र स्वरात द्रोझ्दोवस्की म्हणाला "कुझ्नेत्सोव, आपण त्याला शोधलंच पाहिजे! मी डिव्हिजनच्या कमांड पोस्टशी संपर्क साधला आणि आम्ही कुठं जात आहोत ते सांगितलं. तेव्हा त्यांनी मला हे सांगितलं. त्यांना परत नेताच ताबडतोब कमांड पोस्टवर दाखल केलं पाहिजे. त्यांच्या कैद्यासकट. टेहळणी पथकाच्या प्रमुखासमोर. कुझ्नेत्सोव, आपण त्याला शोधून काढलंच पाहिजे ... काय वाट्टेल ते करून! आपण त्या दुसऱ्या टेहळ्याला शोधून काढीपर्यंत हे ठिकाण सोडायचा आपल्याला अधिकार नाही!"

"शोधत बसण्यात आपण आणखी वेळ घालवू शकत नाही, इथून आपल्याला प्रत्येकाला बाहेर काढलंच पाहिजे! उजाडण्यापूर्वी! या सापळ्यात त्यांनी आपल्याला पकडण्यापूर्वी!" कुझ्नेत्सोवने त्याला मध्येच अडवले. "जर्मन आघाडीपासून हा खड्डा फक्त दोनशे मीटर अंतरावर आहे हे तुला समजत नाही का? दिवसाउजेडी, दुर्बीण न लावता, कुणीही खेड्यामधून इथपर्यंत नजर टाकू शकेल. ते आत्ता थोडे थंड होताच आपल्याला त्या चिलखती गाड्यांपर्यंत गेलं पाहिजे, नंतर तिथून

छोटे टप्पे धावत रणगाडे ओलांडून तोफेपर्यंत गेलं पाहिजे. स्तेपभर भटकण्याऐवजी जरा लौकर तुला शोधाचं काम करायला पाहिजे होतं! दोन चिलखती गाड्या तुला शोधता आल्या नाहीत?"

"शाब्बास लेफ्टनंट!" आपल्या बाहीने बंदुकीची मागची बाजू पुसून चकचकीत करीत उखानोव शांतपणे म्हणाला.

द्रोझ्दोवस्कीने केलेल्या चुकीचा, दोन संदेशवाहकांबरोबर त्याने खूप उशिरा केलेल्या आगमनाचा, चिलखती गाड्यांचे ठिकाण शोधण्यात त्याला आलेल्या अपयशाचा व त्यामुळे त्याने लक्ष वेधल्यामुळे सुरू झालेल्या गोळीबाराचा कुझ्नेत्सोव उल्लेख करीत होता. वस्तुतः एव्हाना त्यांनी घायाळ टेहळ्याला आपल्या हद्दीत सुखरूप नेले असते, पण द्रोझ्दोवस्कीच्या चुकीमुळे सारेच विस्कटून गेले होते.

क्षणभर द्रोझ्दोवस्की आपले ओठ चावीत राहिला आणि नंतर ठामपणे म्हणाला, "मी जिवंत आहे तोपर्यंत तोफखान्याची जबाबदारी माझ्यावर आहे! कुझ्नेत्सोव, मी सर्व गोष्टींना जबाबदार आहे. तुझ्या आयुष्यासकट..."

"खरं की काय? नाही तोफखाना कमांडर, माझ्या आयुष्याला नाही. त्याला माझा मीच जबाबदार राहीन आणि सुदैवी असेन तर माझ्या माणसांनाही जबाबदार राहीन!" कुझ्नेत्सोव एकदम फाडकन बोलला, पण दुसऱ्याच क्षणी त्याने स्वतःला आवरले. झोयाच्या आणि संदेशवाहकांच्या उपस्थितीत त्याला हे असे बोलणे चालू ठेवायची इच्छा नव्हती, द्रोझ्दोवस्कीबद्दल त्याला वाटणारा तिरस्कार उघड करायचा नव्हता. "तोफखाना कमांडर, राहू द्या ते सारं!" तो म्हणाला. "आपण शोध घेतलाच पाहिजे असं तुम्ही म्हणालात ना?"

खड्डयाच्या डाव्या बाजूला सारे स्तेप ती हेवी मशिनगन पद्धतशीरपणे विंचरून काढीत होती आणि आता आश्चर्य म्हणजे एकाच जागी सतत गोळीबाराचा एकवटलेला आवाज ऐकू येऊ लागला होता. जर्मन मशिनगनवाल्याला काहीतरी विशेष आढळले होते.

"तर आम्ही इथं आणखी शोध घेत रहावं असं तुमचं म्हणणं आहे, तोफखाना कमांडर?" कुझ्नेत्सोवने पुन्हा विचारले व त्या विवरातल्या सर्वांकडे नजर टाकली. संदेशवाहकांनी सावध होऊन त्याच्या दिशेला पाहिले. जर्मनाने आपला चेहरा मांड्यांमधून वर केला व हे

संभाषण कान टवकारून कंटाळवाण्या मुद्रेने तो ऐकू लागला. कमान ताणलेल्या भुवयांमधून, बर्फाने माखलेल्या टोपीखालील काळ्याभोर डोळ्यांनी झोयाने झटकन पाहिले. तिच्या नजरेत अगतिक प्रश्नार्थक भाव उमटला होता. कुझ्नेत्सोवने दात आवळले. ती त्याच्याकडे अशा तऱ्हेने का बघत होती?

"ठीक आहे, ठरलं तर मग," काहीशा अनैसर्गिकपणे समझोता घेत तो म्हणाला. आपले हे वागणे त्याचे त्यालाच उमगत नव्हते. "मी इथं रूबिनबरोबर थांबतो. आम्ही पुन्हा एकदा तपास करतो. आणि तिथं गोळीबार थांबताच तुम्ही सारेच्या सारे तात्काळ इथून चालते व्हा! उखानोव, तू सर्वांच्यापुढं राहून रस्ता दाखव! नाहीतर मेंढरांच्या कळपाप्रमाणं ते पुन्हा रस्ता चुकतील!"

आपल्या निर्णयांमधील तर्कशास्त्राचा अभाव त्याला जाणवत होता. हा शुद्ध वेडेपणा आहे, माझे डोके फिरले असावे, त्याने स्वत:लाच बजावले. मग दुसरा विचार त्याच्या डोक्यात आला. काय झालेय मला? मी स्वत:वरचा ताबा घालवतोय. या टेहळ्याला शोधणे व्यर्थ आहे हे मला समजतेय, तरी मी तसे करायला मान्यता देतोय. मी त्याचा शोध घ्यायलाही तयार आहे.

"होय, शोध घ्या. सारा भाग पुन्हा तपासायचा रूबिनला हुकूम दे. आणि तोपर्यंत आम्ही इथं थांबतो!"

आपल्या बायकी बारीक कमरेभोवतालच्या पट्ट्याशी चाळा करीत द्रोझ्दोवस्की अस्वस्थपणे म्हणाला व बाजूला वळला. काही क्षण तो उतारावर ताठ उभा राहिला. त्याचे ते तसे उभे राहणे अगम्य, भयावह वाटत होते. जणू त्याच्या हुकूमात, त्याच्या स्थिर अट्टाहासात अजिबात बदल होणार नव्हता.

तो म्हणाला, "दुसरा टेहळ्या फार दूर गेला नसणार. आपण त्याला इथंच टाकला असं डिव्हिजनला सांगायचा आपल्याला अधिकार नाही. त्याच्याशिवाय आपल्याला इथून जायचा अधिकार नाही! कुझ्नेत्सोव, तू संदेशवाहकांनाही बरोबर घेऊ शकतोस!"

"त्यांची गरज नाही," कुझ्नेत्सोव उत्तरला. "आम्ही दोघे पुरेसे आहोत. जर्मनांच्या डोळ्यांवर यायला चौघांना कशाला पाठवायचं?"

"तोफखाना कमांडर..."

झोया कुझ्नेत्सोवच्या इतक्या जवळून गेली की, तिचा मेंढकातडी कोट त्याच्या पायघोळ कोटाला घासला गेला. ती द्रोझ्दोवस्कीसमोर उभी राहिली व शांतपणे समजूत घालण्याच्या स्वरात बोलू लागली.

"आत्ता आपण निदान या एका टेहळ्याला परत घेऊन गेलं पाहिजे. त्याची परिस्थिती फार वाईट आहे. कमालीची हिमबाधा झालीय आणि बरंच रक्त गेलंय. दुसरा टेहळ्या आपल्याला जिवंत सापडेल किंवा नाही ते मला ठाऊक नाही, पण याला मात्र..."

"ऊठ ए लांडग्या!" उखानोवने हिसका देत आपल्या कैद्याला उभे केले व तो स्वत: अस्वलासारखा झुलत उठला. आपली टॉमीगन त्याने खांद्यावर लटकावली. "चालायला लाग अक्करमाशा! नाच! उड्या मार! नाहीतर वेळेआधीच गचकशील! जरा हालचाल कर!"

त्याने जर्मनाला त्या खड्ड्यात सबंध गोलभर फिरवले, त्याला धक्के मारले आणि मग त्याला तसाच सोडून, झोयाला हळुवारपणे बाजूला करीत तो द्रोझ्दोवस्कीसमोर उभा ठाकला. त्याच्या चेहऱ्यावर एक मिस्कील भाव उमटला होता व त्याचा पुढचा खोटा दात हसल्यामुळे चमकत होता.

"तोफखाना कमांडर, तुम्हाला स्वत:ला स्वत:बद्दलची सारी खरी माहिती आहे का? त्याबद्दल कधी विचार केलाय? झोया, जरा कृपा करून मिनिटभर लांब जा! तुझ्या इथं असण्यानं मला जरा अवघडल्यासारखं वाटतंय ..."

"उखानोव!..." तिथून जाण्याऐवजी ती पुढे सरली आणि घाबरून तिने आपल्या नाजूक, ताठरलेल्या देहाने द्रोझ्दोवस्कीला मागे झाकले. जणू ती आपल्या डोळ्यांनी उखानोवशी सामना करीत होती. "काय करणार आहेस तू? ... कशाला?"

"बाजूला हो झोया, माझ्या लाडके! मी त्याला काय करणार? तसं करण्यात काही अर्थ नाही. मी सार्जंट, तो लेफ्टनंट. आणि विद्यालयात आम्ही दोघंही नियम तोंडपाठ शिकलोय. तर मी म्हणत होतो ..."

उखानोवने अगदी हळुवारपणे तिला बाजूला सारले आणि द्रोझ्दोवस्कीच्या ताठ, लवचीक खांद्यांवर सरळ खाली वाकून ऐकू न येणारे असे काही मोजके शब्द तो पुटपुटला व नंतर अधिक स्पष्ट स्वरात पुढे म्हणाला, "... आणि तुमच्या तोफखान्यात शिल्लक उरलेल्या आमच्या कुणाहीबद्दल तुम्हाला काहीही पर्वा वाटत नसली, तरी निदान

थोडातरी मेंदू वापरण्याची तसदी घ्या. विशेषत: डिव्हिजनच्या मुख्य ठाण्याला वर्दी देताना!"

'काय म्हणालास?" द्रोझ्दोवस्कीचा चेहरा संतापाने वेडावाकडा झाला. त्या उंच उतारावर पडेपर्यंत मागे ताठ होत त्याने तीव्र स्वरात पुन्हा विचारले, "काय म्हणालास?"

"जाऊं द्या, तोफखाना कमांडर!" उखानोव शांतपणे म्हणाला. त्याचे डोळे मात्र हसत होते. "इथं आपण अगदी मोकळेपणानं बोलू शकतो. हे काही कवायतीचं मैदान नाही. देव आपल्या साक्षीला आहे आणि इथून तो फार लांबही नाही. हा नियमांचा भंग ठरत नाही. तुझ्या हुकुमांची आम्ही चर्चा करीत नाही आहोत. तोफखाना कमांडर, मला तुमच्याबद्दल काय वाटतं तेवढंच मला सांगायचं होतं तुम्हाला! लक्षात असू द्या, एखाद्या दिवशी उपयोगी ठरेल!"

"उखानोव, पुरे झालं!" कुझ्नेत्सोव खंबीरपणे पुढे झाला व त्याने उखानोवचा दंड धरला. "या जर्मनाच्या समोर हे एवढं पुरे झालं! त्याच्याकडं बघ! तो गरगरा फिरतोय!"

द्रोझ्दोवस्की स्तब्धपणे ताठ उभा राहिला. त्याचा चेहरा पांढराफटक आणि महाभयानक दिसत होता. तो जर्मन लंबकासारखा झुलत होता, आपल्या फरच्या बुटांमधील पाय आपटीत होता आणि दुबळेपणाने दोन्ही हात छातीवर आदळत होता. परकी भाषेतले शब्द जाणून घेण्याचा प्रयत्न करणारे त्याचे डोळे उखानोवकडून कुझ्नेत्सोवकडे फिरताना चकाकत होते. ही चर्चा आपल्याबद्दल चालली आहे असा त्याने ठाम तर्क बांधला. त्याने सताड तोंड वासले आणि हृदयविकाराचा झटका आल्याप्रमाणे तो जलद श्वास घेऊ लागला. मग एकाएकी तो कुशीवर बर्फात कलंडला आणि काहीही न समजणारी वाक्ये भरभरा बरळू लागला. त्यातून फक्त पुढील शब्दांचा बोध होत होता: Rus, Schwein, ich sterbe. Es... Kalt."

"साला आवाज चढवतोय!" उखानोव म्हणाला. "कैदी म्हणून त्याला घेऊन जातोय ते आवडत नाहीय् त्याला. गारठ्यानं डोकं फिरलं वाटतं त्याचं! कुझ्नेत्सोव, काय म्हणाला तो – डुक्कर?"

"उभा रहा!" कुझ्नेत्सोवने आज्ञा केली व टॉमीगनच्या नळीने जर्मनाला इशारा केला. "Steht auf ! चल! Steht auf! चल म्हणतो ना!"

पण तो जर्मन तसाच जमिनीवर पडून राहिला, त्याने आपले गुडघे हनुवटीपाशी आवळून धरले व आपल्या उंच वळवलेल्या कॉलरमधून तो चित्रविचित्र आवाज काढीत राहिला. उखानोवच्या चेहऱ्यावर आश्चर्य उमटले आणि पुढे होऊन त्याने त्या जर्मनाची कॉलर एवढ्या जोरात हिसकली की, ती फाटायला लागली. "आम्हाला डुक्कर म्हणतोस, तुला चांगला धडा शिकवतो" असे म्हणत त्याने त्याला गदगदा हालवायला सुरुवात केली तेव्हा त्या जर्मनाने अशी काही किंकाळी फोडली की, आता पुढच्या क्षणी तो मरणार असे वाटले. उखानोवने झटकन त्याला आपल्या पोलादी पकडीत धरले व आपले हातमोजे त्याच्या तोंडावर दाबून धरले. तो जर्मन अगतिकपणे हिसके देऊ लागला व त्याच्या तोंडातून दबते विव्हळणे उमटू लागले.

"नाझी हरामखोरा! डुक्कर हा शब्द तू विसरशील अशी अद्दल घडवतो तुला! तुला असा धडा शिकवतो की, स्वतःच्या मायबापांची आठवण राह्यची नाही!"

"उखानोव, सोड त्याला! त्याला घुसमटून टाकशील!... तुम्ही सारे काय करताहात?" जवळ जवळ रडत झोया म्हणाली. ती एकापाठोपाठ सर्वांकडे नजर फिरवीत होती. "तुम्ही एवढे खुनशी का बनता? तुम्हा सर्वांना काय झालंय?" तिने द्रोझ्दोवस्कीवर स्वतःला झोकून दिले आणि त्याच्या कोटाची बाही पकडून विनवणीच्या सुरात म्हणाली, "वोलोद्या, सांग त्यांना तू तसा नाहीस! तू जसा खरा आहेस तसे ते तुला ओळखत नाहीत, वोलोद्या!"

"चालती हो! इथं कशाला तोंड खुपसतेस मधे मधे?" आपल्या बाहीवरची तिची बोटे त्याने हिसडून टाकली व तो मागे सरला. उपहासात्मक हास्याने त्याचे दात चमकले. "आघाडीवरच्या रांडांकडून हस्तक्षेप झालेला मला आवडत नाही! जा आणि कुझ्नेत्सोवचं सांत्वन कर! तो प्रेमळ अंतःकरणाचा आहे आणि तूही तशीच आहेस! तुम्ही दोघे संतांचे अवतार आहात! पण तुझ्या सगळ्या मित्रांना कळू दे, विशेषतः त्या कुझ्नेत्सोवला समजू दे की, त्या कुणाहीबरोबर तू शय्यासोबत करणार नाहीस! दयेच्या पुतळी, ती आशा तू सोड! या लढाईनंतर तू आमच्या तोफखान्यातून चालती हो आणि आपल्या वैद्यकीय पथकात परत जा! तोफखान्यात नंतर तुला एक दिवसही थांबायला देणार नाही!"

त्या क्षणाला त्याच्या चेहऱ्यावर अगदी किळसवाणा भाव होता. जणू आणखी अपमान करण्याच्या हेतूने तो आणखी एक पाऊल मागे सरला आणि निश्चयपूर्वक जोराने खांदे उडवून त्या उतारावरून एवढ्या सपाटच्याने झपझप चालत गेला की, गोठलेल्या मातीची ढिकळे उडाली व त्याच्या पावलांमागून गडगडत खाली गेली.

विवराच्या तोंडाशी तो काही सेकंद थांबला, आपले पिस्तूल त्याने बाहेर काढले आणि आज्ञा करताना त्याचा आवाज फाटला.

"संदेशवाहकांनो! जर्मन कैद्याला घ्या आणि माझ्या पाठोपाठ या! धावत!"

कुणाचीही वाट न पाहता तो मातीचे ढीग तुडवीत अंधारात दिसेनासा झाला.

क्षणभर कुणीच बोलले नाही. जर्मन मशिनगन आता स्तेप विंचरून काढण्यासाठी धडधडत नव्हती आणि खड्डयाच्या तोंडावर हिमकणांचे पांढरे पुंजके तरंगत होते. द्रोझ्दोवस्कीची वरून झालेली आज्ञा एवढी स्पष्ट आणि कठोर स्वरात होती की, दोन्हीही संदेशवाहक ताडकन उडी मारून उभे झाले व उखानोव आणि कुझ्नेत्सोवला वळसा घालून एखादा ससा पकडायला निघावे तसे जर्मन कैद्याच्या दिशेने निघाले.

"थांबा!" कुझ्नेत्सोव ताडकन उद्गारला व त्यांच्या आणि त्या जर्मनाच्या मध्ये उभा राहिला. "टेहळयाला उचला आणि द्रोझ्दोवस्कीच्या मागं जा! उखानोव जर्मनाला घेऊन येईल! जखमी टेहळयाला उचला!" आणि टेहळया जिथे पडला होता तिथे त्याने संदेशवाहकांना चक्क लोटले. "जर तुम्ही त्याला तिथपर्यंत नेला नाहीत, तर त्याचा जाब तुम्हाला द्यावा लागेल! झोया!"

तिने उखानोवबरोबर जावे म्हणजे तोफेपर्यंत ती सुरक्षितपणे पोहोचेल असे त्याला सांगायचे होते, पण त्याचे डोळे तिच्या डोळयांना भिडले आणि तो काहीच बोलला नाही. परंतु ती त्याला पहात नव्हती. जरी ती त्याच्याकडे पहात होती तरी तिला त्याचे बोलणे ऐकू येत नव्हते. तिची बोटे हातमोजांना गच्च पकडून खेचीत होती. तिचे डोळे कोरडे होते आणि कसलीतरी अपरिचित वेदना व्हावी परंतु त्या वेदनेचा उगम समजू नये, त्याप्रमाणे तिच्या मोठ्या व लांब भुवया आश्चर्याने उंचावल्या होत्या.

"ए, मी धावायचं म्हणतो त्याचा अर्थ तुला समजतो का? तू कसा काय धावतोस ते आम्ही आता पाहू ..."

उखानोवने जर्मनाला उतारावर चालवले व आपल्या टॉमीगनच्या पट्ट्याने त्याला हळूच फटका मारला. झोयाला तो काहीच बोलला नाही, फक्त ती केव्हा निघते याची शांतपणे वाट पहात राहिला.

"झोया," अखेरीस कुझ्नेत्सोव घोगऱ्या आवाजात म्हणाला. "तुला आता गेलं पाहिजे. जोपर्यंत शांत आहे तेवढ्यात. तू उखानोवबरोबर जा! ऐकतेस का?"

"होय, मी जाते. आत्ता निघाले," झोया दचकून म्हणाली आणि आपल्या कोटाच्या कॉलरमध्ये तोंड लपवून तिने डोके खाली झुकवले. नंतर ती टेहळ्याजवळ खाली बसली व संदेशवाहकांना उसन्या उत्साहाने म्हणाली, "जरा जास्त काळजी घ्या हं. त्याच्या डाव्या पायाला खूप वाईट जखम झालीय. त्यावर दाब देऊ नका. जरा जास्त काळजीनं त्याला उचला हं!"

संदेशवाहकांनी टेहळ्याला उचलले व त्याला अधिक सुखकारक ठरेल अशा जागी धरण्यासाठी त्याचे शरीर त्यांनी चाचपले.

"चला पुढं," कुझ्नेत्सोव म्हणाला. "आम्ही चटकन कामगिरी पार पाडली तर मी आणि रूबिन तुम्हाला गाठतो."

"जर्मनांच्या तावडीत सापडणार नाही याची काळजी घ्या ... जिवंत रहा. आणि डोकं फिरवून घेऊ नकोस. आम्हाला लौकर गाठ हं कुझ्नेचिक," मान मागे वळवून क्षीण हसत झोया म्हणाली. तिचे ते लटके हसू न पाहण्यासाठी त्याने काय वाट्टेल ती किंमत मोजली असती.

"तर मग जर्मन लांडग्या, तू किती बहाद्दर आहेस ते आम्हाला दाखव. आपण हातात हात घालून जाऊ. Sprechen, Schwein?!" उखानोवने जर्मनाला जोरात आपल्याकडे खेचले. "अच्छा लेफ्टनंट."

"चल पुढे उखानोव. आणि काळजी घे."

विवराच्या तोंडापर्यंत कुझ्नेत्सोव त्यांच्याबरोबर गेला व दोन चिलखती गाड्यांच्या काळ्या छायांमागे ती सर्वजण अदृश्य होईपर्यंत रूबिनशेजारी पडून त्यांना एकटक पहात राहिला.

## प्रकरण विसावे

"रूबिन, सगळीकडं कसून शोध केलास?"

"कॉम्रेड लेफ्टनंट, तुम्ही माझ्यावर विश्वास का ठेवीत नाही? माझ्या पोटावर मी सगळा भाग सरपटत फिरलो, माझ्या मोठ्या कोटाचा सत्यानाश केला. जर तो ठार झाला असेल, तर एव्हाना बर्फाच्या ढिगाऱ्यात गाडला गेला असणार. इथं काही मुडदे पण आढळले नाहीत. आणखी कुठं पाहणार आपण?"

"ठीक आहे रूबिन. जोपर्यंत ते शांत आहेत, तेवढ्यात खिंडीच्या दिशेनं आपण पुन्हा एकदा शोध घेऊ. जरी विश्वास ठेवायला कठीण असलं तरी एखादे वेळी तो वाट चुकला असण्याची शक्यता आहे. आपले मोर्चे कुठं आहेत हे प्रकाशगोलकांनी त्याला दाखवलं असलं पाहिजे."

"खिंडीजवळ जरा जास्त काळजी घेतली पाहिजे. अजून जर जर्मन डाराडूर झोपले नसतील, तर तिथं दबा धरून बसले असणं शक्य आहे. शिंची काय कटकट आहे! कॉम्रेड लेफ्टनंट, मला तर उभ्या उभ्या झोप येतेय. झोपेनं मला अगदी घेरलंय... बर्फासारखा मी थंडगार पडलोय आणि पापण्यांवर मणामणांची वजनं ठेवली आहेत असं वाटतंय."

"बर्फानं चेहरा चोळ. जेवढ्या जोरात चोळता येईल तेवढ्या जोरानं!"

"मी सारखा चोळतोय. माझ्या चेहऱ्याची कातडी सोलून निघालीय. गेल्या रात्री तासा दोन तासांची झोप मिळालीय तेवढीच. बाकी आपल्याला झोपच मिळालेली नाही."

आता ओसाड पडलेल्या त्या बाँबस्फोटाच्या विवराच्या तोंडाशी ते पालथे पडून होते. भोवतालचे वातावरण निवळत होते व फटफटू लागले होते. डिसेंबरातल्या त्या रात्रीची घनघोर स्तब्धता आता विरत चालली होती व पहाट फुटायचा सुमार झाला होता. त्या गोठलेल्या संधिकालात त्या दोघांना झोप अगदी अनावर झाली होती. कुझ्नेत्सोवला प्रकर्षाने जाणीव झाली की, कितीही प्रयत्न केले तरी त्या सर्वशोषक स्तब्धतेच्या फसवेपणामुळे, पहाटेपूर्वीच्या त्या शांततेने, मेंदूला एक प्रकारची सुखद गोड गुंगी आली होती व सर्व गोष्टींचे अचानक विस्मरण पाडणारी ती शिथिलता नाकारण्याची त्याच्या जाणीवबुद्धीत ताकद राहिली नव्हती.

"रूबिन, खिंडीकडं चल!" तो उभा राहिला आणि त्याच क्षणी

त्याला जाणवले की, पाच पावले टाकणेही त्याला शक्य नाही. त्या निद्राविहीन रात्रीनंतर अचानक सर्व ताण शिथिल झाल्यामुळे धोक्याचा विचारच डोक्यातून पळाला व त्याला गोड, उबदार वातावरणाची गुंगी चढली. त्या क्षणिक गुंगीच्या भासात तो थोडा वेळ तसाच उभा राहिला. "चल जाऊ या!" तो मोठ्यांदा पुन्हा म्हणाला आणि पुन्हा पूर्वीची वास्तवाची जाणीव आणण्यासाठी त्याने आपल्या हातमोजांमधील बधीर बोटांच्या टोकांची हालचाल केली आणि बंदुकीच्या दस्त्यावरची त्यांची पकड घट्ट केली. "चल जाऊ या!" तो तिसऱ्यांदा म्हणाला. कोणत्याही परिस्थितीत त्यांना गेले पाहिजे, खिंडीच्या टोकाशी त्यांना गेले पाहिजे. ही गोष्ट तो स्वत:ला व रूबिनला आपल्या स्वत:च्या आवाजाने पटवू पहात होता.

त्यांच्या पायांखाली बर्फ चुरडत होता आणि जसा तो पुढे निघाला, तसे कुझ्नेत्सोवला आपल्या खांद्याशी रूबिनच्या धापांचा गरम श्वास जाणवू लागला. त्यांच्या नमदी बुटांखालचा चुरडणारा बर्फ जाणवू लागला. पुढच्या गोठलेल्या वातावरणात, नि:स्तब्ध पसरलेल्या रात्रीच्या पांढऱ्या पोकळीत त्याने टक लावून पाहिले आणि पुन्हा त्याला जाणवले की, हे सगळे करणारा तो स्वत: नसून दुसराच कुणीतरी आहे, तो आणि रूबिन त्याच्या आज्ञा पाळत नसून दुसऱ्याच कुणाच्या तरी हुकुमांचे ते पालन करीत आहेत. जणू काही स्वत:ची खात्री पटविण्यासाठी त्याला याचा विचार करावा लागत होता. आणि त्या लाटांसारख्या तरंगत येणाऱ्या हिमाच्या लांबलचक सरींमध्ये, गोळीबाराचा चकचकाट थांबलेल्या त्या नि:स्तब्ध पांढऱ्या वाळवंटामध्ये एक प्रकारच्या सुखद क्षणिक आनंदाचे अंधुक आश्वासन होते. जणू तेथे घडलेले समर अनंत काळापूर्वी घडले होते आणि तो एक फार पूर्वीचा इतिहास बनला होता. एका उबदार, काळ्या चिकट आवरणाने त्याला पूर्णपणे वेढून टाकले. पण विस्मरणाच्या त्या मऊ कोषाला, त्या दुबळ्या विश्रब्धतेला काहीतरी टोचत होते.

त्याच्या पाठीमागे गोळीबाराचा कोरडा आवाज घुमला आणि रात्रीची ती शांतता भंगली. तो एकदम पुढे सरला. त्याला अंधुकपणे जाणवले की, गोळीबार मागून होतोय. आपण जर्मन मोर्चात चालून आलोय असा पहिला विचार त्याच्या मनात आला. अंत:प्रेरणेने त्याने स्वत:ला पालथे झोकून दिले व गळयातून टॉमीगन मोकळी केली.

"रूबिन, मागं चल!"

पण असे तो ओरडत असतानाच त्याने पाहिले की, खिंडीच्या टोकापासून रूबिन धापा टाकीत त्याच्या दिशेने धावत येत होता.

"लेफ्टनंट, लेफ्टनंट, ती आपली माणसं आहेत! ... बघा! तुमच्या मागं, त्या तिथं!"

"रूबिन, माझ्यामागनं ये!" ग्रेनेडच्या स्फोटांमध्ये जेव्हा टॉमीगन्सचा आवाज घुमू लागला तेव्हा त्याने खड्ड्याकडे, द्रोझ्दोवस्कीचा गट धावत होता त्या दोन चिलखती गाड्यांच्या दिशेने पळायला सुरुवात केली. काय घडले होते? जर्मनांच्या ते नजरेला पडले होते? त्यांना टाळून या लोकांना निसटता आले नव्हते?

आता त्याच्या मागे, खेड्याच्या सीमेपासून पुन्हा हेवी मशिनगनचा अखंड दणदणाट सुरू झाला व सारे स्तेप खडबडून जागे झाले होते. सरळ डोक्यावरून उडणाऱ्या गोळ्यांच्या त्या चकचकाटात स्तेपचा विस्तार लहानमोठा भासत होता; अंधार फाडून जाणाऱ्या त्या चकचकाटाने त्या धावणाऱ्या दोन माणसांच्या सावल्या एकदा इकडे तर एकदा तिकडे अशा थरथरत होत्या; सुसाट येणाऱ्या त्या गोळ्या त्यांचा वेध घेऊ पहात होत्या, त्यांच्या पलिकडे सुसाटत जात होत्या व हवेत विरून नाहीशा होत होत्या.

"रूबिन, गाड्यांकडं! उजव्या बाजूला!" कुझ्नेत्सोव समोरच्या विवराकडे आणि गाड्यांच्या काळ्या आकारांकडे धावताना ओरडला. त्या चिलखती गाड्यांवर साचलेल्या बर्फावर उडणाऱ्या गोळ्यांच्या खुणा उमटत होत्या.

पुन्हा ठिणग्यांचा चकचकाट करीत पुढे अनेक ग्रेनेड फुटले. मशिनगनची फैर अधिक ताज्या जोमाने उडू लागली आणि एका गाडीकडे धापा टाकीत धावताना कुझ्नेत्सोवच्या नजरेला संपूर्ण दृश्य स्पष्ट दिसले.

मोडून उध्वस्त झालेल्या जर्मन रणगाड्यांपासून टेकाडावर उभ्या असलेल्या दोन वाहनांच्या दिशेने आकृतींची रांगच्या रांग धावत होती व गोळीबाराच्या चकचकाटात ती स्पष्ट दिसत होती. तो जिथे उभा होता त्या ठिकाणाच्या व त्या जर्मन रणगाड्यांच्या स्मशानभूमीच्या दरम्यानच्या खोलगट भागात काही काळ्या आकृती बर्फातून सरपटत चालल्या होत्या व त्यांच्या टॉमीगन त्या दोन वाहनांवर व पळणाऱ्या

जर्मनांवर आगीचा वर्षाव करीत होत्या. त्यांच्या आवाजावरून त्या सोविएत आहेत हे कुझ्नेत्सोवने ओळखले. एका वाहनाचे इंजिन सुरू झाले होते, त्याला दोन्ही बाजूला आकृती लटकल्या होत्या व त्या वाहनाने वळण घेतले. दुसरे जागेवरच उभे होते आणि जर्मन त्यातून खालच्या पोकळीत तुफान गोळीबार करीत होते.

"रूबिन, त्या मोटारींवर! ... साल्यांना भाजून काढ!" आपल्या बधीर बोटांनी टॉमीगनचा चाप ओढता ओढता कुझ्नेत्सोव आसुरी आनंदाने ओरडला. त्याच्या खांद्याला दस्त्याचे हादरे बसत होते आणि त्याच्या गोळीबाराने स्तेप अक्षरशः घुसळून निघाले. एकाच फैरीत सारी थाळी खलास करण्यापासून मोठ्या कष्टाने त्याने स्वतःला आवरले.

"डुकरांनो! हलकटांनो!" त्याच्या शेजारून रूबिन दातओठ चावीत ओरडत होता. "तुम्हा सगळ्यांची नरडी दाबीन, नुसत्या हातांनी तुमचा जीव घेईन!"

"रूबिन! ग्रेनेड! ... त्या मोटारींवर फेक! लौकर!"

त्याच्या टॉमीगनच्या फैरीच्या उजेडात रूबिनचे भक्कम दात जांभळे चकाकत होते. त्याचा भलामोठा कुरूप चेहरा दस्त्याला घट्ट बिलगला होता. प्रथम त्याला ऐकू आले नाही किंवा कदाचित कुझ्नेत्सोवचा हुकूम त्याला समजला नाही. कुझ्नेत्सोवने त्याच्या खांद्याला जोरात बुक्का मारला व संतापाने तो ओरडला: "ग्रेनेड! ग्रेनेड!" तेव्हा कुठे फैर थांबवून टॉमीगन एकदम मध्येच थांबली आणि ग्रेनेडसाठी रूबिनचा हात त्याच्या कोटाच्या खिशात खुपसला गेला. चिलखती गाडीपासून तो दोन पावले पुढे झेपावला, त्याने पिन खेचली आणि घशातून एक घोगरा चीत्कार काढीत टेकाडाच्या दिशेने त्याने ग्रेनेड भिरकावला, मग ताबडतोब दुसरा ग्रेनेडही त्याने त्याच त्वेषाने जोरात फेकला. उतारावर स्फोटांचे दोन आगीचे लोळ उठले. ग्रेनेड मोटारींपर्यंत पोचले नव्हते.

"अरे दुष्ट सापांनो!"

पुन्हा झटकन टॉमीगन उचलून रूबिन चिलखती गाडीच्या चाकाखाली कुझ्नेत्सोवशेजारी पालथा पडला आणि त्या मोटारींवर त्याने एक लांबलचक फैर उडवली. लौकरच आपली सर्व काडतुसे संपतील आणि आपल्या दोघांजवळही जादा दारूगोळा शिल्लक नाही याची जाणीव

होताच कुझ्नेत्सोवने स्वतःला बजावले : खालच्या पोकळीत द्रोझ्दोवस्कीच्या गटाला जाऊन मिळणे त्यांना आवश्यक आहे. खरे म्हणजे त्यांच्या आत्ताच्या ठिकाणावरही जर्मन गोळीबाराचे लक्ष वळलेले होते. पण याचा विचार करीत असतानाच त्याच्या लक्षात आले की, खालच्या खोलगट भागातला गोळीबार क्षीण होत चालला आहे. मोह घालणाऱ्या चापावरचे बोट त्याने झटकन् बाजूला केले आणि दोन्ही कोपरांवर ओणवे होऊन तो पोकळीत पाहू लागला.

"रूबिन! तू इथं थांब! त्यांच्या गोळीबाराचं लक्ष इकडं ओढवून घे! मी तिथं इतरांकडं खाली जातो. ऐकलंस? दारूगोळा हात राखून वापर. वाया घालवू नको! मी तिथं खाली जातो ..."

त्या सबमशिनगन उडत होत्या त्यांच्या दिशेने खेड्याच्या सीमेवरील हेवी मशिनगनने आपल्या फैरींचा मोहरा वळवला. सारा खोलगट भाग ती विंचरून काढू लागली. पहिल्या काही घरांच्या खिडक्यांमधून आणखी तीन चार मशिनगन आग ओकू लागल्या. त्यांचे अनुक्षेपक चिलखती गाड्यांवरून सपासप उडू लागले, उतारांवरच्या बर्फात खसाखस गोळ्या घुसू लागल्या व पोकळीच्या वर जळून पडलेल्या रणगाड्यांच्या पत्र्यावरून आपटून उजळणाऱ्या आकाशात सरळ वर उसळू लागल्या.

ठेचकाळत, खाली कोसळत व पुन्हा वर उठत, स्फोटांनी पडलेल्या खड्ड्यांना अडखळत, कुझ्नेत्सोव त्या चकचकीत उजळलेल्या खोलगट भागाकडे सुमारे पन्नास मीटर धावला. जर्मनांनी तेथे अखंड गोळीबार चालवला होता. एकाएकी त्याला आपले सारे अवयव शिशासारखे जड भासू लागले. त्याला धड श्वासही घेता येईना एवढा तो त्या भाराने चेपला गेला. टेकाडावर छोट्या फैरी झाडीत तो अनेकदा बर्फात कोसळला. त्याच्या धकधकणाऱ्या काळजाने त्याच्या कानात हातोड्यांनी घण मारायला सुरुवात केली होती व बाकीचे आवाज त्याला ऐकू येईनासे झाले होते. टेकाडावरच्या त्या वाहनातून कोठून गोळीबार होतोय याचा त्याचे डोळे आटोकाट शोध घेत होते आणि हातोडे त्याच्या मेंदूत एकच विचार सतत आदळीत होते. ते रणगाड्यांकडे परत का जात नाहीत? इथं ऐन गोळीबारात ते का थांबून राहिलेत? रणगाड्यांकडे त्यांनी धावले पाहिजे! आणि रणगाड्यांच्या पलिकडे!

त्या खोलगट भागाच्या तळाशी उतारावरून पोचल्यानंतर कुझ्नेत्सोवला

प्रथम उखानोव दिसला. टेकाडाच्या पायथ्यापासून दीडशे पावलांवर एका बर्फखंडामागे तो पालथा पडला होता, आपल्या कोपरांनी अंगाखालच्या जर्मनाला दाबून धरीत होता आणि त्या थांबून राहिलेल्या वाहनावर लक्षपूर्वक गोळीबार करीत होता. प्रत्येक फैरीनंतर तो थोडासा डावीकडे रणगाड्यांच्या दिशेने सरपटत होता, आणि शिव्यांचा भडिमार करीत, जर्मनाला आपल्यामागे जोरात खेचून घेऊन बर्फात दाबत होता आणि पुन्हा त्याच्या अंगावर पडत होता. मोकळी झालेली काडतुसांची एक थाळी बर्फाच्या ढिगापासून काही मीटर अंतरावर पडली होती.

"उखानोव! रणगाड्यांकडं – धाव!" कुझ्नेत्सोव कसाबसा ओरडला आणि कमालीच्या दमल्या अवस्थेत त्याच्याशेजारी कोसळला. "रणगाड्यांकडं धाव! आणखी एकही मिनिट इथं थांबू नको! रणगाड्यांकडं धाव! उखानोव, ऐकलंस का?"

उखानोवने आपला फिकट, विस्कटलेला, कमालीचे आत्मसंयमन केलेला चेहरा त्याच्याकडे वळवला आणि त्याचा पुढचा खोटा दात लालसर चमकला. "लेफ्टनंट! ... बॅटरी कमांडरकडं धावा ... झोयाकडं! मी एका संदेशवाहकाला पाठवलंय, पण तो काही कामाचा नाही! जखमी झालीय बहुधा! मी इथं थांबतो! ... तुम्ही त्यांच्याकडं जा!"

"कोण जखमी झालंय? काय म्हणालास तू?"

"लेफ्टनंट, त्यांच्याकडं जा! झोयाकडं! धावा!" उखानोवचा ओळखू येणार नाही इतका घोगरा आवाज कुझ्नेत्सोवच्या कानांवर आदळला. उखानोवने त्या जर्मनाला पुन्हा बर्फात दाबले व आपली टॉमीगन टेकाडावरच्या वाहनावर रोखली.

झोया जखमी झाली? अशक्य! असे होणेच शक्य नाही!

त्याच्या पाठीमधून थंडगार शहारे जात होते, आपण काय करतो आहोत याचे त्याला फारसे भान राहिले नव्हते, पण तरीही क्षीणपणे कुझ्नेत्सोव खाली न वाकता, सरळ त्या खोलगट भागाच्या तळाशी विखुरलेल्या आकृतींच्या दिशेने धावत होता. त्याला फक्त एकाच गोष्टीची जाणीव होती. जे कधीही घडायला नको होते असे काहीतरी घडले होते, तसे घडायचा काही एक हक्क नव्हता, त्याला ते तसे घडायला नको होते. अविश्वासाच्या भावनेने, बेभान संतापलेल्या अवस्थेत तो त्या खोलगट भागाच्या तळाशी धावत गेला. बर्फाच्या एका छोट्या ढिगावर

ओणवे राहून तोंडावर हात धरलेल्या कुणालातरी त्याने वाटेतून जोरात बाजूला ढकलले.

रणांगणावर तातडीने मलमपट्टी करण्याचे पाकीट संदेशवाहक आपल्या दातांनी उघडत होता हे कुझ्नेत्सोवला त्यावेळी स्पष्टसे उमगले नाही. आणि त्याच्या नजरेला परिचित पांढरा मेंढकातडी कोट, पांढरे नमदी बूट व प्रथमोपचाराची पिशवी पूर्णपणे बर्फाने माखलेल्या अवस्थेत पहायला मिळाली.

"मूर्खा, काय गोंधळ चालवला आहेस?"

"ती जखमी झालीय ... मलमपट्टीची गरज आहे!" घाबरल्या आवाजात संदेशवाहक उत्तरला. "बघा, त्यांनी तिची काय दशा केलीय ..."

जणू थंडी वाजत असावी त्याप्रमाणे पाय पोटाशी आखडून झोया कुशीवर पडली होती. तिने आपले हात पोटाशी गच्च आवळून धरले होते व तिच्या ताठ वाकलेल्या गुडघ्यांशी छोटे जर्मन पिस्तूल पडले होते. तिच्या अंगाखालून भयावह असा काहीतरी काळसर द्रव बर्फावर पसरत होता.

तो भयावह काळसर द्रव म्हणजे रक्त आहे हे त्याला ताबडतोब समजले, पण ते झोयाचे रक्त आहे यावर विश्वास ठेवायलाच त्याचे मन तयार होईना, तिचे रक्त प्रत्यक्ष डोळ्यांनी आपण पाहत आहोत हेच मानायला तो तयार होईना; तात्काळ त्याने मनाची समजूत घालायचा प्रयत्न केला की, कधीही दुरुस्त करता येणार नाही असे काहीही घडलेले नाही, तिला प्राणांतिक जखम होणे किंवा ती ठार होणे शक्य नाही, तिचे हात एवढ्या भीतीदायकपणे तिच्या पोटाला आवळून धरणे शक्य नाही.

"झोया! ... काय झालं झोया?"

"लेफ्टनंट, ती बोलत नाही ... टॉमीगनची फैर उडाली ... मला वाटतं पोटात गोळी ... पहिल्यांदा तिनं आम्हाला दूर रहायला सांगितलं, आपण स्वतःच सावरून घेऊ म्हणाली. आम्ही तिला बँडेज बांधू लागलो तर तसं करू देईना ... आता ती काहीच बोलत नाही," संदेशवाहकाची अस्पष्ट बडबड लांबून कुठून तरी ऐकू येत आहे असे त्याला वाटत होते. "या खोलगट भागात येईपर्यंत सारं काही शांत

होतं. मग त्यांनी तिथून वरून आमच्यावर गोळीबार सुरू केला. आणि मग जुंपली ..."

"द्रोझ्दोवस्की कुठं आहे?" कुझ्नेत्सोवने विचारले, पण त्याचा त्यालाच आवाज ऐकू आला नाही. "कुठं आहे तो?"

"तुम्हाला दिसत नाही? त्या तिथं पलिकडं बर्फावर बसलेत ... त्यांनाही जखम झाली असावी. जर्मनांनी ग्रेनेड फेकले."

"द्रोझ्दोवस्की कुठं आहे?" कुझ्नेत्सोवने पुन्हा अस्पष्ट आवाजात विचारले. नंतर तो गोल वळला आणि तिथून अवघ्या पाच मीटर अंतरावर द्रोझ्दोवस्की बसलेला त्याने पाहिला.

द्रोझ्दोवस्कीच्या डोक्यावर टोपी नव्हती. आपल्या डाव्या हातात त्याने अद्याप पिस्तूल धरले होते व उजव्या हाताने तो मानेला स्पर्श करीत होता, नंतर डोळ्यांपर्यंत हात धरीत होता व अस्पष्टपणे स्वत:शीच काहीतरी पुटपुटत होता. दुसरा संदेशवाहक त्याच्या मागे ओणवा उभा होता व त्याला खाकेत धरून उठवण्याचा अजागळासारखा प्रयत्न करीत होता. बुरख्यातल्या हिमबाधा झालेल्या टेहळ्याच्या मुटकुळीशेजारी तांबडीलाल नळी तापलेली टॉमीगन पडली होती.

संदेशवाहकाला हिसडा मारून त्याच्यापासून सुटका करून घेत, स्फोटाचा धक्का बसलेल्या एखाद्या झपाटलेल्या माणसासारखा द्रोझ्दोवस्की जोरजोराने बडबडू लागला.

"मला या जखमेवर पट्टी बांधून पाहिजे! ... झोया कुठं आहे? या जखमेला बँडेज कर! मी जखमी झालोय, तिला इथं येऊन मला मलमपट्टी करायला सांग! जा!"

आपल्या पायघोळ कोटाची बटणे मोकळी करीत कुझ्नेत्सोव आपोआपच त्याच्याकडे चालत गेला. त्याने खाली वाकून पाहिले तेव्हा द्रोझ्दोवस्कीच्या कानामागची कातडी सोलून निघाली होती व ती जागा रक्ताने माखली होती. थंडगार पडलेल्या ओठांनी कुझ्नेत्सोव बोलला, "द्रोझ्दोवस्की! माझं बोलणं तुला ऐकू येतंय? तुला अजून चालता येतं का? तुझे पाय ठीक आहेत? तुला नुसता ओरखडा गेलाय! ऊठ! ऊठ द्रोझ्दोवस्की!"

"झोया कुठं आहे? झोया कुठं आहे, कुझ्नेत्सोव? मला बँडेज बांधलं पाहिजे!"

"ऊठ द्रोझ्दोवस्की, उभा रहा!"

कुझ्नेत्सोवने आपला पायघोळ कोट अंगातून काढला आणि बर्फावर खाली पसरला. त्याने आणि द्रोझ्दोवस्कीने झोयाचे लोळागोळा झालेले शरीर त्यावर ठेवले आणि त्या तात्पुरत्या स्ट्रेचरवरून ते तिला घेऊन निघाले. पण तो तिच्याकडे पहायचे टाळत होता. मलेरियाचा ताप भरताना हुडहुडी भरावी तसा तो कापत होता. झुकांड्या खात द्रोझ्दोवस्की पुढे चालला होता. नेहमी ताठ असणारे त्याचे खांदे खाली वाकले होते, त्याच्या दोन्ही हातांनी मागे कोटाची टोके गच्च धरली होती. त्याच्या मानेवरचे पांढरे बँडेज विचित्र दिसत होते. ते त्याच्या कॉलरवर घसरले होते आणि त्यामुळे त्याला मागे वळून पाहता येत नव्हते. मधून मधून दारूड्यासारख्या त्याच्या झुकांड्या जात होत्या, पण तो एक अक्षरही बोलत नव्हता. काहीवेळा मात्र त्याची पाठ थरथरायची आणि कण्हल्यासारखा किंवा कफ अडकल्यासारखा आवाज त्याच्या घशातून उमटायचा. त्याच्या त्या चमत्कारिक घुसमटलेल्या आवाजाने कुझ्नेत्सोवच्या काळजातून सण्णदिशी वेदना चमकून जायची.

जर्मन सबमशिनगनच्या माऱ्याच्या टप्प्याबाहेर, मोडून पडलेल्या जर्मन रणगाड्यांच्या पट्ट्याशेजारी ते जेव्हा आले तेव्हा द्रोझ्दोवस्कीने अस्पष्ट आवाजात विनवणी केली, "क्षणभर थांबू या ... मला पुढं जाववत नाहीय. प्लीज कुझ्नेत्सोव!"

त्यांनी झोयाला खाली बर्फावर ठेवले. आणि पुन्हा कुझ्नेत्सोवला तिच्याकडे नजर वळवेना, त्याच्या घशात एवढा जबरदस्त आवंढा अडकला होता की, धड श्वास घेणे त्याला शक्य होत नव्हते. जर्मन रणगाड्याच्या छिद्रे पडलेल्या चिलखताला टेकून तो उभा राहिला. त्याचे पाय अगदी पार गळून गेले होते आणि बर्फात खाली बसावे, डोळे मिटावे व काहीही हालचाल न करता किंवा विचार न करता स्वस्थ रहावे एवढी एकच इच्छा त्याला तीव्रतेने होत होती. त्याहून आणखी कशाचीही पर्वा वाटत नव्हती, दुसरे काहीही मोलाचे वाटत नव्हते. एकाच क्षणात सारे काही अर्थहीन बनले होते, बिनमहत्त्वाचे बनले होते. तो गोठलेला टेहळ्या, पकडलेला जर्मन, लढाईनंतरची रात्र, गारठा, खिंडीच्या टोकाशेजारचा खड्डा या सर्व गोष्टी एका राक्षसी, अमानुष अन्यायासारख्या वाटत होत्या व जणू काही हे घडण्यासाठी त्या घडून गेल्या होत्या.

हे घडेपर्यंतच्या घटनांची तार्किक संगती लावण्याचा व्यर्थ प्रयत्न करीत त्याने स्वत:ला जोरात बजावले की, तिला पोटात जखम झाली आहे. प्रथम ते जेव्हा त्या पोकळीत अडकले तेव्हा तिने पिस्तूल झाडले होते का? आणि मग काय? तिलाच हे असे का घडले?

"कुझ्नेत्सोव! ..."

स्वप्नात असल्याप्रमाणे त्याने कोटाचे कोपरे पकडले व तो निघाला. अजूनही त्याला तिच्याकडे पहायचा धीर होत नव्हता. त्या कोटाच्या झोळीत ती निपचित पडली होती, तिचा आवाज येत नव्हता, कण्हणे ऐकू येत नव्हते, श्वासाचा आवाज येत नव्हता, मृत्यूचा भयाण रितेपणा एव्हाना जाणवू लागला होता. पण अजूनही जिवंतपणाचा आभास होता – तिच्या देहाचे वजन त्याच्या हातांना जाणवत होते आणि तो व द्रोझ्दोवस्की तिला तोफेकडे घेऊन जात असता त्याला फक्त एवढेच जाणवत होते.

खंदकाच्या बांधावर जेव्हा ते तिला घेऊन गेले तेव्हा नेचायेवचा चेहरा डोकावताना दिसला. अत्यंत मूर्खासारखी प्रश्नार्थक मुद्रा करून तो तोफेच्या खोलगट भागातून उडी मारून वर आला व त्यांच्या बरोबरीने चालू लागला. झोयाकडे घाबरून तो नजर टाकीत होता व कुझ्नेत्सोव आणि द्रोझ्दोवस्कीकडे नंतर टक लावून पहात होता. जणू काय घडले, तिला हे कसे घडले याचा खुलासा ते त्याला करतील, अशी अपेक्षा त्याच्या नजरेत तरळत होती. पण कुझ्नेत्सोवने किंवा द्रोझ्दोवस्कीने, असा दोघांपैकी कुणीच त्याला काहीही खुलासा केला नाही.

अद्यापही तिच्याकडे न बघण्याचा कुझ्नेत्सोव प्रयत्न करीत होता. झोयाला तोफेच्या मागच्या भागात जेव्हा त्यांनी निजवले तेव्हाही त्याने डोळे दुसरीकडे फिरवले. तिला तिथे ठेवले म्हणजे तिच्या तोंडावर बर्फाचा थर जमणार नाही असा सल्ला कुणी दिला, तेही त्याला आठवत नव्हते. जमिनीवर बंदुकीचा दस्ता टेकवून तो उभा होता. नेचायेवच्या आवाजाशी साधर्म्य असलेला एक अशरीर आवाज त्याला पटकन ऐकू आला नाही, "लेफ्टनंट, तुम्ही गार पडला आहात. तुम्ही अशा रीतीनं गोठून मराल." तोफेमागच्या भागातील बांधावर नंतर त्याला त्याचा कोट दृष्टीस पडला. त्याच्या काठाशी काळसर डाग पडले होते. तिच्या रक्ताच्या खुणा उमटलेला, तिच्या मृत्यूच्या खुणा उमटलेला तो कोट

आपल्याला पुन्हा कधीही अंगावर चढवणे शक्य नाही असे त्याने स्वत:ला बजावले.

"माझा कोट कशाला घेतलास?" तो पुटपुटला. "तिथंच मागं राहू दे ..."

"कॉम्रेड लेफ्टनंट, त्या जाकीटात तुम्ही कुडकुडता आहात," नेचायेवही तसाच खालच्या आवाजात उत्तरला. "झोयाला काय झालं? कसं घडलं?"

कुझ्नेत्सोवच्या गोठलेल्या शरीरातून जोरजोराने शहारे उमटत होते व त्याचा सारा देह गदगदून हलत होता, त्याचे दात कडकडा वाजत होते आणि खाली बसून, डोळे मिटून काहीही विचार न करण्याची इच्छा त्याचा पिच्छा सोडत नव्हती. केवळ याच मार्गाने त्याला आराम मिळेल असे वाटत होते.

त्याने आपली बंदूक खाली टाकली, तोफेच्या मागल्या भागातल्या बांधाच्या कडेवर तो खाली बसला, तोफेच्या चाकांपर्यंत जाण्याचेही त्याच्या पायात त्राण उरले नव्हते. आपल्या मळक्या हातमोजांनी त्याने चेहरा पुसायला सुरुवात केली व गळयावरून तो हात फिरवू लागला.

"कुझ्नेचिक!" त्याने ही हाक अगदी स्पष्ट ऐकली. "लौकर आम्हाला गाठ. जिवंत रहा कुझ्नेचिक! जर्मनांच्या तावडीत सापडू नको!"

दोन्ही हातांची ओंजळ त्याने तोंडावर धरली व तो विव्हळला. आणि पहिल्या प्रथमच त्याने तोफेच्या मागच्या भागात तिच्याकडे पाहण्याचे धाडस केले.

नेचायेवने पसरलेल्या बुरख्याच्या कापडावर झोया पडली होती. त्या कापडाच्या एका टोकाने तिच्या छातीपर्यंतचा भाग झाकला होता आणि त्याला धडकी भरविणारे तिचे रक्त आता नजरेला दिसत नव्हते. तिच्या डोक्यावर टोपी नव्हती, बहुधा ती त्या खोलगट भागात कुठेतरी पडली होती. ती कुशीवर अजूनही पाय पोटाशी धरून एखाद्या लहान मुलासारखी पडली होती. जणू काही तिला गाढ झोप लागलीय असा भास होत होता. तिच्या चेहऱ्यावरच्या केसाच्या बटा वाऱ्याने हलत होत्या. त्या केसांचे सारे तेज नाहीसे झाले होते व त्यांना एक प्रकारचा फिकुटलेपणा आला होता. तिच्या भुवया स्पष्ट उठून दिसत होत्या,

क्षणिक वेदना झाल्याप्रमाणे त्यांना किंचित आठी पडली होती. तिच्या भुवया आणि हिमाचा थर बसलेल्या पापण्या अशा दोन्हीही किंचित थरथरत असल्याचा भास होत होता. बांधावर विखुरत असलेल्या कोरड्या बर्फकणांनी त्या पांढऱ्या बनत चालल्या होत्या. कुझ्नेत्सोवने डोळे मिटून झरकन आपला चेहरा बाजूला फिरवला आणि तोंडावर आपला हात एवढ्या जोराने दाबून धरला की, त्याच्या हातातल्या गोठलेल्या कातडी हातमोजाने त्याच्या तोंडाची सालडी सोलपटून निघाली. आपला आपल्यावरचा ताबा सुटेल आणि काहीतरी वेड्यासारखे भलतेच करून बसू अशी त्याला भीती वाटत होती. एवढ्या जबरदस्त निराशेने आणि कल्पना करता येणार नाही अशा अपराधी जाणीवेने त्याला ग्रासले होते. आयुष्य सरल्यासारखे वाटत होते. काहीही बाकी उरले नव्हते.

स्फोटांचे धडाके उडत असताना दावलात्यानच्या तोफेशी जेव्हा ती त्याला बिलगली होती, त्यावेळी तिचे हे फिकट, मुलायम केस त्याच्या तोंडाला, त्याच्या ओठांना, त्याच्या डोळ्यांना स्पर्शले होते आणि तिच्या पाठीत तोफगोळ्याचा कपचा घुसू नये म्हणून अंत:प्रेरणेनेच त्याने तिला तोफेच्या चाकांशी दाबून धरून तिच्या शरीराभोवती स्वत:च्या अंगाचा विळखा घालून तिचे रक्षण केले होते. तिच्या ओठांचा तो शीतल स्पर्श, तिच्या श्वासाची ऊब त्याच्या घामेजल्या मानेला, त्याच्या गालांना जाणवली होती ... नंतर काय होईल, काही तासांनंतर काय घडेल हे त्या क्षणांना त्याला कुठून ठाऊक होणार होते? त्या खोलगट भागात ती जखमी होईल आणि आपल्या वैद्यकीय पिशवीतून ते जर्मन पिस्तूल बाहेर काढील, हे त्यावेळी त्याला कुठून ठाऊक असणार होते?

कुणीतरी त्याच्या खांद्यांवर कोट पांघरला, पण तो अजूनही बांधावर स्तब्ध बसून होता, शेजारीच कुणी बोलत होते त्या आवाजाला उत्तर देत नव्हता. तो आवाज नेचायेवचा असावा असे त्याला भासत होते.

"कॉम्रेड लेफ्टनंट, तुम्ही थंडीनं थरथर कापताहात. तुम्ही इथून जाणं बरं ... आडोशात तुम्हाला बरं वाटेल, तिथं जखमींना ठेवलंय त्या आडोशात. तिथं स्टोव्ह पेटलेला आहे ... शेवटी एकदाचे सारे परत आलो बुवा ... कॉम्रेड लेफ्टनंट, मी काय बोलतोय ते तुम्हाला ऐकू येत नाही? तुम्हाला ऊबेची गरज आहे. सगळे परत आलात, मी तुम्हाला सांगतोय ..."

"सारे परत आले?" घुसमटल्या आवाजात कुझ्नेत्सोवने विचारले. त्या शब्दांनी त्याला जणू चाबकाचा फटकारा बसावा अशा वेदना झाल्या होत्या. एकाएकी त्याला नेचायेवचा हतबल चेहरा दिसला व अगदी जेमतेम ऐकू येईल अशा अस्पष्ट आवाजात तो म्हणाला, "झोयाचा चेहरा झाक ... बर्फ पडतोय त्याच्यावर. ताबडतोब तिला झाक."

घाबरट चालीने नेचायेव तोफेच्या मागच्या भागात गेला, बुरख्याच्या कापडाचे टोक त्याने उचलले व झोयाचा चेहरा त्याने काळजीपूर्वक झाकला आणि बांधावर परत आला.

यामुळे परिस्थिती थोडीशी अधिक सोपी झाल्यासारखी वाटली व कुझ्नेत्सोवने उठायचा प्रयत्न केला. पण त्याचे पाय आता त्याला ऐकेनासे झाले होते आणि तो परत बांधावर कोसळला. नेचायेवने त्याच्या खांद्यावर पांघरलेला पायघोळ कोट मागे घसरून पडला.

ज्या गोष्टींमुळे हे दिवस आणि या रात्री तो विलक्षण अनैसर्गिक असा ताण सहन करीत होता, ज्या गोष्टींमुळे तो अशक्यप्राय वाटणारी कृत्ये करीत होता, त्या गोष्टींची त्याच्यावरची पकड अचानक सुटल्यासारखी झाली होती. तो वर उठायचा सुद्धा प्रयत्न करीत नव्हता. जणू काही आपला गळा फासात अडकला गेला होता त्याप्रमाणे तो गळा चोळत बसून राहिला. या क्षणी जर्मन रणगाड्यांनी जरी हल्ला चढवला असता किंवा त्यांच्या टॉमीगनवाल्यांनी त्याच्या तोफेवर भडिमार केला असता, तरी तो जागेवरून तसूभर हलला नसता किंवा तोफ उडवायचा त्याने हुकूमही दिला नसता.

कुणी बोलत का नाही? सारे माझ्याकडे असे का पाहताहेत? कसला विचार चाललाय त्यांच्या डोक्यात? हे कसे घडले ते त्यांनी पाहिले का? द्रोझ्दोवस्की कुठे होता? तो तर तिच्या अगदी शेजारी होता ...

गारठून गोठलेल्या टेहळ्याला घेऊन दोघे संदेशवाहक तोफेच्या मागल्या बाजूने गेले. जखमींना ठेवले होते त्या आडोशात ते त्याला घेऊन चालले असावेत. झोयाला ज्या ठिकाणी झाकून ठेवले होते त्या जागेकडे अविश्वासाच्या नजरांनी पहात ते तिथून मुकाटपणे गेले. नंतर एकजण म्हणाला. "नर्स आटपली वाटतं!" आणि क्षणभर ते घुटमळले. जणू आत्ता ती तिच्यावर पांघरलेले वस्त्र फेकून देईल आणि किंचित हसून,

सबंध तोफखान्याला परिचित असलेल्या आपल्या कोमल आवाजात त्यांना उत्तर देईल अशा अर्धवट अपेक्षेने ते क्षणभर थांबल्यासारखे वाटत होते. ती म्हणाली असती: "काय आहे मित्रांनो? माझ्याकडं असं का बघताय? मी जिवंत आहे ..." पण असा काही चमत्कार घडला नाही आणि ते दोघेही शून्य नजरांनी तोफेच्या मागल्या भागातल्या त्या वस्त्रझाकल्या देहाकडे पहात राहिले. संदेशवाहकांनी आपले पाय उचलले. टेहळ्या किंचित कण्हला.

"पुढं चालू लागा! उगाच घुटमळू नका!" उखानोव संतापून ओरडला, मग थोडे थांबून तो शांतपणे म्हणाला, "नेचायेव, असा घुटमळत काय थांबलायस? लेफ्टनंटच्या खांद्यांवर कोट पांघर. रूबिन, त्यांना हात दे."

"कॉम्रेड लेफ्टनंट, तुमचा कोट अंगात घाला," नेचायेवचा आवाज पुन्हा ऐकू आला व पुन्हा एकदा त्याच्या खांद्यांवर कोट घालण्यात आला.

"कॉम्रेड लेफ्टनंट, उठा आता," रूबिन पुटपुटला. "असं जमिनीवर बसून खलास व्हाल."

"ठेवा तो कोट तिथंच. मला त्याची गरज नाही. तिथंच पडू दे तो."

अखेरीस तो उठला. नेचायेवच्या आणि रूबिनच्या सतत आग्रहामुळे त्याला जाणवले की, त्याच्यात काहीतरी नवे, भीतीदायक, अपरिचित असे त्यांना आढळले आहे, त्यांनी कधी पाहिले नाही असे काहीतरी त्याच्यात त्यांना दिसले आहे. त्याला कणकणल्यासारखे वाटत होते. त्याचे दात कडकड वाजायचे थांबत नव्हते आणि घशातला आवंढा गिळायला त्याला विलक्षण त्रास होत होता.

दरम्यान हळूहळू उजाडत होते. विरत जाणाऱ्या निळसर अंधारामधून आकृत्या उमटू लागल्या होत्या आणि जळून पडलेल्या रणगाड्यांसकट सारे स्तेप पहाटेच्या नीरव शांततेत लपेटले गेले होते. उखानोव आणि रूबिन यांच्या अंगअंगावर बर्फ विखुरला होता व ते पांढरेशुभ्र दिसत होते. फक्त त्यांचे धुराने काळवंडलेले चेहरे तेवढे काळे दिसत होते. आपल्या सबमशिनगन मांडीवर धरून ते तोफेच्या चाकांवर बसले होते. सबमशिनगन अजून एवढ्या गरम होत्या की, हातमोजे न काढता ते

त्यांवर आपले हात शेकू शकत होते. ते दोघेही कुझ्नेत्सोवकडे अगदी एकटक रोखून पहात होते.

त्यांच्यापासून दोन पावलांवर तो जर्मन कुशीवर पडला होता, तोसुद्धा बर्फाने पुरता माखला होता, त्याचे हात पट्ट्याने मागे बांधलेले होते. तो आपले डोके वर उचलून विव्हळत होता, पण कुणीही त्याचे हात सोडले नाही. कुणी त्याच्याकडे लक्ष दिले नाही. त्यांना त्याचे विव्हळणेही ऐकू येत नव्हते. जणू तो तिथे मुळी अस्तित्वातच नव्हता. त्याचे विव्हळणे, त्याची भीती, त्याच्या यातना यांना कसलेही महत्त्व राहिले नव्हते. कुझ्नेत्सोवला क्षणभर आश्चर्य वाटले की, अजून तो जर्मन का जिवंत होता, अजून तो कसा विव्हळू शकत होता, अशी बगळ्यासारखी मान कशी लांब करीत होता आणि झोया मात्र त्या वस्त्राखाली अशी निस्तब्ध पडली होती. "त्याला वाचवण्याचा त्यांनी प्रयत्न केला," संतापाच्या भरात त्याच्या डोक्यात हा विचार चमकून गेला. "मला माहीत असते तर सगळेच काही वेगळे घडले असते! ती कशी जखमी झाली ते द्रोझ्दोवस्कीने पाहिले?"

"तोफखाना कमांडर!" त्याने हाक मारली व चरामधून धडपडत तो वाट काढू लागला." "तोफखाना कमांडर, माझा आवाज ऐकू येतोय?"

चराच्या टोकाशी त्याच्याकडे पाठ करून द्रोझ्दोवस्की उभा होता. त्या खोलगट भागात संदेशवाहकाने त्याला मानेवर बांधलेले बँडेज अगदी चमत्कारिक दिसत होते. त्यामुळे त्याची मान जाड वाटत होती व खांदे अरुंद दिसत होते. त्याचे डोके खाली झुकले होते, त्याच्या कोटातून त्याची खांद्यांची हाडे वर उठून दिसत होती, त्याचे हात निर्जिवपणे लोंबत होते.

"काय पाहिजे तुला माझ्यापासून?" त्याने शांतपणे विचारले.

"फक्त एकच गोष्ट. झोयाबरोबर तू होतास?"

"आम्ही बरोबर होतो."

"ती कशी जखमी झाली ते तू पाहिलंस?"

"आम्ही दोघं एकाच वेळी जखमी झालो."

"तिनं आपलं पिस्तूल केव्हा बाहेर काढलं? तोफखाना कमांडर, तिनं पिस्तूल झाडलं?"

"कुठलं पिस्तूल? कशाबद्दल बोलतो आहेस तू?" तो मागे वळला. त्याच्या उभट निमुळत्या पांढऱ्या चेहऱ्यावरचे ओलावलेले निळे डोळे विस्फारले होते. "कुझ्नेत्सोव, तुम्हा दोघांमध्ये काय होतं? अस्सं, आत्ता मला धागा सापडला... तू कशामागं होतास ते मला ठाऊक होतं! पण तू आपला वेळ फुकट घालवत होतास!"

त्याच्या जबड्याला हिसके बसत होते. त्याच्या मेंदूला स्फोटांचा धक्का बसला होता आणि निराशेच्या व मत्सराच्या झटक्यात तो बरळत होता. त्याचा तो मत्सर आता इतका निरर्थक वाटत होता की, कुझ्नेत्सोव चराच्या भिंतीला शांतपणे मागे टेकला आणि त्याने आपले डोळे मिटले. द्रोझ्दोवस्कीचे ते बापुडवाणे डोळे, त्याच्या मानेवर घसरलेले ते बँडेज आणि त्याच्या कॉलरवरचे रक्ताचे डाग, हे दृश्य त्याला पाहवत नव्हते. एक क्षणापूर्वी त्या दोघांमध्ये वैर निर्माण करणाऱ्या सर्व गोष्टी विसरायला व क्षमा करायला, त्याला समजून घ्यायला तो तयार होता, पण आता मात्र त्याची याला तयारी नव्हती. झोया जखमी झाली त्याचवेळी द्रोझ्दोवस्कीला किंचित जखम झाली होती, पण तरीही ती कशी मेली ते त्याने पाहिले नव्हते. आणि आता मत्सर वाटण्याचा कुणालाही हक्क राहिला नसतानाही तो अजून मत्सर करीत होता. क्षणभर कुझ्नेत्सोव थांबला आणि नंतर घोगऱ्या आवाजात म्हणाला, "तोफखाना कमांडर, तू उत्तर न देणं जास्त चांगलं!" आणि त्याचा राग भडकू नये, त्याच्याशी पुन्हा संबंध येऊ नये म्हणून, त्याला आणखी प्रश्न विचारण्याचे टाळावे म्हणून कुझ्नेत्सोव तिथून निघून गेला.

"हे सारे त्या डुकरामुळे घडले! सारे त्याच्यामुळे! तिच्या मरणाला हा भिकारडा डुक्कर जबाबदार आहे!"

कुझ्नेत्सोवच्या हाताला जोरात धक्का बसला. द्रोझ्दोवस्की त्याला बाजूला सारून बांधावर अद्याप विव्हळत पडलेल्या त्या जर्मनाकडे झेपावला होता.

"हरामखोर डुकरा!" द्रोझ्दोवस्कीचा जबडा फेफरे आल्याप्रमाणे हलत होता. त्याचा खांदा थरथरत होता व आपले पिस्तूल काढण्याचा प्रयत्न करताना त्याच्या हाताची खालीवर हिसके बसल्यासारखी हालचाल झाली. त्याच्या या कृतीचा अर्थ समजताच कुझ्नेत्सोव एकदम पुढे धावला.

"थांब! मागं हो!" द्रोझ्दोवस्कीचे मनगट पकडण्यात व त्याच्या वेडाच्या झपाटयात केल्या जाणाऱ्या कृत्याला थोपवून योग्य वेळीच त्याच्या अंगावर स्वतःला झोकून देण्यात कुझ्नेत्सोव यशस्वी ठरला. द्रोझ्दोवस्की बांधाच्या टोकावर धडपडला, पुन्हा सावरला आणि त्याचा चेहरा रागाने पांढराफटक व वेडावाकडा झाला.

"कुझ्नेत्सोव, बाजूला हो! बाजूला हो!"

उखानोव आणि रूबिनने द्रोझ्दोवस्कीच्या दोन्ही कोपरांना धरले व चराच्या भिंतीशी त्याला मागे दाबून धरले. तो आपले डोके या बाजूकडून त्या बाजूकडे जोरजोरात हलवत होता, त्याच्या मानेवरचे बँडेज लोंबत होते व दुबळया रागापोटी त्याच्या डोळयात अश्रू उभे राहिले होते. तो सारखा ओरडत होता, "हा त्याचा अपराध आहे! सगळा दोष त्याचा आहे!"

"तोफखाना कमांडर, निःशस्त्र माणसावर तुम्हाला गोळी झाडायचीय?" एखाद्या दारूड्याला गदगदा हलवावे त्याप्रमाणे द्रोझ्दोवस्कीचे खांदे घुसळीत उखानोवने विचारले. "हे काम कुणीही मूर्ख करील! आता शांत व्हा! तुम्हाला थोडा धक्का बसलाय, होय की नाही? या जर्मनाशी त्याचा काहीही संबंध नाही. स्वतःला नीट सावरा!"

द्रोझ्दोवस्कीमधला सारा आवेश एकदम नाहीसा झाला. त्याचे शरीर लुळे पडले आणि त्यांनी त्याच्यावरची पकड सोडली. त्याने दोनचारदा दीर्घ श्वास घेतला व तो म्हणाला, "होय, मला स्फोटाचा धक्का बसलाय. माझं डोकं गरगरतंय. मला गिळता येत नाहीय." नंतर पुढे तो क्षीण, कोसळल्या आवाजात म्हणाला, "लौकरच हा परिणाम जाईल. मला आता टेहळणी मोर्चावर गेलं पाहिजे."

"तुमचं बँडेज सुटतंय तोफखाना कमांडर," उखानोव म्हणाला. "रूबिन, टेहळणी मोर्चापर्यंत त्यांच्या बरोबर जा आणि त्यांच्या मानेला व्यवस्थित बँडेज बांध."

"चला कॉम्रेड लेफ्टनंट," द्रोझ्दोवस्कीच्या मागोमाग दळणवळणाच्या चरातून रूबिन गंभीर चेहऱ्याने चालू लागला.

"उखानोव, जर्मनाला आपण कुणाबरोबर पाठवू या?" कुझ्नेत्सोवने विचारले. "रूबिन का नेचायेव! का या संदेशवाहकांबरोबर?"

उखानोवने सिगरेटचा एक जोरात झुरका घेतला व धूर नाकामधून सोडला.

"लेफ्टनंट, ठरविण्यासारखं काही राहिलेलंच नाही. या जर्मनाला मुख्य ठाण्यावर पाठवलंच पाहिजे. त्यात काही वाद नाही. मग नाहीतर हा एवढा त्रास आपण त्याच्यासाठी कशाला घेतला? तुम्ही नेचायेव आणि रूबिन बरोबर तोफेवर रहा. तुम्हाला अजून थोडी गोळाबारी करावी लागेल. मी याला कसंही करून तिथपर्यंत नेतो. लेफ्टनंट तुम्हाला माहीत आहे ..." दोन तीनच झुरके घेतलेल्या सिगरेटच्या थोटकावर पाय देऊन उखानोवने ते विझवले व तोफेच्या मागच्या भागात हळू नजर फिरवली. त्याच्या डोळ्यात वेदना होती. "जाऊ दे, विसरून जा लेफ्टनंट. मला काय म्हणायचंय ते तुम्हाला माहीत आहे. आग लागो या लढाईला! आज एक मेला, उद्या दुसरा मरणार, परवा—आपण स्वतःच!"

"रूबिनला तुझ्याबरोबर घे," मंदपणे कुझ्नेत्सोव म्हणाला. "आणि दुसऱ्या बाजूला जरा सावध रहा. हूणांवर सरळ आदळू नका. मी आडोशात जाऊन जखमींना पाहतो."

"मला पुरुषांची चुंबनं आवडत नाहीत, तेव्हा आपण एकमेकांचा निरोप घ्यायला नको लेफ्टनंट!" उखानोवने टॉमीगन खांद्यावर लटकावली. त्याच्या डोळ्यात किंचित हसू चमकत होते. "जिवंत रहा लेफ्टनंट! मी रूबिनला बरोबर नेतो."

उखानोवचे ते आश्वासक स्मित, गेल्या चोवीस तासात त्याने पत्करलेल्या अनेक धोक्यांमध्ये आता त्या जर्मन कैद्याला दुसऱ्या तीरापर्यंत घेऊन जाण्याचा तो आणखी पत्करीत असलेला धोका—हे सारे काही खोटे, भ्रमात पाहिल्यासारखे कुझ्नेत्सोवला वाटत होते. वास्तवता, सूर्यप्रकाशाने व विविध आवाजांनी भरलेले जीवन, दिवसाचा स्वच्छ, शांत प्रकाश या सर्व गोष्टी जणू रात्रीच्या अनंतकालीन काळोखाने गिळून टाकल्या आहेत असे वाटत होते. तोफेच्या चाकांवर बसावे किंवा डोळे मिटून बर्फात गप्प पडून रहावे असे कुझ्नेत्सोवला वाटत होते. पण मला जखमींची विचारपूस केली पाहिजे... दावलात्यान तिथे आहे... अजून जिवंत आहे तो? मला जखमींकडे गेले पाहिजे. आत्ताच गेले पाहिजे! जणू काही प्रचंड ओझे उचलावे तसे कुझ्नेत्सोवला आपली

टॉमीगन उचलताना सायास पडले. टॉमीगन तशीच हातात लोंबती धरून त्याने अभावितपणे तोफेच्या मागच्या भागात नजर टाकली.

झोयाच्या तोंडावर झाकलेल्या वस्त्रावर बर्फाचे कण जमत होते. एकाएकी त्याला भीती वाटली की, वाऱ्याने ते वस्त्र एकदम बाजूला उडून जाईल आणि पुन्हा एकदा तिचे निर्जीव, रक्षणहीन, मुरकुंडी केलेले, त्या थंडगार खड्ड्यात पडलेले शरीर वारा निर्दयपणे उघडे पाडील. आपल्या बंदुकीची नळी बर्फातून फरपटत, खांद्यांना पोक काढून कुडकुडत, वाटेवर ठेचकाळत तो सुळक्यावर खोदलेल्या पायऱ्यांच्या दिशेने चालू लागला.

## प्रकरण एकविसावे

आदल्या दिवशी सरत्या संध्याकाळी बेस्सोनोव यांना समजून चुकले की, लढाईच्या मैदानात त्यांनी स्वतंत्र रणगाडा रेजिमेंट आणि पायदळाची राखीव ३०५ वी डिव्हिजन घालूनही, रणगाडानाशक स्वतंत्र ब्रिगेडने वेगवान व खंबीर चाल करूनही, रॉकेट मॉर्टरच्या दोन रेजिमेंटनी प्रचंड भडिमार करूनही, दिवसअखेरी जर्मनांनी काबीज केलेल्या उत्तर तीरावरील पुलाच्या तोंडावरून जर्मनांना हाकलणे शक्य झाले नव्हते आणि खेड्याच्या उत्तर विभागातील अर्ध्या भागातून त्यांचे रणगाडे पिटाळता आले नव्हते. तरीही मोठ्या मुष्कीलीने देयेव यांच्या डिव्हिजनच्या फळ्यांना शत्रूचे लागलेले चिमटे सोडविणे व मेजर चेरेपानोव यांच्या घायाळ आणि घेरलेल्या रेजिमेंटपर्यंत चिंचोळी फळी फोडणे शक्य झाले होते.

मध्यरात्रीपर्यंत सेनेच्या सर्व क्षेत्रात लढाई हळूहळू थंडावली.

या घटकेला बेस्सोनोव आपल्या निवाऱ्यात बसून कारवाई विभागाचे उपप्रमुख मेजर ग्लादीलिन यांच्या तोंडून एकूण परिस्थितीचा अहवाल कंटाळवाण्या चेहऱ्याने ऐकत होते. रणमैदानावरच्या थंडावलेपणावर त्यांचा विश्वास बसत नव्हता, पण ३०५ व्या डिव्हिजनने चेरेपानोव यांच्या रेजिमेंटला सोडविले या वार्तेने ते जरासे खूष झाले होते. ग्लादीलिन यांचा अहवाल अगदी कोरडा आणि तपशीलवार चालू होता. बेस्सोनोव यांनी त्यांच्या निवेदनात अडथळे केले नाही. सतत मानसिक

ताणामुळे त्यांच्या पायात वेदना सुरू झाल्या होत्या व सबंध संध्याकाळभर त्या वेदनांनी ते अगदी हैराण झाले होते. विशेषत: जर्मन मॉर्टरचा हल्ला अचानक सुरू झाल्यावर ते खंदकात वेडेवाकडे पडले, तेव्हापासून पायातल्या ठणका वाढल्या होत्या. त्यांचा रोड चेहरा आणखीच रोडावला होता, त्यांचे गाल पांढुरके व खप्पड दिसत होते. मधून मधून त्यांना एकदम घाम फुटत होता व मेजर बोझिच्को यांचे लक्ष चुकवून ते मानेवरचा व कपाळावरचा घाम हातरुमालाने पुसत होते. सेनापतींचे तितकेसे काही ठीक नाही ही गोष्ट बोझिच्को यांच्या केव्हाची लक्षात आली होती.

"मेजर हे स्पष्ट होत नाही," अहवाल ऐकल्यानंतर बेस्सोनोव म्हणाले आणि अधिक आरामशीर आसन जमविण्याचा प्रयत्न करीत त्यांनी टेबलाखाली पाय सरळ केला.

बेस्सोनोव यांचा शेरा अहवालाला किंवा सेनेच्या एकूण परिस्थितीला अनुलक्षून नव्हता. पण शांत स्वभावाचे, आपल्या व्यक्तिमत्वाची अजिबात छाप न पाडणारे, भावनेचा कमीत कमी ओलावा ठेवून वस्तुनिष्ठ घटनांचा अहवाल देण्याची सवय असलेले ग्लादीलिन त्या शेऱ्याने गोंधळले व काहीतरी अत्यंत महत्त्वाचे असे सेनापतींना सांगायला आपण विसरलो व असे विसरण्याचा आपल्याला काहीएक अधिकार नव्हता, अशा क्षणिक गोंधळल्या नजरेने त्यांनी बेस्सोनोव यांच्याकडे कटाक्ष टाकला.

"माफ करा कॉम्रेड कमांडर, मी समजलो नाही."

"काल संध्याकाळी," बेस्सोनोव आपल्या कर्कश्य आवाजात बोलू लागले, "ते क्षणाची उसंत न घेता तासन् तास एकापाठोपाठ एक हल्ले चढवत होते. आता त्यांना अत्यंत सोयीस्कर अशी नदीच्या पुलावरची शेवटची तटबंदी त्यांनी काबीज केलीय आणि आमच्या माहितीप्रमाणं आपली राखीव फौजही त्यांनी आणलीय. पण एकाएकी त्यांनी हल्ले चढवायचे थांबवलेत. मेजर, हे तुम्हाला तर्कविसंगत वाटत नाही? विसंवादी वाटत नाही?"

"कॉम्रेड कमांडर, मला वाटतं त्याचा कदाचित आपल्या दॉनच्या मधल्या भागातल्या शेजाऱ्यांच्या कारवायांशी संबंध असावा. तसंच नैर्ऋत्य आणि वोरोनेझ आघाड्यांवरच्या कारवायांशी संबंध असावा. अर्थात त्यांचे आजचे सुरवातीचे आक्रमक हल्ले तेवढे यशस्वी नव्हते हे मान्य

केले पाहिजे, तरीही" – "शक्य आहे," विचार करीत बेस्सोनोव म्हणाले.

सबंध दिवस यशस्वीपणे हल्ले चढवून, सतत दाब वाढवूनही, जर्मनांनी आत्ता या विभागात आपली चढाई थांबवली होती त्याची कारणे अर्थातच काहीतरी वेगळी होती. त्यांची घाई समजू शकत होती, पण ह्या अचानक निर्माण झालेल्या शांततेमागची कारणे नवी होती, अचानक काहीतरी घडले होते. वस्तुत: तसे गृहीत धरणे धोक्याचे होते, पण तरीही असा विचार करण्याकडे त्यांचा कल झुकत होता की, शत्रूने त्यांच्या उजव्या फळीला आपली मुख्य राखीव फौज एकवटल्यानंतर आणि या विभागात काही किलोमीटरची मुसंडी मारल्यानंतर रात्रीपुरता विराम घेतला होता. प्रतिहल्ला चढविण्यासाठी कोणती वेळ साधायची ते या नव्या परिस्थितीने निर्णित होणार होते, आघाडीच्या सेनापतीशी त्याबाबत चटकन विचारविनिमय करायला पाहिजे होता आणि शत्रूच्या राखीव फौजा दमल्याची स्पष्ट चिन्हे दिसत असताना व त्यांची आक्रमक चढाई मंदावत असतानाच योग्य क्षणाला प्रतिहल्ला चढविणे आवश्यक होते. त्यात घाई किंवा उशीर करून चालणार नव्हते.

परंतु आणखी काही तासपर्यंत खूप काही ठरविता येत नव्हते, निदान सकाळपर्यंत अंतिम निर्णय घेता येत नव्हते. जर्मन परत हल्ले सुरू करतील किंवा नाही? काल जर्मनांच्या पँझर तुकड्यांनी डाव्या फळीला सोविएत मोर्चांचा फडशा पाडला, त्याच फळीवर घाईगर्दीच्या धोरणाने दुसरा हल्ला कदाचित चढवला जाईल व संध्याकाळपर्यंत दक्षिण किनाऱ्याला पोचून ते सोविएत तटबंदीत खिंडार पाडतील? पण मुख्य दणका देण्याच्या दिशेत शत्रू एवढा मोठा बदल करील यावर बेस्सोनोव यांचे अंतर्मन विश्वास ठेवीत नव्हते. शिवाय, त्यांच्या सेनेच्या डाव्या फळीवर शत्रूने पुन्हा जमवाजमव केल्याची काहीही खबर नव्हती. या सगळ्यात सत्य कुठे होते? भक्कम आणि विश्वसनीय सत्य कुठे होते?

"कॉम्रेड कमांडर, तुम्ही मघा चहा विचारला होतात. साखर किती घालायची?"

"अं, हो हो ... दोन चमचे. थँक्यू."

लोखंडी स्टोव्हवर उकळत असलेली किटली मेजर बोझिच्को यांनी उचलली व सुगंधित, वाफाळत्या चहाने प्याला भरला, नंतर क्षणभर

त्यानी विचार केला व तीन चमचे साखर घालून बेस्सोनोव यांच्या पुढयातल्या टेबलावर चहाचा प्याला ठेवला.

शत्रू स्वतःच दमल्यामुळे गप्प राहिला आहे काय? बेस्सोनोव विचार करीत होते. किंवा पुन्हा आरंभ करायला त्याच्याजवळ आणखी काही आहे?

याला त्यांच्याजवळ निश्चित उत्तर नव्हते. पण त्यांना एवढे माहीत होते की, जर जर्मनांनी आपली सारी राखीव फौज वापरली नसली आणि उद्या किंवा खरे म्हणजे आज सकाळी त्यांच्या उजव्या फळीवर, पुलाच्या तोंडाशी, देयेव यांच्या क्षेत्रात नवा हल्ला सुरू केला, तर संरक्षण फळी सावरून धरण्यासाठी त्यांना आपल्या शेवटच्या राखीव बळाचा वापर करणे भाग पडणार होते. सर्वप्रमुख लष्करी ठाण्याने दिलेल्या या रणगाडयाच्या ब्रिगेडस्चा व यंत्रसज्ज कोअरचा त्यांना वापर करणे भाग पडणार होते आणि आघाडीच्या दहा पंधरा किलोमीटर परिसरात या राखीव फौजा एव्हाना एकवटल्या होत्या. याचा अर्थ प्रत्याघातासाठी राखून ठेवलेल्या बळाची उधळमाधळ करावी लागणारं होती. याचा अर्थ घट्ट मिटल्या मुठीचा जबरदस्त प्रहार होणार नव्हता, तर केवळ चपराक बसणार होती आणि अशा प्रकारे वारंवार चपराकी देऊन आजवर कधीही यश गवसलेले नव्हते.

कडक चहाच्या प्याल्यात बेस्सोनोवनी गरम चमचा एकदम टाकला व विचारले: "आघाडीच्या हेडक्वार्टर्सबरोबर आपल्याला कधी तरी बोलणे शक्य होईल का? संदेश खात्याचे प्रमुख कुठं आहेत?"

"कॉम्रेड कमांडर, लौकरच संपर्क साधणं शक्य होईल," आपल्या बोलण्यातील प्रत्येक शब्दाचा अचूकपणा काळजीपूर्वक जोखत मेजर ग्लादीलिन उत्तरले. "अंधारात रणगाडयांच्या तुकडया आघाडीकडे जात असताना टेलिफोनच्या तारांवर रणगाडे आदळल्याने त्या तारा तुटल्या. आता कोणत्याही मिनिटाला त्या दुरुस्त होतील. संदेश खात्याचे प्रमुख त्याची पाहणी करायला केव्हाचे गेले आहेत."

"नुकसान कसं झालं यात मला काहीही स्वारस्य नाही. मला संपर्क हवाय!"

आपल्या हाताने बेस्सोनोव यांनी प्याल्याच्या गरमपणाचा अंदाज घेतला, मग चहाचे काही घुटके घेतले (त्या कडक चहाला धातूची

आणि किंचित बंदुकीच्या दारूचीही चव जाणवत होती) व प्याला बाजूला ठेवून आपल्या कपाळावर व मानेवर चटकन फुटलेल्या घामाचे थेंब त्यांनी टिपले. गेल्या चोवीस तासांमधील घडामोडींनी त्यांची शक्ती खलास केली होती; सेनेच्या प्रमुख ठाण्याकडून सतत येणाऱ्या वार्ता, तुकड्यांकडून येणारे निरोप, चेरेपानोवच्या वेढलेल्या रेजिमेंटला सोडविण्यासाठी ३०५ व्या डिव्हिजनने पाडलेले छोटे खिंडार मोठे करण्याचे त्यांनी चालवलेले प्रयत्न—या सर्व गोष्टींनी ते कमालीचे थकून गेले होते आणि त्यात भरीला भर म्हणून त्यांच्या पायात सतत ठणका बसल्या होत्या. त्यांचा पाय कमालीचा जड झाला होता व त्याला आलेली वेडीवाकडी सूज स्पष्ट दिसत होती. ही शारीरिक वेदना विसरण्याचा प्रयत्न करीत असताना इस्पितळामध्ये त्यांना मदत झालेल्या एका गोष्टीची आत्ता प्रकर्षाने आठवण होत होती—अखंड धूम्रपानाची. शस्त्रक्रियेनंतर त्यांना धूम्रपान करायला सक्त मनाई करण्यात आली होती. धूम्रपान करायचे म्हणजे सर्जनच्या सुरीला पायाचा बळी द्यायचा असे त्यांना स्पष्टपणे बजावण्यात आले होते. त्यांना इशारा देण्यात आला होता की, त्यांच्या उजव्या पायातली शीर एवढी नाजुक बनली होती की, त्यांची दीर्घकाळची धूम्रपानाची सवय कमालीची घातुक ठरली होती. पण आता निकोटिनच्या त्या सुखद व उत्तेजक चवीची आठवण होताच बेस्सोनोव यांनी तिरप्या नजरेने टेबलाच्या डाव्या अंगाला पडलेल्या निळ्यापांढऱ्या 'काझबेक' सिगरेटच्या पाकिटाकडे लोभी कटाक्ष टाकला. टेहळ्या पथकाचे प्रमुख किंवा वेस्निन यांच्यापैकी कुणीतरी एक ते पाकीट तिथे विसरून गेले होते. धूम्रपान न करणाऱ्या आपल्या सेनापतीच्या हजेरीत त्या पाकीटाला हात लावण्याचा कुणालाही धीर झाला नव्हता.

विचारात गढल्याप्रमाणे त्यांनी ते पाकीट उचलले, उघडले व कार्डबोर्डचा होल्डर असलेली लांबसडक सिगरेटची कांडी बाहेर काढली आणि अद्यापही त्यांच्या स्मरणात असलेला तंबाखूचा तो कोरडा वास त्यांनी मोठ्या चविष्टपणे अनुभवला.

फक्त एकच ... पूर्वी तिच्याशिवाय माझे चालायचे नाही. एक ओढली तर काय बिघडेल? विशेषत: वेस्निन इथे नसताना. बेस्सोनोव यांनी कल्पना केली: स्वत: कट्टर धूम्रपान करणाऱ्या वेस्निनना आपण धूम्रपान करतो याचा शोध लागताच केवढे मजेदार आश्चर्य वाटेल!

एकदम ते नाकावरचा चष्मा काढून हातात घेतील, त्यांच्या भुवया चटकन उंचावतील. "प्योत्र अलेक्सांद्रोविच, म्हणजे तुम्हीही धूम्रपान करता तर?"

"कॉम्रेड कमांडर, तुम्ही धूम्रपान करता?" थोडेसे बिचकत ग्लादीलिन यांनी चकित आवाजात विचारले व सिगरेट पेटविण्यासाठी टेबलावरची काडचापेटी त्यांनी घाईघाईने पुढे सरकवली. बोझिच्को, कारवाई अधिकारी व संदेशवाहकसुद्धा क्षणभर स्तब्ध होऊन बेस्सोनोव यांच्याकडे एकटक पहात राहिले.

सर्वांचे आपल्याकडे लक्ष लागलेले आहे हे ध्यानात येताच बेस्सोनोवनी झटदिशी बोटांमध्ये कार्डबोर्डचा होल्डर चुरगाळला. ते स्वत:वरच चिडले आणि लोकांच्या नजरांनी अस्वस्थ बनले. त्यांच्या सर्व आवडीनिवडी सेनेच्या मुख्य ठाण्यात आणि इथे देयेव यांच्याही डिव्हिजनमध्ये सर्वांच्या परिचयाच्या होत्या. त्यांच्या तिखट जिभेपासून बचावण्याचा सर्वांनी एकमेकांना इशारा देऊन ठेवलेला होता.

"तर मेजर मी काय म्हणत होतो ... आघाडीच्या हेडक्वार्टर्सबरोबर मला संपर्क हवाय, तो केव्हा मिळेल ते मला समजून घ्यायचंय." बेस्सोनोव यांनी आपल्या आवाजातला तिरसटपणा दाबून टाकायचा प्रयत्न केला आणि ते अत्यंत नम्र आवाजात बोलले. किंचित विव्हळून त्यांनी टेबलाखालचा आपला सुजलेला पाय सरळ केला आणि केवळ ग्लादीलिननाच नव्हे तर, त्या निवाऱ्यातील सर्वांना उद्देशून ते म्हणाले, "आपले लष्करी मंडळाचे सदस्य राखीव रणगाड्यांच्या विभागात पोचले किंवा नाही याबाबत अजून आपल्याला काहीच कसं कळलं नाही याचं मला विलक्षण आश्चर्य वाटतं. कुठं आहेत ते? रणगाड्यांच्या आणि यंत्रसज्ज दलांच्या पथकाला विचारा. एव्हाना ते तिथं असायला हवेत. एवढा वेळ का लागला त्यांना?"

मेजर ग्लादीलिन नम्रपणे उत्तरले, "लष्करी मंडळाचे सदस्य सेनेच्या प्रमुख ठाण्यात आले नाहीत हे मला ठाऊक आहे. कदाचित रणगाडा पथकाकडे जाण्यापूर्वी ते चढाई पथकात थांबले असावेत. तशी शक्यता आहे."

"पथकांच्या मुख्य ठाण्यात, ३०५ व्या डिव्हिजनमध्ये आणि खोख्लोवच्या रेजिमेंटमध्ये चौकशा करा ... आणि पुन्हा एकदा सांगतो,

मला आघाडीच्या हेडक्वार्टरबरोबर बोलायचं आहे! मी वाट पाहतोय."

आपला राग उघडपणे दाखवीत बेस्सोनोवनी सिगरेट परत पाकिटात कोंबली आणि आपल्या बोटांनी ते टेबलावर टिचक्या वाजवीत राहिले.

वायरलेस ऑपरेटर आपल्या यंत्राशी संदेश घ्यायला गेला, तशी निवाऱ्यातल्या त्या उबदार, दमट हवेत विद्युत्प्रवाहाच्या ठिणग्यांचा कडकडाट वाजला. हवेच्या झोतांच्या आवाजाबरोबर रूमानियन भाषेतले भाषण क्षणभर ऐकू आले व ते मध्येच थांबून जर्मन भाषेतला कडवा आवाज ऐकू आला. तो आवाज काहीतरी हुकुमाचा संदेश सांगत असावा. नंतर तो जर्मन आवाज अस्पष्ट झाला व मोर्सच्या सांकेतिक भाषेतले आवाज ऐकू येऊ लागले. या घडीला जर्मन आणि रूमानियन ऑपरेटर कामात अधिक मग्न होते हे उघड होते. कोणत्याही गंभीर स्वरूपाच्या चढाईआधी बहुधा त्यांचे ट्रान्समीटर गप्प असत व एकूण वातावरण कमालीचे शांत आणि स्तब्ध असे.

आपले डोळे मिटून *थकल्या चेहऱ्याने बेस्सोनोव हे आवाज ऐकत होते व या रेडिओ संदेशांच्या गडबडीचे कारण काय असावे याचा तर्क बांधण्याचा प्रयत्न करीत होते. काय संभाषण चालले असावे? सकाळची तयारी करताहेत का ते? रूमानियन ट्रान्समिटर मध्येच कशाला वाजताहेत?

शेजारच्या निवाऱ्यामध्ये देयेव आणि त्यांचे कारवाई अधिकारी धांदल गडबड करीत होते. त्यांच्या आवाजांनी, बुटांच्या आवाजांनी, गोंधळाने व अखेरीस दारावर जोरात कुणीतरी ठोकल्यामुळे बेस्सोनोव यांची तंद्री भंगली.

"कॉम्रेड कमांडर, मी आत येऊ?"

परवानगीशिवायच बोझिच्को आत आले. ज्या पद्धतीने ते "कॉम्रेड कमांडर" हे शब्द पुन:पुन्हा उच्चारीत होते त्या त्यांच्या स्वरावरून आणि सदैव हसतमुख असलेल्या त्यांच्या टवटवीत चेहऱ्यावर ज्या प्रकारची निस्तेजता पसरली होती त्यावरून बेस्सोनोवना जाणवले की, काहीतरी अघटित घडले आहे. क्षणभर त्यांच्या काळजात लक्क चमकले.

पायाखाली मातीची टेकळे चिरडीत बोझिच्को अधीरपणे वाट पहात उभे होते. बेस्सोनोव यांच्या काळजात चिंतेची नवी लाट उमटून गेली.

"बोझिच्को, तुम्ही गप्प का आहात? बोला! काय खबर आहे?"

“वेस्निन ... कॉम्रेड कमांडर ...”

“कुठं? अशक्य! स्पष्ट बोला! कुठं आहेत ते?”

“कॉम्रेड कमांडर... मेजर तितकोव आत्ताच टेहळणी चौकीत आले. ते जखमी झालेत... त्यांनी सांगितलं की, लष्करी मंडळाचे सदस्य...”

“काय? जखमी? ठार?”

बोझिच्कोनी मान खाली घातली व बुटांखालची माती चिरडली. बेस्सोनोव यांचा चेहरा घामाने डवरला आणि त्यांच्या पायातून तीव्र वेदना गेली. पहिल्याप्रथमच त्यांचा ताबा सुटला आणि आपल्या अॅडज्युटंटवर त्यांनी आवाज चढवला.

“ते जखमी किंवा ठार झाले का म्हणून मी विचारतोय तुम्हाला! मुके आहात का? ते वारले?”

“होय कॉम्रेड कमांडर... वाटेत ते जर्मनांच्या तावडीत सापडले. मेजर तितकोव स्वतः येऊन तुम्हाला खबर देऊ इच्छिताहेत.”

वेस्निन मेले? जर्मनांच्या तावडीत सापडले? कुठे? खेड्यात? बोझिच्को काय म्हणत होते? असे कसे घडले? या अचानक आपत्तीशी बेस्सोनोव यांचा मानसिक मुकाबला चालला होता.

निवाऱ्यामधल्या त्या दाटलेल्या गरम वातावरणात ते दिवे, ते स्विचबोर्ड, तो ट्रान्समीटर, टेबलावरचा तो नकाशा, ते चेहरे या साऱ्या गोष्टी गरगर फिरताहेत असे क्षणभर त्यांना वाटले. सारे गप्प झाले. दाराशी एक धिप्पाड सावली हलली आणि “कॉम्रेड जनरल” असा कुठूनतरी अज्ञातातून आवाज ऐकू आल्याचा भास होताच बेस्सोनोवनी रुमालाने आपली मान व हनुवटी पुसली. त्यांना अवधी हवा होता, वेस्निन यांच्या मृत्यूची बातमी सांगणाऱ्या या बथ्थड आवाजावर आपल्या दबलेल्या रागाची आग पाखडण्यापासून स्वतःला आवरण्यासाठी त्यांना अवधी हवा होता. त्यांनी आपल्या चेहऱ्यावरचा घाम पुसला आणि दीर्घ काळ गप्प राहिल्यानंतर विचारले, “मेजर तितकोव, जर्मनांशी तुमची कुठं गाठ पडली?”

“खेड्याच्या वायव्य सीमेवर कॉम्रेड कमांडर. संरक्षकांची मोटार पुढं होती...” त्या एकाकी, आत्मसमर्थक आवाजाकडे आपली मान वळवून कटाक्ष टाकायला त्यांना खूप सायास पडले. एकाएकी त्यांना

तितकोव यांना नखशिखांत पाहण्याची तीव्र इच्छा झाली, नक्की काय घडले याचा त्यांच्या चेहऱ्यामधून, डोळ्यांमधून, अस्पष्ट पुटपुटण्यामधून मागोवा घ्यावासा वाटला, तितकोव ज्या प्रसंगात सापडले होते व ज्या प्रसंगाचे साक्षीदार होते त्या प्रसंगाची अखेरची मिनिटे त्यांना आपल्या डोळ्यांसमोर उभी करावीशी वाटली.

परंतु निवाऱ्याच्या दाराशी उजव्या बाजूला सावलीप्रमाणे उभे असलेले मेजर तितकोव ओळखता येत नव्हते. त्यांचे गोल गरगरीत डोके नाकापर्यंत बँडेजमध्ये गुंडाळलेले होते, त्यांच्या भक्कम, पोलादी स्नायूंच्या घडणीतल्या शरीराला एकेकाळी घट्ट छान बसणाऱ्या मेंढकातडी कोटाच्या दशा झाल्या होत्या, त्याच्या किनारीच्या चिंध्या बनल्या होत्या, डाव्या बाहीवर गोळी आरपार घुसल्याने आतले अस्तर फाटून बाहेर लोंबत होते; त्या राखी बँडेजच्या खालचे त्यांचे तांबडेभडक डोळे घायकुतीला येऊन एकटक पहात होते. आणि पुन्हा ते आपल्या कमालीच्या निराश आवाजात म्हणाले:

"त्यांनी मोटारींकडे जर्मन टेहळं पथक पाठवलं. कॉम्रेड लष्करी सल्लागारांनी जवळच्या घरांकडं माघार घ्यायला नकार दिला. ती सुमारे दोनशे मीटर अंतरावर होती, तिथपर्यंतचा रस्ता उघड्या मैदानातून होता... त्यांनी आम्हाला शत्रूशी मुकाबला करायचा हुकूम दिला..."

"ते कसे ठार झाले?" बेस्सोनोवनी मध्येच विचारले. "वेस्निन कसे ठार झाले?"

"आम्ही त्यांच्या गोळीबाराला दहा मिनिटंपर्यंत उत्तर दिलं. मग मी भोवती पाहिलं तेव्हा कॉम्रेड लष्करी मंडळाचे सदस्य मोटारीजवळ उताणे पडलेले दिसले. त्यांचं पिस्तूल अजून त्यांच्या हातात होतं आणि तो हात त्यांनी छातीशी घट्ट दाबून धरला होता नि त्यांच्या गळ्यामधून रक्ताचा लोंढा लागला होता..."

"पुढं?" आपली इच्छा नसतानाही बेस्सोनोव यांनी संपूर्ण तपशीलवार हकिकत ऐकायचा आग्रह धरला. जणू अजूनही त्यांना काहीतरी जाणून घ्यायचे होते, त्यांच्या समजुतीमधून जणू काहीतरी महत्त्वाचा तपशील सुटला होता. वेस्निन ठार झाले असे त्यांना सांगण्यात आले होते, पण त्यांना वेस्निन यांचा मृत्यू दिसत नव्हता,

ते मरण पावले अशी कल्पना त्यांना करवत नव्हती. हे फार अनपेक्षित घडले होते. अद्याप त्या दोघांमधल्या संबंधांमध्ये खूप काही सुरळीत व्हायचे राहून गेले होते. प्रत्येक गोष्टीला सारख्याच जबाबदार असलेल्या त्या लष्करातील दोन माणसांमध्ये अजून तेवढी जवळीक घडली नव्हती. वेस्निन यांना त्या दोघांमध्ये जसे संबंध निर्माण व्हायला हवे होते व जसे संबंध निर्माण होणे आवश्यक होते, तसे संबंध बेस्सोनोव यांच्या संशयी स्वभावामुळे अद्याप निर्माण झाले नव्हते. आपल्या शेजारीच आपल्याएवढेच अधिकार असलेली व्यक्ती सतत ठेवण्यात आली आहे ही वस्तुस्थिती बेस्सोनोव यांना त्रासदायक वाटत होती. कदाचित वेस्निन यांच्या सौजन्यशील वर्तनामुळे, वादाबाबत त्यांनी अप्रियता राखल्यामुळे, त्यांच्या सौम्य, सहज सल्ला देण्याच्या स्वभावामुळे, बेस्सोनोव यांच्या अभिमानाला धक्का लागणार नाही अशी काळजी पूर्वानुभवानुसार त्यांनी घेतल्यामुळे, सेनापतींएवढाच आपलाही अधिकार आहे हे दाखविण्याचे त्यांनी नेहमी टाळल्यामुळे, बेस्सोनोव यांना अद्याप अपरिचित असलेल्या सेनेत आपले पाऊल भक्कम रोवणे शक्य झाले होते? त्यांचे स्थान निर्माण करण्यात वेस्निन यांनी मूकपणे कामगिरी बजावली होती? असेच घडले होते काय? अगदी असेच घडले नसले तरी त्या दोघांमध्ये जो काही दुरावा अद्याप होता त्याला वेस्निन नव्हे तर बेस्सोनोव जबाबदार होते; आणि याबद्दल ते स्वत:ला कधीही क्षमा करू शकणार नव्हते.

कुठून तरी दूर अंतरावरून, दिव्यांच्या त्या चकचकीत उजेडामधून, त्या गरम, वाफाळणाऱ्या हवेमधून मेजर तितकोव यांचा फाटलेला आवाज ऐकू येत आहे असे त्यांना वाटत होते.

"कर्नल ओसिन यांनी आणि मी आळीपाळीनं त्यांना पाठीवर उचलून आणलं. खेड्याजवळ आम्ही पोचलो तेव्हा कर्नल ओसिन यांना खांद्याला जखम झाली. स्फोटक गोळीनं त्यांचं खांद्याचं हाड पिंजलं. आम्ही आपल्या रणगाड्यांपर्यंत पोचताच दारूगोळा वाहून नेणाऱ्या ट्रकनं आम्हाला घेतलं आणि ३०५ च्या मेडिकल बटालियनमध्ये नेलं. मी लष्करी मंडळाच्या सदस्यांची पदकं आणि त्यांचे कागदपत्र बरोबर घेऊन आलोय. कर्नल ओसिन यांना आजाऱ्यांच्या विभागात ठेवलंय. सगळे कागदपत्र तुमच्याजवळ द्यायला त्यांनी सांगितलंय. कॉम्रेड जनरल, आता मी काय करू? मी कुठं जायचं?"

मेजर तितकोव एवढे घायकुतीला आले होते की, त्यांचा प्रत्येक शब्दाबरोबर आवाज कापत होता. वेस्निन यांची पदके व कागदपत्र एकवेळ त्यांनी दाखवली नसती तर अधिक बरे झाले असते. रक्ताचे डाग पडलेली ती लहान पुरचुंडी त्यांनी टेबलावर ठेवली. ती पुरचुंडी म्हणजे कठोर वास्तवता होती, मर्मस्थानी झालेला प्रहार होता, वेस्निन यांच्या मृत्यूचा क्रूर पुरावा होता.

दिव्याच्या प्रखर उजेडापासून व भोवतालच्या लोकांच्या नजरांपासून बचावण्यासाठी बेस्सोनोव यांनी अनिच्छेने एक हात चेहऱ्यावर आडवा धरला आणि दुसऱ्या हाताने वेस्निन यांचे ओळखपत्र उचलले. त्याची पाने रक्ताने भिजून चिपकली होती आणि काही वेळपर्यंत त्यांना ती उलगडता येईनात.

अखेरीस त्यांनी ती पाने उलगडली आणि पहिल्याप्रथम त्यांच्या नजरेला त्या पानांमध्ये दडून राहिलेला फोटो दिसला. त्या फोटोवरही काळसर तपकिरी डाग पडले होते, पण अद्याप तो ओळखू येत होता. फोटोत वेस्निन आणि बहुधा त्यांची मुलगी होती. त्यांनी पांढरा शर्ट व पांढरीच फ्लॅनेलची पँट घातली होती. त्या फोटोत अंतर्भूत नसलेल्या कुणा व्यक्तीकडे पाहून त्यांनी आपले खासे बालिश हास्य केले होते व त्या तशा हसण्यामुळे त्यांच्या नाकाला किंचित मुरड पडली होती. वल्हयाच्या होडीत ते वल्ही मारण्याच्या ठिकाणी बसले होते व त्यांच्या पार्श्वभूमीवर सुरूच्या झाडात लपलेली आरोग्यधामाची पांढरी इमारत दिसत होती. त्यांच्या नौकेवर उन्हाची तिरीप पडलेली होती. नौकेच्या मागच्या भागात एक सात वर्षांची बालिका बसलेली होती, उन्हाने तिचा गौरवर्ण काळपटला होता, सूर्यप्रकाशात झळाळणारे तिचे पनामा टोपीखालील केस तिच्या गालांवर रुळत होते व तिच्या खास उन्हाळी फ्रॉकमधून तिची नाजुक खांद्याची हाडे डोकावत होती. होडीच्या एका बाजूला झुकून ती आपल्या बारक्या हाताने पाण्यावर रेषा ओढीत होती. फोटो काढणाऱ्या व्यक्तीने तिला मुद्दाम तशी पोज घ्यायला सांगितले असावे. वेस्निन ज्या दिशेला पाहून फोटोत हसत होते त्याच दिशेला तिच्या पनामा टोपीच्या सावलीतील तिचे डोळे वळलेले होते. तिने ओठ किंचित बाहेर मुरडले होते. फोटो काढणाऱ्या अपरिचित व्यक्तीकडे

पाहून हसण्याची तिची तयारी नव्हती आणि ती व्यक्ती तिला हसायचा आग्रह करीत असावी.

छायाचित्राच्या कोपऱ्यात पांढऱ्या अक्षरांमध्ये लिहिले होते: "सोची, १९३८."

हा फोटो ते आपल्याबरोबर का बाळगीत होते? ही बालिका त्यांची मुलगी होती का? या कागदपत्रांमध्ये त्यांच्या पत्नीचा फोटो होता का? पण त्यामुळे कोणती अधिक माहिती मिळणार होती अथवा खुलासा होणार होता? आता हा माणूस मेल्यानंतर त्याच्या खाजगी गोष्टींचा तपास करण्याचा आपलयाला हक्क नाही असे बेस्सोनोव यांनी स्वतःला बजावले. एखादा माणूस तो जिवंत असताना त्याच्याबद्दल माहिती करून घेण्यापेक्षा तो मेल्यानंतर आपण नेहमी त्याची अधिक चौकशी का करतो?

"कॉम्रेड कमांडर..."

त्यांनी आपल्या कपाळावरचा हात बाजूला काढला. प्रमुख ठाण्याच्या टेलिफोनची घंटा त्या आडोशात जोरात खणखणली. ऑपरेटरने चटकन रिसीव्हर उचलला व भित्र्या नजरेने बेस्सोनोव यांच्याकडे अपेक्षेने पाहिले.

"कॉम्रेड कमांडर, तुमचा फोन आहे. आघाडीच्या हेडक्वार्टर्सकडून."

"ठीक आहे. एक सेकंद. हा मी आलोच..."

टेबलाच्या टोकाशी ठेवलेली काठी उचलायला त्यांनी तिच्याकडे न पाहताच हातांनी चाचपले. तिथे उपस्थित असलेल्या सर्वांच्या नजरा त्यांच्यावर खिळल्या होत्या. त्या आडोशामधील दबत्या स्तब्धतेत ते उठून उभे राहिले. टेलिफोन सेटकडे ते चालत जात असताना त्यांची काठी जमिनीवर घासत होती. ऑपरेटरच्या हाताच्या उबेमुळे रिसीव्हर अजून गरम होता. त्यात अंतराळातले विविध आवाज, अफाट पोकळीतले अज्ञात आवाज भणभणत होते. त्या आडोशातली व त्या रिसीव्हरमधली ती चमत्कारिक शांतता बेस्सोनोवना असह्य झाली. अखेरीस ते उद्गारले, "येस्? मी पाच बोलतोय."

"एक मिनिट कॉम्रेड पाच. मी तुम्हाला कॉम्रेड एकबरोबर जोडून देतो," आणि ताबडतोब दुसरा दमदार, तातडीच्या कामांमध्ये पूर्णपणे गुरफटलेल्या व्यक्तीचा आवाज उत्तेजकपणे उद्गारला:

"प्योत्र अलेक्सांद्रोविच, नमस्कार! तुमच्या सपाता तयार ठेवल्यात का? तुम्ही दाढी वाढवलीत का? अंगरख्याचा पट्टा बांधून तय्यार का?"

आघाडीचे सेनापती बोलत होते. त्या बोलण्यातला युक्रेनी हेल बेस्सोनोवनी ओळखला, पण त्यांची एकमेकांशी एवढी सलगी कधीच नसल्याने ही फोनवरची थट्टामस्करी, हे अनौपचारिक संबोधन बेस्सोनोवना चमत्कारिक वाटले. निदान आरंभाला तरी आपले स्वातंत्र्य अबाधित राखणे त्यांना यामुळे जमणार नव्हते. आघाडीच्या सेनापतींनी सहज थट्टाविनोदात सरळ सरळ सुचविले होते की, बेस्सोनोव यांच्या सेनेला ते "वेढ्याच्या धोक्यात सापडलेली" मानीत होते.

त्या क्षणाला विनोद ऐकण्याच्या मन:स्थितीत नसलेले व आपल्या वरिष्ठाच्या अनौपचारिक बोलण्याची सवय नसलेले बेस्सोनोव उत्तरले, "कॉम्रेड एक, मी अजून रेझर बरोबर बाळगून प्रवास करतो. आणि पुरवठा खात्याकडून मला अजून सपाता किंवा अंगरखा मिळाला नाही. कॉम्रेड एक, दोन तासांपूर्वीच मी आमच्या एकूण परिस्थितीचा अहवाल द्यायला तयार होतो."

"मला तुमचा अहवाल माहीत आहे, मी त्याचा अभ्यास केला आणि मला तो मान्य आहे" बेस्सोनोव यांचा रोखठोक औपचारिक संभाषणाचा पवित्रा न मानता हास्याचा प्रचंड गडगडाट करीत आघाडीचे सेनापती म्हणाले: "तर प्योत्र अलेक्सांद्रोविच, हे मला तुम्हाला आता सांगायचंय. मला वाटतं यापुढं तुम्ही थोडा सुटकेचा निश्वास टाकू शकाल. फळी फुटलेल्या भागात तुमच्या वायव्य विभागातल्या शेजाऱ्याने चार रणगाडा तुकड्या पाठवल्यात आणि कारवाईची राखीव शक्ती नष्ट करीत त्या तुकड्या यशस्वीपणे पुढे सरकताहेत. दॉन सेनेच्या गटाच्या पिछाडीवर आघात करून त्या पुढे घुसताहेत. आत्ता या क्षणाला अशी परिस्थिती आहे. मला तुमच्या योजना मान्य आहेत. जर तुम्ही अवघड जागी अडकला असलात तर बाहेर निसटायची हीच वेळ आहे. आम्ही शेवटची तपासणी केली की, तुम्ही ताबडतोब चालू करा. आम्ही तात्काळ तुम्हाला हुकूम पाठवू. तुम्ही आणि विताली इसायेविचनी जो दम धरलात त्याबद्दल मी तुमचा कृतज्ञ आहे. आणि हो, तुम्हाला आणखी एक खूषखबर आहे. गेल्या रात्री आम्हाला मॉस्कोहून फोन आला होता.

तुमची सेना कशी काय लढते आहे त्याची चौकशी ते करीत होते. तुमच्या कामगिरीवर ते खूष आहेत आणि आम्हाला जल्दी करायला सांगितलीय."

याचा अर्थ आघाडीच्या मुख्य ठाण्यावर कुणालाही काय घडले होते त्याची माहिती नव्हती. वेस्निन अद्याप जिवंत आहेत अशी त्यांची कल्पना होती व त्यांची त्यांना अद्याप गरज भासत होती. पहिल्या अयशस्वी प्रयत्नांनंतर नैर्ऋत्य आणि वोरोनेझ आघाड्यांनी अखेरीस जर्मन मोर्चे मोडून काढले होते व आपली चिलखती दले खिंडार पाडून घुसवली होती. सर्वप्रमुख लष्करी ठाणे त्यांची चौकशी करीत होते, समाधान व्यक्त करीत होते व जल्दी करायला सांगत होते.

आपल्या सेनेकडे सर्वांचे लक्ष वेधून राहिलेले असणार याची त्यांना प्रथमपासूनच कल्पना होती...

बेस्सोनोवनी आपल्या ओलसर, चिकट बोटांमध्ये रिसीव्हर घट्ट पकडला होता. त्यांना भास होत होता की, पदके व कागदपत्र एकत्र बांधलेल्या त्या पुरचुंडीच्या रक्ताचा खारट वास अजून त्यांना येतोय, वेस्निन यांच्या मुलीबरोबरच्या त्या फोटोला लागलेल्या रक्ताचा अजून वास येतोय, नखे पांढरीफटक पडेपर्यंत रिसीव्हर गच्च धरलेल्या आपल्या हाताच्या बोटांनाही त्या रक्ताचा वास येतोय.

"प्योत्र अलेक्सांद्रोविच, तुम्ही गप्प का? काय विशेष घडलं? तुमच्या काही हरकती असल्या तर मला सांगा, मी ऐकीन त्या. काय आहेत? तुम्हाला काही पाहिजे? यात्सेन्को आधीच मला पिळून काढतोय. तुमचा तो यात्सेन्को मोठा गच्च धरणारा माणूस आहे बुवा!"

"कॉम्रेड एक, मी जरा मधे बोलू का?" आपला घसा कोरडा पडल्याचे बेस्सोनोवना जाणवले. "ही बातमी राखून ठेवण्याचा मला अधिकार नाही... तीन तासांपूर्वी, रणगाडा तुकड्यांकडं जात असताना लष्करी मंडळाचे सदस्य विताली इसायेविच वेस्निन वाटेत मारले गेले."

"काय? असं कसं घडलं? काय तुम्ही सांगताय काय मला?" टेलिफोनच्या दुसऱ्या टोकाला आघाडीच्या सेनापतींचा आवाज एकदम उंच गेला. मग एकदम खालच्या अस्पष्ट आवाजात ते म्हणाले, "कसं घडलं ते? तुम्ही काय सांगताय?"

बेस्सोनोव पुन्हा म्हणाले, "कॉम्रेड एक, मी तुम्हाला सांगतोय की, रणगाडा तुकड्यांकडं जात असताना विताली इसायेविच वेस्निन वाटेत मारले गेले. आम्हाला आत्ताच ही बातमी सांगण्यात आली."

"वेस्निन ठार झाले? तुमच्या लष्करी मंडळाच्या सदस्याची तुम्हाला काळजी घेता आली नाही? एखाद्या धोक्याच्या ठिकाणी अचानक ते सापडतील याचा विचार तुम्ही केला नाही? ... असं घडतं याची तुम्हाला कल्पना नाही? तुम्ही त्यांना आवरायला पाहिजे होतं! केवढा चांगला माणूस गमावलात तुम्ही! ही असली अपेक्षा मी कधीही केली नव्हती! असला कसला शरीररक्षक ठेवलाय तिथं तुम्ही? ती माणसं त्यावेळी काय करीत होती?"

"आता राग करण्यात अर्थ नाही कॉम्रेड एक, प्लीज! दुर्दैवानं त्याचा मला किंवा तुम्हाला असा दोघांनाही काही उपयोग होणार नाही." बेस्सोनोव थोडे थांबले. "माझ्या पूर्वीच्या संदेशात आणखी थोडं काही सांगू का?"

"आणखी काय बातमी आहे? ... पण प्योत्र अलेक्सांद्रोविच, हे असं घडलंच कसं? खरंच, हा फार भयानक धक्का आहे!"

"मी पुढं बोलू का कॉम्रेड एक? कृपा करून माझं ऐका."

"हं, बोला पुढं. मी ऐकतोय."

बेस्सोनोव यांनी संभाषणाचा ओघ चटकन दुसरीकडे वळवला, कारण वेस्निन यांच्या मृत्यूचा तपशील पुन्हा सांगण्याची हिंमत त्यांच्यात आता उरली नव्हती. त्यांनी आपला अहवाल दिला. मात्र दिवसअखेरीला देयेव यांची डिव्हिजन जर्मन रणगाड्यांनी कोरून काढली, तरी या क्षेत्रात सर्वांगीण रक्षक पवित्रा उभारण्याची त्यांनी तयारी केली होती, हा तपशील देण्यावर त्यांनी फारसा भर दिला नाही. आणि सर्वांत त्यांना याची भीती वाटत होती तरी (वेस्निननाही तशी वाटली होती, पण त्यांच्याप्रमाणे त्यांनी आपल्या शंका दडवून ठेवल्या नव्हत्या), प्रत्याघातासाठी राखून ठेवलेली रणगाडा व यंत्रसज्ज दले वापरून टाकण्याचा धोका ते पत्करत नव्हते. आता ते एवढेच म्हणाले की, या फौजांनी रणांगणावर उतरण्याची आता वेळ येऊन ठेपली आहे. पकडलेल्या जर्मन मेजरकडून, संपर्क अधिकाऱ्याकडून, पक्की बातमी काढून घेण्यात आली होती की, हॉथने काल आपले राखीव बळ वापरले होते आणि

म्हणून उत्तर किनाऱ्यावर शत्रूने नवी हालचाल करण्यापूर्वीच आज सकाळी प्रत्याघात करायला पाहिजे होता. त्यांनी ही संधी उचलायला पाहिजे होती आणि नेहमीप्रमाणे प्रथम तोफखान्याचा मारा न करताच रणगाडा व यंत्रसज्ज दले रणांगणात घालून जर्मनांना पुलाच्या शेवटच्या तटबंदीवरून जमवाजमव करायला अवसर न देता हाकलून लावायला पाहिजे होते.

"तोफखान्याचा मारा का नको? त्याने तुम्ही काय साधता?" आघाडीच्या सेनापतींनी विचारले. "तुमचा तोफखान्यावर विश्वास नाही?"

"तोफखान्याचा प्रथम मारा केला म्हणजे ही चढाईची पूर्वतयारी आहे हे जर्मनांना ठाऊक झालंय. रणगाडे रणांगणात उतरण्यापूर्वी जरा आधी तोफखाना सरबत्ती सुरू करील."

"आम्ही त्याबाबत चर्चा करू," आघाडीचे सेनापती उत्तरले. "ठीक आहे. मी याबद्दल सरसेनापतींच्या प्रतिनिधीला विचारतो. तुम्हाला तसा हुकूम मिळेल ... पण वेस्निन यांचं काय? कसं घडलं ते? प्योत्र अलेक्सांद्रोविच, तुमच्या बातमीनं तुम्ही मला खरंच अस्वस्थ केलंय. आता तुम्हा एकट्यालाच तुमचे निर्णय घेतले पाहिजेत. लष्करी मंडळाच्या सभासदाशिवाय. तुमच्यावर त्यांचा विलक्षण विश्वास होता, मला माहीत आहे, तुम्ही—तुमच्याशी जमवून घेणं एखाद्याला तेवढं सोपं नाही. प्योत्र अलेक्सांद्रोविच, मी हे सरळ तोंडावर सांगतो तुमच्या!"

आपल्या जड, मिटणाऱ्या पापण्या बेस्सोनोव यांनी हाताने झाकून घेतल्या. खरेच, वेस्निन यांची जागा माझ्यासाठी आता कुणीही घेऊ शकणार नाही, मी अगदी एकटा पडेन... अच्छा, त्यांचा माझ्यावर विश्वास होता? आणि मी खुला वागायला भीत होतो. मी मला बंद करून ठेवले होते! खरेच, प्रिय विताली इसायेविच, आपण सारे आयुष्यभर जगताना शिकले पाहिजे आणि खऱ्या गोष्टींची पारख करायला आपण खूप उशिरा शिकतो. तुम्हाला शक्य असेल तर मला माझ्या थंडपणाबद्दल, माझ्या अलिप्तपणाबद्दल क्षमा करा. त्यामुळे मला स्वतःलाही त्रास होतो, पण आता स्वभाव बदलणे अवघड आहे.

बेस्सोनोव आघाडीच्या सेनापतींना हे बोलले नाही. त्यांच्या सदसद्विवेकबुद्धीला टोचणाऱ्या त्यांच्या मुलाच्या व पत्नीच्या

आठवणींप्रमाणेच ही एक भावना पूर्णतः त्यांची खाजगी होती, आणि ती कुणाहीसमोर निवाड्यासाठी व्यक्त करायला त्यांची तयारी नव्हती.

आघाडीवरच्या सेनापतींशी संभाषण संपल्यानंतर बेस्सोनोव तिथेच खूप काळ उभे राहिले. त्या सावध बोलण्यांनी गजबजलेल्या वातावरणात, टेलिफोनच्या खणखणाटात, त्यांचे गुपचूप निरीक्षण करीत असलेल्या त्या सर्व लोकांमध्ये बेस्सोनोव पूर्णतः भावनाहीन होऊन उभे राहिले. आपल्या स्वतःच्या थकल्या, पांढुरक्या, वृद्ध चेहऱ्याची, सर्वांसमोर मुखवटा घेतलेल्या त्या चेहऱ्याची त्यांना काही क्षण जाणीव झाली. आणि तरीही, अद्याप नकाशावर अवधानपूर्वक निरीक्षण करण्यात गुंतलेल्या संयमनशील, कार्यक्षम मेजर ग्लादीलिन यांच्या मनात, त्या संदेशवाहकांच्या, त्यांचे ॲडज्युटंट बोझिच्को यांच्या, आपले भवितव्य काय ठरेल याची चिंताग्रस्त चेहऱ्याने वाट पाहणाऱ्या रक्षक-प्रमुख मेजर तितकोव यांच्या मनात काय चालले आहे, याची बेस्सोनोवना पूर्ण जाणीव होती. प्रत्येकजण त्यांची वाट पहात होता. मेजर तितकोव दाराशी उभे होते. त्यांच्या काळया सावलीवर ते बँडेज बांधलेले डोके एखाद्या पांढऱ्या तरंगत्या फुग्याप्रमाणे भासत होते. सहनशक्ती पुरती संपल्यामुळे अखेर त्यांनी आपल्या अस्तित्वाची जनरलना जाणीव करून दिली.

"कॉम्रेड कमांडर, मी आता काय करू? आता मी कुठं जायचं?"

"इस्पितळात!" बेस्सोनोव कठोरपणे उत्तरले. "मेजर तितकोव, इस्पितळात जा!"

देयेव यांच्या उबदार निवाऱ्यात बेस्सोनोव कोचावर स्तब्ध पडून होते. ते मुळीच हालचाल करीत नव्हते. छतावरच्या ठिपकणाऱ्या ओंडक्यांकडे ते एकटक नजर लावून पडले होते. मधूनमधून बोझिच्को यांचे सहेतुक खोकणे, स्टोव्हवर किटली ठेवल्याचा आवाज, पायघोळ कोटाची सळसळ ते ऐकत होते पण त्याला प्रतिसाद देत नव्हते. शेजारच्या निवाऱ्यातील काही अंधुक आवाज मातीच्या थरांमधून त्यांच्यापर्यंत पोहोचत होते, पण त्यांना स्तब्ध पडून रहावेसे वाटत होते. स्टोव्हच्या फरफरणाऱ्या ज्वाळांच्या आवाजाची

सोबत करीत ते विचार करीत होते. वेस्निन यांच्या मृत्यूच्या बातमीपासून त्यांचा तोल ढळत चालला होता; निदान वरपांगी तो राखण्याचा त्यांचा प्रयत्न चालला होता, सकाळसाठी तसा तोल राखणे त्यांना आवश्यक होते. मेजर तितकोव यांनी सांगितलेल्या हकिकतीचा निदान काही सेकंद तरी विसर पडावा म्हणून बेस्सोनोव आगामी प्रतिहल्ल्याबाबत, आघाडीच्या सेनापतींना त्यांनी सांगितलेल्या अहवालाबाबत विचार करण्याचा प्रयत्न करू लागले. पण पुन:पुन्हा त्यांचे विचार वेस्निन यांच्याकडे वळत होते, त्या दोघांमध्ये न घडलेल्या अक्षम्य, पूर्णतया अर्थहीन अशा सुसंवादाच्या अपयशाकडे, टेबलावर तितकोव यांनी ठेवलेल्या त्या पदकांच्या व कागदपत्रांच्या डागाळलेल्या पुरचुंडीकडे, वेस्निन यांच्या ओळखपत्रात त्यांना सापडलेल्या त्या ओठाला मुरड घातलेल्या छोटचा मुलीकडे, त्यांचे विचार वळत होते.

"माघार घ्यायला नकार दिला" – तितकोव यांनी सांगितलेले शब्द बेस्सोनोव यांच्या डोक्यात घुमत होते. वेस्निन ज्या पदावर होते त्या स्थानी अस्थायी प्रतिकूल परिस्थितीशी झुंजण्याची गरज नव्हती. अशा परिस्थितीत त्यांनी धोका टाळायला पाहिजे होता. पण वेस्निन यांनी झुंजायचा निर्णय घेतला आणि त्याचा परिणाम म्हणजे तीन तासांपूर्वी घडलेली घटना होती.

"कॉम्रेड कमांडर, थोडा चहा घेणार?"

चहा उकळण्याचा वास. हलक्या पावलांचा आवाज. स्टोव्हवर उकळणाऱ्या किटलीचा बारीक आवाज. प्याल्यावर किणकिणणारा चमचा.

"कॉम्रेड कमांडर, तुम्ही अर्धा तास डुलकी घेतली पाहिजे... तुम्हाला इथं कुणी त्रास देणार नाही. चहा प्या आणि झोपा. अर्ध्या तासात काहीही घडणार नाही. मी कुणालाही तुम्हाला चिंता करायला लावणारी गोष्ट करू देणार नाही..."

"थँक्यू. एक मिनिट थांबा".

बेस्सोनोव यांनी डोळे उघडले, पण ते उठले नाही. त्यांच्यासाठी तयार केलेल्या चहाचा प्याला त्यांना उठून घेतला पाहिजे असे त्यांनी स्वत:ला बजावले. त्यांनी चहा प्यायला पाहिजे आणि पुन्हा नेहमीप्रमाणे वागले पाहिजे, शेजारच्या निवाऱ्यात सरळ चालत गेले पाहिजे, सकाळच्या हल्ल्याबद्दल सूचना घ्यायला तेथे सारेजण थांबले असतील, तिथे पुन्हा

यांना झगझगीत बॅटरींवरचे दिवे, नकाशे, टेलिफोन, ट्रान्समीटर आणि सांकेतिक खुणांचे पुनःपुन्हा होणारे आवाज हे परिचित वातावरण नजरेला पडेल. हे त्यांना केले पाहिजे होते, कारण त्यांना माहीत होते आणि खूप दीर्घ काळापासून ठाऊक झाले होते की, अनंताचे कठोर, आत्मा विदीर्ण करणारे दणके युद्धांना किंवा यातनांना विराम देत नाहीत, आयुष्य जगण्यापासून जीवनाची सुटका करीत नाहीत. त्यांच्या मुलाबद्दलच्या बातमीनंतर असेच झाले होते. त्यांनी आपली सारी इच्छाशक्ती पणाला लावली, कोचावरून पाय खाली सोडले आणि सरळ बसून कशासाठी तरी उशीखाली चाचपून पाहू लागले.

"एक मिनिट हं. थँक्यू मेजर." ओठांच्या कोपऱ्यांमधून ते कडवट हसले. कमालीच्या थकव्यामुळे त्यांच्या ओठांजवळच्या रेषा खोल उमटल्या होत्या. "माझ्याकडं असं काय पाहताय बोझिच्को?"

बोझिच्कोनी गरम किटली स्टोव्हवरून उचलायला आपली टोपी वापरली, कडक, तपकिरी चहाची वाकडी धार त्या प्याल्यात सोडली आणि आपल्या पिवळट छटेच्या दुःखी डोळयांवरच्या काळयाशार पापण्या खाली झुकवल्या.

"काही विशेष नाही कॉम्रेड कमांडर. विताली इसायेविच यांचे हे कागदपत्र ... मी ते बॅगेत भरतो."

आपल्या सबंध आयुष्यात त्यांना बेस्सोनोवना हे सांगायचा कधीही धीर झाला नसता की, मुख्य ठाण्याकडे पाठविण्यासाठी जेव्हा त्यांनी वेस्निन यांचे कागदपत्र आपल्या बॅगेत भरले, तेव्हा त्यात त्यांना एक भिजलेले पत्रक आढळले होते—ती भयानक गोष्ट बेस्सोनोव यांना कधीही समजून चालणार नव्हती.

## प्रकरण बाविसावे

रणगाड्यांना आणि यंत्रसज्ज कोअरांना हल्ला चढविण्याचा बेस्सोनोव यांनी आदेश दिल्यानंतर चाळीस मिनिटात उत्तर क्षेत्रामधील लढाईचा रंग पूर्ण पालटला.

टेहळणी चौकीवरून खेड्याच्या रस्त्या रस्त्यात व खेड्याच्या सीमेवर जुंपलेली लढाई ते न्याहाळत होते. वर उंचावरून आणि अंधारात पहात

असल्याने ती लढाई अगदी निकट झुंजली जात आहे व कमालीच्या अटीतटीने हाणामारी चालली आहे असे वाटत होते. खेड्याच्या सबंध कडेने बंदुकींचे बार वाजत होते. रॉकेट मॉर्टर घरांमधून आगीचे लोळ उठवीत होते. एकमेकांवर आदळलेले रणगाडे चौकांमधून धडाधडा पेटत होते. सर्वत्र उसळलेल्या त्या आगीच्या डोंबामधून सबंध तीरावर मागेपुढे होणाऱ्या गुलाबी लोखंडी आकृती घाम आल्याप्रमाणे चकाकत होत्या, अगदी जवळून लक्ष्यावर मारा करीत होत्या, आपल्या तोफांच्या नळ्या अगदी एकमेकींना भिडवीत होत्या, आपल्या चाकांखाली घरांचा व आडोशांचा चक्काचूर करीत होत्या, परसदारांमधून मागे वळत होत्या, पुन्हा जोरदार हल्ला चढवीत होत्या आणि पुलाच्या तटबंदीशी अधिकाधिक जवळ भिडत होत्या. जर्मन निकराने लढून उत्तर तीराला धरून होते, पण हळूहळू त्यांना नदीत माघार घ्यावी लागली आणि चाळीसाव्या मिनिटाला लढाईचा रंग पालटला. नदीच्या मार्गावर इंजिनांचा एकवटलेला घरघराट ऐकू येऊ लागला आणि जर्मनांनी नदी ओलांडून माघारीला आरंभ केला. आणि एकाएकी बेस्सोनोव यांनी उत्तर किनाऱ्या-ऐवजी दक्षिण किनाऱ्यावर चमकून पाहिले. आपण घाईघाईने निष्कर्ष काढतो आहोत अशी त्यांना क्षणभर भीती वाटली.

जर्मन रणगाडे नदीच्या दुसऱ्या तीरावर जेथे हळूहळू माघार घेत होते आणि जेथे बॉबहल्ल्यांनी, तोफगोळ्यांनी व रणगाड्यांच्या हल्ल्यांनी सर्व काही भुगा झाला अशी कल्पना करण्यात आली होती, जिथे स्तेप पूर्णपणे निर्जन, भाजून ओसाड पडले होते तेथून रायफलींचे आवाज, तोफांमधून धडाधड आडवे जाणारे जांभळे आगीचे मोठे लोळ व रणगाडाभेदी रायफलींच्या चुटपुटत्या ज्वाला त्यांना दिसत होत्या. काल जेथे पायदळाचे खंदक होते तेथून तीन मशिनगन्समधून गोळ्यांच्या फैरी उडाल्या व त्यांचे अनुक्षेपक स्तेपवर तांबड्या फुलपाखरांसारखे उडाले. जेथे सर्व काही संपले आणि नाश पावले असे वाटत होते तेथून जीवनाच्या खुणा अस्पष्टपणे, दुबळेपणाने उमटत होत्या. हे जीवन तेथे कसे टिकले, आदल्या दिवशी जर्मन रणगाड्यांनी ज्या भूमीचा दळून अक्षरशः भुगा केला होता व ज्या सेनेला वेढून तिचा खिमा केला होता तेथे त्या दीर्घ, प्राणांतिक लढाईत ही माणसे कशी टिकून राहिली याबद्दल कल्पनाही करणे अवघड झाले होते.

सकाळ अजून पुरती उजाडली नव्हती. थंडगार वारा टेहळणी चौकीच्या पुढच्या बांधाला झोंबत होता आणि बेस्सोनोव यांच्या डोळयांना पाणी आणीत होता. त्यांनी आपल्या हातरुमालाने डोळे व चेहरा पुसला. आणि मोठ्या दुर्बीणीशी वाकून ते पाहू लागले.

विश्वास ठेवायला अवघड अशा त्या गोष्टीची त्यांना स्वतःला खात्री पटवून घ्यायची होती, पण आता संशयाला जागाच राहिली नाही. दक्षिण तीरावर, शत्रूच्या रणगाड्यांनी जेथे खंदकांचा भुगा केला होता, तोफांच्या मोर्च्यांचा प्रचंड भडिमाराने जेथे निःपात केला होता, त्या ठिकाणांहून वेढल्या गेलेल्या सैन्यातले काही अवशेष आता लढाईत सामील झाले होते. ही माणसे कशी जिवंत राहिली होती ही तर्क करण्याच्या पलिकडली गोष्ट होती.

"ती माझी पोरं आहेत! कॉम्रेड कमांडर, बघा तिकडं! अजून त्यांच्यात धुगधुग आहे! व्वारे माझ्या बहाद्दर पठ्ठ्यांनो! आहेत की नाहीत शूर वीर?" त्या वाऱ्याच्या घोंघावण्यात आणि टेहळणी चौकीवरल्या संदेशवाहकांच्या गजबजाटात देयेव यांचा खणखणीत आवाज वरच्या पट्टीत उमटला.

आघाडीच्या खंदकांमधली आपली माणसे केव्हाच आटपली अशी कल्पना असताना, अचानक ती अद्याप लढताहेत हे पाहताच देयेव यांनी आपल्या भावना ज्या पद्धतीने उघडपणे व्यक्त केल्या, त्याची बेस्सोनोवना चीड आली नाही. उलट देयेव यांची ती आरोळी ऐकताच मागे वळून त्यांनी एक मोठा आवंढा गिळला. असा उमदा, दिलदार डिव्हिजन कमांडर देऊन पुन्हा एकदा नशीबाने त्यांच्यावर खैर केली आहे असा विचार त्यांच्या मनात डोकावला.

त्या डिसेंबरातल्या सकाळचा अंधार रणगाड्यांच्या तोफांच्या जांभळ्या ज्वालांनी फाकला. स्तेपवर गडगडाटांचे प्रतिध्वनी उमटले. इंजिनांचा एकच मोठा घरघराट ऐकू येऊ लागला, अंधुक उजाडलेल्या आकाशात जर्मन प्रकाशगोलक उडू लागले. गुहेत जागे केलेल्या जंगली श्वापदांप्रमाणे जर्मन रणगाडे चवताळून उसळत होते, नदीतीराकडे सरपटत धावत होते, त्यांची पार दैना उडत होती आणि सोविएत टी-३४ त्यांच्या पाठीमागे हात धुवून लागले होते. पाच मिनिटांपूर्वी आलेल्या वार्तेनुसार त्यांनी एव्हाना दोन उतार काबीज केले होते. दक्षिण तीरापर्यंत मुसंडी मारल्याने

टी-३४ सरळ समोरच्या स्तेपवर घुसले होते आणि खिंडीत रणगाड्यांची एकच धुमाळी माजली होती. दोन्हीकडच्या रणगाड्यांची अंगे एकमेकांना घासत होती एवढी दाटी माजली होती.

खिंडीच्या टोकाशी पोचलेल्या या रणगाड्यांच्या जमावापासून शत्रूचे एकटे दुकटे रणगाडे पळ काढू लागले. आदल्या दिवशी याच ठिकाणाहून शत्रूने जोरदार मारा केला होता. पण जेव्हा ते इतस्ततः धावू लागले तेव्हा आकाशात इशाऱ्याचा प्रकाशगोलक उडाला व त्याने हिरव्या ठिणग्यांचा स्तेपवर पाऊस पाडला. दुसऱ्याच क्षणी खिंडीजवळच्या टेकाडावरून एका मशिनगनने फैरी उडवायला सुरुवात केली व तिच्या तांबूस पिवळ्या अनुक्षेपकांचा जर्मन पिछाडीला ओघ लागला. पण तिथे कुणी सोविएत मशिनगनवाला असण्याची शक्यता नव्हती आणि अनुक्षेपकांच्या रंगावरून ती जर्मन हेवी मशिनगन असल्याचे स्पष्ट होत होते.

"ते आता काय करताहेत कॉम्रेड कमांडर? त्यांची डोकी फिरली काय? आपल्या स्वतःच्याच माणसांवर गोळ्या झाडताहेत?" बेस्सोनोव यांच्याभोवती फिरत बोझिच्को उद्गारले. जर्मन माघार घेत होते आणि सोविएत आगेकूच उत्तम चालली होती याचा आनंद त्यांच्या वागण्या-बोलण्यातून, हसण्यातून पुरेपूर व्यक्त होत होता. "कॉम्रेड जनरल, यावेळी मात्र त्यांनी आपली खूपच करमणूक केलीय!"

अनुक्षेपकांची दिशा पहायला बेस्सोनोव दुर्बीणीशी वाकले. प्रथम बोझिच्को यांच्याप्रमाणे तेही बुचकळ्यात पडले होते. पण जेव्हा तीराच्या कडेने जर्मन रणगाड्यांचा समूह हलू लागला तेव्हा त्यांना उमजले की, खिंडीपलिकडचा माघारीचा रस्ता आपल्या फैरींच्या साहाय्याने जर्मन मशिनगन त्यांना दाखवीत असली पाहिजे.

बोझिच्को यांना ही गोष्ट समजावून सांगण्याच्या भानगडीत ते पडले नाही, कारण या टप्प्याला खुलासा करण्याचा कोणताही प्रयत्न त्यांच्या मुख्य गोष्टीपासून चित्त विचलित करणारा ठरला असता. दुसऱ्याचे रहस्य जाणल्याची, आपला अंदाज खरा ठरल्याची, त्या प्रचंड यशाची ग्वाही गृहीत धरल्याची, आपल्या मनात विलक्षण ताणलेली ती भावना त्यांना तोडायची नव्हती. हल्ल्याच्या आरंभालाच तोफखान्याचे पाठबळ देऊन तुकड्या रणांगणात घुसवताच त्यांनी पहिल्या धडाक्यात

जर्मन तटबंदीचा धुव्वा उडवला होता, दक्षिण तीर गाठला होता, आता तर दुसऱ्या तीरावर जर्मनांना त्यांनी माघार घ्यायला लावली होती आणि मशिनगनच्या अनुक्षेपकांनी दाखविलेल्या दिशेने जर्मन दक्षिणेकडे माघार घेत होते. लढाईतल्या सहज विजयाची, नशीबावर हवाला ठेवण्याची, दैवावर आंधळा विश्वास ठेवण्याची त्यांना नेहमी भीती वाटत असे. आपल्या काही सहकाऱ्यांच्या अर्थहीन अतिरेकीपणावर जसा त्यांचा विश्वास नव्हता, प्रत्येक मोहिमेसाठी अधिकाऱ्यांच्या मागल्या दालनांमध्ये व्यूहांचे स्वप्नरंजन चाले, त्यावर जसा त्यांचा विश्वास नव्हता, तसाच याही बाबतीत नव्हता. अमर्याद कल्पनारंजनाला बेस्सोनोव सहसा वाव देत नसत, कारण त्यांना पुरेपूर ठाऊक होते की, युद्धात अपयशाची किंवा यशाची अशी दोन्हींची किंमत रक्ताने मोजावी लागते, तिथे दुसऱ्या कशात किंमत मोजता येत नाही. रक्त ही अशी वस्तू आहे की, तिची जागा दुसऱ्या कशानेही भरून काढता येत नाही.

मला थांबले पाहिजे, त्यांनी स्वत:ला बजावले. पुढच्या वार्ता तुकड्यांपासून येईपर्यंत मला थांबले पाहिजे. आघाडीच्या मुख्य ठाण्याला तपशीलवार अहवाल आत्ताच देणे घाईचे ठरेल. मला अशी घाई करून चालणार नाही!

पण सारे सोविएत मोर्चे पार जमीनदोस्त करण्यापर्यंत ठेपलेल्या आदल्या दिवशीच्या त्या जर्मन मुसंडीनंतर, जर्मनांनी उत्तर तीर काबीज केल्यानंतर, त्या प्रचंड हानीनंतर, सहन केलेल्या अमाप ताणानंतर, देयेव यांची डिव्हिजन तशी खणून निघाल्यानंतर, आता जेव्हा जर्मन पायदळाचे ट्रक स्तेपमध्ये पेटत असलेले व जर्मन रणगाडे दक्षिणेकडे माघार घेत असलेले त्यांच्या दृष्टीला पडले, अगदी आत्तापर्यंत डिव्हिजनशी संबंध पार तुटलेल्या दक्षिण किनाऱ्यावरून जेव्हा खिंडीकडे माघार घेणाऱ्या जर्मन रणगाड्यांवर रणगाडाभेदी बंदुकांच्या व तोफांच्या ज्वाला आग ओकताना त्यांनी पाहिल्या, तेव्हा बेस्सोनोव यांच्या अंत:करणात भावनांचा एकच कल्लोळ उसळला आणि घामाने त्यांची पाठ चिंब भिजून निघाली. रेडिओवरच्या अगदी ताज्या वार्ता अलिप्तपणे ऐकण्याचा ते अद्यापही प्रयत्न करीत होते. त्यांनी आपल्या हातातली काठी जमिनीत जोरात खुपसली व फरच्या हातमोजांमध्ये ओलसर झालेल्या बोटांनी तिला गच्च पकडून धरले.

थांब! थांब! प्रतिहल्ला सुरू केला असे अर्ध्या तासापूर्वी त्यांनी आघाडीच्या सेनापतींना कळवले होते आणि आता तात्काळ निवाऱ्यात जाऊन, जर्मन सेना नदीतीरापासून माघार घेत असल्याची, रणगाडा व यंत्रसज्ज दले यशस्वी होत असल्याची, त्यांना खेड्याच्या संपूर्ण अर्ध्या दक्षिण भागाचा कबजा करण्याचा हुकूम दिल्याची आणि दक्षिणेकडे जाणाऱ्या मार्गांची नाकेबंदी करायला सांगितल्याची वार्ता देण्याची वाढती प्रबळ इच्छा बेस्सोनोवनी कशीबशी आवरून धरली होती.

दरम्यान दक्षिण किनाऱ्यावर सर्वत्र आगी भडकल्या होत्या. ज्या ठिकाणी रस्त्यांवर रणगाड्यांची लढाई जुंपली होती तेथे खेड्यातल्या घरांच्या छपरांवरून आगीच्या ज्वाळा उठत होत्या, स्फोटांची एकच रणधुमाळी माजली होती.

सुमारे दहा मिनिटांनंतर, आघाडीच्या सेनापतींना तपशीलवार अहवाल दिल्यानंतर आणि आपले चीफ ऑफ स्टाफ यात्सेन्को यांच्याशी बातचित केल्यानंतर, त्या उबदार, शांत निवाऱ्यामधून बेस्सोनोव बाहेर पडले आणि पुन्हा धुकट, झोंबऱ्या वाऱ्याच्या खंदकात आले. एकाएकी त्यांना जाणीव झाली की, गेल्या काही मिनिटात काहीतरी फार मोठा बदल घडून आला आहे. वातावरणात काहीतरी नवे जाणवते आहे; पृथ्वीवर आणि आकाशात काहीतरी बदल घडला आहे.

जोरात वाहणारा वारा आता मंद झुळुकांनी वहात होता; टेकडीपल्याड दिवसाचा जांभळट-निळसर स्वच्छ प्रकाश पसरत होता, त्यात खिंडीच्या कडेला पेटत असलेल्या रणगाड्यांच्या शेकोट्या उठून दिसत होत्या. उजाडत्या सकाळी त्या ज्वाला प्रसन्न वाटत होत्या. खेड्याच्या दक्षिण भागात पेटलेल्या आगींमुळे तो भाग जवळ सरकल्यासारखा भासत होता आणि त्याच्या सीमेवर सोविएत रणगाडे व त्यांच्या पाठोपाठ पायदळाने भरलेल्या पांढऱ्या रंगात रंगविलेल्या 'झिस' लॉऱ्या बर्फ उधळीत गडबडीने जा-ये करताना दिसत होत्या. आणि या सर्वांपलिकडे, पूर्व क्षितिजावर एक तेजस्वी आणि शांत असा प्रकाशगोलक उमटत होता, आपल्या पांढऱ्या ज्वालेने सारा बर्फ उजळून काढीत होता व बेस्सोनोव आणि टेहळणी चौकीवरचे त्यांचे इतर सहकारी ज्या मानवी भावना केव्हापासूनचे पार विसरून गेले होते, त्या अत्यंत वेगळ्या

प्रकारच्या मानवी भावनांची तो प्रकाश काही चिरंतन नियमांद्वारे जगाला आठवण करून देत होता.

ती सकाळ उजाडली होती.

टेकडीच्या माथ्यावर घोंघावणाऱ्या त्या वाऱ्यात ते उघड्यावर आले डिसेंबरातली कडाक्याची थंडी असलेली ती स्वच्छ प्रकाशित सकाळ एजाडली होती. उघड्या स्तेपमध्ये आपल्या रणगाड्यांना आकाशातून संरक्षण नाही याची बेस्सोनोवना जाणीव झाली. जर्मन आणि सोविएत हवाई दले या घटकेला काय करताहेत असा विचार त्यांच्या मनात डोकावला. त्या दिवशी पहाटेलाच टेहळणी चौकीवर आलेल्या, निमुळत्या चेहऱ्याच्या, मनमिळाऊ स्वभावाच्या, झोकदार बूट घातलेल्या आणि नकाशाची भली मोठी पेटी जवळ बाळगणाऱ्या, आपल्या हसऱ्या ओठांमध्ये सिगरेटचा होल्डर धरणाऱ्या कर्नलच्या—हवाई दलाच्या प्रतिनिधीच्या—मनात कदाचित त्यावेळी हेच विचार चालले असावेत. चढाई करणारी विमाने कोठे आहेत असे केवळ डोळयांनीच बेस्सोनोवनी विचारले, तेव्हा त्यांनी ताबडतोब सांगितले की, सारे काही ठीक आहे, सुदैवाने जमिनीवर धुके नाही आणि पंधरा मिनिटात टेहळणी चौकीवर चढाई करणारी विमाने उडताना दिसतील. आपले उत्तर दिल्यानंतर पुन्हा ते आपला होल्डर चघळू लागले आणि धीर देणारे हास्य त्यांनी केले.

"जेवढं लौकर तेवढं बरं," बेस्सोनोव उद्‌गारले. जर्मन हवाई दलालाही अडथळा करायला जमिनीवर धुके नाही, याची हवाई दलाच्या प्रतिनिधीला आठवण करून द्यायची त्यांना तीव्र इच्छा झाली होती, पण त्यांनी ती दाबली.

"कॉम्रेड कमांडर, आपले लोक काय करताहेत बघा. पुन्हा ते सगळे थाऱ्यावर आलेत! अरेच्चा, तो रणांगणावरचा मुदपाकखाना तर नाही?" बोझिच्को अद्यापही आपला आनंद पूर्णतया व्यक्त न करता संयमाने बोलत होते. आपल्या हातमोजांनी त्यांनी टेकडीच्या डाव्या बाजूच्या अर्धवट नासधूस झालेल्या पुलाकडे निर्देश केला. लढाईला तोंड फुटल्यापासून बोझिच्कोनी बेस्सोनोव यांची क्षणभरही पाठ सोडली नव्हती.

"काय?" हवाई छत्राचा विचार करण्यात गढलेल्या बेस्सोनोवनी विमनस्कपणे बर्फाचा थर कडेला जमलेली निसरडी दुर्बीण वर उचलली व फोकस जुळवला.

खरोखरीच मुदपाकखान्याने तो पूल ओलांडला होता आणि सकाळच्या त्या धूसर प्रकाशात धूर ओकीत, बर्फावर तांबड्या लाल ठिणग्यांचा पाऊस पाडीत, बॉंबस्फोटांनी पडलेल्या खड्ड्यांवरून ठेचकाळत दक्षिण किनाऱ्यावर जात होता. आदल्या दिवशी जर्मनांनी तोडलेल्या नदीपासून ते खिंडीपर्यंतच्या भागात काही तोफा, रणगाडाविरोधी रायफली व तीन मशिनगनना पुन्हा एकदम जाग आली होती. टेकाडावर लाल फुले फुलावीत तसे मॉर्टरचे स्फोट उठत होते व त्यांमधून मुदपाकखान्याची गाडी वेगाने वाट काढत चालली होती. कुणी एक धाडसी सार्जंट-मेजर आघाडीवर हिंमतीने जात होता. डाव्या फळीच्या खंदकांमधून पाच सहा माणसे उठली व त्यांनी मोठ्या आशेने रायफली उंचावून हात हलवले, पण मुदपाकखाना त्यांच्या समोरून ठेचकाळत पुढे पुलाच्या उजव्या बाजूस असलेल्या तोफांच्या मोर्चांकडे गेला. तिथे तो एकदम थांबला आणि जी तोफ आत्ता काही क्षणांपूर्वी भडिमार करीत होती, तिच्याकडे मुदपाकखान्याच्या गाडीचा ड्रायव्हर आपल्या पायघोळ कोटाचे वाऱ्यावर फलकारे उडवीत धावला.

"अच्छा, तो तोफखाना! आपण त्याला भेट दिली होती, आठवतंय?" बांधाच्या टोकावर हाताचे कोपर टेकीत बोझिच्को उद्गारले. "कॉम्रेड कमांडर, तुम्हाला ती पोरं आठवतात? त्यांचा तोफखाना कमांडर अगदी पोरसवदा आहे... लेफ्टनंट द्रोझ्दोव का असंच काहीतरी नांव आहे त्याचं!"

"मला नाही आठवत," बेस्सोनोव पुटपुटले. "द्रोझ्दोव? ... बोझिच्को, पुन्हा नीट आठवा."

"टेहळे परतायची वाट पहात तुम्ही ज्याच्याजवळ उभे होतात बघा! त्यांनीच त्या जर्मनाला इथं आणला. त्यांच्यातले दोघेजण त्याला इथं घेऊन आले. ७६ मिलीमीटर तोफखाना."

"तो तोफखाना? आत्ता आठवलं. पण तो द्रोझ्दोव नव्हता... असंच काहीतरी नांव होतं खरं. मला वाटतं द्रोझ्दोवस्की. होय तेच! द्रोझ्दोवस्की..."

बेस्सोनोव यांनी दुर्बीण खाली केली. क्षणाचाही विचार न करता मृत्यूच्या खाईत उडी टाकायला तयार असलेल्या आणि लष्करी वर्तुळांमध्ये प्रसिद्ध असलेल्या जनरलचे नांव धारण करणाऱ्या त्या

पोरसवदा, निळ्या तेजस्वी डोळ्यांच्या, प्रशिक्षण विद्यालयातून नुकत्या बाहेर पडलेल्या अत्यंत रुबाबदार, हुषार तरुण लेफ्टनंटच्या नेतृत्वाखालील त्या ७६ मिलीमीटर तोफखान्याने सबंध रणधुमाळीत कशी तग धरली असेल, असा ओझरता विचार त्यांच्या मनात चाटून गेला आणि जर्मन रणगाड्यांच्या झुंडींचा जेथे सरळ रोख होता त्या ठिकाणी उभ्या ठाकलेल्या तोफांवरच्या लोकांनी काय सहन केले असेल त्याचे चित्र क्षणभर त्यांच्या नजरेसमोर उभे राहिले. तोंडावर चिकटलेले हिमकण त्यांनी अत्यंत काळजीपूर्वक पुसून काढले, भावनावेगाने त्यांच्या गालांवरचे स्नायू थरारले व अखेरीस मोठ्या प्रयासांनी ते म्हणाले, "बोझिच्को, त्या ठिकाणी प्रत्यक्ष जाऊन मला पाहणी करायचीय. आत्ता! काय शिल्लक उरलंय ते मला पहायचंय... बरोबर तुमच्याजवळ असतील तेवढी मानाची पदकं घ्या. तुमच्याजवळ असतील तेवढी सारी," त्यांनी पुन्हा म्हटले. "आणि देयेवना माझ्या मागोमाग यायला सांगा."

चकित नजरेने बोझिच्को यांनी बेस्सोनोव यांच्या हातरुमालाचा चोळामोळा करणाऱ्या छोट्या हाताला पाहिले. तो हातरुमाल खिशात कोंबणे बेस्सोनोवना अवघड झाले होते एवढा त्यांचा हात कापत होता. बोझिच्को यांनी संमतीदर्शक मान हलवली व ते कर्नल देयेवना बोलावण्यासाठी धावले.

आपली वैयक्तिक मते व्यक्त करण्यास, लढाईचे सर्व बारीकसारीक तपशील नजरेखालून घालण्यास, आघाडीच्या क्षेत्रात त्यांच्या आज्ञांचे पालन करणाऱ्या लोकांचे रक्त, हालअपेष्टा, मृत्यू व संहार पाहण्यास आपल्याला हक्क नाही, असे त्यांचे मत होते. रणक्षेत्रावरची परिस्थिती लढाईनंतर ताबडतोब स्वतःच्या डोळ्यांनी पाहिल्यास मन दुबळे होण्यात त्याचा परिणाम घडतो, मन स्वतःला खाऊ लागते, दया हातपाय पसरू लागते, आणि कारवाईची अंमलबजावणी बरोबर होते किंवा नाही हे पाहणे त्यांचे काम असताना व परिणामाची संपूर्ण जबाबदारी त्यांच्यावर असताना डोक्यात संभ्रम निर्माण होऊ लागतात, याबद्दल त्यांची खात्री होऊन चुकली होती. एका खंदकातल्या काही माणसांच्या, एका तोफखान्यातल्या काही माणसांच्या हालअपेष्टा, धैर्य आणि त्यांचा संहार हे प्रत्यक्ष पाहणे इतके असह्य होण्याची शक्यता होती की,

त्यांच्या आज्ञांचे पालन करणाऱ्या लोकांना, त्यांच्या अपेक्षा पुऱ्या करणाऱ्या लोकांना नवे ताजे हुकूम ठामपणे देणे सर्वथा अशक्य ठरले असते.

ही जाणीव त्यांना आत्ताच पटली होती असे नाही, तर १९४१ च्या त्या महाभयंकर अटीतटीच्या दिवसात पश्चिम आघाडीवर प्रचंड रक्तपात होत असताना, किंचाळ्यांनी वातावरण भरलेले असताना, शुश्रूषा पथकाची माणसे विनवण्या करीत असताना, जखमींचे विव्हळणे ऐकवत नसताना, खंदकातल्या आपल्या माणसांना फळी फोडून जायचे आदेश त्यांना द्यावे लागले होते तेव्हाच पटली होती. त्या माणसांबद्दल मनातून सहानुभूती वाटत असूनही त्यांना कठोरपणे हुकूम द्यावे लागले होते. समोरून येणाऱ्या जर्मन रणगाड्यांच्या झुंडी सरहद्दीवर थोपवण्यात आणि डोक्यावर मोकाट भिरभिरणाऱ्या लुफ्तवेफ विमानांचे तांडे अडविण्यात अपयशी ठरलेल्या आपल्या माणसांबद्दल सहानुभूती वाटत असूनही प्रसंगी त्यांना कठोर व्हावे लागले होते.

पण आत्ता त्यांनी चढविलेल्या प्रतिहल्ल्याच्या या थंडगार प्रात:समयी, स्तालिनग्रादच्या नैर्ऋत्येस पस्तीस किलोमीटरवर, सबंध सैन्याचा विजय नजरेच्या टप्प्यात दिसत असताना, बेस्सोनोव यांनी आपला नियम मोडला.

नदीवरचा बर्फ पार करून आणि भणाणणाऱ्या वाऱ्यात नदीतीराचा चढ चढून, त्यानंतर एका उथळ चरामधून जेव्हा ते अधिक खोल अशा अर्ध्या गाडलेल्या खंदकात पोचले, तेव्हा ही पायदळाची पुढची पहिली ओळ होती हे बेस्सोनोव यांनी ओळखले. त्यांना आपला वेग कमी करावा लागला, कारण छातीतल्या धडधडीमुळे धड श्वास घेणे त्यांना अशक्य ठरले होते.

या दक्षिण किनाऱ्यावर शत्रूच्या रणगाड्यांनी कित्येक तासपर्यंत अविरत हल्ले चढवले होते आणि रणगाड्यांनी आपल्या चाकांखाली खंदकांना अक्षरश: दळून काढले होते. आधीच बाँबहल्ल्यांनी भुगा केलेल्या खंदकांवर रणगाड्यांनी आपला वरवंटा इतक्यांदा फिरवला होता की, छिन्नविच्छिन्न झालेल्या मशिनगन, दुलईदार जाकिटांची लक्तरे, नौदलातल्या गंजिफ्रॉक्सच्या चिंध्या, विंधलेले रायफलचे दस्ते, गॅसच्या मुखवट्यांचे व जेवणाच्या भांड्यांचे तुकडे, काळ्या पडलेल्या काडतूसांचे

ढीग, बर्फाने माखलेली शरीरे, हे सर्व बेस्सोनोवना एकदम दृष्टीस पडलेच नाही आणि या सर्व गोष्टी त्यांना वेगवेगळ्या ओळखता येईनात. या सर्व गोष्टी, शस्त्रांचे आणि मानवी देहांचे अवशेष एखाद्या प्रचंड नांगराच्या फाळाने जमीन नांगरून जणू जमिनीत गाडून टाकले आहेत असे वाटत होते आणि बाँबच्या वर्षावाने व रणगाड्यांच्या पोलादी चाकांच्या प्रचंड वजनाखाली जमिनीत अर्धे गाडले गेले होते.

बर्फाने झाकलेल्या त्या लहानमोठ्या उंचवट्यांमधून बेस्सोनोव काळजीपूर्वक पावले टाकीत होते, त्या उंचवट्यांना ते आपली काठी टेकवीत नव्हते, कारण आदल्या दिवशीच्या सकाळी ठार झालेल्या माणसांचे ते देह किंवा अवयव विखुरले आहेत, हे त्यांना समजले होते. कुणी जिवंत असेल ही आशा हळूहळू त्यांच्या मनातून मावळत चालली आणि टेहळणी चौकीवरून पाहिले तेव्हा या खंदकांमध्ये कुणी जिवंत असल्याची अस्पष्ट चिन्हे दिसली होती तो केवळ भासच असावा, या कडवट विचाराने त्यांचे* मन निराश होऊ लागले होते.

छे:, इथे कुणीही असणे शक्य नाही, एकही जिवंत माणूस नाही, त्यांनी स्वत:ला बजावले. त्या मशिनगन आणि रणगाडाभेदी रायफली डाव्या फळीच्या खंदकांमधून फैरी झाडीत असाव्यात. तिथे जाऊन पाहिले पाहिजे.

पण त्याच क्षणाला बाजूच्या खंदकातून भांडी एकमेकांवर आपटल्याचा आवाज आला आणि त्या पाठोपाठ काही माणसांचे आवाज आले. त्यांच्या छातीतली धडधड कमालीची वाढली. बेस्सोनोव कोपऱ्याशी वळून थांबले.

मशिनगनच्या मोर्च्यांमधून दोन माणसे त्यांना भेटण्यासाठी एखाद्या पांढऱ्या भुतांप्रमाणे उठून उभी राहिली. ती नखशिखांत बर्फाने माखली होती. गारठ्याने तडकलेले त्यांचे चेहरे त्यांनी गुंडाळलेल्या मफलरवर जमलेल्या बर्फाच्या थरामधून दिसत होते, बर्फाच्या व वाऱ्याच्या सतत माऱ्याने त्यांचे डोळे लालभडक झाले होते व डोळ्यांभोवती बर्फ जमला होता. त्या मृत्युछायेतल्या खंदकात एक जिताजागता जनरल काही जित्या-जागत्या अधिकाऱ्यांसमवेत साक्षात समोर येऊन उभा राहिलेला पाहताच ते आश्चर्याने थक्क होऊन गेले होते.

कमरेच्या नौदलातल्या पट्ट्यांची चपटी बकले बर्फात फिकट चकाकत होती. खंदकाच्या टोकावर पसरलेल्या एका फाटक्या केपवर आजूबाजूच्या सर्व ठिकाणांहून गोळा करून आणलेल्या लाईट मशिनगनच्या काडतूसांच्या थाळ्या रचून ठेवलेल्या होत्या. मशिनगनच्या शेजारी रणगाडाविरोधी रायफल स्टँडवर चढवलेली होती. सबंध बांधावर आणि खंदकाच्या तळाशी काडतूसांची ताजी टोपणे विखुरली होती. शेवटच्या प्रयत्नात एकमेकांचा आधार घेत मशिनगनवाला आणि रणगाडाभेदी रायफलवाला या एकाच ठिकाणी उभे राहून फैरी झाडीत असावेत. त्यांची नौदलातली बकले पाहता, ते दोघेही अतिपूर्वेतले खलाशी असावेत आणि दोन महिन्यांपूर्वी जेव्हा ही सेना उभी केली तेव्हा पायदळात भरती झाले असावेत. आपल्या पूर्वीच्या आयुष्याची आठवण म्हणून त्यांनी आपल्या खलाशाच्या गरम बंड्या आणि नौदलातले पट्टे ठेवले असावेत.

बेस्सोनोव यांच्यासमोर दोघेही गोंधळून उभे होते. त्या जाड, घट्ट पायघोळ कोटांमध्ये ते ओळखूच येत नव्हते. थोड्या वेळाने त्यांचे गोठलेले हातमोजे बिचकत टोपीपर्यंत वर उचलले गेले. दोघांनीही तोंडून एक शब्दही न उच्चारता मूकपणेच त्यांचे स्वागत केले, कारण जनरल आपल्या अधिकाऱ्यांसमवेत साक्षात् आपल्यासमोर उभे आहेत, या वस्तुस्थितीवर अजूनही त्यांचा विश्वास बसत नव्हता.

वरिष्ठ अधिकाऱ्याच्या उपस्थितीत संयम पाळण्याचा एक अलिखित नियम देयेव यांनी प्रथम मोडला आणि त्या खंदकात उतरून त्या दोघांना एका पाठोपाठ त्यांनी घट्ट मिठी मारली. आवाजात खंबीरपणा ठेवण्याचा त्यांनी खूप प्रयत्न केला, पण त्यांचा कंठ दाटून आलाच.

"पोरांनो, तुम्ही नेट धरलात तर? तुम्ही सहीसलामत पार पडलात? कॉम्रेड कमांडर, दोन नंबरची कंपनी ..." ते वाक्य पुरे करू शकले नाहीत. त्यांच्या चेहऱ्यावर आनंद आणि आश्चर्य यांचे मिश्रण उमटले होते आणि त्याच मुद्रेने ते बेस्सोनोव यांच्याकडे पहात राहिले.

बेस्सोनोव यांना त्या क्षणी काय वाटले होते त्या भावना व्यक्त करणारे सारे शब्द त्यांच्या मनातून निसटून गेले. त्या शब्दांचे वाक्य बनलेच नाही. त्यांच्या डोळ्यांसमोर आत्ता जे अजरामर दृश्य होते त्यापुढे ते शब्द फिके, अर्थहीन वाटत होते. जेमतेम दोन तुटक प्रश्न ते विचारू शकले.

"आणखी कुणी उरलंय? कुणी कमांडर अजून जिवंत आहे?"

"कुणीही नाही, कॉम्रेड जनरल."

"जखमी कुठं आहेत?"

"दुसऱ्या किनाऱ्यावर आम्ही सुमारे वीस जणांना पाठवलं, कॉम्रेड जनरल. आमच्या कंपनीतले फक्त आम्ही उरलो."

"थँक्यू! ... मी वैयक्तिकरीत्या तुमचे आभार मानतो! ... तुमची नांवं काय? मला ऐकायचीत!"

बेस्सोनोवनी त्यांची नांवे जेमतेम ऐकली न ऐकली आणि ते बोझिच्को यांच्याकडे वळले. बोझिच्को त्यावेळी त्या दोघा सुदैवी सैनिकांकडे हेव्याने पहात असले तरी त्यात समाधानाची भावना होती. कालच्या भयंकर रणकंदनात पुढच्या ओळीतल्या खंदकात जिवंत राहणे म्हणजे काय दिव्य होते याची त्यांना पूर्ण जाणीव होती. बेस्सोनोव यांच्या घोगऱ्या आवाजाने बोझिच्को भानावर आले: "लाल पताकेच्या दोन ऑर्डर द्या मला.*तुम्ही आणि कर्नल देयेव यांनी मला आज बक्षिसांची यादी दिली पाहिजे." बोझिच्कोंनी आपल्या बॅगेतून आनंदाने तात्काळ दोन छोटया पेटया बेस्सोनोव यांच्या हाती दिल्या. बेस्सोनोवनी आपली काठी खंदकातल्या भिंतीला टेकवून ठेवली, घाबरलेल्या अवस्थेत उभ्या असलेल्या त्या दोघा आकृतींजवळ ते गेले आणि त्यांच्या ताठरलेल्या हातमोजांवर मानाची पदके ठेवून, आपल्या दाटलेल्या उरातल्या भावना बाहेर फुटलेल्या कुणाला दिसू नयेत म्हणून मागे वळून न पाहता खंदकातून सरळ पुढे चालत निघाले. उत्तरेकडून वारा जोरात वहात होता, त्याच्याबरोबर जळणाऱ्या खेडयाच्या पलिकडे चाललेल्या लढाईचे आवाज ऐकू येत होते. वारा डोळयांना झोंबत असल्याने त्यांच्या डोळयांच्या कडा पाणावत होत्या. आपला चेहरा पाठीमागच्या कुणालाही दिसू नये म्हणून त्यांनी आपल्या चालण्याचा वेग वाढवला. आपल्या भावना कशा आवराव्या, कसे रडावे हे त्यांना समजत नव्हते आणि आता वारा त्यांना मदत करीत होता. शेवटच्या काडतूसापर्यंत काय वाटेल त्या परिस्थितीत लढले पाहिजे हा त्यांनी स्वतः दिलेला हुकूम रणांगणावरच्या त्यांच्या लोकांनी तंतोतंत पाळला होता व फत्ते केली होती. आपल्या लोकांबद्दल वाटणारी कृतज्ञता त्यांच्या डोळयांमधून अश्रूंवाटे ओसंडत होती. त्यांचे सैनिक आशा न सोडता इथे लढले होते

व धारातीर्थी पडले होते आणि त्यातले खूपजण प्रत्याघाताच्या पहिल्या काही तासातच रणांगणी पडले होते.

मला शक्य आहे ते ते सर्व काही केले पाहिजे, असे ते स्वत:ला पुन:पुन्हा बजावीत होते. पण आभार मानण्यापलिकडे मी त्यांच्यासाठी काय करू शकतो?

"मुदपाकखाना! ... गोलंदाज बघा कॉम्रेड कमांडर. हीच तोफखाना होती तो!" त्यांच्या पुढे धावत जात बोझिच्को ओरडले. पण बेस्सोनोव यांचा ओलावलेला, ओळखू न येणारा चेहरा पाहताच ते आश्चर्याने चमकले आणि त्यांनी नजर दुसरीकडे वळवण्याचा प्रयत्न केला. ते ताबडतोब पुन्हा बेस्सोनोव यांच्या मागे राहिले व आपल्या एकाकी चिमणीमधून धुराची अस्पष्ट रेषा उमटवीत उभ्या असलेल्या सुळक्यावरच्या मुदपाकखान्याकडे वळले.

सोविएत रणगाड्यांपाठोपाठ दक्षिण किनाऱ्यावर दिसलेला हा मुदपाकखाना या तोफखान्याचा होता व सार्जंट-मेजर स्कोरिक तो घेऊन आला होता.

काबीज केलेल्या पुलाच्या शेवटच्या तटबंदीवर लढाई जेव्हा शिगेला पोचली आणि जर्मन रणगाडे तोफखान्याचा उजव्या-डाव्या अंगांनी नदी पार करू लागले तेव्हा तोफखाना रेजिमेंटच्या मुख्य ठाण्याशी रेडिओने संपर्क जोडण्याचे आपले अयशस्वी प्रयत्न द्रोझ्दोवस्कीने सोडून दिले होते. काय घडले होते ते स्पष्ट समजून चुकले होते. त्यानंतर अर्ध्या तासात, दक्षिण किनाऱ्यावर पोचलेल्या जर्मन रणगाड्यांवर कुझ्नेत्सोवने आपले उरलेले शेवटचे सात तोफगोळे हुकमाची वाट न पाहता उडवले होते आणि ते संपल्यानंतर त्याने आपल्या माणसांना सबमशिनगन हाती देऊन, माघार घेणाऱ्या जर्मन पायदळावर हल्ला चढविण्यासाठी खंदकात उभे केले होते. पण जर्मन पायदळ जाड ताडपत्री झाकलेल्या मोटारींमधून डाव्या बाजूला खूप लांबवरून जात होते आणि तिथे शेजारच्या तोफखान्यांमध्ये उरलेल्या काही तोफांच्या माऱ्यात ते सापडले होते. तसेच पुढच्या चौक्यांवरच्या पहिल्या ओळीतल्या खंदकातून अचानक दोन हेवी मशिनगन जर्मनांवर आग ओकू लागल्या होत्या.

पलटणीतले शिल्लक उरलेले उखानोवच्या तोफेवरचे चारही गोलंदाज त्यावेळी गोंधळून आपली शस्त्रे सज्ज ठेवून खंदकात उभे होते आणि

हातांवर व बंदुकींचे वंगण गोठू नये म्हणून त्यांच्या बोल्टवर फुंकरा मारीत होते. दुसऱ्या किनाऱ्यावर काय घडले व जर्मन गडबडीने माघार का घेताहेत हे त्यांना नीटसे उमगले नव्हते. कुझ्नेत्सोव थंडी भरल्याने अखंड थरथर कापत होता. उखानोव आपले हातमोजे सारखे छातीवर आदळत होता. नेचायेव आणि रूबिन बांधावरचा बर्फ सारखा झाडून टाकीत होते. सर्व गोष्टी मुकाटपणे केल्या जात होत्या, कारण बोलायचे त्राण त्यांच्यात उरले नव्हते. एक तासाहून अधिक काळ लोटला. आणि एखादे अद्‌भुत भूत दिसावे तशी मुदपाकखान्याची गाडी खड्ड्यांवरून ठेचकाळत, धडधडत त्यांच्या तोफेपासून दहा पावलांवर येऊन जेव्हा उभी राहिली आणि धापा टाकणाऱ्या, दमलेल्या घोड्याला शिव्या घालीत ड्रायव्हरच्या सीटवरून जेव्हा सार्जंट-मेजर स्कोरिकने खाली उडी मारली व आपल्या पायघोळ कोटाचे फलकारे मारीत जेव्हा तो त्यांच्याकडे धावला, तेव्हा त्यांच्या आश्चर्याला पारावार उरला नाही. काय घडते आहे तेच त्यांना क्षणभर उमजेना. सार्जंट-मेजर बेंबीच्या देठापासून ओरडला: "अरे पोरांनो, मी तुमचा शिधा घेऊन आलोय!" तरीसुद्धा त्यांच्यापैकी कुणीही आपल्या जागेवरून हलले नाही. त्याचे आगमन आणि त्याची आरोळी त्यांना अजून खरीच वाटत नव्हती. जणू त्यांची मने दुसऱ्या जगात पोचली होती आणि या जगाचे अस्तित्व त्यांना अगदी फिकटसे जाणवत होते. कुणीही सार्जंट-मेजरला उत्तर दिले नाही.

"तुम्ही फक्त चौघेच आहात? फक्त चार? दुसरे कुठं आहेत?"

तोफांच्या ओसाड मोर्चांवरून आणि जळून, मोडून पडलेल्या जर्मन रणगाड्यांवरून सार्जंट-मेजरचे डोळे फिरले. आपल्या नमदी बुटांनी त्याने तोफेच्या मोर्चावरची जमीन ठोकली व चमत्कारिक आवाज करीत तो मुदपाकखान्याच्या गाडीकडे धावला. तिथे त्याने एक भलामोठा थर्मास व पावांनी भरलेल्या दोन पिशव्या पाठीवर मारल्या आणि धडपडत तो परत तोफेनजीक आला व तोफगोळ्यांच्या रिकाम्या टोपणांमध्ये ढीग ठेवीत गोंधळल्या अवस्थेत पुटपुटला:

"हा सबंध तोफखान्याचा शिधा—पाव आणि वोदका. आणि तुम्ही तर फक्त चौघं उरलाय? ... कॉम्रेड लेफ्टनंट, मी या सगळ्या

शिध्याचं काय करू? द्रोझ्दोवस्की कुठं आहेत? तोफखाना कमांडर कुठं आहेत?"

"टेहळणी मोर्चावर आणखी तिघं आहेत. निवाऱ्यात काही जखमी आहेत. सार्जंट-मेजर, तिथं त्यांना भेटायला जा," कुझ्नेत्सोवने कसेबसे उत्तर दिले. जीभ हलविण्याचीही त्याच्यात ताकद राहिली नव्हती. थंडीने कापत तो तोफेच्या चाकांवर बसला. अन्नाची किंवा सार्जंट-मेजरच्या आताच्या उद्‌गारांची त्याला पर्वा वाटत नव्हती.

"लेफ्टनंट! आपण थोडी शेकोटी पेटवली पाहिजे," उखानोव म्हणाला. "नाहीतर आगीविना आपण मरू. झाडाच्या पानासारखे तुम्ही थरथर कापताय. आपल्याजवळ तोफगोळ्यांचे रिकामे खोके आहेत. आणि आता आपल्यापाशी ढोसायला चिक्कार वोदका आहे. यावेळी आपल्या लोकांनी योग्य वेळी दणका मारलाय असं दिसतंय!"

"वोदका?" कुझ्नेत्सोव तुच्छतेने उत्तरला. "होय, आपल्या सर्वांसाठी वोदका आहे."

सार्जंट-मेजर एव्हाना घाईघाईने निवाऱ्यातल्या जखमींकडे धावला होता. नेचायेव आणि रूबिनने काही खोकी फोडून शेकोटी पेटवली होती, तर उखानोवने रिकाम्या खोक्यांचा ढीग बाजूला सारून तोफेच्या मागच्या भागात ताडपत्री पसरली होती आणि थर्मासमधल्या वोदकाचे व शिध्याच्या प्रचंड साठ्याचे वाटप करण्यात तो गुंतला होता. खंदकात सापडलेल्या एकमेव भांड्यात त्याने वोदका ओतली व पावाचा पुडा त्याने फोडला. मग कुझ्नेत्सोवशेजारी तोफेच्या चाकांवर तो बसला आणि वोदकाचे भांडे त्याने कुझ्नेत्सोवपुढे धरले.

"लेफ्टनंट, स्वतःला जरा गरम करा, नाहीतर थोड्याच वेळात आपले इथं पुतळे बनतील. प्या थोडं – तुम्हाला खूप बरं वाटेल."

कुझ्नेत्सोवने भांडे दोन्ही हातांनी धरले आणि वोदकाचा शिसारी आणणारा वास दुर्लक्षून चार घुटके घटाघटा घशाखाली ओतले. आपले थरथरणे वोदकामुळे थांबेल आणि आतडी कुठेतरी पिळवटून निघाल्यासारखी होत होती, तो ताण थोडा सैल पडेल असे त्याला वाटत होते. तो थंडगार द्रव झटकन त्याच्या शरीरात भिनला आणि अंगात एकदम ऊब आली. पावाचा लोखंडासारखा तुकडा तो चघळू लागला

तेव्हा त्याला आठवले की, फार फार पूर्वी केव्हातरी, त्या अनंत, चकाकत्या स्तेपमधून सैन्याची वाटचाल चालली असताना, उखानोवने झोयाला वोदका दिली होती व तिने वोदकाचे चार चोरटे घुटके घेऊन आपल्या पोटात गरम गरम वाटत असल्याचे सांगितले होते ... वस्तुत: तिला पोटात मळमळले होते हे त्याला ठाऊक होते... केव्हा बरे हे सारे घडले होते? सुमारे शंभर वर्षांपूर्वी, इतक्या पूर्वी की, माणसाच्या आठवणीत राहणे अवघड! पण जणू काही तासापूर्वी ती घटना घडली असावी तसे त्याला आठवत होते. तिचे डोळे तेजस्वीपणे चकाकत त्याच्याकडे पहात होते, तिचे मंद हसणे अजून त्याच्या कानात घुमत होते. सारे एवढे स्पष्टपणे जाणवत होते की, ती तिथेच आसपास असावी आणि जणू काहीही घडले नव्हते. बाकी घटना म्हणजे त्याला पडलेले स्वप्न होते का? पुरे आयुष्य, पुरी शंभर वर्षे? खरेच, जे कधीच घडले नव्हते त्याचे त्याला केवळ स्वप्न पडले होते ... काही काही घडले नव्हते. ती वैद्यकीय पथकाकडे औषधे आणायला गेली होती आणि थोड्याच वेळात तोफखान्यात परत येणार होती... आगगाडीतून उतरताना ती आपल्या नीटस पांढऱ्या, घट्ट पट्टा बांधलेल्या मेंढकातडी कोटात दिसली होती तशीच आत्ताही दिसणार होती आणि म्हणणार होती, "काय रे मित्रांनो, माझ्या गैरहजेरीत कसं काय चाललं होतं तुमचं?"

पण त्याची जाणीव कुठेतरी त्याला बजावून टोचत होती की, तो स्वत:ची फसवणूक करून घेतोय, ती कुठल्याही वैद्यकीय पथकाकडून परत यायची नव्हती, ती तिथेच त्याच्या मागे होती, पहाटेच्या जरा आधी त्याने स्वत:, उखानोवने, नेचायेवने आणि रूबिनने मिळून तिला तोफेच्या मागेच पुरले होते. केपमध्ये गुंडाळलेला तिचा अचेतन देह मातीच्या आवरणाखाली चिरंतन काळासाठी पहुडला होता आणि त्या मातीच्या किंचित उंचवट्यावर पडलेली तिची वैद्यकीय पिशवी एव्हाना बर्फात अर्धी गाडली गेली होती.

तिच्यानंतर हे एवढेच बाकी उरले होते आणि शेवटची क्रिया त्यांनी पार पाडल्यानंतर, तिच्या थडग्यावर रूबिनने तिची पिशवी ठेवीत गंभीर आवाजात म्हटले होते: "नंतर आपण इथं अक्षरं कोरली पाहिजेत", येलागिना झोया, वैद्यकीय मदतनीस."

रात्रीच्या त्या घटनांनंतर ते तिघे कुझ्नेत्सोवच्या खूपच निकट आले होते. कडकड आवाज करीत पेटणाऱ्या शेकोटीभोवती, कुझ्नेत्सोवभोवती तोफेच्या चाकांवर ते तिघेही बसले होते. त्याच्या पलटणीतले तेच तेवढे जिवंत राहिले होते. आगीमधून तिखट धुराचा गरम लोट उठला. वोदकाने उत्तेजित झाल्यानंतर आणि आगीने थोडी ऊब आल्यानंतर ते जर्मनांच्या अचानक माघारीविषयी बोलू लागले. समोरच्या पेटत्या खेड्याकडे ते पहात होते आणि तोफखान्याच्या दक्षिणेस दूर दूर स्तेपमध्ये जाणाऱ्या लढाईचे हळूहळू क्षीण होणारे आवाज ऐकत होते.

शिधावाटपाचा संपूर्ण ताबा स्वतःकडे घेऊन उखानोव पावांवर भरपूर लोणी फासत होता, त्यावर साखर पेरीत होता, थर्मासमधली वोदका भांड्यात ओतत होता आणि मर्यादा न राखता सर्वांना सढळ हाताने वाटत होता. वोदकाने तो झिंगला नाही. त्याचा चेहरा फिका पडला होता. त्याने पाहिले की, रूबिन व नेचायेवं यांची परिस्थिती थोडी सुधारू लागली होती. वोदकाचा कुझ्नेत्सोवला मुळीच उपयोग झाला नाही. त्याची पिळवटलेली आतडी अद्याप सैल झाली नव्हती आणि थरथर कापणे थांबले नव्हते. पण वोदकाचा तो वास शिसारी आणीत असूनही, उखानोवच्या सल्ल्यानुसार तो पीत होता.

"लेफ्टनंट, आपल्याला बडी मंडळी भेटायला येताहेत असं दिसतं!" तोफखान्याकडे येणाऱ्या लोकांकडे उखानोवचे प्रथम लक्ष गेले. "बांधावरून ते येताहेत ... जरा बघा तरी लेफ्टनंट!"

"खरंच, ते इकडंच येताहेत," वोदकामुळे तांबडाबुंद चेहरा झालेला व किंचित झिंगलेला रूबिन म्हणाला. आपल्या भल्या मोठ्या खडबडीत पंजाने त्याने वोदकाचे भांडे तोफेच्या चाकांमध्ये दडवले. "मला वाटतं ते जनरल आहेत नाही? हातात काठी घेतलेले?"

"होय, पाहिलं मी त्यांना," कुझ्नेत्सोव अगदी शांतपणे म्हणाला. एवढे शांतपणे वागणे त्याच्या नेहमीच्या स्वभावाला धरून नव्हते. "रूबिन, वोदका लपवून ठेवण्याची काही गरज नाही."

आदल्या दिवशी एका बलवान तोफखान्याचा अंगभूत भाग असलेल्या गोष्टींवर बेस्सोनोव दर पावलागणिक ठेचकाळत होते, तोफांच्या मोर्चांवरून आपला मार्ग काढीत होते, छिन्नभिन्न झालेल्या बांधांना मागे सारून, फुटलेल्या तोफांना मागे टाकून, आ वासणारे स्फोटांचे

खड्डे ओलांडून, आपल्या प्रचंड पोलादी चाकांखाली चुबारिकोवची तोफ चिरडणाऱ्या जर्मन रणगाड्याला ओलांडून येत होते. आता त्यांना आदल्या दिवशी सकाळी बाँबहल्ला सुरू होण्यापूर्वी या तोफखान्याला भेट दिल्याचे स्पष्टपणे आठवत होते. त्याचप्रमाणे उत्तम प्रशिक्षित झालेल्या, एका विख्यात जनरलच्या नांवाशी साधर्म्य असलेल्या त्या रुबाबदार, खंबीर, तरुण, तोफखाना कमांडरबरोबरचे संभाषणही त्यांना आठवत होते.

म्हणजे त्या तरुणाच्या नेतृत्वखालचा हा तोफखाना जर्मन रणगाड्यांवर आग ओकीत होता तर?

कुठेतरी विचारांच्या साहचर्यामुळे त्यांना आपल्या मुलाची आठवण झाली, इस्पितळात त्याच्याबरोबर झालेली शेवटची भेट आठवली, ते इस्पितळातून परत घरी आल्यानंतर त्यांच्या बायकोने व्यक्त केलेला मनस्वी राग आठवला, कारण त्यांच्या मुलाच्या दृष्टीने अधिक चांगले व सुरक्षेचे असूनही त्याला त्यांनी आपल्या सेनेत घेण्याबद्दल आग्रह धरला नव्हता आणि याबद्दल त्यांची पत्नी त्यांना क्षमा करायला तयार नव्हती. आणि आता क्षणभर त्यांच्या डोळ्यांसमोर चित्र उभे राहिले की, त्या पायदळाच्या खंदकांच्या पहिल्या ओळीत जेथे उरलेले दोन सैनिक भेटले त्या कंपनीचा त्यांचा मुलगा कमांडर आहे किंवा पोलादी वादळामुळे संपूर्णतया छिन्नविच्छिन्न बनलेल्या, ओळखू न येणाऱ्या या तोफखान्याच्या मोर्चांचा तो कमांडर आहे. या नुसत्या विचारासरशी त्यांचा श्वास कोंडला व चालण्याचा वेग मंदावला, पण त्यांच्या छातीतला ताण मात्र सुटेना आणि घुसमटणारी भावना मोकळी करण्यासाठी आपल्या मेंढकातडी कोटाच्या कॉलरची बटणे ते मोकळी करू लागले.

क्षणात मी परत माझ्यावर ताबा मिळवीन ... माझ्या मुलाबद्दल पुन्हा जोपर्यंत विचार करणार नाही तोपर्यंत हे असे होणार नाही, असे त्यांनी स्वतःला ठामपणे बजावले. आपल्या काठीवर ते अधिकाधिक भार देऊन वाकत होते.

"अटे ऽ ऽ न्शन! कॉम्रेड जनरल ..."

बेस्सोनोव थांबले. कमालीच्या मळलेल्या आणि काळ्या पडलेल्या पायघोळ कोटांमध्ये तोफखान्याच्या शेवटच्या तोफेशेजारी चार गोलंदाज उभे होते. तोफेच्या खड्ड्यात छोटी शेकोटी पेटलेली होती आणि

जमिनीवर अंथरलेल्या ताडपत्रीवर थर्मास व दोन शिध्याच्या पिशव्या पडल्या होत्या. वोदकाचा वास त्यांना स्पष्ट जाणवत होता.

त्या चौघांच्याही भेगाळलेल्या चेहऱ्यांमध्ये किटण बसले होते; त्यांचे डोळे कमालीचे निस्तेज दिसत होते. त्यांच्या बाह्यांवर आणि टोप्यांवर काजळीची पुटे चढली होती. बेस्सोनोव यांना पाहताच शांतपणे "अटेन्शन" असा पुकारा करणारा शांत, गंभीर चेहऱ्याचा, किंचित बुटकेला लेफ्टनंट तोफेपासून दोन पावले पुढे आला व किंचित ताठ उभे रहात जणू वर्दी देण्यासाठी त्याने आपला हात टोपीशी नेला. बेस्सोनोव यांनी क्षणभर बारकाईने त्याच्याकडे पाहिले व पूर्वी त्याला कोठे पाहिले होते त्याची त्यांना आठवण झाली. तो तरुण तोफखाना कमांडर तेवढा त्याच्या नांवामुळे त्यांना आठवत होता असे नव्हे, तर दुसराही एक तरुण लेफ्टनंट, त्यांना भेटलेला पलटणीचा कमांडर त्यांना आठवत होता. रेल्वे जंक्शनापाशी मेस्सेरश्मिट विमानांनी हल्ला चढवला, त्यानंतर हा तरुण माणूस आपल्या एका गोलंदाजाला शोधीत होता व गोंधळल्यामुळे कुठे शोधावे हे त्याला त्यावेळी समजत नव्हते.

या उदास, राखाडी रंगाचे डोळे असलेल्या, ओठ भेगाळलेल्या आणि गाल खप्पड बसलेल्या तरुण लेफ्टनंटला त्यांनी ओळखताच आपल्या हाताच्या इशाऱ्याने त्याचे बोलणे त्यांनी थांबवले. त्या लेफ्टनंटच्या पायघोळ कोटाची सर्व बटणे तुटली होती, सबंध अंगावर कुलपी गोळ्यांचे वंगण माखले होते आणि हुद्द्याच्या फितींवर काचेच्या मुलाम्याऐवजी हिमाचा थर बसला होता.

"तुम्ही वर्दी द्यायचं कारण नाही. मला सारं काही ठाऊक आहे. मी स्टेशनवर तुम्हाला पाहिलं होतं. तुमच्या तोफखाना कमांडरचं नांव मला आठवतं, पण तुमचं विसरलो."

"पलटण क्रमांक एकचा कमांडर, लेफ्टनंट कुझ्नेत्सोव."

"तुमच्या तोफखान्याने हे रणगाडे खलास केले?"

"होय कॉम्रेड जनरल. आज आम्ही शत्रूच्या रणगाड्यांवर तोफ झाडीत होतो; पण आमच्याजवळ फक्त सात गोळे होते ... हे रणगाडे आम्ही काल फोडले."

नियमानुसार तटस्थ आवाजात खंबीरपणे बोलण्याचा तो प्रयत्न करीत होता. त्याच्या स्वरात, त्याच्या नजरेत, त्याच्या खिन्न, प्रौढ

गांभिर्यात, जनरल सान्निध्यात असूनही लाजरेबुजरेपणाचा पूर्ण अभाव असलेल्या त्याच्या वागण्यात असे काहीतरी होते की, त्यावरून जाणवत होते: या मुलाने, पलटणीच्या या कमांडरने आपल्या आयुष्याची किंमत देऊन कशावर तरी मात केली होती आणि ज्या गोष्टीवर त्याने मात केली होती व जिला जाणले होते तिच्यामुळे त्याचे डोळे कोरडे आणि कठोर बनले होते, त्यांच्यातून अश्रूंचा पूर लोटू शकत नव्हता. त्या लेफ्टनंटचा आवाज आणि नजर, व आपल्या पलटणीच्या कमांडरमागे तोफेशी उभ्या असलेल्या तीन गोलंदाजांच्या निळसर तांबड्या, खडबडीत चेहऱ्यांवर जवळ जवळ तसाच उमटलेला भाव बघून बेस्सोनोव यांच्या घशात एकदम आवंढा आला. तोफखान्याचा कमांडर जिवंत आहे किंवा नाही, तो कोठे आहे, टेहळयाला आणि जर्मन कैद्याला कुणी आणले या गोष्टी त्यांना विचारायच्या होत्या, पण त्यांनी प्रत्यक्षात काहीही विचारले नाही — ते विचारूच शकले नाही. मोर्चावर वारा जोरात झोंबत होता, त्यांच्या मेंढकातडी कोटाच्या कॉलरला आणि कडांना लगटत होता व त्यांच्या तांबारलेल्या डोळयांमधून पाणी काढीत होता. आपल्या डोळयातले ते कृतज्ञतेचे, कडवट, अतिदुःखाचे कढत अश्रू बेस्सोनोवनी पुसले नाही, भोवती नम्रपणे उभ्या असलेल्या आपल्या अधिकाऱ्यांसमोर डोळयातून पाणी काढताना त्यांना आता शरमल्यासारखे वाटत नव्हते. आपल्या काठीवर त्यांनी जोरात भार दिला व बोझिच्को यांच्याकडे ते वळले. हजारो लोकांचे भवितव्य ठरविण्याचा महान आणि तितकाच धोकेबाज अधिकार त्यांना ज्या सर्वोच्च सत्तेने दिला होता, त्या सर्वोच्च सत्तेच्या वतीने त्यांनी त्या चौघांनाही लाल पताकेचा किताब बहाल केला. मोठ्या कष्टाने ते कसेबसे बोलले, "व्यक्तिशः मला शक्य होईल ते ते सर्व मी करीन... सर्व काही... तुम्ही गारद केलेल्या रणगाड्यांबद्दल आभार. ही मुख्य गोष्ट होती — त्यांचे रणगाडे खतम करणं! ही मुख्य गोष्ट होती."

आणि हातमोजे चढवून ते लगबग चालीने चरामधून पुलाच्या दिशेने निघाले.

आपल्या बधीर बोटांमध्ये त्या बहुमानाच्या पदकाची पेटी धरून कुझ्नेत्सोव तिच्याकडे आठ्या घालून बघत गप्प उभा होता. आपल्या सेनापतीच्या डोळयातले अश्रू पाहिल्यानंतर त्याला अद्यापही आश्चर्य वाटत

होते. परवा स्टेशनवर आणि काल सकाळी तोफांच्या मोर्चावर त्याला आपल्या सेनापतीच्या बारीक अवधानाचे कौतुक वाटले होते, त्यांचा थंड कर्कश्य आवाज त्याच्या मनावर ठसला होता, पण आता सेनापतींच्या स्वभावातला एक नवाच पैलू अनपेक्षितपणे त्याच्या नजरेला पडला होता.

त्याच क्षणाला सार्जंट-मेजर स्कोरिक आणि लेफ्टनंट द्रोझ्दोवस्की नदीजवळच्या सुळक्यावर आले व तोफेनजीकच वरिष्ठ अधिकाऱ्यांना पाहताच तोफखान्याकडे धावत सुटले.

सार्जंट-मेजर स्कोरिक तोफेपासून वळून मुदपाकखान्याच्या गाडीकडे वळला, पण द्रोझ्दोवस्की मात्र एव्हाना तीरापासून शंभर मीटर अंतरावर असलेल्या अधिकाऱ्यांच्या घोळक्याकडे धावला. बेस्सोनोव यांच्यासमोर तो आपल्या रुबाबदार कोटात व घट्ट बांधलेल्या पिस्तुलाच्या पट्ट्यात ताठ उभा राहिला. त्याच्या मानेवर बँडेज होते व चेहरा पांढराफटक पडलेला होता. मोठ्या झोकात त्याने लष्करी थाटाचा सलाम केला. तोफेच्या मोर्चावरच्या कुणालाही तो काय बोलला ते ऐकू आले नाही, पण सेनापतींनी त्याला मिठी मारल्याचे व त्या चौघांना आणि पायदळाच्या खंदकातल्या दोघांना जशा पेट्या दिल्या होत्या तसलीच पेटी त्याला भेट दिल्याचे त्यांनी पाहिले.

"सगळ्यांना आपापला वाटा मिळाला!" मत्सर न धरता उखानोव मनमोकळे हसत तोफेच्या चाकावर बसत म्हणाला. पण रूबिनने मात्र अस्सल शिव्यांची एवढी जबरदस्त सरबत्ती केली की, उखानोव तिरप्या नजरेने त्याच्याकडे कुतूहलाने पहात म्हणाला, "भले शाब्बास ड्रायव्हरमहाराज, काय तयार भाषा आहे तुमची! काय गाडीला जुंपलेल्या घोड्याशी बोलत होता काय? कशाबद्दल एवढं?"

"सगळी मळमळ ओकून टाकावीशी वाटत होती सार्जंट. फार वेळ साचलं होतं."

"ठीक आहे मित्रांनो," उखानोव म्हणाला. "आपल्या पदकांना आपण स्नान घालू या. आणि जर्मनांना चोप दिल्याबद्दल आपल्या दोस्तांच्या नांवाने पिऊ या. आणि जर्मनांनी कुरापत काढल्यानंतर त्यांना चांगली अद्दल घडवल्याबद्दल पिऊ या! बस्स, मला एवढंच म्हणायचंय. बरोबर की नाही लेफ्टनंट? तुम्ही कसे काय आहात? इथं माझ्याजवळ बसा. रूबिन, मला भांडं दे! लेफ्टनंट, जाऊ द्या. एवढं मनाला लावून

घेऊ नका. एक दिवस सारं ठीक होईल. आपले किताब कायम राहणार आहेत."

"ठीक होईल?" कुझ्नेत्सोवने शांतपणे उखानोवचे शब्द परत उच्चारले आणि त्याचा चेहरा वाकडा झाला.

"आपल्या तोफखाना कमांडरचं काहीतरी बिघडलंय," मिशीला पीळ भरीत आणि सुळक्याच्या दिशेने बघत नेचायेव म्हणाला. "तो आंधळ्या माणसासारखा भटकतोय..."

सेनापती व त्यांच्याबरोबरची माणसे पुलाकडे निघून गेली होती. जखमींना ज्या निवाऱ्यात ठेवले होते त्या कड्याच्या दिशेने खोदलेल्या पायऱ्यांवरून द्रोझ्दोवस्की निघाला होता. पण आता द्रोझ्दोवस्की नेहमीप्रमाणे ताठ चालत नव्हता. सेनापतींकडे धावत जाऊन त्यांना रुबाबदारपणे सलाम ठोकण्यात त्याची सारी उरलीसुरली शक्ती संपली होती. आता त्याची मान खाली झुकली होती. जणू आसपास कुणीही नाही अशा तिऱ्हाईतपणे तोफेवरच्या माणसांकडे दुर्लक्ष करून तो चालत होता.

"झोयाच्या मरणापासून तो बदललाय," उखानोव म्हणाला. "पण आपण त्याबद्दल आता विचार करीत बसायचं नाही. तर मित्रांनो, आपल्या पदकांना स्नान घालण्याचा कार्यक्रम हा असा साजरा करायचा!

त्याने ताडपत्रीच्या मधोमध वोदकाने अर्धे भरलेले भांडे ठेवले, आपले पदक दोन बोटांच्या चिमटीत धरले व साखरेची वडी धरल्याप्रमाणे ते भांड्याच्या तळापर्यंत वोदकामध्ये बुडवले. मग रूबिन, नेचायेव आणि कुझ्नेत्सोव यांची पदकेही त्याने तशीच बुडवली.

आळीपाळीने ते सारे वोदका प्यायले. कुझ्नेत्सोवने सर्वांत शेवटी भांडे घेतले. दरम्यान द्रोझ्दोवस्की झिंगल्यासारखा धडपडत, ठेचकाळत क्षीणपणे पायऱ्या उतरून गेला आणि त्याची वाकलेली आकृती सुळक्यापलिकडे दिसेनाशी झाली. नदीवरून वाऱ्याचा जोरात झोत आला आणि तोफेच्या मागल्या भागात त्यांनी झोयाला पुरल्यानंतर जशी केप फडफडली होती, तसाच काहीतरी फडफडल्याचा भास कुझ्नेत्सोवला झाला व त्याच्या हातातले भांडे थरथरले नि भांड्यातल्या तळाची पदके किणकिणली. तरीही तशीच वोदका पीत त्याने त्या मातीच्या पांढुरक्या ढिगाकडे नजर टाकली. झोयाची प्रथमोपचाराच्या सामानाची पिशवी

बर्फाने झाकली गेली होती. त्याला एकदम ठसका लागला व त्याचा जीव घुसमटला. त्याने भांडे बाजूला फेकून दिले आणि उठून तो चरामधून चालत, गळा चोळत तोफेपासून दूर गेला.

"लेफ्टनंट काय झालं? कुठं निघालात लेफ्टनंट?" उखानोव धावत त्याच्यामागे जात उद्गारला.

"काही नाही," कुझ्नेत्सोव अस्पष्ट आवाजात उत्तरला. "मी एका मिनिटात परत येतो. जरा तोफखान्याभोवती एक चक्कर मारतो."

हल्ला चढवणाऱ्या विमानांचा जथा खेड्यावर अगदी खालून उडत होता आणि त्यांच्या घरघराटाने सारे स्तेप भरून गेले होते. पहाटेच्या त्या मंद प्रकाशात त्यांचे पंख गुलाबी चमकत होते· क्षितिजाशी त्यांनी गिरकी घेतली व अदृश्य लक्ष्यांवर झेप घेत त्यांनी सकाळचे वातावरण कर्कश्य गोळीबाराने हादरवून टाकले. समोर जळत असलेल्या खेड्याच्या पलिकडे, काळ्या जांभळ्या रंगाच्या धुराने क्षितिजाला वेढून टाकले व तो पश्चिमेकडे पसरत जाऊ लागला. पश्चिम क्षितिजावर आकाशाच्या भव्य पोकळीत मावळता फिकट चंद्र विरत चालला होता.